काव्यसंग्रह. ४५.

परशुरामकविकृत

# गुरुचरित्र.

हा ग्रंथ

**नारायण चिंतामण केळकर, बी. ए.,**

यांनीं टीपा देऊन तयार केला.

तो

मुंबईत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक

तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

१९०३.

किंमत १॥ रुपया.

# प्रस्तावना.

**गुरुचरित्र**—शालिवाहनाच्या चवदाव्या शतकांत हिंदुधर्माला राजाश्रयाचा जोर नव्हता एवढेंच नव्हे तर उलट त्याजवर यवनांकडून सारखे घाव पडत होते. अशा वेळीं त्या धर्मावरील श्रद्धा कमी न होऊं देतां तो चांगल्या स्थितींत ठेवण्याचें काम फार अवघड होतें तें वरील शतकाच्या प्रथम पादांत श्रीपाद श्रीवल्लभ यांनीं केलें आणि त्यांच्यानंतर थोडे दिवसांनीं श्रीनृसिंहसरस्वति यांणीं अंगिकारिलें. हे दोघेही श्रीदत्तात्रयाचेच अवतार होत.

पहिले श्रीपाद श्रीवल्लभ ह्यांनीं काशींत संन्यास घेतला (अ० ४ गी० ३८) व बद्रिकाश्रम, गोकर्ण इत्यादि तीर्थें करून नंतर ते कृष्णापंचगंगेच्या संगमावर असणाऱ्या कुरवपुरास (हल्लींच्या कुरुंदवाडास) आले (अ० ७ गी० ५।६). तेथील द्विजपुत्रास महाकाळेश्वराचें माहात्म्य सांगून, त्यास ज्ञान दिलें. रजकाची व उदीम विप्राची हकीकत कुरवपुरींच घडली आणि तेथेंच ते शेवटीं गुप्त झाले (अ० ९ गी० ६९) अशी माहिती परशुराम कवीनें दिली आहे. पण मूळ गुरुचरित्रांत श्रीपाद श्रीवल्लभ यांचा अखेरपर्यंत ब्रह्मचर्याश्रमच आहे. शिवाय त्यांचें कुरवपूर हें वृद्ध माहितीप्रमाणें मोगलाईंत कृष्णा स्टेशनजवळ कृष्णेच्या प्रवाहांत कुरुगड्डी या नांवाचें एक बेट आहे तें होय. येथील श्रीगुरूंच्या देवालयांत बंद केलेली गुहा असून श्रींच्या पादुकाही आहेत.

त्यानंतर दुसरा अवतार श्रीनृसिंहसरस्वतीचा (अ० ९). येथून शेवटपर्यंतचें चरित्र व चमत्कार यांचेच आहेत. यांनीं वाडी नरसिंह येथें बारा वर्षें राहून तेथें पादुका ठेवून भीमामरजेच्या संगमावरील गाणगापुरीं गमन केलें, आणि अनेक यात्रा करून हे शेवटीं गाणगापुरासच गेले. नरसोबाची वाडी आणि गाणगापुर हीं दोन्ही स्थानें महाराष्ट्रीयांस अत्यंत पूज्य असून अद्यापिही दरवर्षीं हजारों भाविक लोक या ठिकाणीं जातात. गुरुद्वादशीस वाडीस सुमारें पंचवीस हजारपर्यंत लोक प्रसादाकरितां येतात

**परशुराम** कवि—ह्या कवीनें 'साग्रगुरुचरित्र' (गीति ३७८३) व 'गुरुचरित्रसार-मनोरमा' (श्लोक ५२) असे दोन ग्रंथ केले आहेत. हा रामात्मज जो बच्याजी त्याचा पुत्र एवढीच माहिती यानें वरील ग्रंथांत केलेल्या उल्लेखावरून आम्हांस झाली होती. पण पहिले अकरा अध्याय छापून झाल्यावर नृसिंहवाडी येथील आमचे अत्यंत परिचित रा० रा० कृष्णाजी नरहर वाडीकर यांनीं कळविलें कीं तेथें याच पोथीची अस्सल

---

१. नृसिंहवाडीच्या सुसंगत व सविस्तर वर्णनाकरितां कै. रा. रा. सदाशिव मोरेश्वर भिडे यांचा नृसिंहवाडीचा इतिहास पहा. कुरवपूर, अमरपूर (औरवाड) व शिरोळ हीं तिन्ही मिळून पूर्वीची नृसिंहवाडी. हल्लींची वाडी ही शिरोळची वाडी होय. येथील वस्ती सुमारें २०० वर्षांची आहे. तत्पूर्वी येथें जंगल होतें.

सुवाच्य हस्तलिखित प्रत असून तीवर पुढील शेरा आहेः—'ह्या गुरुचरित्र आर्या परशुराम बच्याजी ढवळे वास्तव्य वेळवंड तर्फ हातखंबें तालुके रत्नागिरी यांणीं करून गुरुदेवदत्त यास अर्पणार्थ वाडी नरसोबाची येथें आपले चिरंजीव बाळकृष्ण यांजबरोबर पाठविल्या त्या पुजारी रामभट्ट बिन बापूभट्ट बड्डु यांचे विद्यमानें श्रीस अर्पण केल्या. या पुस्तकाचें संरक्षण व प्रशंसा रामभट्टजी यांणीं करावी. कोणास पाहिजे असल्यास याची प्रत करूं द्यावी. इतर पुजारी यांचा वारसा या पोथीवर नाहीं. मिती वैशाख शुद्ध पौर्णिमा शके सतराशें एक्यांशीं सिद्धार्थी नाम संवत्सर?' यावरून हा कवि अगदीं अलीकडचा होय. पंतांबद्दल त्याला पूज्यभाव होता हें ह्याच्या पुढील गीतीवरून दिसेल.

'भागवतभारतादि श्रीरामायण अनेक आर्यांनीं ।
मोरेश्वर कवि वदला पहावया योग्य सर्व आर्यांनीं. ॥ अ० १ गी० २५

ह्याच्याच पुढील दोन गीतींत आपणाला गुरुचरित्र लिहिण्याची प्रेरणा कशी झाली तें कवीनें सांगितलें आहे.

'मच्चरितासि वदावें तों आयुर्दाय पूर्ण तो सरला ।
आर्याकवितासरितापूर पुढें मग तसाच वोसरला ॥ २६ ॥
तरि आर्याघन वर्षुनि, भरिं तूं रे! मच्चरित्र गंगाला ।
देईल वहावुनियां श्रुतिमात्रें सर्व अघतरंगाला ॥ २७ ॥

या गुरुचरित्रांतील कविता फार सोपी आहे व कित्येक ठिकाणीं यमकेंही पंतांच्या नमुन्यावर साधण्याचा प्रयत्न केला आहे. पण एकंदरींत शब्दांची ओढताण फार केली असून कवींच्या सर्व हक्कांचा यानें पूर्ण उपयोग केला आहे. नेम=अन्न, अश्मा=मेघ, बर्बु=कमल, वस्वि=रात्र, असे कोनाकोपऱ्यांतले व वेदांतील अर्थानें घेतलेले अनेक शब्द मधून मधून आढळतात. यावरून या कवीचा निरुक्तादिकांशीं चांगला परिचय असावा असें दिसतें. एकंदरींत भाविकांना व विशेषेंकरून दत्तभक्तांना हें नवीन आर्याबद्ध गुरुचरित्रसार सहज समजेल व आवडेल असें वाटतें.

'गुरुचरित्रसारमनोरमा' हें छोटेखानी प्रकरण आपल्या नांवाप्रमाणें मनोरम आहे.

वर दिलेली वाडी प्रतींतील माहिती व त्याच पोथींतील पाठांतरें पाठवून इतर अनेक महत्वाच्या सूचना केल्याबद्दल रा० रा० कृष्णाजी नरहर वाडीकर यांचे आम्ही अत्यंत ऋणी आहों. त्याचप्रमाणें धुळें येथील रा० रा० अंताजी चिंतामण दामले यांनीं जी मदत केली तिजबद्दलही आम्ही त्यांचे आभार मानिले पाहिजेत.

काव्यसंग्रहकार.

---

॥ ॥ ॥

# अनुक्रमणिका.

# परशुरामकविकृत कवितासंग्रह.

## गुरुचरित्र.[1]

(गीतिवृत्त.)

### अध्याय पहिला.

गणपतिसरस्वतीच्यो[2] नमितों मीं [3]मातृपितृपदकमला, ।
गुरुचरिता वर्णाया द्या हृदयीं ज्ञानबुद्धिपदक मला. ॥ १

श्रीहरिगुरुपदकमला साष्टांगीं नमुनि, हृदयकमलातें ।
पूजीं सद्भावें मीं, जें कां सद्बुद्धिदायक मला तें. ॥ २

श्रीपाद श्रीवल्लभ श्रीगुरु नरसिंह दत्त अवतारी, ।
[4]भद्रसने ! तच्चरिता बोलवुनी हा समुद्र [5]भव तारीं. ॥ ३

भजतां तव चरणासी, देशी ज्ञानासि तूं [6]दयाउदधी; ।
संशय नसे यदर्थीं, लोणी मथितांचि येत जेंवि दधी. ॥ ४

तव [7]पदिं भजती त्यांचे हरिसी करुनीच तूं कृपा [8]दर जे ।
दीर्घायुःश्रीसुत नर पावुनि ते होति मुक्त पादरजें. ॥ ५

---

१. 'गुरुचरित्र' हा एक सुप्रसिद्ध ओवीबद्ध मराठी ग्रंथ आहे. हा गंगाधरसरस्वती यांनीं लिहिला असून त्यांत श्रीनृसिंहसरस्वतीची कथा सिद्ध व नामधारक यांच्या संवादरूपानें लिहिली आहे. हे नृसिंहसरस्वती कृष्णसरस्वतींचे शिष्य असून यांस भक्तजन दत्तात्रयाचा अवतार असें मानितात. हे गाणगापुरास असत. यांच्या शिष्यमंडळांत 'गुरुचरित्र'कार गंगाधर-सरस्वती, एकनाथाचे गुरु जनार्दनस्वामी, गीतेवरील मराठी ओवीबद्ध टीकेचे कर्ते दासोपंत वगैरे ठळक ठळक पुरुष होते. एकनाथाचा जन्म शक १४७० आहे म्हणून नृसिंहसरस्वती हे शके १४५० च्या सुमारास प्रसिद्धीस आले असावे. यांची समाधि नरसोबाचे वाडीस असून त्या प्रांतीं त्यांचें भक्तमंडळ फार मोठें आहे. प्रस्तुत ग्रंथांत परशुराम कवीनें गंगाधरसरस्वतीच्या गुरुचरित्रांतील कथाभाग गीतिवृत्तामध्यें वर्णन केला आहे. २. यापुढें 'पदकमला' याचा अध्याहार आहे. ३. येथें एक मात्रा कमी पडते. 'मातृपितृचरणकमला' असा पाठ कल्पिल्यास मात्रांची भरती होईल. ४. माझ्या जिव्हे ! ५. संसार. येथें 'भवसमुद्र' असें अर्थानें घेतां येतें. ६. येथें समास असून संधि केला नाहीं. ७. येथें 'पद' असा पाठ बरा. ८. भय.

ऐशी तव पदकीर्ती राम[1]सुता सांगतांचि संतांनीं[2], ।
पारायण तव चरिता करि मग इच्छा धरोनि संतानीं[3]. ॥ ६
करितां एक अवर्तन[4] जालों उत्पन्न पोटिं बाळक मी, ।
भवभय निरसुनि जाली संसाराची हि ते अबाळ[5] कमी. ॥ ७
वडिलांपासुनि ऐसें भजतों श्रीगुरु! तुझे सुपादास, ।
इच्छा वर्णिन चरिता, जालों, मजवरि करीं कृपा, दास. ॥ ८
सागरवलयांकित भू करोनि कागद तुझ्या चरित्रातें, ।
लिहितां न सरे, परि तें ठसलें मज सत्य अंतरिं त्रातें. ॥ ९
श्रीगुरु! तव गुणकीर्तीचरितसुधेचे अपार सागर जे, ।
नलगे अंत तयांचा षट्शास्त्रें[6] वेद ही असा गरजे. ॥ १०
वर्णन नव्हेचि शेषा परि त्यांतिल बिंदुमात्र सिद्ध वदे, ।
शिष्यातें प्रीति[7] कसें[8] गोपींसी ज्ञान जेंवि उद्धव दे. ॥ ११
बिंदूतिलसर्षप[9]भरि, वर्णन करुं इच्छि माजि गा! जिभली[10], ।
इजला परि[11] करिं[12] ऐशी, म्हणती जन सर्व सत्य गांजि[13] भली. ॥ १२
सर्षपवद्वीज असे, परि कैसा पसरिला दिसे वर्टे[14] तो, ।
मन्मति अल्प परि तसा, करवुनि विस्तार लावि सेवट तो. ॥ १३
श्रीगुरु! तुझ्या कृपेनें, सुरगुरुसीं बोलतां मुका हरवी, ।
अंध परीक्षी रत्नें, पंगू स्पर्शिल उडोनि[15] देह रवी. ॥ १४
ऐसें तुझ्या कृपेचें, जाणुनि सामर्थ्य सत्य मन्मनिं कीं, ।
निश्चय केला वर्णिन, तव कीर्ति, धरूनि पादपद्म, निकी[16]. ॥ १५
यास्तव कृपा करोनी, वदवीं चरितासि तूं गुरु स्वामी! ।
इच्छा पुरेल मग ती, तुजवरि मग तो करीं न रुस्वा[17] मी. ॥ १६
वदविसि[18] जें करिं ऐसें, देखुनि ते प्रीतिं संत मानवती. ।
शीतजळीं प्रीति जशीं धरिती येतां वसंत मानव ती. ॥ १७

१. राम=कवि परशुराम याचा पितामह; रामसुत म्ह० बचाजीपंत हा प्रस्तुत कवीचा पिता. २. साधूंनी. ३. अपत्याविषयीं. ४. आवर्तन, आवृत्ति. ५. हाल. ६. सहाशास्त्रें:— न्याय, मीमांसा, वेदांत, वैशेषिक, सांख्य आणि योग. ७. प्रीतीनें. ८. कसें म्हणाल तर. ९. सर्षप=मोहरी. १०. जीभ. ११. परंतु. १२. (देवा तूं) कर. १३. मोठें काम करणारी. १४. वडाचें झाड. १५. (त्याचा) देह उडोनि पंगू रवी स्पर्शिल. १६. चांगली, पवित्र. हें 'कीर्ति'चें विशेषण. १७. रुसवा, राग. १८. जें वदविसि (तें) ऐसें करिं (कीं) तें देखुनि संत प्रीतिं (प्रीतीनें) मानवती (पसंत करितील).

मत्पापें, तव चरिता वदवुनि मज उद्धरीं, न पाहा तीं, ।
आलें जरि तत्र चित्ता, लेखनिसीं तरि धरीन पां हातीं. ॥ १८
गुरुपदिं शिर ठेवुनियां, करितां स्तुति ऐसि येत नीज मला ।
तों स्वप्नीं गुरु शिरिं कर, ठेवी मग हर्ष मन्मनीं जमला. ॥ १९
शिरिं कर ठेवुनि बोले, 'मी जें सांगेन [1]ती न [2]व्याकर्णी, ।
तें च लिही; तुज लागे शब्दाची पद्धती नव्या कर्णीं. ॥ २०
नलगे व्युत्पत्ति तुला, [3]मात्रासाधन करावयास हि तें ।
[4]वदसी जें तें सज्जन पाहति जे जोडती तयांस हितें. ॥ २१
आवड बहुत शशीतें, अर्पण करितां धरोनि भाव [5]दशी, ।
तैसें मज बहु हर्षें, आवडतें मच्चरित्र जें वदशी. ॥ २२
वदसी मच्चरिता [6]जे, तें ऐकति पढति त्यांस हो! यम न ।
जाची; [7]ईप्सित मनिंचें त्यां पावुनि हर्षयुक्त होय मन. ॥ २३
परि [8]गीत्यार्यावृत्तें, मच्चरितासी वदेंचि हो! मधुर. ।
श्रवणें दीर्घायू [9]दे, यज्ञाचा जेंवि देचि होम धुर. ॥ २४
भागवतभारतादि श्रीरामायण अनेक आर्यांनीं, ।
[10]मोरेश्वर कवि वदला, पहावया योग्य सर्व [11]आर्यांनीं. ॥ २५
मच्चरितासिं वदावें, तों [12]आयुर्दाय पूर्ण तो सरला, ।
आर्याकवितासरितापूर पुढें मग तसाचि वोसरला. ॥ २६
तरि आर्याघन वर्षुनि, भरिं तूं रे! मच्चरित्र[13]गंगाळा, ।
देईल वहावुनियां श्रुतिमात्रें सर्व अघतरंगाला. ॥ २७
आर्यावृत्त न जाणें, म्हणसिल जरि थोडक्यांत गा! तूतें ।
सांगेन, [14]पिंगळाही तो करि जें प्रकट सत्य [15]गातूतें. ॥ २८
[16]पिंगळउरग बहु वृत्तें वदला छंदीं शिवप्रसादें तो, ।
परि आर्यारस जो कां, तोष बहुत फार मानसा देतो. ॥ २९

---

१. 'तें' असावेंसें वाटतें. २. वाटाघाट करूं नकोस. ३. मात्रा म्हणजे अक्षर उच्चारण्यास गणारा काळ. ४. जें वदसी तें जे सज्जन पाहति तयांस हितें जोडती—असा अन्वय. वस्त्राच्या कांठाचा धागा. ६. ज्या. ७. इच्छित. ८. गीति नांवाचें आर्यावृत्त त्यानें. याचा कर्ता 'चरित'. १०. कविशिरोमणी मोरोपंत. ११. श्रेष्ठ लोकांनीं. १२. पंतांचा १. गंगाल=पात्रविशेष. १४. तो पिंगलाही जें सत्य गातूंतें प्रकट करि—असा अन्वय. १५. गातू= गारा, कवि. १६. पिंगल नाग. हा एक छंदःशास्त्रप्रवर्तक ऋषि होता.

लावण्यवल्यलंकृत पतिव्रता आचरें[1] जशी युवती, ।
शोभे आर्याकविता छंदीं तालीं स्वरीं तशी युव[2] ती. ॥ ३०
तो सांठिमात्र[3]कार्यारस कविसी देतसे अति चवेस, ।
त्या आर्यानगरातें शिरावया दावि तो सुंति[4] च वेसें[5]. ॥ ३१
दृढ मंदिरें असाया स्थापिति दृढ संदें[6] बंद चैंवथारे[7], ।
तैसी गणमात्रासह बैसवितार्यारसीं सुचव थारे[8]. ॥ ३२
द्वय अर्धरि[9] चार चरण, मिळुनि असति गण समग्र चवदा ते, ।
आणिक मध्यांतीं ते, दोनचि गुरु तेचि रसिकचवदाते. ॥ ३३
चवदा गण दोन गुरुहि मिळुनि असति मात्रिका परिसुं सांठ[10]. ।
चालति शीघ्र कवीच्या वदनांतरिं मारुतापरि सुसाट. ॥ ३४
असती गणाठ परि हो ! पंच[11]आर्या[12]कविर्ति ते कविमुखांत, ।
शोभति जैसे रात्रीं, कवि[13] गुरु बुध भूमि[14]पुत्र विधु[15] खांत[16]. ॥ ३५
ते कोण गण म्हणालचि, तरि आठ हि सर्व सांगतों आधीं, ।
तन्मननें सुकवीची, जाय हरुनि निपट सर्व हो ! आंधी[17]. ॥ ३६
**म**गण **य**गण **र**गण **स**गण **त**गण **ज**गण **भ**गण **न**गण हे अष्ट, ।
असती यांतिल पांचचि, आर्याछंदांत योजिले स्पष्ट. ॥ ३७
ते कोण कोण ऐका, **म**गण **स**गण **ज**गण **भ**गण **न**गणा यां, ।
एकैक गणा मात्रा, किति त्या सांगेन मोजुन गणाया[18]. ॥ ३८
एकैक गणा मात्रा, जाणाव्या चार चार त्या असती, ।
होतां पंच त्रीणी, अशुद्ध आर्या हि ते जशी असती[19]. ॥ ३९
षण्मात्रिका **म**गण जो, त्रिमात्रिका **न**गण बोलिला श्लोका[20], ।
परि आर्यावृत्तातें, चतुश्चतुर्वदत पिंगल, श्लोकां[21]. ॥ ४०
आतां मात्राभेदन, सांगेनचि तें मनांत आणावें, ।
गुर्वक्षर द्विमात्री, लघ्वक्षर एकमात्र जाणावें. ॥ ४१

---

१. चांगल्या आचरणानें. २. चांगली. ३. गीति छंदाच्या चार चरणाच्या मिळून साठ (१२+१८+१२+१८) मात्रा होतात. ४. सरळ. ५. वेश. ६. संद बंद=सबंध, सलग (?). ७. चौथरे. ८. राहते. ९. आर्येचा अर्ध, अर्धली. १०. साठ. एका गणाच्या मात्रा चार याप्रमाणें. चौदाच्या ५६ अधिक दोन गुरूच्या ४ मिळून एकंदर ६०. ११. पांचगण. १२. आर्या वृत्तांत. १३. शुक्र. १४. मंगळ. १५. चंद्र. १६. आकाशांत. १७. चिंता. १८. मोजावयास. १९. जारिणी. २०. अक्षरगण वृत्ताला. २१. श्लोका=वाचा—अशी टीप मूळ पोथींत दिली आहे. धा० 'श्लोक=कविता करणें'.

लघु गुरु भेद कसा तो, क-कि-कु-कृ-सम अक्षरांसि लघु म्हणती, ।
का-की-कू-के-कै-को-कौ-कं-कः-कृ तयांसि गुरु गणती. ॥ ४२

आणिक गुरुभेद असे, जोडाक्षर जें असे पुढें जरि तें, ।
मागील*अक्षरासी, जाणा येतें गुरुत्व हो तरि तें. ॥ ४३

क ख ग घ ङ फळ व [1]ल्यातें छ क्ष ज्ञ हिं अक्षरें [2]वेळिस येती, ।
परि [3]तत्प्राक् जें अक्षर, तयासि सहजें गुरुत्वता ये ती. ॥ ४४

आतां गणभेद कसे सांगेनचि पूर्ण सर्व हि वदोनी, ।
द्विलघु प्राग्गुर्वंतीं तोचि **स**गण, **म**गण गुरु जया दोनी. ॥ ४५

आद्य गुरु मग लघु ज्या, तोचि **भ**गण, **न**गण लघु जया चार, ।
आद्यंतीं लघु मध्यें, असेचि गुरु तोचि **ज**गण उच्चार. ॥ ४६

धरिती **ज**गण द्विचतुःस्थानीं जरि तरि विशेष परिसावा, ।
अथवा **न**गण ऽथवा [4]लघु, दोंतूनी एक धरिति परि [5]सावा. ॥ ४७

एकैक अर्धरीतें [6]गुर्वेकैकचि गण असति ते सप्त ।
परि **ज**गणा विषमस्थीं, न धरिति कवि जेंवि धातु जी तप्त. ॥ ४८

अर्धरिअंतिं लघु हि गुरु होत असे, चरणअंतिं हि तसाच, ।
लघु ही गुरु कचित् परि ग्राह्य न [7]संयोगिं [8]गुरुरहित साच. ॥ ४९

प्रथम तृतीय [9]पदातें, असती गण तीन तीन परिसा च, ।
द्विचतुश्चरणीं ते गण, चतुश्चतुर्गुरु तयांतिं परि साच. ॥ ५०

गणमात्राभेद [10]असे, आर्याछंदांसि जाणती ज्ञाते, ।
आतां भाषायोगें, [11]ल्यांग गुरुत्वास होत संज्ञा ते. ॥ ५१

जोडाक्षर क्या-ख्यादि, व्या-ह्यापर्यंत अक्षराप्राग् जें ।
अक्षर गुरु होतें परि, तें लघु भाषापरत्विं हो ! साजे. ॥ ५२

आणिकहि ल्ये म्ह न्हा व्हा व्हे म्हा म्ही आदिचें लघुच राही, ।
फोड करीन तयांची, सादरता देउनी मौंन धरा ही. ॥ ५३

---

१. 'क'–'ल' या अक्षरापुढें. २. ओळीनें. ३. 'छ' 'क्ष' 'ज्ञ' यांच्या पूर्वींचें. ४. चारही अक्षरें लघु असतात असा मात्रागण. ५. सहावा. ६. ज्यामध्यें एकतरी गुरु अक्षर आहे असे. ७. पुढें जोडाक्षर असतां. ८. द्विमात्रक नव्हे; एकमात्रक. ९. चरणांत. १०. वर सांगितल्याप्रमाणें. ११. पुढें जोडाक्षर असूनही केव्हां केव्हां बोलण्याच्या पद्धतीप्रमाणें मागील ऱ्हस्वाक्षरास गुरुत्व प्राप्त होत नाहीं.

इतक्या सल्या उग्या हो ! नध्याच चिमव्या मिठ्या कुड्याचि नव्हा, ।
सुगुढ्या उण्या पित्याच्या, कुरथ्या परि असु न द्या सुध्या चिप व्हा. ॥
न सुन्या वृत्ति तप्यांच्या सकप्यांच्या हृच्छिब्या उभ्याधि नव्या, ।
सदम्या पुन्या भल्यांनीं दद्यांसि भक्षून ये हृदय खन ब्या. ॥ ५५
कृष्णेंत न्हा, नव्हेची तुम्हासि यमभय तुम्ही सुखें स्वर्गीं ।
नांदालचि म्हणत्यें अघतस्कर शिर उडवुनी सुकृतस्वर्गीं. ॥ ५६
आतां अनेक आर्या, कृति पद्धतितें गुरुप्रसादानें, ।
सांगुनि तृप्त करिन बुधजनमन जें नृपति विप्रसा दानें. ॥ ५७
एकैक दलीं गण जे, सांगितले सप्त सप्त गुर्वंती, ।
तैसेचि सकल आर्यादलीं परी परिसिजे सुधीवंतीं. ॥ ५८
येउनि लघु अंत्यपदीं, त्रिगणाचा आद्य पाद होतां कीं, ।
पथ्या च नाम तीतें; येतें लोणी जसें अहो ! ताकीं. ॥ ५९
उल्लंघुनि गण तीन चतुर्गण मध्येंचि पाद ते विपुला, ।
दे कपिला वपुला देखे त्या तोष जसि तें विपुला. ॥ ६०
उभय हि दलीं जगण तो, द्वितीय चौथा म्हणावि ते चपला, ।
कविता करील जो तो महा सुकवि जों लवे चपला. ॥ ६१
पूर्वार्धरी चपलवत् जिची द्वितीयार्धरी हि भलतीशी, ।
ज्ञाते ठेविति नामा, मुखचपला या सकल तीर्शीं. ॥ ६२
प्रथमार्धरि भलतीशी, असली जरि तरिं असोचि परि दुसरी, ।
जघनचपला तिला ऽल्या, असे जिलार्धरी सुचपलिसरी. ॥ ६३
सुप्रथम अर्धरी जसि, तसि असली जरि दुजी हि अर्धरि ती, ।
गीती नाम तियेचें, गायक जे प्रीतिनें हृदीं धरिती. ॥ ६४
चपला परार्धरीं जसि, तसींच दोनी दलें होती, ।
उपगीति याचि नामा, वदोनि गाती भले हो! ती. ॥ ६५
जीस प्रथमदलीं षट्, लघु द्वितीये दलीं होते, ।
गीतीवत् सप्त गणचि, तरिं उद्गीतीच शुद्ध ती होते. ॥ ६६
उभय दलाचे ठायीं, द्विर्द्विगुरु शेवटीं जिचे असती ती, ।
आर्यागीत्यष्टगणी, शुद्ध जशी अत्रिभूमिदेवसती ती. ॥ ६७
आर्यावृत्त असें हें, तुझिया राहोनि हृदयघृतजा तें, ।

---

१. मर्यात. २. बुद्धिमानांनीं. ३. वीज. ४. अनुसूया. ५. घृत म्ह० पाणी त्यांत झालेलें कमळ, त्याला. 'घनरसमम्बुक्षीरं घृतममृतं जीवनं भुवनम्' रत्नकोष.

सुज्ञानदीप उजळिन, मी मनपात्रीं सुबुद्धिघृतजातें.[१]' ॥　　६८
गुरु आश्वासन या परि, येतां विनती करीं अशि कवींला, ।
जाईल अर्थ जेथें, गुरुसम मज पाहिजेचि शिकवीला. ॥　　६९
आतां साधू सज्जन, संत महंतांसि मी नमस्कार ।
करितों ऐका सादर, न करावा जी! कदां तिरस्कार. ॥　　७०
मंदमती मी मजला नाहीं व्युत्पत्तिचाहि तो समज, ।
सांगति गुरु जेंवि तसें बोलें, ठेवा कदा न दोष मज. ॥　　७१
दत्तात्रय जो स्वामी, तो हा श्रीगुरु महींत अवतरला, ।
भक्ति[२] भजे तत्पायीं, तो इच्छित पावुनी हि भव तरला. ॥　　७२
श्रीपाद श्रीवल्लभ, नाम तया आणखीं दुजें म्हणती ।
नरहरिसरस्वती हें, परि नामां त्याचिया नसे गणती. ॥　　७३
वास सदैव तयाचा, कुरवपुरीं[३] आणि गाणगागांवीं[४], ।
भजतां इच्छित देतो, कीर्ति तयाची कितीक सांगावी. ॥　　७४
आतां सादर चित्तें, ऐकावें तत् तुम्ही चरित्रास, ।
नर एक फार[५] पावे करितां संसार अंतरिं त्रास. ॥　　७५
भोगी बहु कष्टा मग, ऐके श्रीपादनाम कर्णीं हें, ।
होऊनि विरक्त निघे, त्यास असे नाम नामकर्णी हें. ॥　　७६
गुरुभजना करि, घे तो दत्त श्रीपाद नरहरी नांव, ।
भवनिधि तरावया तो, हे श्रीवरपाद नरहरी नाव. ॥　　७७
बोले, 'हे गुरुराजा! त्रैमूर्ती दत्त तोचि अवतरसी, ।
भव तारुनि भक्तासी, नेसी परि मज किमर्थ अंतरसी? ॥　　७८
वंशोवंशीं भक्ती करितों देवा! तुझेचि कीं चरणीं, ।
भोगविसी मज कष्टा, पडतां भूवरि जसा अकिंच[६] रणीं. ॥　　७९
दातृत्वाविषयीं तुजवांचुनि मजला दिसे न दुसरा जी! ।
याचक मी दीन असें, हो मजला तूं कदा न रुस, राजी. ॥　　८०
सर्वहि देवालागीं, तुजविण दुसरा नसेच हो! दाता ।
तुजविण मागूं कोणा, अधरातें उघडुनी चहों दांतां? ॥　　८१

१. सुबुद्धिरूप पुष्कळ तुपानें. २. भक्तीनें. ३. कुरवपुर=कुरुंदवाडाजवळची नरसोबाची वाडी. येथें कृष्णा व पंचगंगा यांचा संगम झाला आहे. ४. गाणगापुरीं. ५. हें 'त्रासा'चें विशेषण. ६. गरीब (?).

म्हणसिल केली नाहीं, त्वां चरणांची कधींहि सेवा ते, ।
सरिता न करिति सेवा, घन जलपूर्ती करीतसे [1]वातें. ॥ ८२

सेवा घेउनि देतां, दातृत्वा बोलताति सामान्य, ।
मग तुजलागीं [2]निर्जर दातासा बोलती कसा मान्य? ॥ ८३

दिधल्यावांचुनि देणें न घडे धरिलें असें तुवां मनिं हो! ।
बळि पायांतळिं रगडिसि, देतां भूदान वेषिं [3]वामनिं हो! ॥ ८४

कनकाची जे नगरी देशी [4]वासा बिभीषणा असुरा, ।
त्यानें पूर्वीं नगरी, दिली तशी कोणत्या जि! [5]भूमिसुरा? ॥ ८५

देशी त्या क्षुधिताला, क्षीरोदधि उत्तमोपमन्यूतें, ।
मजवरि काय कराया, कारण वद [6]वृत्त [7]मोप [8]मन्यूतें. ॥ ८६

मुठिभर पोहे भक्षुनि, हेमपुरी देशि त्या सुदाम्यातें, ।
केलें काय असे जी! न दाविसि हि मार्ग मज [9]सुधाम्यातें. ॥ ८७

निःक्षेत्री भू करुनी विप्रांसी देशि, आणि तैसा च ।
स्थापिसि अढळ पदीं ध्रुव, देती ते काय सांग पैं साच? ॥ ८८

धांवसि पवनाहुनियां ऐकुनियां हाक ते [10]गजवराची, ।
दे दर्शन मात्र मला, घालींना भीड मी तुज [11]वराची. ॥ ८९

खांडवदहनीं रक्षिसि कृपाकवच घालुनी [12]द्विजपिल्याला, ।
तोचि तव कृपाकवचा, जो [13]हरिरित्यक्षरद्वि [14]जपि, [15]त्याला. ॥ ९०

ऐसा त्वन्नामाचा महिमा वदतीच [16]निगमं [17]दर्शन ही; ।
वदतों त्वन्नाम मला देशि न कां पडुं हि सुगम दर्शन ही? ॥ ९१

काय उणें तुज आहे? मागसि तूं काय साच सांग मला? ।
षड्गुणऐश्वर्यें तूं संपन्न, दुजा न मानसा गमला. ॥ ९२

सृष्टी पोषण करिसी, लक्ष्मी घरिं वावरे जशी दासी, ।
देऊं काय अशा तुज, ध्यातों निशिदिन तुझ्याच पादासी. ॥ ९३

माझें [18]पूर्वजऋण कीं, असेचि तुजवरि तयासि देउनि तें, ।

---

१. वाऱ्याच्या मदतीनें. २. देव. ३. वामनरूप धारण केलें होतें तेव्हां. ४. राहण्यास. ५. ब्राह्मणास. ब्राह्मणास दिलें असतां देवास दिल्यासारखेंच आहे. ६. झालेलें किंवा हकीकत. ७. पुष्कळ. ८. रागास. ९. 'धाम्या' हें उपहासदर्शक पद माध्यंदिनास लावलेलें आढळतें. १०. गजेंद्राची. ११. वर देण्याची. १२. शार्ङ्ग पक्ष्याच्या चार पिल्यांनां. १३. 'हरि' हीं दोन अक्षरें. १४. जपतो, वारंवार भक्तीनें उच्चारितो. १५. याचें कर्म 'कृपाकवचा.' १६. वेद. १७. शास्त्र. १८. वाडवडिलांनीं केलेली भक्ति हेंच ऋण.

फाडीं खत अज्ञान हि, साधू सद्भक्त साक्षि ठेवुनि तें. ॥ ९४
[1]कोण्या अपराधास्तव धरिसी जरि कोप, ये न कामातें, ।
अज्ञानत्वें बालक मारी जरिं, कोप ये न(चि?) कां मातें[2]? ॥ ९५
तूं माता, तूंचि पिता, सांगूं कोणासि दुःखवैभव[3] हें? ।
लावुनि चरणा तारीं, मोडुनि अज्ञान दुःख वै[4] भव[5] हें[6]. ॥ ९६
दीना तारक ऐसें, बोलति तुजला ऽठरा[7] तसे सा[8] ही, ।
न करुनि माझ्या त्यागा, अपराधातें अजा! कैसें साहीं[9]. ॥ ९७
मत्करुणाशब्द कसे न श्रवणीं घालिसी असे हे तूं? ।
संकट न घालि कांहीं, परि पाहिन तव पदा असे हेतू.' ॥ ९८
ऐसा धांवा ऐकुनि, येउनि पथ दावि त्यासि नें भयाचे[10], ।
जाळी अज्ञाना मग, तम जैसें मित्र[11] नाशि नभयाचें[12]. ॥ ९९
हृत्कमळामाझारीं गुरुमूर्ती बसवुनी विचारेंसी, ।
द्रव्यें कल्पुनि मानसपूजन करि षोडशोपचारेंसी[13]. ॥ १००
साष्टांगीं आनंदें, नमोनि जोडोनि युग्म[14] कीं करि तो, ।
वारंवार नमितसे, रामात्मजपुत्र एक किंकर[15] तो. ॥ १०१

---

## अध्याय दुसरा.

मानसिं ध्यातचि गुरुसी चाले मार्गासि नामधारक तो ।
श्रमुनी निद्रावस्थे[16] पाहे श्रीपादनामधारक तो. ॥ १
व्याघ्रांबर [17]परिधानीं, भगव्या वस्त्रासि, भस्म अंगीं, तें, ।
पाहुनि जागृत होतां पाही तैसाचि सिद्ध [18]योगीतें. ॥ २
नमुनि पुसे मुनितें त्या, 'कोण तुं रे! सांग वर्तमानाला, ।
शरण असें गुरु! तुजला त्यागुनि भोगासि सर्व मानाला.' ॥ ३
सांगे सिद्ध तयातें[19] योगी आपण वसें त्रिभुवनीं तें, ।
अस्मच्छ्रीगुरु नरहरि, वास जया गाणगासुभुवनीं तें. ॥ ४

---

१. एखाद्या. २. आईला. ३. फार दुःख. ४. पादपूरणार्थक अव्यय. ५. संसार. ६. हें सर्व. ७. अठरा पुराणें. ८. सहा शास्त्रें. ९. सहन कर कसा. १०. निर्भयतेचे (पथ). ११. सूर्य. १२. आकाशाचे. १३. षोडशोपचारांनीं. १४. दोन हात. १५. दास, सेवक. १६. झोंपेंत. १७. नेसण्यांत, पांघरण्यांत. १८. सिद्धनामक योग्यास. १९. नामधारकाला.

भीमामरजासंगम तेथें तो राहि भक्त रक्षाया, ।
त्याच्या भक्ता दैन्यहि नाहीं नाहींच येत लक्षाया. ॥ ५

सिद्ध[1] स्तवितां गुरुसीं, सांगे[2], 'मीं त्या गुरूसि हो ! भजतों, ।
वंशोवंशीं भक्ती करितां कष्टा किमर्थ दे मज तो? ॥ ६

गुरुविण अज्ञानाचा नाहीं कल्पांतिं होत नाश, मला ।
सांगति साधु असें कीं देखुं न भवताप गुरुविना शमला. ॥ ७

तारक गुरु तूं आम्हा, माझे मनसंशया निवारीजे, ।
जैसें शरदृतूतें सरिताचें शुद्ध होय वारी जें.' ॥ ८

सिद्ध म्हणे, 'मग त्याला गुरु तो अक्षयि कृपाळु भक्तजना, ।
सांगसि[5] भोगीं कष्टा, नसेल दृढता तुझे मनीं भजना. ॥ ९

त्रैमूर्ती गुरु म्हणउनि भजतां तारोनि देत सौख्यातें, ।
विधि हरि हर कोपति जरि रक्षी भक्ता अशीच आख्या ते. ॥ १०

आपण कोपे ज्यावरि रक्षूं न शकति तयासि शिव[6] सर्व[7], ।
इतरांची काय कथा? कर्ता गुरुराज एक शिव[8] सर्व' ॥ ११

शिष्य वदे, 'गुरु! बोलसि कोपे ज्या वरि महेश वा हरि तो, ।
श्रीगुरु मात्र तयासी रक्षुनियां शंभु केशवा हरितो. ॥ १२

वदसी आणिक नवलहि श्रीगुरु धरि पूर्ण कोप ज्यावर तो, ।
रक्षाया शक्त नव्हे तयासि हरि आणि शैलजावर तो. ॥ १३

कोण वदे हीं वचनें पुराण कीं शास्त्र कीं वदे निगम[9], ।
पाडी मच्चित्ति गुरो! गुरुमहिमा सर्वही वदोनि गम[10].' ॥ १४

'सांगिन शिष्या! ऐकें करि तूं दृढ मन' म्हणेचि सिद्ध असें, ।
वेदांगत्व पुराणें व्यासकृताष्टादश प्रसिद्ध असें[11]. ॥ १५

त्यांत ब्रह्मविवर्तक, त्या माजी पद्मजें[12] कलीला[13] तें, ।
सांगितला गुरुमहिमा, तुज मी सांगेन ऐक लीला ते.' ॥ १६

ऐकुनि वचनें शिष्या विनवी सिद्धा पुन्हा करुनि नमन, ।
'साद्यंत कथा ते मज सांगाया ऽलस्य तव करू न मन. ॥ १७

---

१. सिद्धानें आपला गुरु नरहरी याची अशी स्तुति केलेली ऐकून. २. याचा कर्ता 'नामधारक' अध्याहृत. ३. 'गुरुविना भवताप शमलां (असें) न देखुं'–असा अन्वय. ४. शरदृतूंत. ५. याचा कर्ता 'मीं (नामधारक)' अध्याहृत. ६. एकादश रुद्र. ७. कल्याण. ८. शंकर. ९. वेद. १०. स्वस्थता, शांति. ११. व्यासकृत अठरा पुराणें हीं वेदांगेंच आहेत–असा भावार्थ. १२. ब्रह्मदेवानें. १३. कलियुगाला.

ब्रह्मा किमर्थ कलिला सांगे तो आदिअंत सांग मसी', ।
ऐकुनि सिद्ध म्हणे मग, 'मज तूं गुरुभक्त होसिसा गमसी. ॥ १८

आतां सांगेन तुला मूळापासुनि समग्र रचना ते ।
प्रळयीं नारायण जो करितो [1]न्यग्रोधपात्रिं शयनातें. ॥ १९

इच्छा होतां त्यातें प्रपंचसृष्टी रचावयालागीं ।
नाभीपासुनि पद्मा निर्मी, विधिजन्म व्हावयालागीं. ॥ २०

त्यांत चतुर्मुख जन्मुनि बोले, 'मजयेवढा दुजा नाहीं,' ।
ऐकुनि हरि बोले त्यज गर्ववचें सर्व तूं [2]अजाना ! हीं. ॥ २१

[3]अद्भुत पाही मग तो श्रीहरिचें जें स्वरूप; यास्तव तो ।
करपद्मा जोडुनियां करि नमनातें; [4]करोनियां [5]स्तवतो. ॥ २२

सांगे श्रीहरि त्याला रचिं रे ! [6]म्हणवोनि सर्व सृष्टीसी ।
'न कळे' म्हणतां बोले [7]घे रचि या वेद मार्ग दृष्टीसी. ॥ २३

त्या [8]श्रुतिमार्गें सृष्टी रचितो ब्रह्मा अनुक्रमें, [9]बिज तें, ।
[10]स्थावर, [11]जंगम, [12]अंडज जे स्वेदज जारजादि उद्भिज ते. ॥ २४

रचिलें त्रिजग विधीनें सांगे हे [13]त्रय दशादिका व्यास, ।
करिता जाला मग तो पुराण अष्टादशादि काव्यास. ॥ २५

[14]त्यांतिल [15]विधिवैवर्ता सूत ऋषिंस कथित ज्या पुराणातें, ।
तेचपरी तुज सांगिन सृष्टि रची [16]सत्यलोकराणा तें. ॥ २६

---

१. वडाच्या पानावर. २. (हे) अजाणा (ब्रह्मदेवा!) तूं हीं सर्व गर्ववचें (गर्वाचीं भाषणें) त्यज—असा अन्वय. ३. हें 'स्वरूपा'चें विशेषण. ४ नमन केल्यानंतर. ५. स्तुति करितो. ६. (असें) म्हणून. ७. वेद घे, दृष्टीसी मार्ग रचि. ८. वेदमार्गानें. ९. आदिकारण (पुढील विस्ताराचें). १०. जडसृष्टि. ११. जीवसृष्टि. १२. येथपासून पुढील जीवसृष्टीचे चार प्रकार—अंडज (अंडापासून झालेले पक्षी वगैरे), स्वेदज (घामापासून झालेले ढेंकूण वगैरे), जारज (सं० 'जरायुज.' याचेंच 'जारज' असें मराठींत अपभ्रष्टरूप झालें आहे. जरायु अथवा मराठी 'जार' म्ह० गर्भाभोंवतीं असणारे वेष्टण अथवा वार त्यापासून झालेले मनुष्य पशु इत्यादि) आणि उद्भिज्ज (उत्+भिद्+ज=जमीन भेदून वर येणारे=वनस्पतिवर्ग). १३. त्रय दशादिका याचा अर्थ काय? १४. त्या अष्टादश पुराणांपैकीं. १५. ज्या विधिवैवर्त पुराणातें (ब्रह्मवैवर्त पुराणास) सूत कथित (कथिता झाला). तें तेचपरी (त्याच रीतीनें)—इत्यादि अन्वय. १६. ब्रह्मदेव.

**स**नकादि ऋषि त्रिदशा[1] निर्मुनि असुरा, युगांसि पां चारी, ।
निर्मुनि **कृ**तायुगाला भूवरि जाणे म्हणोनि पाचारी. ॥ २७
**वि**धिआज्ञे भूमिवरी आलें जें ध्यान[2] त्या सु**स**त्याचें, ।
वैराग्यज्ञानाचे बोले जे बोल तेच सत्याचे[3]. ॥ २८
शोभा रुद्राक्षांची कंठीं यज्ञोपवीत आभरण, ।
विनवी **वि**धिलागीं तें, 'अनन्यभावें असें तुला शरण. ॥ २९
तव आज्ञे जाइन परि वसती अति नष्ट जे नर क्षितितें, ।
कैसें जाऊं मजला देतिल अति कष्ट ते न रक्षिति ते?' ॥ ३०
**वि**धि सांगे, 'तुज ऐसे वर्तति नर. भय नसेचि सत्य तुला.' ।
ऐकुनि भूवरि येउनि उभारि तें स्वगुणते[4]चि सत्यतुला[5]. ॥ ३१
त्याची अवधी होतां **त्रे**ता सांगोनि यज्ञकर्मविधी, ।
पाठविता मग झाला तयासि सांगोनि सर्व धर्मविधी. ॥ ३२
यास्तव जन यज्ञातें करिती **त्रे**तायुगांत कर्माला, ।
स्वाधर्म[6] आचरुनि मग जप करिती ते धरोनि कर्माला. ॥ ३३
पुरतां तदवधि[7] मग **वि**धि **द्वा**पारयुगासि पाठवीत ईला[8], ।
तल्लक्षण तें ऐका वदली **व्या**साचि जे कवीत ईला[9]. ॥ ३४
सायकधनुखट्वांगा[10], खड्गधरी निष्ठुरी दयावंत, ।
शांतोग्र अघ सुकृतही सम ऐसे लक्षणी कयावंत[11]. ॥ ३५
त्याची मिति सरल्यावरि **वि**धि मग तो **क**लियुगासि बोलावी, ।
आलें सन्मुख **वि**धिचे त्याचीं चिन्हें कितीक बोलावीं. ॥ ३६
परि कांहीं त्यांतिल जीं **सू**तकथित **नि**मिषकानकामाजी, ।
**शु**नकादि ऋषी त्यांतें, तींच वदे आजि गा! स्वना[12]माजी. ॥ ३७
हीनविचार क्रोधी वक्रमुखीं क्रूरही रडे हसुनि, ।
दोषोत्तरें[13] स्तुति करी हृदयातें पुण्यपाप ही वसुनी. ॥ ३८
कलह द्वेषासंगें घेउनि दक्षिणकरीं धरी जिभली, ।
वामकरीं धरि शिश्ना, पाहे **वि**धि मौज ते भली जि भली. ॥ ३९

---

१. देवांना. २. या ध्यानाचें वर्णन पुढील गीतींत आहे. ३. चांगल्या अशा सत्ययुगाचें. ४. आपल्या गुणाची. ५. सत्याची तराजु. ६. आपापल्या धर्मांस. ७. त्याची वेळ. ८. इला= पृथ्वी. येथें विभक्तीचा प्रत्यय गाळला आहे. वास्तविक 'इलेला,' 'इलेवर' असें रूप पाहिजे होतें. ९. वाणी. १०. वर डोक्याची कवटी वसविलेली काठी तिला 'खट्वांग' म्हणतात. हें शिवाचें एक आयुध आहे. ११. तेजस्वी. १२. स्वन=शब्द, वाचा. १२. निंदायुक्त भाषणानें.

ऐसा कलि विधिसन्मुख येउनि बोले, 'किमर्थ बोलावा[1]?' ।
विधि बोले, 'कां धरिसी जिव्हा लिंगासि अर्थ बोलावा.' ॥ ४०
कलि बोले ब्रह्यासी, 'न भियें जिंकीन सर्व लोकां मी, ।
धोका[2] मी वाहें हीं रक्षूं द्वय[3] केंवि; जन्मलों कामी[4].' ॥ ४१
विधि सांगे, 'जा आतां तूं स्वगुणाचा प्रकाश करिं महित[5].' ।
कलि बोले, 'गुण माझे ऐसें कीं जें बुडेल धर्म हित. ॥ ४२
परजायाधनहर्ते, दांभिक, मत्सरकरी, सखे मज ते, ।
वैरी तीर्थें सुकृता कर्ते जे धर्म हरिहरा भजते.' ॥ ४३
विधि सांगे, 'स्वल्पायू नर होतिल रे! तुझ्या युगामाजी, ।
न करिति सुकृतहि जाई आज्ञा पाळीच हे तुं गा! माजी. ॥ ४४
काळ दुजा तुज संगें देतों लावील हा तुला वाटे, ।
साधूजना न पीडी, भूलोका जिंकीसी मला वाटे. ॥ ४५
विरला नर पुण्यातें करितां पावेल शीघ्र परमार्थी, ।
पीडूं नको तयातें असती जे साधुसंत कामार्थी[6].' ॥ ४६
विधिस म्हणे कलि मग तो, 'साधुजना मीं कसें जि! समजावें?' ।
द्रुहिण म्हणे, 'निर्लोभी गुरुभक्तहि मानि मजचिसम जावे. ॥ ४७
ऐकति पुराण, तीर्थें करिती, जे भजति हरिस[7] भीमातें[8], ।
पुससी जरि पीडि न, भीं[9] त्यातें, करि जेंवि हरिस भीमातें[10].' ॥ ४८
पुनरपि कलि सांग म्हणे, 'समजावा मी कसा म्हणोनि गुरु?' ।
द्रुहिण म्हणे, 'गुरुसाम्य श्रेष्ठ दुजा नाहिं गुरु[11] म्हणोनि गुरु. ॥ ४९
गुरुसम नसेचि कोणी, परंतु गुरुशब्द इतकियां समज, ।
मोरेश्वर वैश्वानर शिव हरि माता पितादि यांस मजें[12]. ॥ ५०
होतां प्रसन्न हरिहर, सद्गुरु जो वोळखी[13] तया ऽवश्य, ।
होई प्रसन्न गुरु जरि हरिहर जे होति ते तया वश्य.' ॥ ५१
'देवाहुनि गुरु योग्य श्रेष्ठ कसा' कलि म्हणे 'मला कळवी.' ।
'ऐक' म्हणे विधि 'सद्गुरु शिष्याचे भवभयासि तो पळवी. ॥ ५२

---

१. कां बोलावलें. २. काळजी. ३. जिव्हा आणि जननेंद्रिय. ४. विषयरत. ५. पृथ्वीवर. ६. परमेश्वरपर. ७. महादेव. ८. शंकरास. ९. साधूस. १०. भयंकर. हें 'हरि(सिंहा)'चें विशेषण. ११. मोठा, श्रेष्ठ. १२. महादेवास. १३. याचा कर्ता 'नर' अध्याहृत व कर्म 'सद्गुरु.'

मंत्रें देवपण द्विज आणिति दारूशिळादि धातूतें, ।
गुरुसामर्थ्य अति असे, सांगेन तदर्थ जो सुधा तूतें. ॥ ५३

गुरुवांचुनि गुरुपदवी देणें न घडेचि सर्व देवांशीं, ।
गुर्वेक सर्वदाता ऐशी वेदाचिही वदे वाशी. ॥ ५४

कैंचें श्रवण गुरुविणें पुराण तें शास्त्र आणि ते निगम, ।
श्रवणें होतां ज्ञानी, समजे गुरु रूप तें पडोनि गम. ॥ ५५

गुरुसम न कोणि म्हणउनि गुरुचा करिती सदैव जप संत, ।
गुरुकीर्तिसी यदर्थीं ऐकें सांगेन मी तुज पसंत. ॥ ५६

गोदावरितटवासी अंगिरस मुनी तया गुणि सुपूत, ।
संपन्न वेदशास्त्रे, नामहि ज्या वेदधर्म, असु पूत. ॥ ५७

त्यातें शिष्य बहुत, परि त्या माजी मुख्य नाम दीपक तो, ।
होउनि वेदपरायण प्रकाश करि कुळनिशीस दीपक तो. ॥ ५८

एक दिनीं तो बोले सर्वहि शिष्यांस बोलवून मुनी, ।
'पाळाल मद्वचन कीं बोलति मग सकळ ते पदा नमुनी.' ॥ ५९

म्हणती, 'श्रीगुरु आम्हां वचन तुझें मान्य गा! श्रुतीपरिस, ।
गुरुवाक्य जो न मानी जाई तो नर अधोगती पैरिस.' ॥ ६०

मग वेदधर्म बोले, 'करि मी जन्मांतरीं बहु अघाला, ।
तें भोक्तृत्व प्राप्तचि, नातरि अंतीं पडेल यमघाला. ॥ ६१

यास्तव अघनिस्तारा दुःखें भोगीन या मनवदेहीं, ।
ऐकतसां कीं वाक्यें माझीं देऊनियां मन वदें हीं. ॥ ६२

होईन अंध कुष्टी नेउनि मज विश्वनाथ शिव दावा, ।
कोणेक या तुम्हांतें असेल सामर्थ्यवानपि वदावा. ॥ ६३

सेवांगिकार करुनी माझा सोसोनियां कुकोप मला ।
रक्षील कोण? सांगा दवडिल ऐशाहि सर्व पापमला.' ॥ ६४

तों मुख्य शिष्य दीपक बोले, 'तव पापकष्ट भोगिन मी, ।
करि मज अघ अर्पण तें.' वदुनि असें भक्तराज योगि नमी. ॥ ६५

सच्छिष्यवचन ऐकुनि पावे गुरुचें अपार तोष मन, ।
मग बोले स्वतनूनें भोगियल्याविण न होय अघशमन. ॥ ६६

---

१. लांकूड. २. अमृतच केवळ असा. ३. वाणी (?). ४. चित्तस्वास्थ्य. ५. सुपुत्र. ६. (ज्याचे) असु (आत्मा) पूत (पवित्र होता.) ७. ऐक.

या करितां स्वशरीरीं भोगावें जें स्वपाप हा नियम, ।
नातरि जो जनन मरण फेरीं घाली करोनि हानि यम. ॥ ६७
यास्तव अघभोक्तृत्वा शिष्या भोगीन याच देहेंची, ।
रक्षुनि मज तूं सेवा करिन असें पूर्ण वचन दे हेंची. ॥ ६८
रोग्याहुनि कष्ट बहुत सेवाकर्त्यास होति पुष्कळ ते, ।
तरि मज रक्षुनि सेवा करि तूं माझी धरोनि कळकळ ते. ॥ ६९
त्रिःसप्त वर्ष कुष्ठी होइन मी पंगु अंध बहिरा गा! ।
येउनि[1] दुःखें तुजवरि मारिन तुज मी धबाधब हि रागा. ॥ ७०
सोसाया शक्य असें इतकें जरि सर्व सत्य गा! तूतें, ।
सेवा अंगिकारि तरि मग होइल तव कीर्ति सत्य गोतूतें.[2]' ॥ ७१
मग सेवा करुनि म्हणे शिष्य गुरुसि नमन तो करुनि भावें, ।
'तुझियाच कृपेंकरुनी सेवाकर्मासि मी गुरु! निभावें.' ॥ ७२
काशीस नेइ मग तो गुरुच्या भरतांचि कुष्ट देहातें, ।
सेवा करुनि अहर्निशि नमि गुरुचीं सर्वदा पदें हातें. ॥ ७३
[3]कंबळईशा संनिध राहति सुत तात तेंवि काशींत, ।
गुर्वानंदसरोजा[4] तो सेवाभास्वतें विकाशीत. ॥ ७४
गुरु देहीं कुष्ठातें[5] गळे पडुनियां अनेक[6] रवरव[7] पू, ।
प्रक्षाळी प्रतिदिवशीं लावुनियां दृढमनें करवर[8] वपू. ॥ ७५
भिक्षा मागुनि आणुनि गुरुपूजा करित तो यथाविधिनें ।
विश्वेश्वरसम मानी गुरुसि.' कलिस कथियलें असें विधिनें. ॥ ७६
गुरु एकादे दिवशीं दे गाली[9] बहुत ये खलु कुंपासी[10], ।
मिष्टान्न देचि म्हणउनि मारि, [11]असें करित लुकलुकु, पांसीं[12]. ॥ ७७
[13]आणी मिष्टान्न तसें मागे गुरु, जेंवि जेंवि मागोनी, ।
घालुनि भोजन गुरुसी आपण मग शेष जेंवि मागोनी[14]. ॥ ७८

१. रागा येउनि. २. कवीला. ३. कंबळेश्वराजवळ. ४. सेवारूप सूर्याचे योगानें गुरूच्या आनंदरूप कमलाला प्रफुल्लित करीत. ५. कोडास, कोडापासून. ६. पुष्कळ, विपुल. ७. पुष्कळ, किड्यासहित. ८. सुंदर हात. ९. शिव्या. १०. कोपास (?). ११. लुकलुकु असें करित=कांपत कांपत. १२. दोन्यांनीं. याचा संबंध 'मारि'कडे. १३. (तो दीपक शिष्य) जेंवि जेंवि (जसजसें) मिष्टान्न मागोनि आणी तसतसें (अनेकवार) गुरु तें मागे—असा अन्वय. १४. मागाहून.

भोगुनि अपार कष्टा तोषवि गुरुच्या क्षपादिन[1] मनासी, ।
सेवा करुनि करि सदां लावुनि गुरुच्या अक्षे[2] पादिं[3] नमनासी. ॥ ७९
राहुनि काशिक्षेत्रीं न करि कधीं शिष्य तीर्थयात्रा ती, ।
गुरुपद सेवाचि म्हणे हीच मला करुनियां दया त्राती. ॥ ८०
ऐशा गुरुसेवेसीं करितां तो एकविंशती वर्षें, ।
त्याला प्रसन्न होउनि वैरघनधारा[4] महेश ती वर्षे. ॥ ८१
आनंद[5], शिष्य पाहुनि, काशीविश्वेश्वरा अगाध मनीं, ।
'ऐक' म्हणे 'माझी तूं, घे तुज देतों वरा, अगा! धमनी[6].' ॥ ८२
'मागे वरासि' म्हणतां शिष्य म्हणे 'ऐक विश्वनाथा रे! ।
गुर्वाज्ञेविण वर तो घ्यावा ऐसें न मन्मना थारे. ॥ ८३
गुर्वाज्ञा जाल्या मग मागेन तुला सुरद्रुमा! वर तो.' ।
'जा पुसुनी येइ, तों वर उभा असें मी' म्हणे उमावर! तो. ॥ ८४
मग तो येउनि गुरुसी वृतांत सांगे करोनि नमनाला, ।
[7]'येतें काय तव' म्हणे 'मागूं त्वद्व्याधिनाशन, मनाला?' ॥ ८५
कोपें गुरु मग बोले, 'माझे व्याधीनिमित्त न भवातें, ।
प्रार्थी तूं; भोक्तृत्वा न भोगितां नर तरेचि न भवातें. ॥ ८६
सध्या जरि तें गेलें कदापि तरि रे! चुके न भवजन्म, ।
होउनि भोगावें तें लागुनि, बुडवी नरासि भव, जन्म. ॥ ८७
तपबळसामर्थ्य मला दवडाया काय दीपका नाहीं, ।
मोक्षा आड रिघे तें भोगावें सत्य ऐक कानांहीं.' ॥ ८८
येउनि शिवासि मग तो म्हणे 'नको वर' म्हणोनि नमन करी; ।
'गमन करी तूं, गुरुचें ग्राह्य तुझा वर कदा हि न मन[8] करी.' ॥ ८९
विस्मय मानुनि शिव ये स्वागाराशि न विलंब लावोनी, ।
इंद्रादि सर्व देवा श्रीहरिसहि आणवी बलावूनि. ॥ ९०
विस्तारुनि शिव तो मग गुरु शिष्याची वदे तयां कृति ती, ।
पाहूं चला हरि म्हणे कैशी गुरुभक्ति, शिष्यआकृति ती. ॥ ९१

---

१. रात्रंदिवस. २ डोळे, नजर. ३. पायांवर. ४. वराची दाट धार म्ह० वरांचा वर्षाव. ५. (असा) शिष्य पाहुनि काशीविश्वेश्वरा(ला) मनीं अगाध आनंद (झाला). ६. वाणी. माझी धमनी ऐक म्हणे–इ० अन्वय. ७. त्वद्व्याधिनाशन तव मनाला येतें काय? (ते) मागूं. ८. गुरूचें मन.

येउनि हरि शिष्याच्या पाहुनि गुरुभक्तिच्या प्रकारासी, ।
बोले प्रसन्नवदनें, 'वर मागें त्यागुनी नकारासी.' ॥ ९२
संदीपक हरिस वदे, 'किमर्थ मजला बळेंच वर देशी? ।
देशि न सिद्धमहंता भजती तुज जरि वनांत परदेशीं. ॥ ९३
न करीं मी तव भक्ती' वदतां दीपक तयासि, बोल हरी ।
बोले, 'गुरुभक्ती जे पावे मज ते, म्हणोनि ये लहरी. ॥ ९४
तातांबापतिधेनूसेवा करि जो, द्विजांसि आधि नमी, ।
गुरुभक्ती करि, त्यांचे जालों देण्या वरासि आधिन मी.' ॥ ९५
वंदुनि हरिपद मग तो बोले, 'गुरु तोचि देव हो! मजला, ।
तूं देशी तें देइल तो, मज मग काय मागुनी तुजला?' ॥ ९६
हरि आग्रहेंचि बोले, 'कांहीं तरि माग साच मज वर तूं.' ।
'दृढ गुरुभक्ती दे तरि' शिष्य म्हणे, 'करि दयाहि मजवर तूं. ॥ ९७
द्यावें ज्ञान मज असें व्हावी वोळख गुरुस्वरूपासी.' ।
हरि वर देई त्यातें, 'वळखुनि गुरु चढसि तूं स्वरूपासी. ॥ ९८
श्रीगुरुवरप्रसादें ब्रह्मज्ञहि तूं तसाच होशील, ।
इहपरलोकीं कीर्ती वाढे तव बहुहि, साच हो शील.' ॥ ९९
हरि गेल्यावरि मग ये गुरुपाशीं शिष्य तो सुगुणराशी, ।
तों गुरु सांग म्हणे, 'रे! विश्वेश्वर काय दे तुज वरासी?' ॥ १००
शिष्य वदे, 'ने घें मी शिववर गा! ऐक तूं दुजा क्रम तो, ।
त्वच्चरणीं दृढभक्ती बैसेसा दे वर त्रिविक्रम तो. ॥ १०१
ऐकें श्रीगुरुराया! सांगितलें मी हरा तया वर तो ।
नलगे; मग शिव गेला तों श्रीहरि पातला तयावर तो. ॥ १०२
श्रीहरिहि म्हणे, 'मागें वर इच्छित' करुनि आग्रहास मज, ।
जाला त्वद्भक्तीचा त्यापासुनि सुवर लाभ हा समज.' ॥ १०३
वर ऐकुनि गुरु हर्षे तत्क्षणिं मग धरुनि तो सुदेहातें, ।
सर्वेच्छितवर मग तो त्याचा स्पर्शोनि भाळ दे हातें. ॥ १०४
शिष्यपरीक्षेसाठीं गुरु दावी त्यास कुष्टरोगा या; ।
नातरि तपस्विया त्या राहिल कोठोनि पाप भोगाया? ॥ १०५

१. (आनंदाची) लाट. २. अंबा=आई. ३. त्याचे आधीन. ४. (तुझें) शील साच (खरें) हो (होवो). ५. विष्णु. ६. त्या शिवाला. ७ त्यानंतर. ८. तो मग हातें त्याचा (शिष्याचा) भाळ स्पर्शोनि सर्वइच्छित वर दे—असा अन्वय.

ऐसा सद्गुरुमहिमा सांगे विधि तो कलीस बोधुनियां, ।
म्हणउनि दृढ मनिं भावें भजणें गुरुलागिं चित्त शोधुनियां. ॥ १०६

यापरि सिद्धमुनी तो सांगे शिष्यासि या चरित्रातें, ।
पाठ करी जो निशिदिनिं हेंच तया होय हो! तरि त्रातें. ॥ १०७

श्रीगुरुपद सेवावें तरणें आहे भवाब्धिजल ज्यातें, ।
रामात्मज पुत्र सदा श्रीगुरुपद पूजि [1]हृदयजलजातें. ॥ १०८

---

## अध्याय तिसरा.

[2]नामांकित सिद्धातें विनवी जोडोनि हस्तयुगुळाला, ।
गुरुमहिमेतें तल्लिन होइ कसा जेंवि [3]मुंगळ गुळाला. ॥ १

सिद्धासी नमुनि पुसे, 'कोठें तुज सांग [4]भुक्तिसहवास.' ।
सिद्ध म्हणे, 'मी गुरुचे स्थानिं वसें करुनि संतसहवास.' ॥ २

भुक्ती 'गुरुचरितामृतपान करीं' म्हणुनि दावि पुस्तक तो, ।
हस्तक जोडुनि ठेवी शिष्य मग तया पदीं स्वमस्तक तो. ॥ ३

विनवी गुरुचरितसुधा नाशी भवरोग पापतापा जी, ।
ते मज तूं गुरुवर्या! करुनि कृपा, गा! न कोपतां पाजीं. ॥ ४

सच्छिष्य मी तुझा गा! कांहीं आणीं विकल्प न मनातें,' ।
म्हणउनि पुनःपुन्हा करि, विनवणिचा करुनि [5]जल्प, नमनातें. ॥ ५

देऊनि अभय सिद्धें नेला मग शिष्य तो धरोनि करीं, ।
[6]मोक्षपथा [7]अश्वत्थीं मग त्याला उपदेश तो बसोनि करी. ॥ ६

उपदेश करुनि सांगे, 'नसे त्रिलोकीं कदा गुरुसमान, ।
पावे सर्वस्थानीं तो, जाई शरण जो गुरुस, मान. ॥ ७

दृढभक्ति धरुनि जेणें गुरुपदसेवाचि मार्ग तो धरिला, ।
तो उद्धरला, त्यानें स्वदर्शनें जन अपार उद्धरिला. ॥ ८

सांडुनि संशय मनिंचा भजतां श्रीगुरुसि, तो करि नुपेक्षा, ।
गुरुपेक्षां थोर नसे, भक्ताचे भेटिची करि अपेक्षा. ॥ ९

म्हणउनियां गुरुलागीं न दिसे मज द्यावयासि उपमा ते, ।
मातेसम दत्त, सुतीं ममता न जडेचि सत्य [8]उपमाते.' ॥ १०

---

१. हृदयकमलानें, मनानें. २. नामधारक. ३. मुंगळा. ४. अशन, खाणें, पिणें इत्यादि आणि राहणें. ५. भाषण. ६. मोक्षमार्गाकरितां. ७. पिंपळाच्या झाडाखालीं. ८. दाईला.

शिष्य म्हणे, 'त्वद्दर्शन होतां सद्बुद्धि होय निर्मळ ती, ।
गुरुचरिता ऐकावें ऐशी मनिं लागली जि ! तळमळ ती.' ॥ ११
सिद्ध म्हणे, 'रे शिष्या ! गुरु तो साक्षात दत्त अवतारी, ।
धरितां दृढ भक्ति पदीं इच्छित देउनि करोनि अव[1] तारी. ॥ १२
घन जल उन्नति[2] जैसें न ठरेचि ठरे सखोल गांतूतें[3], ।
दांभिकदृढभक्ति[4] तशी फळत असे सांगतों अगा ! तूतें. ॥ १३
दांभिकखापर जैसें घर्षुनि परिसा[5] वृथाचि, परिस[6], परी[7] ।
दृढभक्तिनेंचि करितो सज्ञानी हेम लोह परिसपरी[8]. ॥ १४
दृढभक्ति कृपा भक्ता करि, जननी बाळकासरी[9] ती, हो ।
दांभिक जैशी वंध्या कासरि[9] ती सर्वकाळ कांस[10] रिती[11]. ॥ १५
यास्तव दृढभक्तीनें श्रीगुरुच्या लावि हो ! ईला[12] भजना, ।
लागति गुरुभजनीं जे मुक्तीचा त्यांचि होइ लाभ जना. ॥ १६
साक्षात श्रीहरिगुरु अवतरला तो जगीं दयावन गा ! ।
तच्चरितपवि[13] च्छेदी श्रवणीं जे बैसती तयांऽघनगा[14][15].' ॥ १७
शिष्य वदे, 'वदसी गुरुरूपें श्रीहरिच अवतरुनि आला, ।
तरि तूं करुणावळ[16] वळ चातक मी तुज असें करुनि आला[17]. ॥ १८
वद कार्य[18] श्रीहरिसी मानवदेहा धरावया काय ?' ।
सिद्ध म्हणे, 'धरि अनवी[19] रक्षुनि भक्तोद्धरावया[20] काय[21]. ॥ १९
अवताराया कारण तेचि तुला सांगतों कथा आधीं, ।
जी सुकथा श्रवणें त्वद्[22]दूरें[23]घडी होय सर्वथा आधी. ॥ २०

---

१. रक्षण. २. उंचजमिनीवर. ३. पृथ्वीवर. ४. येथें दांभिक भक्ति आणि दृढ भक्ति यांची तुलना अनुक्रमें उंचवट्यावरील व खोल जाग्यांतील पाण्याशीं केली आहे. ५. परिसाला. ६. ऐक. ७. परिसाप्रमाणें. ८. मुलाप्रमाणें. ९. म्हैस. १०. ओटी. ११. रिकामी. १२. वाणी. १३. पवि=वज्र. १४. त्यांच्या. १५. पापरूप पर्वतास. १६. दयेचा मेघ. १७. 'आ'ला करुनि म्हणजे उत्सुकतेनें तोंड पसरून. १८. काम. १९. मानवी. हा अर्थ मूळ पुस्तकांत बाजूस दिला आहे, तो तसाच येथें उतरून घेतला आहे. या कवीचे असेच आणखी शब्द म्हणजे अव=रक्षण, वळ=मेघ, वरिव=धन. २०. भक्त+उद्धरावया. हा संधीचा नवीन प्रकार कवीनें पुष्कळ ठिकाणीं उपयोगांत आणिला आहे. २१. शरीर. हें 'अनवी' याचें विशेष्य. २२. त्वत्=तुझी. याचा संबंध पुढील 'आधी'(दु:ख)कडे. २३. दूर गेलेलें.

श्रीहरिचा प्रिय होता भक्त नृपति अंबरीष नामानें, ।
तो साधनअर्कतिथी[1] व्रत करि, तें हरिच्चिया मना मानें[2]. ॥　　२१
ऐसें चालत असतां व्रत, ये नाड्येक[3] एकदार्कतिथी, ।
तों ये दुर्वासऋषी[4], उदयनगीं जों न ये तदार्क, ऽतिथी[5]. ॥　　२२
नमुनि मुनिस करि पूजा नृप भावें परि मनांत तो भ्याला, ।
कैसें होइल वाटे व्रतरक्षण वैरिव[6] जेंवि लोभ्याला. ॥　　२३
विनवी नृप मग मुनितें, 'व्रत मज सुद्वादशी हि लँक्ष[7], कर ।
स्नान त्वरितचि गा ! तूं, नुगवे जों तो शतांश लँक्षकर[8]. ॥　　२४
स्नान नदीस करुनि मुनि करितांऽनुष्ठान, विधिस तो बसतां, ।
भरतां घटि भूप पुसे, मुनिला त्या लागतां विलंब, सँतां[9]. ॥　　२५
'होवो[10] व्रतभंग अतां, करिन, तुम्ही मज वदाल जेविं कसें ?' ।
ते[11] 'तीर्थपारणें करिं' वदति, तसें नृपमुखाब्ज जें विकसे. ॥　　२६
नृप तैसेंचि करित, तों करुनि अनुष्ठान येत दुर्वास, ।
नृपमुख पाहोनि म्हणे, 'तूं करिसि गृहाश्रमांत दुर्वास[12]. ॥　　२७
नष्टा ! अतिथी टाकुनि जेविसि कैसा ?' म्हणोनि कोपावे[13], ।
दे शाप, 'जन्म घे बहु.' तों स्मरतां हरिस भूप, [14]तो पावे. ॥　　२८
वेगें हरि ये कैसा, धांवे जैसा करींद्रहाकेला, ।
आश्वासन देउनियां कृतार्थ तेणें नरेंद्र हा केला. ॥　　२९
हरि बोले, 'दुर्वासा ! शापीं मज, भक्त भूमिं[15] जन्मुं नये,' ।
ज्ञानी ऋषि जाणुनियां बोले, 'हरि ! तूंचि भूमिं जन्मुन ये[16]. ॥　　३०
हरि ! तूंचि अंगिकारीं जाला मच्छाप भूवराला[17] जो, ।

---

१. अर्कतिथी=द्वादशी. २. आवडे. ३. नाडी+एक=एक घटकेची. ४. दुर्वासऋषी अतिथी ये—असा संबंध. ५. येथें 'अतिथि' यांतील 'अ' गाळून फक्त 'तिथि' च घेतला आहे. कवीनें अशा रीतीनें या काव्यांत जिकडे तिकडे वरीच स्वतंत्रता घेतली आहे. इंग्रजींत Began बद्दल Gan असें कवितेंत कधीं कधीं येतें, त्यासारखीच ही तऱ्हा आहे. ६. धन. ७. पहा, लक्ष दे. ८. सूर्य. ९. जवळच्या सुज्ञ लोकांस. १०. अतां व्रतभंग होवो, करिन, (म्हणजे मी व्रतभंग करीन, व्रतभंग झाला तरी हरकत नाहीं) (पण) तुम्ही मज जेविं (जेव) (असें) कसें वदाल—असा सार्थान्वय. ११. ते (सुज्ञलोक) 'तीर्थपारणें (तीर्थ प्राशन करून पारणें सोडणें) करिं' वदति तसें (तेव्हां)—इत्यादि अन्वयार्थ. १२. वाईट तऱ्हेनें वागणें, अतिथीला टाकून जेवणें वगैरे. १३. रागावला. १४. हरि. १५. पृथ्वीवर. १६. अवतार घे. १७. राजाला.

त्वज्जन्मचरित ऐके स्पर्शाया अघ तया नरा लाजो. ॥ ३१
ताराया भक्तासीं, स्थापाया स्वपदिं [1]पविधरत्रिदश, ।
अवतरसि वेळ बहु परि प्रसिद्ध मद्भूत [2]पविं धरत्रिद श (?)' ॥ ३२
[3]कोठें असे [4]ऐसि कथा, स्मरतां नृप दे हरि स्वदर्शन तें, ।
सोडी दुर्वासावरि कोपें तो आपुलें सुदर्शन तें. ॥ ३३
तें लागे मुनिपाठीं हिंडे मग तो त्रिलोक [5]वेगें मन, ।
परि कोणि न रक्षि तया नृपाजवळि मग करी पुन्हा गमन. ॥ ३४
नृप मग विनवुनि हरिसी शांतवि तें चक्र, हरिकरामाजी ।
राहे मग. परि न असें सिद्ध वदे, परि वदे [6]स्वरा [7]माझी. ॥ ३५
सिद्ध म्हणे, 'श्रीहरिनें भक्ताचा शाप तो असा हरिला, ।
शिष्या! [8]यास्तव लागे धरणें अवतार ते तया हरिला. ॥ ३६
यास्तव ऋषि अत्रीचे सदनीं विधि हरि महेश अवतरती, ।
जाला विनोद सत्यचि, मानव ते ऐकतां कथा तरती.' ॥ ३७
शिष्य वदे सिद्धातें, 'अत्रि ऋषी कोण तो जि! सांगु नितें, ।
करितां विनोद देवहि अवतरती केंवि सांग मागुनि ते.' ॥ ३८
शिष्यविनंती ऐकुनी बोले गुरु अभय त्यासि देऊनी, ।
'भवसिंधू तूं तरसी सर्वहि चिंतित अभीष्ट पावोनी. ॥ ३९
त्वत्प्रश्नें मजलागीं ऋषि अत्रीचें चरित्र आठवलें, ।
आतां सांगेन तुला आजवरी जें मनांत सांठवलें. ॥ ४०
सृष्टीरचनेलागीं ब्रह्मा करि सात पुत्र उत्पन्न, ।
ठेउनि वरद कर शिरीं त्यांचे, करि वेदशास्त्रसंपन्न. ॥ ४१
तन्नामें, एक ऋतु, मरीचि, पौलस्ति, पुलह चवथा रे! ।
अत्र्यंगिरस वसिष्ठ प्रकटुनि [9]तज्ज्यास कीर्तिरव थारे. ॥ ४२
या सातांतिल अत्री वाढे तेथोनि संतती गुरुची, ।
तच्चरितरस [10]श्रवणीं पीतां अति बहुत कितिक सांगु रुची. ॥ ४३

---

१. इंद्र व देव. २. पवि=वाणी अशी टीप मुळांत आहे. ३. अन्यत्र. (भागवतांत.) ४. पुढें सांगितलेली. ५. उद्विग्न चित्तानें. ६. वाणी. ७. माझी म्हणजे कवीची, कारण ही सुदर्शन पाठीस लागल्याची कथा मूळ गुरुचरित्रांत नसून कवीनें दुसऱ्या ग्रंथांतून घेतली आहे. ८. दुर्वासानें अंबरीषास दिलेल्या शापाच्या निवृत्तीसाठीं विष्णूनें तो शाप आपल्यावर घेऊन दहा अवतार घेतले—ही कथा येथें लक्ष्य आहे. (गुरुचरित्र—अ० ३ ओ० ६६–६७ पहा.) ९. तत् (त्यांचा) कीर्तिरव ज्यास (भूमीस, भूमीवर) थारे (राहे). १०. कानांनीं.

त्याचे घे तूं आतां सुकथेचा सुरस सर्व सादर तो, ।
[1]तवभवदर तो नाशी, [2]भक्ताचा केंवि सर्वसा दर तो. ॥ ४४
[3]तन्मुनितपप्रभा कसि, रविचि जशी व्यापि भूनभा जी ती; ।
परि भाजी ती रविची, ऋषिची निववी जना, न भाजी ती. ॥ ४५
**अनुसूया** नामानें तत्स्त्री मोठी पतिव्रता युवती, ।
स्त्री तैसीच असावी नातरि इतरा वृथा [4]शतायु[5]वंती. ॥ ४६
सौंदर्य अति तियेचें दडेचि देखोनि [6]**नीर**जा लाजें, ।
[7]पूज्यतिथी, दे इच्छित, जैसें प्रिय अन्न नीर ज्याला जें. ॥ ४७
पातिव्रतपणतेजें तिचिया सर्वहि [8]दिक्शाप डळमळती, ।
लोपति शशिमित्रहि ते, येतां कीं जेंवि [9]घनपडळ मळती. ॥ ४८
शापील म्हणुनि भीतचि असती सुर सार्वकाळ [10]लंपत असे, ।
तपत असे रवि मंदचि, पदिं होउनि भू [11]मवाळ ल(ज?)पत असे. ॥ ४९
अनळहि शीतळ लागे तिजला मंजूळ शुद्ध वाराही, ।
सेवी पतिपद, तेणें मनीं सदां तोष [12]तद्धवा राही. ॥ ५०
**इंद्रादि** देव मग जे जाति सकळ **विधिहरीशिवा** शरण, ।
सांगति सकळ तयांतें **अनुसूयेचें** पतिव्रताचरण. ॥ ५१
**इंद्र** म्हणे, '**अनुसूया** पतिव्रता या महा [13]रि(द्रि?)पावर ती, ।
कांहिं न पडुं दे कमि, पतिमन अष्टहि याम हारि, पाव [14]रती. ॥ ५२
ऐसी करि पतिसेवा सदैव अतिथी अगाध नेमानें, ।
पूजुनि इच्छाभोजन देउनि तोषवि अगा! धनें मानें. ॥ ५३

---

१. तुझी संसारभीति. २. केंवि (कसा म्हणशील तर), तो (विष्णु) भक्ताचा दर (भीति) सर्वसा (सर्व प्रकारें) (नाशी). ३. तन्मुनितपप्रभा (त्या अत्रि ऋषीचें तपस्तेज) कसि (कशी म्हणशील तर) जशी रविचि जी (प्रभा) ती भूनभा व्यापि. परि ती (रविप्रभा) (जना) भाजी ती ऋषिची (प्रभा) जना न भाजी (तर) निववी—असा अन्वय. ४. शंभर वर्षें आयुष्याच्या. ५. शंभर वर्षें वांचणारी. ६. नीरापासून उत्पन्न झालेली लक्ष्मी. ७. पूजी+अतिथी. ८. इंद्रादि दिक्पाल. ९. मेघाच्छादन. १०. लपत असणारे. ११. मऊ. १२. तिच्या नवऱ्याला. १३. मूळ पोथींत 'रिपा' यावर पृथ्वी' अशी टीप आहे, तेथें 'द्रि' बद्दल 'रि' पडलें असावें. १४. 'रती'='पाव गुंज. (ती) पतिमन अष्टहि याम (प्रहर) हारि, कांहिं पाव रती (ही) कमि पडूं न दे—असा अन्वय.

इच्छित सर्वहि देती कैसी ते जेंवि कामसुरभी[1] ती, ।
नकळे पद कोणाचें हिरोनि घेइल म्हणोनि सुर भीती. ॥ ५४
'त्रैमूर्ति! तुम्ही आतां त्वरित करा जी उपाय यास्तव तो,' ।
म्हणउनि शक्र तयांचा करि बहुतचि यावया दया स्तव तो. ॥ ५५
त्रैमूर्ति वदति, 'शक्रा! करणेंचि स्वस्थ मानसा त्वां तें, ।
येतों आतांहि हरुनि, करुनि तियेचाऽपमान, सत्वातें. ॥ ५६
ये कोप बहुत तेव्हां विधिभ[2]स्मोद्धूलिता घृ[3]ताशीतें, ।
क्रोधें कांपति, [4]जैसे नर मकरीं स्पर्शतां घृता शीतें. ॥ ५७
मग ये[5]त्यतिथीवेषा धरोनि जों अत्रिच्या स्वा[6]लयदारा, ।
गेलाऽनुष्ठानाऽत्री, होति धरुनि पतिपदीं स्वा[7]लय दा[8]रा. ॥ ५८
देखुनि ती आसन दे, क्षा[9]ळि पदा उष्ण अणुनि अंबु सती, ।
पुसती जाली, मग दे सु[10]गंध, पानार्थ शर्करांबुस ती. ॥ ५९
मग ते म्हणती, 'सति वो! सांगितली कीर्ति तव सुलोकांनीं, ।
इच्छाभोजन देशी हें ऐकुनि परम तोषलों कानीं. ॥ ६०
म्हणउनि इच्छाभोजन मागाया येउं, चिंतुन मनातें.' ।
तों सति म्हणे, 'बसावें.' म्हणुनि जुडुनि करि कराब्ज नमनातें. ॥ ६१
'आतां पति येती तों, पाहुनि मद्धाम मन रमु, बसाची ।
क्षणभरि, मग मागावें इच्छित आहे तुम्हांसि मु[11]भ साची.' ॥ ६२
ते बोलति, 'क्षुधा बहु लागे आम्हां, निघे सखेद मन, ।
लागेल वेळ ऋषिसी' म्हणउनि ते विनविती सखेदमन. ॥ ६३
ऐकुनि अतिथीवचना मांडुनि बैसावया सरस पाट, ।
पात्रें [12]मांड्यभिघारी, करोनि, शिंपोनियां स[13]रें, सपाट. ॥ ६४
तेव्हां त्या पाटावरि अतिथी ते बसति धरुनियां ओ[14]ली, ।
तों शाक पाक घेउनि न लावितां ते विलंब सति आली. ॥ ६५
तों ते म्हणती, 'वाढीं, सोडुनि पट नेसलों[15]ऽज आइकशी? ।

---

१. कामधेनु. २. ब्रह्मदेव आणि शंकर यांस. ३. पाण्यांत निजणाऱ्या(विष्णू)तें. घृत=पाणी. ४. जैसे नर मकरीं (जेव्हां सूर्य मकरराशीला येतो तेव्हां म्हणजे हिंवाळ्यांत) घृता (पाण्याला) स्पर्शतां शीतें (थंडीनें) (कांपति)—असा सार्थान्वय. ५. येती+अतिथीवेषा. ६. सु+आलय+दारा. ७. आपलें चित्त. ८. स्त्री. (अनुसूया). ९. उष्ण अंबु अणुनि पदा क्षाळि—असा अन्वय. १०. उटी. किंवा सुगंध हें 'शर्करांबुस' (साखरपाण्यास) याचें विशेषण. ११. मुभा, परवानगी. १२. मांडी+अभिघारी (तूप वाढी). १३. पाणी. १४. ओळ. १५. नेसला (नेसलेला)+आज.

हो नग्न, भीड न धरीं, न धरि जसी बाळलाज[1] आइ कशी.
आतां नको विलंबहि, कांहिं तुवां हो! मनीं न योजावें, ।
मानेना तुज जरि हें सांगें आम्हां निघोनि हो! जावें.' ॥
अतिथींचीं दुर्वचनें ऐकुनि हो! सर्व तीं तया सतिनें, ।
विस्मय मानुनि दिधलें उत्तर जें आइका तयांस तिनें. ॥
बोले, 'न करा चिंता किमपिहि, होऊनि नग्न वाढिन मी, ।
रक्षिति पतिपद मातें.' म्हणोनि ती करुनि बुद्धि गाढि नमी.
चिंत्ति म्हणे, 'कोणि तरी आले मत्सत्व हे हरायातें, ।
मद्दृढभक्ति पतिपदीं आहे जरि रक्षि हे हरा! यांतें[2]. ॥
ऐकेंना जरि यांचें करिती सत्वासि हे अपायासी,' ।
म्हणउनि पाकगृहातें जाउनि चिंती स्वकांतपायासीं. ॥
'मन्मन असतां निर्मळ मन्मथ[3] दुर्जन करील तें काय?' ।
अतिथी कल्पुनि बाळें, उघडी, सोडोनि वस्त्र तें, काय[4]. ॥
होउनि नग्न सुअन्नें घेउनि येतांचि, बाळकें होती. ।
रुदती, लोळति पात्रीं, मानी आश्चर्य तें निकें हो! ती. ॥
नेसुनि वस्त्र मग सती घालुनियां बाळ पालखीं[5], गीत ।
गायी अतिउल्हासें निगमार्था तालसूरसंगीत[6]. ॥
ते अनसूया सति जे गात असे माधुरें अनेक रिती, ।
परि पालखीं न राहति बाळक ते बहुत रोदनें करिती. ॥
मग ते मनीं म्हणे सति, 'लागलि बहु होतिच क्षुधा त्यांतें,
म्हणउनि दे स्तनपाना तेव्हां सर्वत्रिचक्षुधात्यांतें[7]. ॥
कैलासनाथ जो कीं पिउनि सतीच्या लबालब दुधाला, ।
धाला[8] जेंवि सरोजीं भृंग, मनीं जरिहि होय बहु धाला[9]. ॥
श्रीकांत तोहि जाला घेउनि सतिच्या पयाचि चवि धाता[10],
धाता होय तसाचिहि चवि घेउनि तो तयाचिच विधाता. ।

---

१. मुलाची लाज. २. सत्वास. ३. मदन. 'तें दुर्जन मन्मथ' या पदांनीं आपल्य काय चालणार? असें ध्वनित केलें आहे. ४. शरीर. ५. पाळण्यांत. ६. तालसूर। (विष्णु)+त्रिचक्षु (शंकर)+धाता (ब्रह्मदेव) यांस. ८. संतुष्ट झाला. ९. धालेला; १०. धाता जाला=तृप्त झाला.

म्हाणोनि पाळखीं[1] मग हातरुणा करुनियां मउ, निगा ती ।
करुनि असी, निजवुनियां होय तयांला अरामउनि गाती[2]. ॥　७९
तों आला ऋषि अत्री गातां ऐकोनि, पाळखास तिस, ।
हालवितां देखुनियां, वृत्त पुसे तो कृपाल खास तिस. ॥　८०
सति मग वृत्तांत ऋषिसि सांगे जोडोनि हस्त जंव दोनी, ।
ज्ञानी ऋषि पाहुनि मग सांगे आश्चर्य तें गुज वदोनी. ॥　८१
'विधि हरि शिव गे! हे; त्वत्पुण्य उदेलें' म्हणे तयां नमुनी, ।
तों ते प्रकटुनि रूपें 'जालों म्हणती तुला प्रसन्न मुनी!' ॥　८२
शिशु पाळखींहि राहुनि, सन्मुख साक्षात मुनिवरास तिवे, ।
'वर माग' म्हणति तेव्हां, ऋषि बोले नारिसी 'वरा सति! घे.' ॥　८३
सति बोले, 'जी! येती त्वद्भक्तिस देव हे तव सुधामीं, ।
सुत माग, धन्य तेणें होईनचि, पुरुनि हेत, वसुधां[3] मी. ॥　८४
सूर्योदयीं जसें कीं शोभे विकसुनि सरोरुहें भुवन[4], ।
तैसे बाळ तिवे हे होउनि मत्पुत्र शोभु हो! भुवन[5].' ॥　८५
'राहति बाळ' म्हणुनि मग देति वरा ब्रह्मदेव सर्व[6] शिव, ।
गेले निजाश्रमा मग '[7]हो म्हणुनि तयां सदैव सर्व शिव.' ॥　८६
कोणेक कथा वदती पूर्वीं विधिपुत्र जो दयाग्राव[8], ।
तो ये सत्व पहाया, घाली सति[9] शिजवुनी तया ग्रांव[10]. ॥　८७
तों मग आला जेथें नगजार्णवजार्कजा[11] तिघी असती, ।
तेथ म्हणे एक सती अनुसूया, तिजपुढें तुम्ही असती. ॥　८८
सेवि[12] न तसि दुजि देखें दाहीहि दिशांस मी पतिपदासी, ।
वाटे-मनिं मज तुम्ही दिसाल जैशा समीप[13] तिपे[14] दासी. ॥　८९
वर्णुनि सतिकीर्तीसी, निंदि तयां, कोपवी तिघींलाही, ।
लाही मुनि तोष मनीं होय [15]तदंगाचि, तो बघी, लाही. ॥　९०
त्या मग जाउनि पतिसी सांगुनि तें वर्तमान कोपविती, ।
ते म्हणति मग तिच्या व्रतसुकृतनगा उपशमा नको [16]पवि ती. ॥　९१

---

१. पाळण्यांत. २. गाऊं लागली. ३. पृथिवीवर. ४. पाणी. ५. घर. ६. विष्णु. ७. तयां अत्रि व अनुसूया यांस) सदैव सर्व शिव (कल्याण) हो (होवो) (असें) म्हणुनि—असा अन्वय. ८. दयामेघ. ९. अनसूया. १०. दगड. ११. नगजा+अर्णवजा+अर्कजा=पार्वती, लक्ष्मी आणि सावित्री. १२. पतिपदासीं (ती अनसूया जशी) सेवि तसि दुजी न देखे—असा अन्वय. १३. तिजजवळ. १४. पावला. १५. त्यांच्या अंगाची लाही. १६. वज्र.

बोलुनि असें त्रिमूर्ती येती मग अत्रिआश्रमा हो! ते, ।
तेथें बाळक होउनि पावोनि तिघेहि विश्रमा होते. ॥ ९२

इकडे सावित्री श्री उमा म्हणति, 'अझुनि कां नयेति पती? ।
जाले बहुदिन, जालें कसें?' म्हणुनि विरहवन्हिनें तपती. ॥ ९३

तों नारद मुनि तेथें आलांऽधारांत[1] जेविं केवि रवी, ।
सांगोनि वृत्त त्यांचें पतिचें, तद्धृदय तो निकें विरवी. ॥ ९४

'आतां कराल कैसें?' म्हणुनि म्हणे त्यांस लाजवून मुनी, ।
'आतां जा मागा तिस आर्जवुनी, वदुनियां मऊ, नमुनी.' ॥ ९५

त्या मग येति सतिगृहा, तों खेळवि बाळकां ति लालवुनी, ।
त्या मग मागति तेव्हां स्तवुनि नमुनि मस्तका तिला लवुनी. ॥ ९६

सति बोले, 'घ्या वळखुनि गे! या तुम्हि आपआपले पतिला.' ।
त्या म्हणती 'घेउं कसे? वरि बसला त्वत्प्रतापलेप[2] तिला.[3] ॥ ९७

आतां अंत न पाहीं, शरण[4] अम्ही गर्वहत तुलाऽलों कीं, ।
तूं धन्य धन्य! तुझिया पतिव्रतपणा नसे तुला[5] लोकीं. ॥ ९८

केले मुक्त तिणें ते, पतिसह मग पावती निजाश्रम त्या, ।
छळितां[6] सतीस जाल्या विधि हरि हर शक्ति तीनि ज्या श्रमल्या. ॥ ९९

श्रोत्यांच्या शंकेस्तव, माझ्या[7] गुरुराजमाय शोध मनीं, ।
घालुनि वदवि कथा ही; सिद्धाची वदलि मा यशोधमनी. ॥ १००

वासव बोले, 'सतिला छळितां बाळत्व देवदेवांशीं, ।
मुनिदर्शनें स्वरूपा प्रकटुनि वर देति,' हें वदे वांशी[8]. ॥ १०१

गेल्या त्रैमूर्ती[9] ते मागें, सति पोषि बाळकां हो! ती, ।
प्रीतीनें मग नामें जाली ठेविति हि सकळिकां होती. ॥ १०२

विधिसी चंद्र, हरिस तें दत्तहि, दुर्वास हो उमापतिला, ।

---

१. आला+अंधारांत. २. तुझ्या प्रतापाचें आवरण. ३. ह्याचा संबंध 'म्हणती' याकडे. ४. गर्वहत(गर्वामुळें ज्यांचें नुकसान झालें आहे अशा)आम्हीं तुला शरण आलों कीं—असा अन्वय. ५. बरोबरी. ६. ज्या तीनि विधिहरिहरशक्ति (सावित्री इ०) (त्या) सतीस छळितां श्रमल्या झाल्या—असा अन्वय. ७. गुरुराजमाय माझ्या मनीं शोध घालुनि ही कथा (दत्तजन्माची ही दुसरी कथा—नारदानें कळ लाविलेली वगैरे) वदवी; यशोधमनी (यश वाढविणारी अशी) सिद्धाची वदली (सिद्धानें सांगितलेली म्हणजे पहिली—गुरुचरित्र अ० ४ मध्यें असलेली) मा (मग). ८. वाणी. ९. ते त्रैमूर्ती गेल्यामागें (गेल्यानंतर).

ऐसीं नामें ठेवुनि पाळी संतोष हो! उमाप[1] तिला. ॥ १०३
मागति दुर्वास शशी निरोप मातेसि ते तपाचरणा, ।
'आज्ञा दे' म्हणवोनी विनविति दोघे धरोनियां चरणा. ॥ १०४
'ऐकें माते! दत्तचि त्रैमूर्ती हाचि गे! तुझ्या गेहा, ।
राहिल न करीं चिंता निजवस्तूरक्षणासि जागे हा.' ॥ १०५
सांगुनि यापरि माते, निरोप घेवोनि जाइ दुर्वास, ।
मागुनि निरोप शशिही शशिमंडळिं करि नवग्रहीं वास. ॥ १०६
दत्तात्रय जो त्र्यंशी अत्रिऋषीचा धरोनि आश्रम तो, ।
राहुनि भक्त जनांचा दवडी उपदेशुनी भवश्रम तो. ॥ १०७
तो दत्त दयार्णव हा श्रीगुरुरूपें धरीत अवतार, ।
शिष्य म्हणे त्या चरिता सांगुनि तूं मजहि करुनि अव[2] तार. ॥ १०८
शिष्याचे विनतीस्तव त्या चरितासी वदेल सिद्धमुनी, ।
रामात्मजसुत तेंचिहि वदेल सद्गुरुपदांबुजा नमुनी. ॥ १०९

---

## अध्याय चवथा.

सिद्ध वदे शिष्यातें, गुरुचा अवतार भक्त ताराया, ।
लागे अंबरिषास्तव नटणें बहुरूप अच्युता राया! ॥ १
दश अवतारादिक ते धरोनि हरि तो अनेक वेषानें, ।
रक्षुनि भक्तालागीं मर्दी दुष्टांसि तो अवेशानें. ॥ २
गंगा जेंवि भगीरथ आणि तपुनि उद्धरा कुळ क्षांत[3], ।
तस्येक[4] द्विजपत्नी होति पतिव्रत महा कुंलक्षांत[5]. ॥ ३
[6]पीठानगरीं होता द्विज तो विद्वान् गुणी महा सुमती, ।
पूजी अतिथी भावें तत्स्त्री तीं, नाम तीस गा सुमती. ॥ ४
दत्ताराधन नियमें, इच्छुनि सत्पुत्र, भक्तिनें करिती, ।
पतिसेवेसी सादर निष्टुनि मन तोषवी अनेक रितीं. ॥ ५

---

१. उमाप=मोप=पुष्कळ. २. रक्षण. ३. 'क्षांत=पृथ्वीवर' अशी मुळांत टीप आहे. 'उद्धर' (उद्धरावयास) व 'क्षांत' हीं दोन्ही रूपें चिंत्य आहेत. ४. तसी+एक. तसी म्ह० सगराप्रमाणचें. ५. मुळांत 'कु=पृथ्वी' असें आहे. यावरून 'या पृथ्वीवरच काय पण अशा हजारों पृथ्व्या धुंडल्या तरी अशी पतिव्रता स्त्री सांपडणार नाहीं' असा अर्थ संभवतो. ६. हें पीठानगर कोठें आहे?

दर्शदिनीं तो सुद्विज श्राद्धीं बसवोनि विप्र ते क्षणितो; ।
अतिथीवेषा धरुनी आला भिक्षेसि दत्त ते क्षणिं तो. ॥ ६
भोजन न विप्र करितां देतां दत्ता द्विजस्त्रि भिक्षेला, ।
दावी प्रसन्न वदनें स्वरूप तिस, पाहुनी परिक्षेला. ॥ ७
बोले, 'हे विप्रसती! तुझिया वर इच्छिला मनें मागें, ।
जालों प्रसन्न तुज, तव पाहोनि सुभक्ति परम नेमा, गे! ॥ ८
'मागें वरासि' वदतां नमुनि स्तव करित विप्रदारा हो, ।
'त्रैमूर्ती! त्वद्वरदें माझें इच्छीत ये उदारा! हो. ॥ ९
करुणाद्री! जगदीशा! मिथ्या नच होय गा! तुझें वचन, ।
परि गा! अल्पमती मी केलें म्हणवोनि हें पुन्हां सुचन.' ॥ १०
हर्षें स्तुति ऐकुनि तो, 'मागें जननी! म्हणे करीं धरुनी,' ।
'सत्य करिं' म्हणे सति मग 'बोलसि हे बोल तूं मेंदुद्धरुनी. ॥ ११
होउनि पुत्र बहुत मज मेले, द्वय अंध पंगु आहेत, ।
ज्ञानी त्वत्सम सुत गा! देउनि पुरवीं समग्र हा हेत. ॥ १२
जननी ऐसें आतां मजला वदलासि, हेंच साच करीं.' ।
देई वर दत्तमुनी धरुनी द्विजपत्निसी तसाच करीं. ॥ १३
दत्त म्हणे, 'हे जननी! होइल सत्पुत्र पूर्ण मजसम जा, ।
वर्ता त्याचे वाक्यें, नातरि जाईल टाकुनी समजा.' ॥ १४
देउनि अशा वराला तापसि जातां स्वआश्रमा, सति हो! ।
येउनियां पतिचरणां वंदुनि, बोलुनि हरि श्रमास ति हो. ॥ १५
पतिसी म्हणे अवज्ञा केली मी आज दर्शसुतिथींसी, ।
भोजन न विप्र करतां, दिधलें मी अन्न दत्त अतिथीसी.' ॥ १६
'धन्य' म्हणे द्विज 'केलें द्विश्चत्वारी कुळासि उद्धरिलें, ।
जाली पितरां तृप्ती होइल सत्पुत्र मीं मनीं धरिलें.' ॥ १७
भर्त्यासह आनंदें चिंतिति दत्ताचिया वराला जों, ।
जाली गर्भिण मग ते लागे आनंदुनी वैरा लाजों. ॥ १८
प्रसवे नवमासानें तेजस्वी पुत्र ती जसा सविता, ।

---

१. अमावास्येस. २. क्षणणें=क्षण देणें=हातावर दर्भ देऊन निमंत्रण करणें. पूर्वीं प्रथम आमंत्रण देतानांच क्षण देण्याची वहिवाट होती. आतां ब्राह्मण घरीं आल्यावर क्षण देतात. ३. तुझ्या वरानें ? ४. सुचविणें. ५. माझा उद्धार करून (?). ६. पतीला.

उत्साहजातकर्मे[1] जाला द्विज तो जनासि हांसविता. ॥ १९
वर्तवुनी मग जातक सांगितलें ज्योतिर्षीं सुगणकांनीं, ।
होइल हा गुरु सर्वां, तोषति ऐकोनि विप्रगण, कानीं. ॥ २०
श्रीहरि अवतरला हा जाणा चित्तांत, आइका, नाहीं ।
संशय; ऐसें ऐकुनि आनंदति तात आयि कानांहीं. ॥ २१
बोलति मग तातांबा,[2] 'हो हा अस्मत्कुलासि उद्धरिता, ।
दत्तवराचा म्हणवुनि जाणा श्रीपाद नाम हा धरिता.' ॥ २२
श्रीपाद श्रीवल्लभ ठेवुनि नामासि, धर्मलोकरिती[3] ।
करुनी, सप्तम वर्षीं हर्षें मुंजीस कौतुकें करिती. ॥ २३
मुंजीबंधन होतां बोले षट्शास्त्र वेद बाळक तो, ।
चौदा चौसष्टादी त्यास कशा, करतळांत अमळक[4] तो. ॥ २४
सकळ श्रुतिच्या अर्था सांगे, ऐकति समस्त विप्रवर, ।
क्षिप्र[5]वर उठुनि नमिती म्हणती विप्रांत हा कवि प्रवर. ॥ २५
होतां षोडश वर्षें तातांबा वदति कर विवाहा तों, ।
बोले सुत, 'मज माता योषा[6] सर्वत्र आण वाहातों. ॥ २६
योगश्रीवांचुनि मी नवरी जाणा कदापि मानवि[7] जी ।
मानी न च; भर्त्यासी योगश्री बहुत मात्र मान विजी.' ॥ २७
तो मग जननीसि म्हणे, 'दे मज तीर्थाटणासि आज्ञाही' ।
ऐकुनि ते पतिस म्हणे समजा मनिं पूर्वदत्त संज्ञा ही. ॥ २८
तो हाचि दत्त योगी अवतरला साच आमुच्या सदनीं, ।
ताराया आम्हांसी आला हा कीं भवाब्धिच्या सदनीं.[9] ॥ २९
मग म्हणति वचन याचें न मानितां विघ्न होय तें आम्हां, ।
आतां नमोनि विनवूं स्वरक्षणा याचि हो परब्रह्मा.' ॥ ३०
मग विनविति पुत्रासी, 'आम्हां रक्षील कोण वृद्धपणीं, ।
कोणांऽधपुत्र रक्षी, जरि तूं घालोनि जाशि रे! कपणी ? ॥ ३१
करिसि निराशा कां गा! असतां चित्तीं तुझा भरंवसा कीं'. ।
तो मग आश्वासि तयां त्यांची ऐकोनि लोभरंवसाकीं.[10] ॥ ३२

---

१. उत्साहानें आणि जातकर्म नांवाचा संस्कार करून. २. तात+अंबा. ३. धर्म व लोकरीति यांस अनुसरून. ४. आमलक=आवळा. ५. त्वरित. ६. स्त्री. ७. स्त्री. ८. डोलवी. ९. सदन=पाणी. १०. लोभशब्दाचीं वाक्यें.

मग पाहि कृपानयनीं जे सुत मूकांध तेचि जव दोनी, ।
जाले सचक्षु कविही, म्हणति निगमशास्त्र साहज वदोनी. ॥　　३३
मग नमुनि तैया[1] स्तवुनी कृतार्थ जालोंचि म्हणति[2] हे. जननी ।
तो[3] मग पाहि म्हणे 'सुत पूर्णायू साच असति हे जननीं[4]. ॥　　३४
सश्रीस्त्रीसुतपौत्रीं नांदत असतील जेंवि **वा**सवसे, ।
सद्गति तुम्हांस अंतीं, **आ**नंदवनीं करोनि वास वसे.' ॥　　३५
मग वेगें तो गेला **आ**नंदवनीं तसाच **मा**रुतसा, ।
कोणिहि[5] वीर शर जवें न शके अवनींत साच मारु तसा. ॥　　३६
त्या **का**शिक्षेत्रातें दावी अष्टांगयोगसाधन[6] तो, ।
जनसंग्रहार्थ, नृपती संची द्विजरक्षणा जसा धन तो. ॥　　३७
त्या क्षेत्रीं कांहीं दिन राहे घेउनि चतुर्थ आश्रम तो, ।
संन्यासपथ स्थापी सर्वहि यतिचा हरोनियां श्रम तो. ॥　　३८
तेथुनि तीर्थें पावन करीत ये **ब**दरिकाश्रमादि क्ष्मा[7] ।
हिंडत, भक्तजनासी देत असे, हरुनियां श्रमा, दीक्षा[8]. ॥　　३९
उद्धारित भक्तजनां ये तीर्थें करित सारिं **गो**कर्णीं, ।
तेथिल महिम्याची ते सुकथा सुजनाचिया रिगो[9] कर्णीं. ॥　　४०
**सिद्ध** मुनींच्या वचना ऐकुनि कवळीत शिष्य पादास, ।
**रा**मात्मज सुत जाला **श्री**गुरुची इच्छुनी कृपा दास. ॥　　४१

---

## अध्याय पांचवा[10].

शिष्य म्हणे, 'गुरुराया ! तुझिया वचनें जि[11] ! जीव आरमला[12], ।
रमला होता[13] मन्मनगृहीं गिळिन म्हणुनि आधि[14] आ[15] रमला[16]. ॥　　१
तो त्वांचि बोधशस्त्रें छेदन केला समानसा दर[17] कीं, ।
राहेलोंऽतां जालों[18] श्रवणीं चित्तीं समान सादर कीं. ॥　　२

---

१. दत्तात्रयाला. २. दोघे पुत्र. ३. दत्तात्रय. ४. (या) जन्मीं. ५. कोणिहि वीर अवनींत तसा जवें (वेगानें) शर साच मारूं न शके. ६. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधि. ७. पृथ्वी. ८. संन्यासदीक्षा. ९. शिरो. १०. श्रीनृसिंह सरस्वतीकृत गुरुचरित्राच्या ६ व्या अध्यायांतील कथा यांत आहे. ११. अहो. १२. विश्राम पावला. १३. गुंतून राहिला होता. याचा कर्ता 'आ'. १४. मानसिक दुःखें—आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक. १५. तोंड किंवा वाणी. १६. सिद्धाच्या वचनानें ब्रह्मानंदांत निमग्न झाला. १७. प्रसिद्ध, संसारांतील भीति. १८. राहेला जालों=राहिलेला झालों, अर्थात् पूर्णपणें राहिलों.

आतां सांग कथेसी श्रीगुरु हिंडे किमर्थ तीर्थी तो, ।
'गोकर्णीं[1] ये, महिमा काय बहुत बोल तूं समर्था ! तो.' ॥ ३
शिष्याच्या वचनाला ऐकुनि सिद्धाचि ते वदे वाचा, ।
'भक्तां उपदेशास्तव हिंडे गुरुराज देवदेवाचा. ॥ ४
ये श्रीगुरु गोकर्णीं तेथिल आहे विशेष महिमान, ।
श्रवणें डोलवितहि तो शीर्षी असतांहि शेष[2] महि मान. ॥ ५
त्या क्षेत्रामाझारीं शंभूचें दिव्य आत्मलिंग वसे, ।
नामें महाबळेश्वर इच्छित जें सर्व दर्शनें गवसे. ॥ ६
तें लिंग श्रीगणपति जाला तो स्थापिताचि या महिंत, ।
[3]जोडे शिवरात्रीसी पूजीतो त्यास अष्टयाम हित. ॥ ७
विधिसह सुर शक्रादिक अर्चिति त्याच्या सदैव पदकमला, ।
देववधूही पूजिति, अर्चिहि हरि सह सदैव पंद[4] कमला[5].' ॥ ८
शिष्य म्हणे, 'नवल मनीं वाटे ऐकोनि हे तुझी वांशी[6], ।
स्थापी गणेश म्हणसी ऐकाया हेंचि हेतु जीवाशी. ॥ ९
स्थापी गणेश कैसा कारण तें काय जी ! निरोपावें, ।
तुझिया वचनें करुनी बहु संतोषासि मी गुरो ! पावें.' ॥ १०
सिद्ध म्हणे, 'तीच कथा शिष्या; सांगेन आदि गा ! तूतें, ।
विधिसुत पुलस्त्य होता महातपस्वी प्रसिद्ध गीतूतें[7]. ॥ ११
कैकशिनामें करुनी त्याची भार्या कनिष्ठ जी होती, ।
पूजी शिवलिंगासी भक्ति करी एकनिष्ठ जी होती. ॥ १२
दशमुख पुत्र जियेचा, चिंतुनि जय जित (?) या मनें[8] मीती[9] ।
आणुनि, लिंग करुनियां अंसे[10] धरुनि यंजित यमनेमा[11] ती[12]. ॥ १३
पूजासमयीं आला एक दिनीं वीसनेत्रि दशमान[13], ।

---

१. गोकर्ण या नांवानें प्रसिद्ध क्षेत्र कारवार जिल्ह्यांत आहे. २. तो शेष (सर्पराज शीर्षी (मस्तकावर) मही (पृथ्वी) असतांहि गोकर्णमाहात्म्याच्या श्रवणें मान डोलवित. श्रवणाच्या आनंदभरांत शेषास पृथ्वीचें ओझें कांहींच वाटलें नाहीं-असा भावार्थ. ३. (जो) शिवरात्रीसी (तें लिंग) पूजीतो त्यास अष्टयाम आठही प्रहर म्ह० सर्वकाळ) हित (कल्याण) जोडे (मिळे)—असा सार्थान्वय. ४. स्थान. ५. लक्ष्मी. ६. वाणी. ७. गंधर्वांना. ८. या मनें, या हेतूनें. ९. हें 'आणुनि'चें कर्म. १०. यजित असे=पूजित होती. ११. प्राणायाम आणि व्रतासंबंधी नियम. 'शौचमिज्या तपोदानं स्वाध्यायोपस्थनिग्रहः । व्रतं मौनोपवासं च स्नानं च नियमा दश ॥' अत्रिवचन. १२. कैकशी. १३. दहा माना (कंठ) ज्याला आहेत तो.

गर्विष्ठ, दुष्ट, कोपी जो; ज्या गृहिं कधिं नव्हे त्रिदशमान[1]. ॥ १४
तो नमुनि पुसे तेव्हां, 'मृदार्चिसी[2] कां?' म्हणोनि आइ! तिला, ।
'येणें काय प्राप्ती, पूजिसि थोरहि करोनि आयितिला[3].' ॥ १५
'कैलासपदप्राप्ती अंतीं गा!' म्हणुनि ती तयाशि वदे ।
तो तीस म्हणे, 'संकट इतकें न लगेचि मेलिया[4] शिव दे. ॥ १६
कैलासासह शंभू आणिन आतांचि साच लंकेला, ।
केला निश्चय हा म्यां, कांहीं न धरीं मनांत शंकेला. ॥ १७
माझी जननी होसी पूजिसि माती न काइ लाज मला, ।
जिंकीं न जरि सुरासुर पादोदरसंघ[5] कां ईलां[6] जमला[7].' ॥ १८
बोलुनि असि प्रतिज्ञा, करि, कोणिहि घेइना सवें, गमन; ।
गेला कैलासाला मार्गें त्यजुन पवनास वेगमन[8]. ॥ १९
कैलास भुवन तेव्हां उपडूं पाहे निकें[9] विसां हस्तीं, ।
नं[10] करी विचार, न गणी कोणा मातोनि केंवि? सा हस्ती. ॥ २०
कैलासींचे शिवगण[11] पावति भय ते तसीच गिरिजा[12] ते, ।
येउनि पाहि शिवासी, स्वस्थ बसे भय नसेचि, परि ज्यातें[13]. ॥ २१
हालवितां शिवलोका जाला आकांत तो त्रिलोकांसी[14], ।
हालति चवदा[15] भुवनें, वाटे कल्पांत विश्वलोकासी[16]. ॥ २२
विनवी शिवासि गिरिजा, 'सांगा जी! काय होत कैलासा?' ।
तों शिव म्हणे, 'दशानन खेळे मद्भक्त, येत उल्हासा.' ॥ २३

---

१. देवांचा सत्कार. २. मृत्+अर्चिसी=माती पूजितेस. ३. आयती=योगसाधन. ४. मेल्यावर शंकर कैलासपद देणार इतकें कशाला पाहिजे? मी तुला तें आतांच मिळवून देतों—असा भाव. ५. पाद+उदर+संघ. ६. पृथ्वीवर. ७. पुष्ट झाला. जरि मी सुरासुर न जिंकीं तरी हा माझा पादोदरसंघरूपी देह इलां कां जमला—असा अन्वय. ८. असि प्रतिज्ञा बोलुनि, सवें कोणिहि घेईना (बरोबर कोणासही न घेतां) गमन करी. मनाप्रमाणें वेग ज्याचा तो वेगमन. ९. एकदम. १०. तो विचार न करी, मातोनि कोणा न गणी. केंवी? हस्तीसा—असा अन्वय. येथें 'सा हस्ति' यांत 'सा' हें शब्दयोगी अव्यय नियमाप्रमाणें पुढें न जोडतां मागें ठेविलें आहे. ११. शृंगी, भृंगी इत्यादि शिवाचे दूत. १२. याचा कर्ता 'गिरिजा' (पार्वती) १३. शिवाला. १४. स्वर्ग, पृथ्वी आणि पाताललोक यांना. १५. चवदा लोक. भूर्लोक (पृथ्वी), भुवर्लोक, स्वर्लोक, महोलोक, जनलोक, तपोलोक आणि सत्यलोक (ब्रह्मलोक) हे पृथ्वीपासून क्रमानें वरील सात लोक; तसेच अतल, वितल, सुतल, तलातल, रसातल, महातल आणि पाताल हे पृथ्वीच्या खालील सात लोक. १६. विश्व=सर्व.

शिववच ऐकुनि गिरिजा विनवी मागुति धरोनि पायांसी, ।
'रक्षाया जन सुरवर सत्वर आतां करीं उपायासी.' ॥ २४
गिरिजेचे विनतीस्तव वामकरें दडपितांचि शंकर तो, ।
अडकति हस्त गिरीतें स्तवि मग सांबासि विंशतीकर तो. ॥ २५
'जयजय शिव भव ईशा! पि[1]नाकधर! हे! कृपाल कामारी! ।
अपराध करी गर्वें, परी न मज भक्तपालका! मारीं.' ॥ २६
सोडी, स्तव ऐकुनि शिव, सुटतां तेथोनि भक्तलंकेशें ।
येउनि, शिवपद करुनि क्षालन नेत्रांबुनें, पुसी केशें. ॥ २७
न चले बळ उपडाया कैलासगिरी कदापि यास्तव तो ।
करिता जाला मग हो! नानापरि शंभुचा तया स्तव तो. ॥ २८
स्वकरेंचि स्व[2]करैक छेदुनि तो छेदि एकहि स्वशिरा, ।
वीणा त्यां[3]चा करि, वरि तंती लावी हि काढुनि स्व[4]शिरा. ॥ २९
मग सामगायन करी छत्तिस[5] भार्या हि सहित सा[7] रागा, ।
स[6]मयोक्ताऽऽलापुनियां स्वरवर्णोच्चार करित सा[7] रा गा. ॥ ३०
ऐकोनि सामगायन, चित्तीं तोषोनि शैलजावर तो, ।
वर तो माग म्हणे, कर ठेउनि त[8]च्छीर्षनीरजावर तो. ॥ ३१
देतां वरदानासी नमोनि तेव्हां शिवासि लंकेश ।
बोले, 'कैलासासह नेइन तुम्हां चलाचि लंकेस. ॥ ३२
त्वल्लिंगाचें पूजन आहे जननीस हा सदा नेम, ।
पूजा केल्यावांचुनि भक्षित नाहींच ती कदा नेम[9]. ॥ ३३
तरि लंकेसि चलावें आतां कैलासपर्वतासहित ।
मागें हेंचि तुम्हांसी येणें जोडेचि 'सं[10]र्वतांस हित.' ॥ ३४

---

१. पिनाक=शिवधनु. २. स्वकर+एक=आपला एक हात. ३. शिर व हात यांचा, मस्तकाचा भोपळा, हाताची दांडी आणि शिरांच्या तारा मिळून एक वीणा केला—असा अर्थ. ४. आंगांतील शिरा, नाड्या. ५. संगीतरत्नाकराप्रमाणें गाण्याचे राग सहा आहेत. तेः—श्री. वसंत, भैरव, पंचम, मेघ अथवा मेघमल्हार आणि बृहनाट अथवा नटनारायण. यांपैकीं प्रत्येक रागास सहा स्त्रिया म्हणजे रागिण्या आहेत. ६. समय+उक्ता=ज्या वेळेला ज्या रागरागिण्या म्हणावयाच्या त्या. ७. सा, रि, ग, म, प, ध, नि, हे सात स्वर. ८. तत्+शीर्ष+नीरज=रावणाच्या शिरकमलावर. ९. अन्न. १०. सर्वत्रांस.

शिव बोले, 'घे देतों भक्ता! मी आत्मलिंग हें तूला, ।
तूला[1] नसे ययातें, पुरविल तव सर्व जाण हेतूला. ॥ ३५
लंकेशी जाशी तों भूमीस न ठेविं साच लक्षातें, ।
हें वचन ठेविना तरि राहेलचि केंवि सोऽचल[2] क्ष्मातें[3]. ॥ ३६
होशिल मद्रूपचि तूं पूजिसि जरि अब्द सर्व गा! तीन, ।
कैलास त्वन्नगरी होय, मग तव गुण कां नॄं[4] गाती न?' ॥ ३७
ऐशा वरदानासी देउनि मग आत्मलिंग दे त्यातें, ।
घेउनि करीं निघे तो लंकेस्यानंद[5] फार दैत्यातें. ॥ ३८
हें वृत[6] नारद सांगे जाउनियां पाकशासन[7]सभेतें, ।
तें ऐकुनि शक्राचें पावे अति बहुत हो मनस[8] भेतें[9]. ॥ ३९
संविधीसुत[10] वासव मग जाउनियां सत्यलोकवासाचें[11] ।
वंदुनि पदाब्ज वृत तें सांगे आद्यंत तेधवां साचें. ॥ ४०
ससुतविधि[12] शक्र मग ते येउनि वैकुंठिं सांगती हरितें. ।
रावण शिवासि भुलवुनि, गान करुनि आत्मलिंग हो! हरि तें. ॥ ४१
म्हणती, 'हरि! तुज लागे संहारायासि दैत्य अवतरणें, ।
होइल जड[13] तुजचि पुढें, म्हणउनि शीघ्रचि उपाय गा! करणें. ॥ ४२
स्वपुरीं प्रवेशतांऽसुर अमरचि होइल असा वर शिवाचा, ।
तरि करि उपाय झडकरि'. उठे हरी ऐकुनी तदॅशि[14] वाचा. ॥ ४३
हरि मुनिस[15] म्हणे, 'जा प्राँक्[16] गोष्टि तया कथुनि चांगला गुंतव[17], ।
करितों उपाय आम्ही, जाउं; न[18] दे पथिं विलंब लागुं तव.' ॥ ४४
दवडुनि नारद, हरि मग अतित्वरें येउनी शिवाजवळ, ।
बोले, 'दैत्यावर तूं सदयेचा केंवि होसि आज वळे[19]? ॥ ४५
देसी दैत्यासी वॆरं वॆरं[20], तूं न करुनि विवेक लिंगातें, ।
बससी थंड कसा! नर जैसा सेवुनि[21] निंवे कालिंगातें[21]. ॥ ४६

---

१. बरोबरी. २. अचलसें; पर्वताप्रमाणें (न हालतां). ३. पृथ्वीवर. ४. नर, मनुष्यें. ५. लंकेसी+आनंद. ६. वृत्त. ७. पाकशासन=पाकदैत्याचें शासन करणारा, इंद्र. ८. मन. ९. भीतीला. १०. विधिसुत=नारद. ११. ब्रह्मदेवाचें. १२. मुलासहित (नारदासह) ब्रह्मदेव. १३. अवघड. १४. तत्+अशी=त्या ब्रह्मदेवाची अशी वाचा ऐकुनी. १५. नारदास. १६. आधीं. १७. (बोलण्यांत) गुंतवून ठेव. १८. तव पथीं विलंब न लागुं दे=तूं वाटेंत कोठें उशीर लावूं नकोस. १९. मेघ. २०. श्रेष्ठ असा वर. २१. कलिंगडें (?) खाऊन.

वर देउनि दैत्या तूं माजविशी, मामनेक[1] सायास, ।
पडती मर्दाया, तरि उपाय योजूं मनें कसा यास ?' ॥ ४७
शिव बोले, 'श्रीहरि रे! दैत्य भुलवि भक्तिनें कसा मातें, ।
वीणा स्वशिराचा करि, सुस्वर गायी अनेक सामांतें[2]. ॥ ४८
म्हणउनि[3] लिंग दिलें म्यां घालुनि वचनासि गोवि भूलीला.' ।
हरि मग म्हणे, 'तुझी हे विचित्र अति बहु बघों[4] विभू! लीला. ॥ ४९
देशी[5] तरि लिंग कधीं?' शिव बोले, 'होति पांच सा[6] नाडी[7], ।
ठेवुनि भूवरि लिंगा मार्गीं दैत्यासि जा असा नाडीं[8]'. ॥ ५०
सत्वर हरि जाउनि मग सांगुनि तें वृत्त विघ्नरायाला[9] ।
बोले, 'जावें तरि तूं त्या दैत्या विघ्न तें करायाला. ॥ ५१
निर्विघ्नास्तव तुजला आरंभीं नमिति सर्व भू[10] लवुनी, ।
तुज नकळत लिंगासी नेत असे असुर शर्वे[11] भूलवुनी. ॥ ५२
बटुवेषा तूं धरुनी, देउनि विश्वास फार दैत्यासी, ।
स्वकरीं घेउनि लिंगा स्थापीं भू[12] मग ढळे न कधिं त्यासी. ॥ ५३
रवि अस्तमान[13] दिसतां रावण संध्या करावया बसतां, ।
करितां लघुशंकेला तव करिं देईल लिंग, तूं दिसतां. ॥ ५४
नारद गेला यास्तव मार्गीं त्यासीं विलंब लावाया, ।
करशील कार्य हें तूं म्हणउनि आलों तुला बलावाया. ॥ ५५
मित्र[14]आड सुदर्शन, दावाया अस्त, मीहि घालीन; ।
स्थापी घेउनि लिंगा होउनि बोलोनि नम्र गा! लीनें[15].' ॥ ५६
हरिच्या वचना ऐकुनि मागे गुड[16] मोदकादि भक्षाया, ।
जें जें मागे गणपति देउनि तें धाडि लिंग रक्षाया. ॥ ५७
आधिं पुढें नारद जो गेला तो रावणासि भेटुनियां, ।
पुसत वृतांता अवघ्या, 'लंकेशा! येशि सांग कोठुनियां?' ॥ ५८
मुनिला रावण सांगे जालेल्या सर्व वर्तमानासी, ।
तेव्हां मुनि मग बोले, 'दावीं मज तूं तया निधानासी[17]. ॥ ५९

---

१. मर्दाया मामनेक (माम्=मला+अनेक) सायास पडती—असा अन्वय. २. साम (नपुं.)= सामवेदांतील गायनाच्या ऋचा. ३. भूलीला घालुनि (तो) वचनासि गोवि (बांधुन घेई) म्हणउनि (म्हणून) म्यां लिंग दिलें—असा सान्वयार्थ. ४. बघों, पाहतों. ५. दिलेंस. ६. सहा. ७. घटका. ८. नुकसान कर. ९. गणपतीला. १०. पृथ्वी, पृथ्वीवरील लोक. ११. शंकरास. १२. पृथ्वीवर. १३. अस्तास जाणारा. १४. सूर्याआड. १५. अति गरीब. १६. गूळ. १७. ठेवा, मौल्यवान् जिन्नस.

'महिमा, खुण, लिंगाची उत्पत्त्याद्यंत सर्व मी जाणें, ।
बैसें सांगेन तुला, ऐकुनि सर्वहि अनुक्रमीं जाणें. ॥ ६०
ब्रह्मांडीं मृग होता हेमाद्रीपर्वता ऐसा पडला, ।
ब्रह्मा विष्णु महेश्वर जातां ते पारधीस सांपडला. ॥ ६१
चापीं लावूनि शरा सोडुनि मारिति तयासि तत्क्षण ते, ।
मग करिती आनंदें स्वकरें काढोनि मांसभक्षण तें. ॥ ६२
शृंगें तीन मृगा त्या, त्रय लिंगें त्यांतळीं जसे मित्रें, ।
गा! तींच आत्मलिंगें घेती एकेक ते तिघे मित्र. ॥ ६३
त्या आत्मलिंगयोगें महत्व आहे मुकुंदशिवविधिसी, ।
होती शिवस्वरूपी पूजिति तीन्यब्द जे यथाविधिसी. ॥ ६४
दैवाचा बहु म्हणउनि जालें रे! प्राप्त लिंग हें तूला, ।
पूर्जी त्रय अब्दवरी पुरविल तुझिया समग्र हेतूला. ॥ ६५
आणिक अपार महिमा ऐकें टाकोनि सर्व शंकेला.' ।
दैत्य म्हणे, 'वेळ नसे जाणें मजला त्वरेंचि लंकेला.' ॥ ६६
त्याला मग मुनि बोले, 'जाला रविअस्त, वेद तूं चार ।
जाणसि षड्शास्त्रेंही, न करिसि संध्या बुडेल आचार. ॥ ६७
द्विजसुत सज्ञानीही होउनियां ब्रह्मकर्म लोपविशी.' ।
मग मुनि संध्ये जाला नदीतटीं पाहुनी जलोपविशी. ॥ ६८
रावण चिंता करि तों गजास्य बटुवेष ये तयापासीं. ।
पाहुनि दैत्य म्हणे, 'हा न करी विश्वासघातपापासीं. ॥ ६९
याजवळि लिंग देउनि, पाहुनि संध्या करूं सुतोयाला, ।
परि आदींहि पुसावें कुळ, जननी, तात कोण तो याला.' ॥ ७०
रावण बटुच्या सन्निध येतां बटु तो पलायनास करी, ।
द्विजरूप धरुनि, मग धरि अभयातें देउनी तयास करीं. ॥ ७१
कुरवाळुनि बटुवदना बोले, 'न भियें सुगुणनिधि! राहें; ।
कोण तुझी मातृ पिता? मजला सांगें धरोनि धीरा, हें.' ॥ ७२
गणपति म्हणे तयासी, 'नामें पुससी कशासि, मत्तातें ।

---

१. उत्पत्ति+आद्यंत=उत्पत्तीसंबंधी सर्व हकीकत. २. मेरुपर्वताप्रमाणें(लांबलचक). ३. त्या शिंगांखालीं. ४. सूर्य. ५. तीनी+अब्द=तीन वर्षें. याच अध्यायांतील ३७ वी गीति पहा. ६. संध्यावंदनादि. ७. मग मुनि नदी पाहुनी (तिच्या) तटीं संध्ये (संध्येकरितां) जलोपविशी

आहे काय तुझें ऋण द्यावें सांगें तुझ्यास मत्तातें.' ॥ ७३
दैत्य म्हणे, 'स्नेहानें पुसतों, सांगें स्वतातनामातें.' ।
हेरंब म्हणे, 'ऐकें[1] पुससी जरि धरुनियां वनां मातें. ॥ ७४
गिरिजा मम माता ते, पितयाचें नाम सत्य शंकर हें.' ।
ऐकुनि दैत्य म्हणे, 'घे लिंग क्षणभरिं, करीं सुशंकर[2] हें. ॥ ७५
बटु रे! तव तात सदा भिकारि, सुख नाहिं कीं लैव[3] तुलाही, ।
चल आमुचे घरा, सुख भोगीं, तूं बुद्धिमान, अतुला[4] ही. ' ॥ ७६
बटु बोले, 'त्वन्नगरीं असती खातील खास मज रक्ष[5], ।
हो! सुकृत घडेल तुला, सोडीं मज दशशिरा! समज रक्ष.[6] ॥ ७७
जड लिंग असेल तुझें धरवेना, मज धरीं कदा न करीं, ।
मी बाळ अल्पमति मज आग्रह सहसाहि तूं कदा न करीं. ॥ ७८
सोडीं गा! भय वाटे, मज तंव पीडीं न एकल्या वाटे.[7]' ।
विश्वास मनीं दैत्या मृदुवचनें तदशिं[8] ऐकल्या वाटे. ॥ ७९
दिधलें लिंग मग तया नानापरि सांगुनी सुगप[9] हातीं, ।
कौतुक बसुनि विमानीं सुरवृंदें जाहलीं मग पहातीं. ॥ ८०
घेउनि लिंग बटु करीं, 'बोले त्रयवार तुज बलावीन, ।
जाल्या जड मी क्षितिवरि ठेविन, यास्तव विलंब लावीं न.' ॥ ८१
संध्या करीत रावण बैसे मग सागरातटाकीं तो, ।
विधिपूर्वक अर्घ्यासीं मंत्रुनियां सागरांत टाकी तो. ॥ ८२
तेसंधिं[10] मारि तिंदां[11] क्षणक्षणा एकदंत हाकेला, ।
'ठेविन भूं[12], सत्वर ये, म्हणसिल विश्वासघात हा केला.' ॥ ८३
रावण 'येतों' ऐसी खुण, उचलुनि पाणि वाम, जंव दावी, ।
तों बटु वदे 'न; शब्द न आतां दुःपवि (?) तुवां मज वदावी. ॥ ८४

---

(जलाजवळ बसणारा असा) झाला. ८. चांगल्या पाण्याला. ९. प्रथम. १०. तुझें काय ऋण (देणें) आहे (कीं जें) मत्तातें तुझ्यास मत्तात्तें (मत्त जो तूं त्यास) द्यावें (हें) सांगें—असा सार्थान्वय.

१. जरि मातें वनां (रानांत) धरुनियां पुससी (तरी) ऐकें—असा अन्वय. २. चांगलें कल्याण करणारें. हें 'लिंगा'चें विशेषण. ३. किंचित्. ४. हें 'घरा'चें विशेषण. ५. राक्षस. ६. हो (अहो!) दशशिरा (रावणा!) मज सोडीं, तुला सुकृत (पुण्य) घडेल (हा) समज रक्ष (ध्यानांत ठेव). ७. मार्गांत. ८. तत्+अशि=अशीं तद्वचनें ऐकल्या (ऐकून) दैत्या मनीं विश्वास वाटे. ९. मग तया नानापरि सुगप (गोड गोड गप्पा, गोष्टी) सांगुनी हातीं लिंग दिधलें. १०. त्या वेळीं. ११. तीन वेळां. १२. भूवरि.

धरवे न लिंग, पडिलें.' वदुनि[1] असें विघ्नराज रक्षातें, ।
ठेवी साक्षी ठेवुनि, पाहति जे खांत निर्जर क्षातें. ॥ ८५

तें पाहुनि आनंदें करिती वर्षाव देव सुमनांचा[2], ।
तैं दैत्यानंदुतरे[3] जेंवि[4] कृपण नष्टतां वसु मनाचा. ॥ ८६

मग धांवुनि अतिकोपें देउनि तो मुष्टिघात दांपि[5] तया. ।
बटु बोले, 'कां मारिसि? सांगेनचि भेटतां' तदा 'पितया.' ॥ ८७

वदुनि असें पळत, मनीं हांसत, बाहीर दाविचि रडोनी, ।
लिंग असुर वोढी, तों जालें गोकर्ण[6] जेंवि चिरडोनी. ॥ ८८

खबळ सकळ खळ लावी, धांपें[7] पसरीहि आ, गळे निढ़ळ[8], ।
परि लिंग कदा नुपडे राहे तें मेरुं[9]आगळें निढळ[10]. ॥ ८९

यास्तव गोकर्णमहाबळईश्वर नाम जाहलें त्याचें, ।
करितां पूजन भजना नाशी अघ सर्व नांमघेत्याचें[11]. ॥ ९०

गोकर्णाकृति[12] लिंगा क्षेत्राख्या म्हणुनि होत गोकर्ण, ।
तेथिल विशेष महिमा, तच्छ्रवणीं म्हणुनि हो! तंगो[13] कर्ण[14]. ॥ ९१

बहु तप मग रावण तो तेथें करि जननि कैकशीसहित, ।
त्याचे वरप्रसादें इच्छित जें जोडलें तयास हित. ॥ ९२

तेथिल अपार महिमा केलासे वास सर्व देवांनीं, ।
शिष्यातें प्रीतीनें सिद्धमुनी सर्व तो वदे, वानी[15]. ॥ ९३

नामचि शिवासि जालें जैसें गरनाश[16] परशु रामाचें, ।
तैसें[17] श्रीगुरुचरितचि मन मान्यघनाश परशुरामाचें. ॥ ९४

---

१. विघ्नराज असें रक्षातें (राक्षसास) वदुनि जे निर्जर (देव) खांत (आकाशांत) पाहति (त्यांस) साक्षी ठेवुनि (तें लिंग) क्षातें (पृथ्वीवर) ठेवी—असा सार्थान्वय. २. पुष्पांचा. ३. दैत्य+आनंद+उतरे=राक्षसाचा आनंद कमी झाला. ४. जेंवि वसु (संपत्ति) नष्टतां कृपण मनाचा (आनंद उतरे)—असा अन्वय. ५. दरडावी. ६. गाईचा कान. ७. दम लागून. ८. निढळ (सं. निढिल) म्हणजे कपाळ. लक्षणेनें कपाळाचा घाम. ९. मेरुपर्वतापेक्षां ज्यास्त. १०. न हालणारें. ११. नांव घेणाराचें. १२. लिंगा गोकर्णाकृति (होय) म्हणुनि क्षेत्राख्या (क्षेत्राचें नांव) गोकर्ण होत (झालें). १३. टिको, लागो. १४. कान. १५. वर्णन करी. याचा कर्ता 'तो सिद्धमुनी.' १६. हालाहल विषाचा नाश करण्यास परशुप्रमाणें जें तें रामाचें नाम. १७. तैसें परशुरामाचें (कवीचें) मन श्रीगुरुचरितचि अघनाश (पापनाशक) मानी.

## अध्याय सहावा.

विनवी[1] नामांकित जो श्रीसिद्धातें पदाब्ज तो नमुनी ।
'गोकर्णीचा महिमा सांगें मज सर्व जी! वदोन मुनी! ॥ १

सांडुनि समस्त तीर्थें गोकर्णी गुरु किमर्थ तो रमला? ।
सांगा तेथिल महिमा विशेष जो बहुत काय थोर मला.' ॥ २

सिद्ध म्हणे, 'गा! शिष्या! पुससी जरि तूं चरित्र सकळहि तें, ।
सांगेन तुला ज्याचे श्रवणें जोडति नरासि सकळ हितें. ॥ ३

होता श्रेष्ठ नृप महा इक्ष्वाकु[2]वंशिं नाम मित्रसह, ।
करभारा नृप सर्वहि देती, नांदे कलत्रमित्रसह. ॥ ४

धर्मप्रताप ज्याचा पसरे, जैसा प्रकाश त[3]रणीचा, ।
अपजयतम कधिं हि नसे, जयरवि ज्याचा प्रकाशत र[4]णींचा. ॥ ५

एके दिवशीं तो नृप गेला पारध वनीं करायासी, ।
मारी श्वापद बहु तो, हर्ष मनीं बहु अधीक रायासी. ॥ ६

तों सन्मुख राक्षस; तो[5] पाहुनि चित्तांत तो बहु भियाला, ।
'काय' म्हणे 'करुं, सेना पाहुनियां राहिना हि उभि याला.' ॥ ७

मग धैर्यें शर वर्षे, व[6]र्षीं वर्षे कसा जसा अ[7]द्री, ।
वर्मीं शर लागे, मग राक्षस भू[8] उलथला जसा अद्री. ॥ ८

पडतां राक्षस अ[9]वनीं तो, त्याच्या जवळि ये सहोदर तो, ।
तो त्यास म्हणे, 'माझा घे सुं[10]ड, न धरीं मनास हो! द[11]रें तो. ॥ ९

युद्धीं न जिंकवे जरि तरि करि कापट्य तूं स्वभावासी. ।
मग सोडीं प्राणातें.' या परि तो बोलुनी स्व[12]भावासी. ॥ १०

नरवेष धरी मग तो राक्षस ऐकोनि बोल भावाचे, ।
येउनि नृपासि विनवी सन्मुख राहोनि तो उभा वाचे. ॥ ११

'हे नृपति! करिन सेवा, सर्वहि मी सू[13]पशास्त्र जाणतसें, ।
अन्न करिन, नि[14]र्जरही घोटिति वासेंचि लाळ जाण तसें.' ॥ १२

---

१. या अध्यायांत मूळ नृसिंहनामांकित=नामधारक सरस्वतीच्या पोथींतील सातव्या अध्यायांतील कथा आहे. २. इक्ष्वाकु हा वैवस्वतमनूच्या दहा पुत्रांतील ज्येष्ठ. हा त्याच्या शिंकेपासून (क्षुत्=शिंक) झाला म्हणून त्यास इक्ष्वाकु हें नांव प्राप्त झालें. ३. सूर्याचा. ४. समरांगणांतील. ५. राक्षस. हें 'पाहुनि' याचें कर्म. ६. वर्षाकाळीं. ७. मेघ. ८. भूमीवर. ९. पृथ्वीवर. 'अवनीं' हें सप्तम्यर्थी सामान्यरूप. १०. सूड. ११. भीति. १२. आपल्या भावाला. १३. पाकनिष्पत्तीचें शास्त्र. १४. देव.

विनवणि ऐकुनि भूपति ठेवुनि सेवे तयासि नगरा ये, ।
येतां पितॄरतिथी[1] द्विज बलाविले गुरु वसिष्ठ मग रायें. ॥ १३

जो कां सेवक नूतन तयासि सांगे करावया पाक, ।
बसवूनि द्विजपंक्ती, देई[2] क्षण मन करोनियां पाक[3]. ॥ १४

'वाढुनि पात्रें' बोले 'आणीं अन्नासि शीघ्र वाढाया.' ।
दैत्य म्हणे, 'हे संधी आहे नृप शापकूपिं[4] पाडाया'. ॥ १५

नरमांसचि मग राक्षस आधीं आणोनि पात्रिं वाढितसे, ।
पाहुनि तें गुरु भूपा क्रोधें मग शापशस्त्रिं[5] ताडितसे. ॥ १६

बोले वसिष्ठ गुरु तो, 'तूं आम्हां द्विजगणास नरमांस ।
वाढविसी, तूं राक्षस होसि वनीं, भोग या स्वकर्मास.' ॥ १७

राव म्हणे, 'व्यर्थचि मज शापिसि कां तूं? तुलाहि शापिन मी, ।
नरमांसा पचवाया तयासि आज्ञा दिली कदापि न मी.' ॥ १८

'बोलावा स्वयपाकी' म्हणतां राक्षस पळोनि जाय वनीं, ।
शापाया नृप गुरुसी जळ करिं घेतांचि कांपली अवनी. ॥ १९

तैं मदयंती[6] पतिपद वंदुनि बोले नृपाळभाजा ती, ।
'देतां शाप गुरुसि बहु दोष नृं[7] नरकासि, वल्लभा! जाती. ॥ २०

नृपवर्या! समज मनीं या कर्मे आपुलाचि तोटा कीं, ।
यास्तव विवेक करुनी शिरला चित्तांत कोप तो टाकी.' ॥ २१

यापरि सुयुक्तिची ते स्वस्त्रीची नृपति आयकोनि ईला[8], ।
चित्तीं म्हणे, 'करींचें त्यजितां जळ जाय हे जळोनि ईला[9].' ॥ २२

मग तो टाकी स्वपदीं स्वकरींचें भूप तें जळ तसाच, ।
तेणें कुष्ट भरे तों जांनूपर्यंत[10], पदें[11] जळत साच. ॥ २३

कल्मषपाद[12] म्हणुनि मग नाम तया होय, राक्षसी देह ।
होउनि, वनीं प्रवेशुनि भक्षि सकळ जीव तो असंदेह[13]. ॥ २४

---

१. श्राद्धदिन. २. श्राद्धाकरितां आमंत्रण करून ब्राह्मणांच्या हातांत दर्भ देणें या विधीस 'क्षण देणें' असें म्हणतात. हें काम ब्राह्मणाच्या घरीं जाऊन अथवा त्यास आपले घरीं बोलावून करीत असत. हल्लीं आयत्या वेळींच तें करण्यांत येतें. ३. निर्मळ, स्वच्छ. ४. शापरूपी बिहिरींत. ५. शापरूप शस्त्रानें. ६. राजाची बायको. ७. मनुष्यें. ८. भाषण. ९. पृथ्वी. १०. माड्यांपर्यंत. ११. पाय. १२. कल्मष (पाप—पापरूप उदक) याचे पायावर पडलें म्हणून यास 'कल्मषपाद' हें नांव मिळालें. १३. निःशंक.

मदयंती मग ऋषिसी मागे उःशाप ती पदीं नमुनी, ।
[1]द्वादशवर्षी होइल मागुति नृप, देत [2]भाषदान मुनी. ॥ २५
राक्षस जो नृप जाला वनीं फिरे सर्व जीव भक्षीत, ।
कांहीं न धरि मनातें पापाची तो शुभाशुभ[3]क्षीत ॥ २६
तों त्याच वनीं मार्गें सस्त्री द्विजपुत्र एक तो आला, ।
त्याला धावुनि राक्षस धरि तैं पसरोनि दीर्घ तो [4]आला. ॥ २७
तेव्हां द्विजकुमरस्त्री विनवि, म्हणे, 'नृपति! तूं प्रतापि, तया ।
मारिं न, मत्पति गा! हा, रक्षीं मज म्हणुनि [5]दूहिता पितया! ॥ २८
वरिली सत्कीर्ती तूं, त्यागुनि अपकीर्ति हे कदा न [6]वर, ।
मजवर दया करुनि, दें चित्तीं कर तूं विवेक [7]दान [8]वर. ॥ २९
पतिदाना जरि देशी नाहीं मग तुजसमान [9]गातूंतें, ।
बहु [10]सुकृत वढुनि होइल अंतीं स्वर्गास मान गा! तूतें. ॥ ३०
पति तरुणहि, मी तरुणी, नाहीं मज जाहलेंहि लेंकरुं तें, ।
दे पति कृपा करुनि बा! सांग बरें पतिविणें कसें करुं तें? ॥ ३१
जरि [11]पीडी बहुत तुला विवेक [12]केल्या क्षुधा तव शमेना, ।
तरि मज भक्षीं, रक्षीं पति माझा, ऐक हें अवश मेना (?)' ॥ ३२
तत्पायीं शिर ठेवुनि विनवुनि बहु जरिहि मागतां पतिला, ।
सोडी न दुष्ट राक्षस भक्षी तत्काळ देइ ताप तिला. ॥ ३३
मग [13]अस्थिपंजर तिच्या पुढें तयानेंच ठेविला पतिचा, ।
पशुपक्षि रडति ऐकुनि ती करि बहु [14]शोक जो [15]विलाप तिचा. ॥ ३४
राक्षस उभाचि [16]भयासुर मग ती क्रोधें वदे तशापासीं, ।
'देतां भोग स्त्रीसीं तूं मरशिल [17]एवँ' देत शापासी. ॥ ३५
[18]गुरुशापें तूं राक्षस होशी, सरतांचि [19]अब्द बाराही ।
पुनरपि होशी राजा, परि होउनि [दुर] स्त्रियांस बा! राहीं. ॥ ३६
कोणेक स्त्रीसीं तूं रमतां जीवित शरीर तें [20]विघडे, ।
जेंवि घडे विषपानें मृत्यु, तुला भोगितां स्त्रि तेंवि [21]घडे.' ॥ ३७

---

१. बारा वर्षांनंतर. 'होइल' याचा कर्ता 'कल्मषपाद' अध्याहृत. २. अभयवचनरूप दान. ३. क्षीत=क्षिती; पर्वा. ४. आला पसरोनि=तोंड वासून. ५. मुलगी. ६. न वर=मिळवूं नको. ७. तूं चित्तीं विवेक कर (आणि हा) वर दान दे. ८. पति. ९. गाणाऱ्यांना, कवींना. १०. पुण्य. ११. याचा कर्ता 'क्षुधा.' १२. करूनहि. १३. हाडांचा पिंजरा. १४. दुःख. १५. रडणें. १६. भयंकर. १७. च. १८. वसिष्ठाच्या शापानें. १९. वर्षें. २०. नाश पावेल. २१. प्राप्त होईल.

शापुनि नृपासि काष्ठें जमवुनि बहु चेतवूनि [1]सुनिकर ती, ।
सहगमन [2]अस्थिसंगें जाली, मग वन्हिसी नमुनि, करती. ॥ ३८
मग बाराब्दा अंतीं होउनि नृप तो प्रवेशुनि [3]स्वपुरीं, ।
शापादिक वर्ते जे स्त्रीसी सांगे कथा समस्त पुरी. ॥ ३९
ऐकुनियां पतिवचनें दुःखें **म**दयंति बोलते पतिस, ।
'वंश बुडाला स्वामी!' शोकें दिन रात्रि ये [4]नें झोंप तिस. ॥ ४०
'द्विजहत्या मज घडली' सांगे मग नृपति [5]मुनिवरा गुरुतें, ।
'[6]प्रायश्चित्त मज' म्हणे 'सांगें स्वामी! असेल जें [7]गुरु तें.' ॥ ४१
गुरुमुनि सांगति, 'तीर्थें करितां तूं सत्वर [8]क्षितीवरिल, ।
नाशुनि [9]अघ तुज [10]मोक्षश्री होउनि [11]सत्वरक्षिती वरिल. ॥ ४२
गुरुमुनिवचनें तीर्थें करोनि, धर्महि अपार भूपानें ।
केला, परंतु [12]पृष्ठीं द्विजहत्या ये [13]अघोर रूपानें. ॥ ४३
तीर्थें करीत नृपती बैसे **मि**[14]थुळापुरीवनीं श्रमुनी, ।
तों त्या मार्गें **गौ**[15]तम ये संगें घेउनी [16]अपार मुनी. ॥ ४४
ऋषिसी पाहुनि राजा धावुनि वंदी तयाचिया चरणां, ।
'सुखि कीं?' म्हणुनि मुनि पुसे नृपास, मग तो वदे [17]स्वआचरणा. ॥ ४५
द्विजहत्त्या शापादिक सांगुनि [18]वृत्त म्हणत **गौ**तमातें हो! ।
'रक्षक मज तूं स्वामी! तुजसम न दिसेच [19]गौतें मातें हो! ॥ ४६
तीर्थें बहु आचरलों, व्रतें तपें करिं हि दानधर्मातें, ।
परि पाठीसि [20]पिशांची पाहूं पाहे [21]पतनिं [22]अधर्मातें. ॥ ४७
स्वामी! न जाइ कांहीं उपाय बहु केलियास हत्त्या जी, ।
भय वाटे मज चित्तीं म्हणोनि राज्य स्त्रियांसह [23]त्याजीं. ॥ ४८

---

१. (काष्ठांचा) मोठा समुदाय. २. (पतीच्या) अस्थींबरोबर. ३. आपल्या नगरांत (अयोध्येंत). ४. न ये=येईना. ५. ऋषिश्रेष्ठ गुरु वसिष्ठाला. ६. पापक्षालनार्थ करावयाचा विधि. ७. श्रेष्ठ. ८. पृथ्वीवरचीं. ९. पाप. १०. मोक्षसंपत्ति. ११. सत्व रक्षण करणारी. १२. पाठीमागें. १३. फार भयंकर. १४. मिथिलानगरीजवळील वनांत. निमिराजाच्या देहमंथनापासून जन्मलेला पुत्र 'मिथि' त्याचें शहर; त्यास 'वैजयंत' असें दुसरें नांव आहे. १५. चालू मन्वंतरांतील सप्तर्षींतील एक. हाच अहल्येचा पति. १६. पुष्कळ. १७. स्वतःच्या कर्माला. १८. वृत्त; हकीकत. १९. पृथ्वींत. २०. ब्रह्महत्त्या. २१. अधःपतनीं. २२. अधर्मा (पापी) जो मी त्या मला. २३. त्याजीं (टाकितों). याचा 'मी' हा अध्याहृत कर्ता.

त्वद्वचनें हे जाइल आलें चित्तीं मज [1]गमुनि मुनि! असें, ।
म्हणवोनि स्वस्थ मना करोनि मी त्वत्पदांसि नमुनि असें.' ॥ ४९
**गौ**तम 'सांगेन' म्हणे 'उपाय तुज सत्वरें करायासी, ।
**गो**कर्णक्षेत्रातें यात्रा तूं जाइं रे! करायासी. ॥ ५०
**गो**कर्णक्षेत्रातें प्रवेश करितांचि सर्व [2]अघनाशी, ।
देखुनि आनंदातें मन पावे, जेंवि चातक घनाशी. ॥ ५१
बहु [3]वन्हि प्रज्वलितहि करितां किमपिहि न जाइ ते [4]दोषा, ।
तैसें इतरां [5]तीर्थी द्विजहत्त्येच्या न हारवे [6]दोषा. ॥ ५२
रवि [7]दवडी ते दोषा, **गो**कर्ण क्षेत्र तेंवि पापाला, ।
जाळितसे वन्हि जसा पडला वाळोनि जो नृपा! [8]पाला. ॥ ५३
**वि**धि **इं**द्रादिक सुरवर **गो**कर्णी करुनि नित्य [9]वासातें, ।
पूजुनि होउनि [10]षट्पद घेती ते [11]**शिं**वपदाब्जवासातें. ॥ ५४
[12]**स**प्तर्षी [13]मुख्य करुनि बसती तेथेंचि जे महर्षी ते, ।
त्रयकाळ पूजिति [14]**म**हाबळेश्वरा धरुनि नेम [15]हर्षी ते. ॥ ५५
साक्षात तोचि ईश्वर **गो**कर्णक्षेत्र तेंचि **कै**लास, ।
दवडिल अघ, तूं त्याचे जरि निश्चय अर्चनासि गेलास. ॥ ५६
राक्षस तपफळ पावति तत्क्षेत्रीं [16]तपुनि **रा**वणादिक ते, ।
[17]म्हणउनि अमरांसीं त्यां त्यांला वाटे न भांडणा दिक ते. ॥ ५७
**ना**रद **तुं**बरु सन्मुख गंधर्व हि नित्य गायनें करिती, ।
तोषविती **शं**भूतें निशिदिनिं पद सेवुनी अनेक रिती. ॥ ५८
सुर भूसुर [18]पादोदर लाधति वर मग करोनियां स्तव ते, ।
लिंगें तिथें स्वनामें स्थापिति यात्रा करोनि यास्तव ते. ॥ ५९

---

१. वाटलें. २. पापाचा नाश करणाऱ्या (गोकर्ण क्षेत्रातें). ३. पुष्कळ अग्नी पेटवून मोठा उजेड केला तरी रात्र नाहींशी होत नाहीं. ४. रात्र. ५. 'इतरां तीर्थी' हा 'न हारवे' या क्रियापदाचा कर्ता. ६. पापाला. ७. नाहींशी करितो. ८. पाचोळा. ९. वसतीला. १०. भ्रमर. ११. शंकराच्या चरणकमलाच्या सुगंधाला. १२. मरीचि, अत्रि, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, ऋतु आणि वसिष्ठ. १३. मुख्य करुनि=आदिकरून. १४. गोकर्ण येथील महादेवाला ही संज्ञा आहे. या क्षेत्राला नेहमीं गोकर्णमहाबळेश्वर असें म्हणतात. १५. आनंदयुक्त. १६. तप करून. १७. म्हणउनि त्यां अमरांसीं (देवांबरोबर) भांडणा त्यांला (राक्षसांना) ते दिक (दिक्कत, संशय, भीति) न वाटे—असा अन्वय. १८. पाद+उदर=पोट हेंच आहे पाय ज्यांचे ते सर्प, नाग.

क्षेत्रीं पदोपदीं त्या लिंगें तीर्थें असंख्य, [1]त्यां [1]करितां, ।
नाशे समूळ पाप क्षेत्रीं[2] [3]यदव प्रवेश [2]त्या करितां.' ॥ ६०
**गौ**तमतोंडें ऐसा महिमा ऐकोनियां नमुनि राव, ।
बोले, 'प्रतिती ऐसी पूर्वीं कोणास येत मुनिराव! ॥ ६१
कवण कवण तत्क्षेत्रीं पावति जे सांग मोक्ष पापी ते, ।
थंड करीं मत्तनु, भू करिती वर्षुनि जसे [4]क्षपापीते.' ॥ ६२
मग मुनि नृपतीस वदे, 'सांगितल्या फार साक्षि लोकांनीं, ।
परि जो देखें दृष्टी महिमा, सांगेन ऐक तो कानीं. ॥ ६३
गेलों होतों यात्रे तेथें ये जें दिसोनि नेत्रांस ।
तें ऐक, होति लोळत चांडाळी पावुनी उन्हें त्रास. ॥ ६४
जन्मांधहि सर्वांगीं कुष्ट, धरुं शके न [5]अंबर [6]वर वपू, ।
रक्त गळे, बहु कुष्टीं पडति बसुनि [7]मशकचुंब; रव रव [8]पू. ॥ ६५
वस्त्र नसे कासाविस होई पाहोनि [9]मित्रकिरणाला, ।
म्हणउनि लोळत तेथें [10]द्रुमातळीं आलि पापि मरणाला. ॥ ६६
यापरि कष्टें तेथें द्रुमातळीं [11]मिळति गा! बहु नृ[12] पाहूं, ।
वर्तें नवल पुढें तें ऐकें सादर मनें म्हण नृपा! हूं. ॥ ६७
त्यजितां प्राण तियेवरि घालाया **धर्म** दूत जों धाडी, ।
येती मार्गानें तों तिजला **शंकर** विमान तो धाडी. ॥ ६८
तेज:पुंज विराजित चवघे **शिव**दूत जेंवि [13]शशितरणी, ।
दिव्य विमाना घेउनि घंटारव होत येति ते धरणी. ॥ ६९
आम्हीं तयांसि पुसिलें बैसवितां कोण या [14]विमानातें, ।
ते म्हणती चांडाळी हे आणवि **शिव** [15]करोनि [15]मानातें. ॥ ७०
केला प्रश्न पुन्हां म्यां हे करि तरि काय बा! बहु सुकृत तें, ।
ते म्हणती मज, 'ऐकें सर्व इचें पूर्व जन्मिचें [16]कृत तें. ॥ ७१
पूर्वीं **कैकै** नामा होता द्विज एक त्याचि हे दुहिता, ।

---

१. तीं तीर्थें केलीं असतां. २. त्या क्षेत्रीं=महाबळेश्वरांत. ३. नर. (हा अर्थ मुळांत बाजूस दिला आहे.) ४. क्षप म्ह० पाणी त्याला पीते (पिणारे) ते मेघ. ५. वस्त्र. ६. वपू वर=शरीरावर. ७. घुंगुरट्यांचा चुबका (गर्दी, समुदाय). ८. हा 'वाहे' या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. ९. सूर्यकिरणाला. १०. वृक्षाखालीं. ११. पाहण्याला जमले. १२. नर, मनुष्यें. १३. चंद्रसूर्य. १४. ही अधिकरणी चतुर्थी. १५. सन्मानपूर्वक. १६. कर्म.

विधवा होइ जरि परी विसरुनि करि जारकर्म तें[1] स्वहिता. ॥　७२
कळतां मातृपित्यासी त्यजुनि इला घेति पंचगव्याला[2], ।
निःशंकचि मग जाली पापा न भिये जसा खग[3] व्याला[4]. ॥　७३
मग शूद्र एक सुंदर पाहुनि अर्पोनि अंग, नात्याची ।
संगति भर्ता ऐसी लावुनि हे होय अंगना[5] त्याची. ॥　७४
पी मद्य, मत्त कामें फुस्कारे जेंवि कोपतां व्याली, ।
त्या शूद्रासी रमतां तद्देहीं कन्यकासुतां व्याली[6]. ॥　७५
जाली अति मत्त करुनि मांसाहारा, पिऊनि मदिरा[7] ही, ।
जाइ न कधिं कृषिकर्मा[8], सुकुमार म्हणूनि गृहिं सदा राही. ॥　७६
मांसेच्छेनें एके दिवशीं बस्ताचि[9] म्हणोनि वत्सशिर[10], ।
छेदी भ्रमिष्ट होउनि नयन न उघडुनि न लावितां उशिर. ॥　७७
काढुनि मांसार्धें[11] मग वत्सार्धें[12] ठेवि तें शिरासगट, ।
अर्धें पचवोनि करी तें मग भक्षोनि सर्व मांस गट. ॥　७८
सांयान्हीं[13] भ्रम जाउनि आली शुद्धी मनासि गा! ईतें[14], ।
मग वत्स पाहि भोंवुनि[15] तेव्हां ही दोहनासि गाईतें. ॥　७९
तों गोवत्सस्थानीं मेष[16] असे आणि धेनु हंबरडे, ।
छिन्नार्ध वत्स गेहीं पाहुनि मग म्हणुनि '**सांब सांब**' रडे. ॥　८०
'**शिव शिव**' म्हणोनि मग पति मारिल म्हणवोनि[17] बाह्य वत्साचें ।
चर्मास्थि मांस टाकी विदारुनि व्याघ्रभक्षवत्[18] साचें. ॥　८१
मग वाघ वत्स भक्षी म्हणउनि सांगे जनासि आरडुनी, ।
तेणेंच परि पतिस ही सांगे पसरोनि थोर आ रडुनी. ॥　८२
ऐशी त्या शूद्रासी रमोनि, पुरवूनि काम, धामाशी ।
होती त्याच्या; त्यातें भुलुनि असे, जेंवि कां मधा माशी. ॥　८३
असतां शूद्रगृहातें पावे मग मरण कांहिं काळें ही, ।
मग भोगाया नरका नेली चर[19] पाठवोनि **काळें** ही. ॥　८४
नाना नरकीं घालिति लोळविती तप्त भूमिकेला ही, ।

---

१. हें 'विसरुनि' याचें कर्म. २. गव्य=गाईचें. पंचगव्य=दही, दूध, शेण, मूत्र आणि तूप असे गाईपासून मिळणाऱ्या पांच जिन्नसांचें मिश्रण. ३. पक्षी (गरुड). ४. सर्पाला. ५. स्त्री. ६. प्रसवली. ७. मद्य. ८. शेतकामास. ९. बकरा. १०. वासराचें मस्तक. ११. मांस+अर्धें. १२. वत्स+अर्धें. १३. संध्याकाळीं. १४. हिला. १५. इकडे तिकडे फिरून. १६. बकरा. १७. म्हणून. १८. वाघानें खाल्ल्याप्रमाणें. १९. दूत.

नरकीं पचोनि तेथें अपार बहु कष्ट ही निके लाही. ॥ ८५
तप्त पहार उपस्थीं[1] सारुनि, रगडिति कृतांतचर[2] चरकीं, ।
टोंचितिहि सुया ओठीं, शरीर श्वुन[3] फाडितात चरचर कीं. ॥ ८६
बहु नरका भोगुनि मग कुष्ठी चांडाळजन्म पावोनी, ।
होउनि अंध उपजतां, जगली उच्छिष्ट अन्न खावोनी. ॥ ८७
मातृपिता मरतां मग निराश्रयी होय दीन होऊन, ।
हिंडे मागत भिक्षा मिळेल कोठोनि अन्न हो! ऊन. ॥ ८८
बहु वर्षें हे ऐशी कष्टत असतां अपार तों सुजन ।
येती येथें यात्रे दिनरात्रीं करिति शंभुचें भजन. ॥ ८९
यात्रिकरुसंगतिनें मिळेल म्हणवोनियां उदंड इला, ।
चांडाळी हे कष्टत हळु हळु टेकीत येइ दंड इला. ॥ ९०
शीतें[6] तिडके कुष्टहि, चावति माशा म्हणोनियां रडत ।
मार्गी आडवि पडुनी मागे भिक्षा जनांसि आरडत. ॥ ९१
कोणी घालिति तुकडे शुष्कचि तीचे हतांत भास्करिचे[7], ।
कष्टें भक्षि परि उनें तापे माध्यान्हिं तात[8] भास्करिचे. ॥ ९२
मार्गें शिवभजनाचा उठविति जन बहुत ऐकसां बेंहर, ।
हे ही ऐकोनि तसें म्हणे मुखें 'शिव! महेश! सांब! हर!' ॥ ९३
शिवभजनाच्या छंदें मार्गानें चालती सुजनआली[11], ।
त्या सुजनांच्या संगति या क्षेत्रा, करित हे भजन आली. ॥ ९४
काल समुद्रीं स्नाना करोनि सर्वहि जनीं शिवेनिशीतें[12] ।
पूजिति महाबळेश्वर, ही होती पडुनि हुडहुडुनि शीतें. ॥ ९५
शिवपूजे जन जाती त्यांसि म्हणे द्या मला जि! जन्मांध[13], ।
आहें पापी कुष्टी लोळतसें येत आजि जन्मांध. ॥ ९६
विनवी पाणी[14] पसरुनि 'करोनि[15] मागे अवक्षपा आ हे, ।
जन म्हणति, 'न क्षु[16] आजी उपवासचि गे! शिवक्षपा[17] आहे.' ॥ ९७
अंभ[18] इला फळमूळा कोणी कांहीं न देति ते काळीं, ।

---

१. जननेंद्रियांत. २. यमदूत. ३. कुत्रे. ४. अन्न. ५. भूमीस. ६. थंडीनें. ७. भाकरीचे. ८. शनीचा बाप म्हणजे सूर्य त्याचे. याचा संबंध 'उनें' याकडे. ९. एकदम. १०. गर्दी. ११. सज्जनांची रांग. १२. शिवरात्रीला. १३. जन्म (अन्न ?)+अंध (पाणी). १४. हात. १५. हे (ही) आ पसरुनि अवक्षपा (अन्नपाणी–ही पोथींतील टीप) मागे–असा अन्वय. १६. अन्न. १७. शिवरात्र. १८. पाणी.

नर एक मात्र हातीं बेलाचें पान देइ ते कालीं. ॥ ९८
तें हुंगुनि पाहुनि मग टाकि नव्हे भक्ष्य म्हणुनि कोपानें, ।
तें पडलें शिवलिंगीं मग तोषे शिव मनीं तया पानें. ॥ ९९
कोणी न देति भक्ष्यहि यास्तव उपवास काल इस घडला, ।
गर्जति जन शिवनामें श्रवणें अघशैल[1] सर्व तो झडला. ॥ १००
वाद्यें वाजति भारी, नीज न ये ईस नाद ऐकोनी, ।
घडलें जागरणहि मग पडली दुःखें कपाळ टेकोनी. ॥ १०१
शिवनिशि घडे सुकृत हें सायासा किमपि ही[2] न त्या करितां, ।
होउनि शंभु दयाळू उद्धरि हे हीन दीन त्याकरितां. ॥ १०२
मूळींच रोगि त्यांतहि जाली घडतां अशक्त उपवास, ।
वास[3] न धड नेसाया इस मग कोठुन असेल उपवास[4] ? ॥ १०३
तापुनि रविकिरणानें हे येथें आलि जीव टाकाया, ।
यास्तव नेतों इजला सुंदर इच्छि करुनि शेवटां[5] काया.' ॥ १०४
गौतम रायासि म्हणे, 'ऐसें शिवदूत चारि बोलोनी, ।
शिंपोनि अमृत सुतनू करोनि नेती विमानिं घालोनी.' ॥ १०५
गौतम रायासि म्हणे, 'गोकर्णीचा असा बहुत महिमा, ।
महि मा[6] क्षेत्र असें अघनाशक खलु खग जसा सहतम हिमा[7].' ॥ १०६
मुनिवदनें सुकथा हे ऐकुनि कल्माषपादराजें ही, ।
स्वस्थ मन होय; होतें पावत बहु संतपा[8] दरा[9] जें[10] ही. ॥ १०७
सत्री मग नृपति करी गोकर्णा करुनि तो त्वरा गमन, ।
पूजी महाबळेश्वरलिंगा शिवरात्रिसी विरागमन[11]. ॥ १०८
नेई मग शिवलोका श्रीशिव धाडुनि नृपा विमानासी, ।
तो स्वस्वरूप करुनी स्वसन्निधीं करुनि ठेवि मानासी.' ॥ १०९
सिद्ध म्हणे, 'रे शिष्या! यास्तव गोकर्णि भक्त उद्धरित.' ।
राहे श्रीपादगुरू बचाजिसुत तत्पदा सदा धरित. ॥ ११०

---

१. पापाचा पर्वत. २. ही. ३. वस्त्र. ४. लहान वस्त्र (अंगावर घेण्याचें). ५. शेवटीं. ६. महि मा=पृथ्वीवर नाहीं. ७. तमसह हिमा जसा खग=अंधारासहित थंडीला जसा सूर्य. ८. फार तापाला. ९. भीतीला. १० जें मन. ११. वैराग्ययुक्त मन ज्याचें असा.

## अध्याय सातवा[1].

सिद्धमुनीसी विनवी नामांकित शिष्य हस्त जोडोनी, ।
'किति दिन गोकर्णी गुरु राहति सांगें चरित्र उघडोनी. ॥ १
करुणानिधि गुरुराया! चरितश्रवणें मनांत आनंद ।
जाला, अवतरतां हरि गोकुळिं तो हर्षला जसा नंद.' ॥ २
वचना आयकुनि तया, सांगे चरिता मुनींद्र तो गुरुचे, ।
ऐकति जन जरि भावें चरित मनीं तें कितीक सांगुं रुचे ? ॥ ३
त्रयवर्षें[2] तेथें गुरु राहुनि जन तो स्वभक्त उद्धरिला, ।
मग ये श्रीशैलासी[3] मास चतुः[4] क्रमुनि[5] पंथ[6] पुढें धरिला. ॥ ४
ये मग कुरवपुरासी[7] भक्तजना देत तो सुदीक्षेसी, ।
कृष्णा पंचनदीचा[8] संगम; ये[9] त्यांचिये परीक्षेसी[10]. ॥ ५
पाहुनि त्या सुक्षेत्रा राहुनि गुरुराज भक्त उद्धरिती, ।
जाली बहु तैं कीर्ती; सांगति सुजनांसि ते सुबुद्ध[11] रिती. ॥ ६
श्रीगुरुचरणस्पर्शें होउनियां ज्ञानकामना पुरती, ।
ऐक यदर्थीं[12] सुकथा करोनि[13] एकाग्रता मना पुरती[13]. ॥ ७
संपन्न वेदशास्त्रें होता द्विज शुद्ध[14] एक त्या गांवीं, ।
सांगे सकळ जनांसी सुमती[15] 'कर्मं अशुद्ध त्यागावीं.' ॥ ८
ऐसा द्विज तो त्याला जाला जो पुत्र एक मतिहीन, ।
विद्या नये शिकवितां, म्हणुनि[16] करी ताडणा कमतिही न. ॥ ९

---

१. मूळ पोथीच्या आठव्या अध्यायांतील कथा यांत आहे. २. तीन वर्षें. ३. श्रीशैलमल्लिकार्जुन हें प्रसिद्ध बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक आहे. हें तेलंगणाच्या तोंडींच आहे. बारा ज्योतिर्लिंगें येणेंप्रमाणें:—१ सोरट सोमनाथ, २ उज्जनीचा महाकालेश्वर, ३ बदरिकेदार, ४ काशीविश्वेश्वर, ५ ओंकारेश्वर, ६ त्र्यंबकेश्वर, ७ वेरूळचा घृष्णेश्वर, ८ अंवढ्या नागनाथ, ९ परळी वैजनाथ, १० भीमाशंकर, ११ श्रीशैलमल्लिकार्जुन आणि १२ सेतुबंध रामेश्वर. ४. चार. हें 'मासा'चें (महिन्याचें) विशेषण. ५. घालवून. ६. मार्ग. ७. कुरुंदवाडास. ८. पंचगंगेचा. ९. याचा कर्ता 'गुरु.' १०. त्या संगमस्थानाच्या परीक्षेस म्हणजे तें कसें आहे हें पाहण्यास. ११. सुबुद्ध (विद्वान लोक) ते रिती (श्रीगुरूची राहण्याची रीत) सुजनासि सांगति—असा अन्वय. अथवा 'सुबुद्ध' (शहाणपणाची) हें 'रिती'चें विशेषण केलें तरी चालेल. १२. याविषयीं. १३. मना पुरती (पूर्ण) एकाग्रता करोनि. १४. पवित्र आचरणाचा. १५. चांगली आहे बुद्धि ज्याची असा तो ब्राह्मण, हा 'सांगे' या क्रियापदाचा कर्ता. १६. म्हणुनि तो द्विज (त्यास) ताडणा कमतिहि न करी म्हणजे पुष्कळ मारी—हें तात्पर्य.

विद्या नये म्हणुनि सुतपृष्ठीं[1] जों फुटुनि जात मारितसे, ।
मानीं दुष्टचि पुत्रा जेंवि कसा[2] स्वात्मजा तमारि तसें. ॥ १०

जाया[3] म्हणे 'न मारा' काढुनि ती टपटपां नयनिं वारी[4], ।
'मूढ असोंद्या एकचि सुत आम्हां म्हणुनि ताडण[5] निवारी. ॥ ११

बोले 'मारूं आतां यास, तुम्ही करुनियां विवेक, नका; ।
पोषण केलें याचें लोभि जसा रक्षितो जिवें कनका[6]. ॥ १२

आतां जरी तुम्ही या सुतासि निशिदिवस बहुत ताडाल, ।
त्यागीन स्वप्राणा समजा चित्तीं; स्त्रियेसि नाडाल[7]'. ॥ १३

स्त्रीवचना द्विज ऐकुनि राहे निश्चित नाणि[8] राग मना, ।
करिता जाला मग तो येतां स्वर्गा तया जरा[9] गमना[10]. ॥ १४

होती त्या गांवीं मग विप्राची पत्नि त्या सुतासहित, ।
सांगति सज्जन 'विद्या करिं' हें विप्राचिया सुतास हित[11]. ॥ १५

विद्या न ये तयासी करितां बहुघोष[12] तो आवृत्तीनें[13] ।
भरि मग तो पोटासी जनघरिं[14] मागोनि शुक्लवृत्तीनें[15]. ॥ १६

द्विज म्हणति 'दर्शनार्थ[16] प्रसिद्ध जाणे तुझा जनक[17] सारे, ।
त्याचे पोटीं पशुसा जन्मसि कां? धरिसि लाज न कसारे. ॥ १७

होशि अमंगळ[18] केवळ तूं जैसा शौचकूपअश्मा[19] तो, ।
मां[20] उपयोगी जैसा शैलीं[21] वर्षोन्यमूप[22] अश्मा[23] तो.' ॥ १८

ऐकुनि बहु निंदेतें बोले मातेसि पुत्र अनुतापें[24], ।

---

१. मुलाच्या पाठीवर. २. जेंवि कसा (ज्याप्रमाणें) तमारि (सूर्य.) स्वात्मजा (आपला पुत्र शनि त्यास) (दुष्ट मानी त्याप्रमाणें) असा कवीचा अभिप्राय दिसतो. ३. बायको. ४. पाणी. ५. मारूं देत नसे. ६. सोन्यास. ७. मुकाल (?) नाडणें याचा नेहमींचा अर्थ नुकसान करणें असा आहे. ८. (न+आणि) आणिला नाहीं. ९. वृद्धत्व. हा 'ये' या धातूचा कर्ता. १०. 'गमना' हें 'करिता झाला' याचें कर्म. ११. कल्याणाची गोष्ट. १२. पुष्कळ घोकणें. १३. वारंवार आवृत्त्या करून. १४. लोकांच्या घरीं. १५. ब्राह्मणानें ब्राह्मणाकडे भिक्षा मागून पोट भरण्याच्या वृत्तीस "शुक्लवृत्ति" असें म्हणतात. १६. सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा व वेदान्त हीं सहा दर्शनें (शास्त्रें) यांचे अर्थ. १७. बाप. १८. अपवित्र. १९. शौचकूपांतील दगड. २०. नाहीं. संस्कृतांत आज्ञार्थी क्रियापदाचा निषेधार्थ दाखवावयाचा असतां क्रियापदामागें "मा" हें अव्यय योजितात. जसें—मा गच्छ, मा कुरु इ. पण एथें फक्त 'नाहीं' अशा अर्थानें हें पद योजिलें आहे. २१. पर्वतावर. २२. वर्षोनि+अमूप (पुष्कळ) २३. मेघ. हा वर्ष धातूचा कर्ता. २४. पश्चात्ताप पावून.

'वांचुनि जालों व्यर्थचि, निंदाग्निशिखीं[1] अपार तनु तापे. ॥　　१९
आतां ऐक जननि! मी स्वमुखा तरि दाउं केविं लोकां या, ।
त्यागुनि नदींत कांया[2] जाईन स्वर्ग तो विलोकाया[3]'. ॥　　२०
ऐकुनि हीं सुतवाक्यें माता मूर्छित पडोनि शोकानें, ।
आठविती दुःखासी तें सहसा ऐकवे न हो! कानें. ॥　　२१
माता पुत्र उभयतां गंगेमाजी त्यजावया कांय[4], ।
येती, तों श्रीपाद श्रीगुरु पाहोनि वंदिती पाय. ॥　　२२
कृष्णाशरगंगेचा[5] संगम अति रम्य नाहिं उपमा ती, ।
भाळीं लावुनि तेथिल तैं करिती सिद्ध[6] मंत्र जप माती[7]. ॥　　२३
तेथें श्रीपादगुरू करितां तें स्नान, तत्पदां शिर तीं ।
ठेवुनि, दोघेंहि जळीं जालीं गुरु देखतां तदा शिरतीं[8]. ॥　　२४
मग म्हणती 'श्रीपाद श्रीवल्लभ सद्गुरो! मुनीराया! ।
द्यावी आम्हां आज्ञा देह त्यागावयासि नीरीं[9] या'. ॥　　२५
श्रीपादें या परिची वाणी ऐकोनि विप्रकांतेची[10], ।
म्हणती[11] कीं 'दुखास्तव देतां प्राणासि सांग कां तेंची[12]. ॥　　२६
बहुदोष[13] आत्महत्या; त्यागुं नका देह याच बाहेरी[14], ।
म्हणुनि, तयांस[15] कृपेनें स्वापत्या जेविं साच बा हेरी. ॥　　२७
स्व[16] सविस्तर मग सांगुनि ती विनवी गुरुसि विप्रजाया तें, ।
'मत्सुत मंदमती हा, निंदी बहु जन पै[17] विप्रजा[18] यातें. ॥　　२८
पुत्र बहुत मजलागीं जाले परि त्यांत एक हा वांचे[19], ।
परि जाला मूढ पशुचि वेदाक्षर येइना पहा वाचे[20]. ॥　　२९
विद्याब्धी[21] पति माझा हा तदुदरीं[22] जाहला कसा हीन, ।

---

१. निंदारूप अग्नीनें. २. शरीर. ३. पाहण्याला. याचें कर्म स्वर्ग. ४. शरीर. ५. कृष्णा आणि शरगंगा (पंचगंगा.) या नद्यांचा. ६. योगी. ७. माती हें 'लावुनी' याचें कर्म. ८. शिरतीं झालीं. ९. या पाण्यांत. १०. ब्राह्मणाच्या बायकोची. ११. याचा कर्ता श्रीपादगुरू. १२. तें दुःख. हें 'सांग' याचें कर्म. १३. बहु (फार) आहेत दोष (जींत) अशी; हें आत्महत्येचें विशेषण. १४. पाण्याबाहेर. १५. जेंवि बा (बाप) स्वापत्या (आपल्या मुलाला) हेरी (बोलावितो) (तेंवि) (श्रीगुरु) तयांस साच कृपेनें (हेरी) असा सार्थान्वय. १६. स्व=आपलें. ह्यापुढें वर्तमान हा शब्द अध्याहृत. १७. 'हि' असा पाठ असेल तर बरा. १८. ब्राह्मणपुत्राला. १९. वांचला आहे. २०. वाणीला; तोंडाला. २१. विद्येचा केवळ समुद्र. २२. त्याच्या पोटीं.

निंदा करिती बहु जन; ती, करि जरि मी विवेक, साही[1] न. ॥ ३०

पुढिले जन्मीं तरि मज पुत्रासाठीं न होत[2] सायास, ।
सांग उपायास गुरो! कारण मज मुख्य हें पुसायास. ॥ ३१
व्हावा पुत्र मला जी! क्षमशीळचि[3] शांत तो धरागत[4] हो ।,
असमत्[5] त्या पुत्राच्या सुकृतानें[6] पूर्ण उद्धरागत हो'. ॥ ३२
श्रीगुरु म्हणति मग तिला यापरिची ऐकुनी तिची वाणी, ।
'पूजीं शनिप्रदोषीं शिव[7] न करीं मात्र भक्तिची वाणी[8]. ॥ ३३
पूजा करितां शिव तो देतो इच्छितें[9] प्रदोष–शनिवारीं[10], ।
भवभय[11] त्याचें स्वांगें[12] शंभु' म्हणे[13] 'देउनी यश, निवारी. ॥ ३४
गोपी[14] प्रदोषपूजा पाहे जे[14] कृष्ण ये तिच्या उदरा, ।
चक्रदरा[15] धरि करिं जो, भक्तस्पर्शास दे न येउं दरा'. ॥ ३५
श्रीगुरुवचनें ऐकुनि नमुनि म्हणे त्यास विप्रदारा ती, ।
'याचक मी मज दाना द्यावी सुकथा तुवां उदारा[16]! ती. ॥ ३६
होय हरीची जननी, वद कशि ते वर्तली 'महीं[17] रीती', ।
आश्चर्य वाटतें मज शिवपूजा पाहतां अहीरी[18] ती'. ॥ ३७
श्रीगुरु म्हणती 'सांगे व्यासाच्या[19] सूत[20] मुनिस[21] काव्याला, ।
सांगिन तें ऐक; हृदीं[22] दुःखाचें दैन्य बैस कां व्यालां? ॥ ३८
नृप चंद्रसेन होता, ज्यांची[23] नगरी अवंतिपरि साजे, ।

---

१. जरि मी विवेक करिं (तरि) ती (निंदा) न साहीं (मला सहन करवत नाहीं) असा अन्वय. येथें "साही" हा मूळरूपभेद शक्यभेदाऐवजीं योजिला आहे. २. होवोत. ३. क्षम (योग्य) आहे शील (स्वभाव) ज्याचा असा. चांगल्या स्वभावाचा. ४. धरा (पृथ्वी) आहे आगत (प्राप्त) ज्याला असा. पृथ्वीपति असा भाव. ५. असमत् उद्धरागत हो=आमचा उद्धार होवो. ६. पुण्यानें, चांगल्या कर्मानें. ७. हें 'पूजीं' याचें कर्म. ८. कमीपणा. ९. इच्छिलेलें. हें 'देतो' याचें कर्म. १०. प्रदोषयुक्त शनिवारीं. ११. संसारसंबंधी भीति. हें 'निवारीं' याचें कर्म. १२. आपण होऊन. १३. याचा श्रीगुरु हा अध्याहृत कर्ता. १४. जे गोपी=जी गोपी (यशोदा). १५. जो करिं चक्रदरा (सुदर्शन चक्र व दर नांवाच्या शंखाला) धरि (आणि) भक्तस्पर्शास (भक्ताला शिवण्यास) दरा (भीतीला) न येऊं दे. असा अन्वय. १६. दानशीला. १७. पृथ्वीवर. १८. गवळण. १९. व्यासाच्या काव्याला=व्यासानें केलेल्या काव्याला (स्कंदपुराणांतील). २०. सूत नावाचा पुराणीक. २१. शौनकादिऋषींस. २२. बैस; (तुम्ही दोघें–आई आणि मुलगा) हृदिं (हृदयांत) दुःखाचें दैन्य कां व्यालां? असा अन्वय. २३. ज्याची अवंतिपरि नगरी साजे (शोभे). येथें अवंतीपरि=अवंतीसारखी, अवंतीच्या योग्यतेची, अवंती हीच. जसें–तुमच्यासारखा (तुम्ही) मित्र असल्यावर मला कसली काळजी?

मणिभद्र मित्र त्याचा, दोघांसी प्रीति फार परिसा[1] जे. ॥ ३९
मणिभद्रें नृपतीसी दिधला मणि जो जसाचि दिनमणि[2] तो, ।
रक्षित कंठीं बांधुनि बहु यत्नें नृप घताचिदिनें[3] (?) मणि तो. ॥ ४०
संवर्ट्टतांचि[4] लोहा हाटक जो होय तें द्विपन्नकसी, ।
युद्धीं जयगुण त्याचा, मग त्यातें प्रीति ते बसे न कसी ! ॥ ४१
मणिदर्शनमात्रें ज्वर[5]देहीं तो किमपि ही न रोग टिके, ।
चित्तीं नृप जें इच्छी, मणियोगें होय साध्य तें घटिके[6]. ॥ ४२
ऐकुनि असि मणिकीर्ती, होते जे भूपविप्र[7] भुवि[8], चार[9] ।
धाडुनि ते मणि मागति तेव्हां करि उज्जनिप्रभु[10] विचार. ॥ ४३
तों नृप सर्व मिळोनी अवंति[11] वेष्टीति[12], दीर्घ सैन्यैथवा[13], ।
धरुनि म्हणति मणि दे ये युद्धा धैर्या[14] मनीं धरोन्यथवा[15]. ॥ ४४
मंदप्रदोष[16] होता ते दिवसीं चंद्रसेनरायासी, ।
लिंग महाकाळाचें[17] पूजन भावें बसे करायासी. ॥ ४५
विध्युक्त[18] भूप पूजन करि, तें पाहोनि गोपकुमरांनीं[19], ।
म्हणती 'पूजूं आम्ही शिव आणुनि जें असे कुसुम[20] रानीं. ॥ ४६
पूजा करि नृप जैसी पूजूं तैसेंचि लिंग मांडोनी, ।
म्हणुनि स्वगृहासंनिध रचिती पाषाण भूमि झाडोनी.' ॥ ४७
पाषाण देउळाकृति रचोनि कल्पोनि तेंचि शिवभुवन[21] ।
लिंगाकृति दगड मध्ये स्थापुनि, अभिषेक करिति वरि भुवनें[22]. ॥ ४८
भूपतिसमान पूजन करिती आणुनि अपूर्व[23] वनसुमनें[24], ।

---

१. ऐका. २. सूर्य. ३. रात्रंदिवस ? ४. जो (मणी) लोहा संवट्टतांचि तें (लोह–लोखंड) द्विपन्न (बावनकशी) हाटक (सोनें) होय. असा सार्थान्वय. ५. ज्वर आलेल्या मनुष्याच्या अंगांत. ६. घटकेंत, थोड्या वेळांत. ७. विप्र=शहाणा. भूपविप्र=शहाणे राजे कीं काय ? ८. पृथ्वीवर. ९. सेवक. १०. उज्जनीचा राजा चंद्रसेन. ११. हें कर्म वेष्टित याचें. १२. घेरिते झाले. १३. सैन्याचा समुदाय. १४. हें 'धरोनि' याचें कर्म. १५. धरोनि+अथवा. १६. शनिप्रदोष. १७. (उज्जनींतील) महाकालेश्वराचें. १८. यथाविधि. १९. गवळ्याच्या मुलांनीं. २०. फूल–फुलें. हें 'आणुनि' याचें कर्म. २१. कैलास. २२. जल. भुवन अभिषेक=पाण्याचा अभिषेक (पंचामृताचा नव्हे). २३. चमत्कारिक. २४. रानांतील फुलें.

परिमलद्रव्यें[1] कल्पुनि वरि उधळिति धूळि मृत्तिका सुमनें[2]. ॥ ४९
उदकाच्या नैवेद्या अर्पिति कल्पोनि धूपदीपातें, ।
ठेविति[3] शिर सांबाच्या नेत्राचें लाउनी पदीं पातें. ॥ ५०
तों पावे रवि अस्ता, बाहति[4] माता वदोनि नामाला, ।
गेले सर्वहि शिशु, परि सोडीना एक[5] सांबधामाला[6]. ॥ ५१
तन्माता म्हणत मनीं किमर्थ माझाचि मात्र पूत[7] नये[8], ।
म्हणउन येउनि पाहे तों नेत्रें झांकिलीं असति तनयें[9]. ॥ ५२
सन्मुख अवलोकुन ती अपूर्व पूजा पिनाकिची[10] बरवी, ।
म्हणत 'गृहा चल पुत्रा ! होय निशी मावळोनि बिंबरवी[11]. ॥ ५३
जाली रात्र बहुत रे ! खेळसि किति चाल आत्मजा ! 'नु'[12] घडी ।
एक तया विनवि असें; परि तो सुत नयन–पद्मजा[13] नुघडी[14]. ॥ ५४
तो होय शिवध्यानीं रत[15] तें नेणोनि मोडि पूजा ती, ।
मग अतिकोपें ताडन करुनि सुता, जाहली[16] गृहा जाती[16]. ॥ ५५
मोडी जे शिवपूजा धरोनि त्याचा मनांत संशय न ।
घालुनियां तृणशय्या[17] त्यावरि मग तैं करीतसे शयन. ॥ ५६
मोडीतां शिवपूजा टाकुनि दुःखें शरीर धरणीं[18] तो, ।
बाळ करी बहुशोका ठेवुनि माथा महेशचरणीं[19] तो. ॥ ५७
ऐकुनि शिशु–आक्रोशा शंकरजी बहु मनांत कळवळला, ।
करुणाघन[20] तो शंभू [21]गोपशिशुशिखीकडे सकळ वळला[22]. ॥ ५८
प्रकटी[23] मग स्वरूपा, पाहुनि नमि बाळगौळि; तें ज्याचें ।
[24]निर्मी स्वधाम शिव तो; तें कैसें कोटि हेळि (?) तेज्याचें. ॥ ५९
जैसें बहुप्रकाशित[25] शिवमंदिर, तेंवि गोपबाळाचें ।

---

१. बुका वगैरे सुवासिक द्रव्यें. २. स्वच्छ भावयुक्त अंतःकरणानें. ३. नेत्राचें पातें लावुनी सांबाच्या पदीं शिर ठेविती असा अन्वय. ४. बोलाविती. ५. एक मुलगा. ६. (तयार केलेल्या) शंकराच्या मंदिराला. ७. मुलगा. ८. येत नाहीं. ९. मुलानें. १०. शंकराची. ११. बिंबभूत रवि, रविबिंब. १२. नु=हें सांत्वन अथवा प्रार्थना ह्या अर्थी अव्यय. १३. नयनकमलाला. १४. उघडिना. १५. निमग्न. १६. जाती झाली. १७. गवताचें आंथरूण. १८. पृथ्वीवर. १९. शंकराचे पायांवर. २०. दयेचा मेघ. २१. गोपशिशु ह्याच मोर त्याकडे. २२. आला. २३. प्रगट करिता झाला, याचा कर्ता शंभु. २४. तें ज्याचें स्वधाम (असा) तो शिव (तें) निर्मी. २५. फारच तेजस्वी.

निर्मी सुधाम[1] शिव तो; विचित्रकर्तृत्व सोमभाळाचें[2]. ॥ ६०

शिव तो प्रसन्न होउनि 'माग' म्हणे 'तूं स्वभक्त[3] वरदान[4]', ।

बाळ म्हणे 'मातेवरि कोप करीं[5] तूं स्वभक्तवरदा[6] ! नं. ॥ ६१

मोडी तव पूजा ती क्षमा करीं एवढी तिच्यावर हो' ! ।

'चिंता न करी अभया[7] घे' बोले हैमवंतिचा[8] वर हो. ॥ ६२

'तव माता मम पूजा पाहे म्हणवोनि कृष्ण जठरासी[9] ।

येईल अवतरोनी, न वर्णवे कीर्ति ज्याचि अठरांसी[10]. ॥ ६३

तुझिया जननीउदरीं[11] श्रीहरि अवतार सत्य तो धरिल, ।

होईल यशोदा ते, येउनि उदरा सतीस उद्धरिल. ॥ ६४

करिसिल इच्छा जे तूं पात्रसि माझ्या वरप्रसादें ती, ।

आले नृप[12] बाहिर जे ते तुजला राज्यसंपदा देती'. ॥ ६५

देउनि अशा वराला लिंगालयिं[13] गुप्त होय कामारी[14], ।

स्वगृहासी[15] येउनि मग बाळक जननीसि तो हका मारी. ॥ ६६

जागी होउनि जननी प्रकाश–युत गेह ती निरीक्षीते[16], ।

पुत्र म्हणे 'शिवकरणी हे जननी ! काय तूं परीक्षीतें[17]. ॥ ६७

शिव तो प्रसन्न होउनि 'मागें वरदान' बोलिला मातें, ।

'पूजा भंगिसि, अभया मागें मग मी कपालिला[18] माते ! ॥ ६८

पाहसि शिवपूजा तूं प्रदोषिंची म्हणुनि पोटिं मावर[19] तो ।

घेइल अवतार पुढें' देइ उमावर[20] तुला असा वर तो'. ॥ ६९

गवळण शिवालयीं मग जाउनि पूजन सदाशिवाचें तें, ।

---

१. उत्तमप्रकारचें स्थान (मंदिर). २. सोम (चंद्र आहे) भाळीं (कपाळीं) ज्याच्या असा शंकर. ३. आपला (माझा) भक्त. ४. वरदान हें 'माग' याचें कर्म. ५. करूं नको. ६. स्वभक्तांस वर देणाऱ्या (शंकरा) ! ७. अभयवचनाला. ८. हैमवतीचा ह्मणजे पार्वतीचा पति शंकर. ९. उदरीं. १०. अठरा पुराणांना. ११. आईच्या पोटीं. १२. चंद्रसेननृपतीचा मणी हरण करण्याकरितां नगराबाहेर जमलेले राजे पुढील. गीति ८० पहा. १३. लिंगाच्या स्थानांत (देवळांत). १४. मदनाचा शत्रु जो शंकर. १५. येथें 'गृ' ह्या अक्षरानें मागील 'स्व' हें पद द्विमात्रिक होत नाहीं कारण 'गृ' हें जोडाक्षर नाहीं. पण हा नियम कवीनें अध्याय १ मधील पहिल्याच गीतीमध्यें मोडला आहे. तेथील टीप पहा. शिवाय पुढील ७५ व्या गीतींतील सुकृत शब्द पहा. १६. पाहूं लागली. १७. न्याहाळून पहातेस. १८. शंकराला–शंकरास कपाली ह्मणण्याचें कारण तो नरकपालांची माला धारण करितो. १९. मा (लक्ष्मी) तिचा वर (पति) विष्णु. २०. पार्वतीपति.

पाहुनि भजन करी 'शिव हर' म्हणुनी नमुनि तत्पदांचें[1] तें. ॥ ७०
आली मग सांगाया वृतांत[2] तो चंद्रसेननृपतीसी, ।
ऐकुनि पहावयासी संगें घेऊनि येत नृप तीसी. ॥ ७१
ऐकुनि कीर्तीघोषा[3] मिळती जन सर्व ते अवंतीचे, ।
बाळासि[4] पहाया त्या इच्छिति चित्तीं सुपुत्रवंतीचे. ॥ ७२
भांडाया नृप आले मणिलोभें चंद्रसेनरायासी, ।
ते करुनी आश्चर्या इच्छिति नृपमैत्रि[5] कीं करायासी. ॥ ७३
हा पुण्यवंत नृपती म्हणती म्हणवुनि निशींत[6] ये रवि तो, ।
होउनि उदय पुरींतें[7] पडे कशाचा प्रकाश येरवि तो. ॥ ७४
मैत्री करणें बरवी याला युद्धीं कठीण जिंकवणें, ।
सर्वहि या नृपतीनें केलें, न सुकृत[8] असें कधीं कवणें'. ॥ ७५
पाठविती सांगुनि मग येतों भेटीस चंद्रसेनातें, ।
'बंधूपरि आम्हांवरि लोभ धरुनि ही धरी तसें नातें'. ॥ ७६
नृप चंद्रसेनभूपा पाठविती त्या विनंतिचीं लिखितें, ।
तीं वाचितां नृपाला हर्ष, जसा मेघ पाहतां शिखितें[9]. ॥ ७७
मंत्री[10] पाठवुनी मग आणवि नृप तो नृपांसि भेटाया, ।
आले सकळहि जेथें शिवमंदिर गोपपुत्र त्या ठाया. ॥ ७८
भेटुनियां नृपतीसी भेटति मग सर्व भूप गोपातें, ।
पाहुनि रूप तयाचें नेत्रांचें[11] विसरलें हलों पातें. ॥ ७९
म्हणती मग 'गोपाळा! होईं तूं भूप सर्व गोपांचा, ।
एकैक देश तुजला घे, आम्हीं देउं सर्व भूपांचा.' ॥ ८०
देउनि अपार संपति राज्य तया नृपति आपुल्या गांवां, ।
गेले मग सर्वहि ते, यास्तव भवभजनवेध[12] लागावा. ॥ ८१

---

१. पदांचें याचा संबंध भजन या नामाकडे. २. येथें 'त्त' बद्दल छंदाकरितां 'त' घातलें आहे. त्याचप्रमाणें पुढें ८१ गीतीमध्यें 'संपति' पहा. अनंत कविकृत कवितासंग्रहांतील कुशलवाख्यान प्र० श्लो० ५४ मध्येंहि 'वृतांत' असाच प्रयोग आढळतो. ३. कीर्तीच्या गजराला. ४. चांगला पुत्र जिला आहे अशा तिच्या बाळाला. ५. चंद्रसेन राजाचा स्नेह. ६. रात्रीं. ७. गांवांत (अवंतींत). ८. पुण्य. ९. मोराला. १०. प्रधान. ११. नेत्राचें पातें हलों (हलण्यास) विसरलें असा अन्वय. १२. शंकराच्या भजनाचा निदिध्यास.

नृप चंद्रसेन गोपांसह करि मग राज्य उज्जनीगांवीं, ।
ऐसा प्रदोषमहिमा, शिवचरितें म्हणुनि सज्जनीं गावीं'. ॥ ८२

द्विजपत्नीसी श्रीगुरु म्हणती 'ऐशा व्रतासि तूं धरितां, ।
होइल मत्सरि[1] सुत तुज तुझिया अवघ्या कुळांसि उद्धरितो[2]. ॥ ८३

व्रत सांगुनि गुरु ऐसें, ठेवि[3] शिरीं सूनुच्या तिच्या कर तो, ।
दवडी मग अज्ञाना[4], दवडी तम[5] तें जसा दिवाकर[6] तो. ॥ ८४

सज्ञानी मग जाला सुत तो संपन्न वेदशास्त्रींही[7], ।
पावे[8] कुदशा सरुनी मग विप्राची बरी दशा स्त्री ही. ॥ ८५

वेदत्रयपारायण, शास्त्रांतिल ऐकुनी निती[9] लोकीं, ।
विस्मय मानुनि म्हणती 'याची हे धन्य जननि तीं[10] लोकीं[10]. ॥ ८६

द्विजअंतुरी[11] म्हणे 'गुरु त्रैमूर्ती सत्य हा मला गमला, ।
यांचे[12] पदनौकेचा लागे तरण्या भवाब्धि लाग मला. ॥ ८७

होसी तूंचि शिव गुरो!' बोले ऐसें पदांबुजा नमुनी, ।
'पूजिन[13] शनिप्रदोषीं त्वत्पद, जाणे न कांहिं आन[14] मुनी!' ॥ ८८

ऐसा निश्चय करुनी शनिप्रदोषीं सदाहि गुरुपद ती ।
पूजी भाव धरुनियां, 'होइल सत्पुत्र' तीस गुरु वदती. ॥ ८९

पुत्र तिचा जो ज्ञानी होता, त्याचें सुलग्न होऊनी, ।
नांदे सुतपौत्रीं[15] तो हर्षें गुरुच्या पदासि सेवूनी. ॥ ९०

सिद्ध म्हणे 'गा शिष्या! कीर्ति असि प्रकटली महा गुरुची, ।
रामात्मज सुत भावें घेत सदां गुरुपदाब्जमोदरुची[16]. ॥ ९१

---

१. मत्+सरि=माझ्यासारखा. २. उद्धरणारा. ३. तो तिच्या सूनुच्या (मुलाच्या) शिरीं कर ठेवी. ४. अविद्यारूप अज्ञानाला. ५. अंधकार. ६. सूर्य. ७. चार वेद आणि सहा शास्त्रें यांहीं संपन्न (युक्त). ८. कुदशा (वाईट स्थिति) सरुनी विप्राची स्त्री ही बरी दशा पावे. असा अन्वय. ९. शास्त्रांतील नीति. १०. तीन्ही लोकांत. ११. ब्राह्मणाची वायको. १२. भवाब्धि तरण्या याचे पदनौकेचा लाग मला लागे, असा अन्वय. लाग लागणें=हेतु साधणें, लाभ होणें. १३. पूजित जाईन. १४. अन्य, दुसरें. १५. मुलें, नातु यांसह. १६. गुरुपदकमलाच्या सुगंधाची गोडी.

## अध्याय आठवा[1].

सिद्धपदाब्जा नमुनी बोलतसे शिष्य नामकरणी[2] तो, ।
'असतां कुरवपुरीं त्या श्रीगुरु करि काय सांग करणी[3] तो?' ॥ १
शिष्याच्या प्रश्नासी ऐकुनि गुरु सिद्ध देत उत्तर तो, ।
'श्रीगुरुदयानिधी तो भक्तांसी भवनदींत[4] उत्तरतो[5]. ॥ २
असतां कुरवपुरीं गुरु भक्ति धरी रजक[6] एक चरणाची, ।
वेधे[7] मनवृत्ति[8] पदीं, गीतीं[9] जसि चित्तवृत्ति हरणाची[10]. ॥ ३
स्नानासि संगमीं गुरु जातां नमि[11] रजक नित्य नेमानें, ।
सेवा करोनि भावें वर्ते गुरुच्या मना जसें मानें[12]. ॥ ४
प्रोक्षी[13] आंगण झाडुनि, तिष्ठुनि सेवे, गुरूसि वश्य करी, ।
जातां बहुदिन ऐसे, आश्वासी[14] गुरु तया अवश्य करीं[15]. ॥ ५
आश्वासुनि गुरु बोलति 'रजका! तूं राज्य ऋत[16] अदुःख[17] करीं; ।
द्विजभजनाचा हरि[18] तव वसेल हृद्दरीं[19] शिरे न दुःखकरी[20]. ॥ ६
गुरुचें सुवाक्य ऐकुनि बांधी शकुनाचि पालवा[21] गांठी, ।
'बरवें' म्हणे मनीं 'जरि भवाब्धिचा मज न[23] कोलवा[22] गांठी[23]. ॥ ७
सेवा करि मग गुरुची तो चिंता सांडुनि प्रपंचाची, ।
दिव्यांबर[24] मिळतां मग इच्छा धरि काय विप्र पंचाची. ॥ ८
एकदिनीं रजक नदीसंगमिं तो स्नान जों करायासी ।
गेला, तों तंई[25] क्रीडा करितां नौकेंत पाहि रायाची. ॥ ९
म्लेंच्छाधिपती तो नृप दारापुत्रादिसहित दळभारें[26]. ।
क्रीडा नदींत करितां शोभे तरु[27] जेविं पुष्पफळभारें. ॥ १०
पाहुनि रजक तयासी 'धन्य' म्हणे एक जन्मुनी नृप हा, ।

---

१. मूळ पोथीच्या नवव्या व दहाव्या अध्यायांतील कथा यांत आहे. २. नामधारक. ३. कृत्य. ४. संसाररूप नदींत. ५. उत् (वर) तरतो=वर काढितो–'तरतो' हा मूळरूप भेद प्रयोजकभेदाऐवजीं यमकाकरितां योजिला आहे. ६. धोबी. ७. निमग्न झाली. ८. अंतःकरण. ९. गायनाचे ठिकाणीं. १०. हरिणास गायन फार प्रिय असतें हें प्रसिद्ध आहे. ११. नमस्कार करित असे. १२. रुचे, आवडे. १३. सडा घाली. १४. अभयवचन देई. याचा कर्ता गुरु. १५. हातांनीं. १६. सत्य. १७. ज्यांत दुःख नाहीं असें. १८. ब्राह्मणभक्तिरूप सिंह. १९. हृत्+दरीं=हृदयरूप दरींत. २०. दुःखरूप हत्ती. २१. पदराला. २२. पाट. २३. न गांठी=दूर राहील. २४. दिव्य+अंबर=सुंदर वस्त्र. २५. त्या वेळीं. २६. सैन्याच्या समुदायानें. २७. वृक्ष.

शोभे वस्त्राभरणीं[1] नक्षत्रीं जेविं सौम्यपितृ[2] पहा ॥ ११
काय सुकृत तरि करिहा? सुदैवतें कोण पूजिलीं यानें, ।
पावे गजांतलक्ष्मी,[3] शिबिका[4] रथ वाजि[5] सज्जिलीं याने[6]. ॥ १२
केलें व्रत काय महा कीं तप केलें अनेक सायास, ।
दाता[7] ऐश्वर्य असें कीं भेटे कोण गुरु कसा यास. ॥ १३
नृपऐश्वर्या चिंतित येउनि तो गुरुसि करुनि दंडवत[8],।
तिष्ठे[9] करपद जोडुनि संमुख[10] इच्छा धरोनि दंडवत[11]. ॥ १४
रजकमनींची इच्छा जाणुनि ते **गुरु** तया विचारीती, ।
'चिंतिसि काय मनातें सांगें तूं राज्यकार्य[12]च्या रीती'. ॥ १५
रजक वदे 'नृप देखुनि मज वाटे व्यर्थ मी असोन मनीं, ।
परि गुरु तुझ्या पदाब्जीं दृढ भक्ती ते तरी असो नमनीं[13], ॥ १६
दारागृहधनराज्यहि नव्हति स्थिर नाशिवंत हीं सकळ, ।
लोभसुरा[14] त्यांपासुनि निघोनि लावीचि रात्रदिवस कळ[15]. ॥ १७
त्वत्पदसेवनसौख्या[16] नाश नसे, जातिकोटि[17] जरि कल्प; ।
मग त्या विषयसुखाचा चित्तीं करणें कशासि संकल्प[18]. ॥ १८
**गुरु** म्हणती 'परि तुझिया चित्तीं कीं विषयसौख्य भोगावें, ।
यास्तव यवनकुळां तूं जावें परि विप्रकर्मि[19] भंगावें[20].' ॥ १९
ऐकुनि रजक म्हणे 'कां त्वत्पद[21] परतें उपेक्षुनी करिसी, ।
ज्ञान तरी देउनि मज उद्धरिं हरि[22] जेविं रक्षुनी करिसी[23]. ॥ २०
पाचारुनि[24] मग जवळी रजकासी म्हणति 'सांग सावध रे! ।

---

१. वस्त्रालंकारांनीं. २. सौम्य जो बुध त्याचा पिता चंद्र. येथें 'तृ' हें जोडाक्षर धरिलें आहे. ३. संपत्तिवान् पुरुष घोडागाडी इत्यादि वैभवसूचक वस्तूंचा संग्रह करूं शकतो. हत्ती बाळगणें हें फार खर्चाचें काम असल्यामुळें ती वैभवाची शेवटली पायरी समजली जाते. यावरून गजान्तलक्ष्मी (गज आहे अंतीं जीच्या अशी लक्ष्मी) ह्मणजे अतिशय मोठी संपत्ति असा अर्थ. ४. पालखी. ५. घोडे. ६. गमनसाधनें. ७. असें ऐश्वर्य दाता (देणारा) इ. ८. नमस्कार. ९. उभा राही. १०. समोर. ११. काठीप्रमाणें. १२. राज्यकारभाराच्या. १३. नमस्कार करण्यांत १४. लोभरूपी मद्य. १५. दुःख अथवा भांडण. हें कर्म 'लावी' याचें. १६. तुझ्या चरणाच्या सेवेपासून होणाऱ्या सौख्याचा. १७. अनंत युगें. १८. विचार. १९. ब्राह्मणाच्या सेवेंत. २०. निमग्न असावें. २१. (मला) उपेक्षुनी त्वत्पद परतें कां करिसी. असा अन्वय. २२. विष्णु. २३. गजेंद्राला. गजेंद्रमोक्षाची कथा येथें अनुसंधेय आहे. २४. बोलावून.

इह भोगिसि कीं पुढिले जन्मीं होऊनि सौख्य रांव धरे.' ॥ २१
रजक म्हणे 'म्हातारा जालों बहु मी म्हणोनियां विनवीं, ।
यौवनपणिं भोगावें ऐश्वर्या तनु म्हणोनि द्यावि नवी. ॥ २२
श्रीगुरु ऐकुनि म्हणती 'परजन्मीं जाय, बैस राज्यपटीं, ।
जन्मसि विदुरा (?) नगरीं न ठेविं तूं बुद्धि मात्र गा ! कपटी. ॥ २३
म्लेंच्छकुळीं जन्मसि तूं होशिल गा पुत्र पादशाहातें, ।
भोगुनि ऐश्वर्य सुखा नमि विप्रां सज्जनां अशा हातें.' ॥ २४
ऐकुनि गुरुवचन असें वंदुनि गुरुपादबर्बुरजकानें ।
केली विनंति पायीं वर्षुनियां अक्षअंबु रजकानें. ॥ २५
'गुरुराया! मज तेथें सद्बुद्धीनें असो मना समज, ।
त्या जन्मीं तरिं उद्धरिं देउनियां चरणदर्शनास मज.' ॥ २६
गुरु म्हणती 'देइन रे! भेट तुला ज्ञान अंतकाळातें, ।
त्वत्तनुडोहीं लागे जीवतळा मग न अंत काळातें. ॥ २७
आणिक दुजावतारा नरकेसरिनाम सत्य मी धरिन, ।
दर्शन देउनि तुजला दवडुनि भवरोग सत्य उद्धरिन. ॥ २८
आतां जा रे! ऐसा निरोप देतां, गुरूपदें हातें ।
वंदुनि, त्याग करी मग वृद्धदशेच्या कुरूप देहातें. ॥ २९
जाला तयास मग तो विजापुरीं पोटिं जन्म पाछाया, ।
शिष्या! सांगेन पुढें त्यावरि करि जे गुरुकृपा छाया. ॥ ३०
आतां कुरवपुरीं त्या होउनि गुरु गुप्त ही रिपा (?) पसरे, ।
महिमा बहुत, श्रवणें असेल जरि बहु अपारि पाप सरे. ॥ ३१
महिमा सर्व वदाया सरस्वतीच्या पडेल गुढ रसने, ।

---

१. राजा. याचा संबंध होऊनि याकडे. २. पृथ्वीवर. ३. नवीन देह. ४. दुसऱ्या जन्मीं. ५. राजवस्त्रांत, राज्यपदीं. ६. (गुरु+पाद+बर्बु+रजक)=गुरुचरणकमलांतील रजक (पराग असा जो रजक त्यानें. कवितेंत विशेष्यास लागलेली विभक्ति विशेषणासहि लागते या नियमाचें हें उदाहरण. ७. डोळ्यांतील पाणी. ८. ज्ञान. ९. मग त्वत्तनुडोहीं जीवतळा (तुझा जीव हाच तळ त्याचा) काळा अंत न लागे असा अन्वय. तुला मृत्यूची भीति नाहीं हें तात्पर्य. १०. नृसिंह (सरस्वती). ११. संसाररूप रोग. १२. हें वंदुनि याचें कर्म. १३. कुरूप देहातें त्याग करी. असा अन्वय. १४. पाच्छाया पोटीं=बादशहाच्या पोटीं. १५. महिम्याची रिपा (रीफ=घरावर घालण्याची लहान लांकडी फळी) पसरी असा अर्थ दिसतो. १६. अतिशय. १७. सरस्वतीच्या रसने (जिभेला) गुढ (गूढ=संकट) पडेल. असा अन्वय. जिव्हा कुंठित होईल. असा भाव.

परि मी वदेन किंचिच्छोधुनियां मुंगि जेविं गुडरस ने[1][2]. ॥ ३२
अवतार धरायासी दुसरा, गुरु गुप्त संगमीं होती, ।
त्यानंतर त्या स्थानीं जाली कीर्ती वदेन मी हो! ती. ॥ ३३
गुरु लौकिकांत गुप्तहि होती जरि, त्या स्थळीं सदा वास[3], ।
निश्चय करिती, शिष्या पाहुनि होती प्रसन्न भावास[4]. ॥ ३४
आश्विनकृष्णार्कतिथी[5] ते दिवसीं गुप्तरूप गुरु धरुनी, ।
स्वस्थानीं राहति ते भजतां भक्तासि नेति उद्धरुनी. ॥ ३५
स्वस्थानें पादुकांसी श्रीगुरु ठेवूनि गुप्त राहे तो, ।
त्या जे पूजिति भावें तच्चित्तींचा पुरे पुरा हेतो[6].' ॥ ३६
शिष्य म्हणे 'हे गुरुजी! सांगसि गुरु वसुनि नित्य कुरवपुरीं, ।
अवतरती ही आणिक, तरि शंका ही निवारिं सर्व पुरी. ॥ ३७
तेथेंहि असुनि आणिक धरिती गुरु ते कसा दुजा देह, ।
या गोष्टीचें नवलचि वाटे चित्तीं म्हणोनि संदेह[7]' ॥ ३८
शिष्याच्या विनतीसीं सिद्धमुनी ऐकुनी वदे वाचे, ।
'-गुरु तो अनंतरूपी, त्या बहु अवतार भाव[8] देवाचे. ॥ ३९
श्रीराम अवतरोनी पाहे भार्गव[9] कसा चिरंजिवं[10] तो, ।
श्रीगुरुहि अवतरोनी भक्तजनांसी तसाचि रंजिवंतो[11]. ॥ ४०
त्रैमूर्ती अवतरला त्याचा कोणासि तो कळे पार, ।
भजतां[12] भवाब्धि करिती त्याचे पदयुग्मभोंपळे पार. ॥ ४१
धरि रूप जसें भक्त ध्याति तसें एक एक दावाया, ।
शापहि[13] मुनिदुर्वासें दिधला जाऊं नये कदा वायां. ॥ ४२
यास्तव धरणें लागे असंख्य अवतार ते तया हरिला, ।

---

१. गुळांतील रस. २. नेते. याचा कर्ता मुंगी. ३. वसति. ४. भक्तीला. ५. अर्कतिथी= द्वादशी. ६. हेतु. ७. संशय. ८. मान, समज. ९. भृगुऋषीचा वंशज जो परशुराम. १०. अमर. अश्वत्थामा, बलि, व्यास, मारुती, बिभीषण, कृपाचार्य आणि परशुराम हे सात चिरंजीव आहेत. ११. आनंदवितो. १२. त्याचें पदयुग्म (रूप) भोंपळे भजतां (सेवितां, त्यांचा आश्रय केला असतां ते) भवाब्धि (संसारसमुद्र) पार करिती असा सार्थान्वय. १३. अवतार घेण्याविषयींचा शाप.

उद्धरुनि अंबरीषा[1] त्याला जो शाप तो स्वयें हरिला. ॥ ४३
तोचि श्रीहरि गुरु हा अवतारुनियां स्वभक्त उद्धरित, ।
कांहीं कारण लागे म्हणउनि अवतार तो दुजा धरित. ॥ ४४
धरि जरि दुजावतारा, तरि तें स्वस्थान[2] पाडिलें न रितें[3]. ।
देई स्वपादुकांचें पूजन करितांचि इच्छिलें नरीं[4] तें. ॥ ४५
निर्मळ[5] सुभक्त जे त्यां स्वरूप साक्षात देव दावी तें, ।
गुप्त वसुनियां तेथें कीर्ती प्रगटे किती वदावी ते. ॥ ४६
महिमा विशेष तेथिल परि तुज सांगेन एक नवल[6] परी, ।
लागे न उशीर फळप्राप्तिस दृढ भक्ति जरि असेल परीं[7]. ॥ ४७
होता कश्यपगोत्री एक द्विज वल्लभेशनामानें, ।
प्रत्यब्दीं[8] ये गुरुच्या कुरवपुरीं दर्शनास नेमानें. ॥ ४८
तो वैश्यकर्म[9] उदिमा[10] करित परिहि जो स्वधर्म[11] पथ्येकरित[12], ।
पूजी अतिथी; होता[13] तें पाहुनि लोक शर्मपथ करित. ॥ ४९
क्षेत्रीं येउनि तो द्विज पूजुनि गुरुपादुका धरुनि भाव, ।
नवस करी कीं "आतां करितों मी उदिम हा गुरु! निभाव[14]. ॥ ५०
होतां उदिम सफळ हा [15]इच्छित विप्रां सहस्रभोजन हो! ।
येथें घालीन—" म्हणे 'ऐकति[16] हे यास साक्ष भो जन हो! ॥ ५१
नवस करोनीहि असा द्विज करि मग तो उदीम बहु मोटा, ।
होता[17] जाला सफळ; द्रव्याच्या बांधि थोर बहु मोटा[18]. ॥ ५२

---

१. अंबरीष हा साधनद्वादशीचें व्रत करणारा महान् भगवद्भक्त होता. एकदां हा दुर्वास याजकडे आला असतां यानें त्यास भोजनास बोलाविलें. ऋषी स्नानास गेल्यावर परत यावयास उशीर झाल्यामुळें राजानें तीर्थ घेऊन व्रतपारणा केली त्यामुळें अंबरीषानें त्यास शाप दिला. त्यापासून त्याला पीडा होऊं नये म्हणून विष्णूनें त्याकरितां अवतार घेण्याचें पतकरिलें. २. कुरवपुर. ३. रिकामें. ४. नरीं, मनुष्यांनीं. ५. शुद्धान्तःकरण. ६. आश्चर्याचा प्रकार. ७. परमात्म्याचे ठिकाणीं. ८. दरवर्षी. ९. वाण्याचें काम. १०. व्यापारधंदा. ११. आपला (ब्राह्मणाचा). १२. पत्करीत, मान्य करीत स्वधर्माला मान देऊन अतिथी पूजन करीतसे असा भाव. १३. तें पाहुनि लोक शर्मपथ करीत (कल्याणमार्ग आचरीत) होता. असा सान्वयार्थ. १४. चालीव. १५. इच्छित भोजन=इच्छा भोजन १६. हे (लोक) ऐकति. (हे गुरो) भो जन (लोक) यास साक्ष हो (होवो, असो). १७. (तो उदीम) सफळ होता जाला. १८. कातड्याच्या मोठमोठ्या पिशव्या.

येत असे मग यात्रे अश्वावरि बैसुनी चपेटीतें,[1] ।
द्विजभोजनार्थ तेंव्हां घे द्रव्या घालुनीच पेटींत. ॥ ५३
एके दिवसीं रात्रीं तस्कर गांठोनि त्या द्विजा वधिती, ।
तेंव्हां स्मरतां **गुरु**सी, आला; क्षणभरि धरीचनाऽवधि[2] ती. ॥ ५४
तों द्विज चोरीं वधुनी, हरिती, पाहोनि संदुका,[3] द्रव्या, ।
वधि[4] मग तया त्रिशूलें,[5] चंचूनें खग[6] जसाचि काद्रव्या.[7] ॥ ५५
त्यांतिल एक्या चोरें अद्भुत पाहुनि गुरुस्वरूपासी, ।
चरण धरोनी विनती मृत्युभयें[8] मग करी **गुरू**पासीं. ॥ ५६
'विनवी हे **गुरु**राया! अपराधी मी न, मात्र सांगाती,[9] ।
वाघासंगतिनें[10] गोहिंसा करि काय मेष सांगा ती? ॥ ५७
विश्वंभर सर्वेशा! करितों तुझिया पदद्वयां[11] नमना, ।
जाणसि विश्वमना[12] तूं जाणसि रे काय माझिया न मना. ॥ ५८
श्री**गुरु** विनंति ऐकुनि देउनि अभयास, शिर[13] तया हातीं ।
विप्रधडीं लावबुनी, भस्म प्रोक्षोनि[14] जीव[15] वाहाती.[16] ॥ ५९
प्राण श्री**गुरु**आज्ञें भरिला येवोनि विप्रशरिरांत, ।
तों तो उगउनि मित्रहि[17] समूळ निःशेष दूर करि रात.[18] ॥ ६०
भस्मामृत[19] गुरुहस्तीं होतां द्विजदेहिं[20] पूर्ण सिंचन[21] तें, ।
अक्षर[22] शरीर होउनि तेज चढे जेविं तप्तकांचन[23] तें. ॥ ६१
उघडी जों द्विज नयनां, होती **गुरु** गुप्त जेविं ते चंपला,[24] ।

---

१. पिटित पिटित (मारीत मारीत.). २. क्षणभरि ती अवधि (विलंब) धरिचना. ३. मोठ्या पेट्या हें पाहुनी याचें कर्म. ४. ठार करी. याचा अध्याहृत कर्ता 'गुरु'. ५. त्रिशूलनांवाच्या शस्त्रानें. ६. गरुड. ७. काद्रवेया, सर्पाला. ८. मरणाच्या भयानें. ९. सोबती. (मी) सांगाती मात्र=मी चोर नाहीं, नुसता त्यांच्या बरोबर आहें. १०. मेष (मेंढा) वाघासंगतिनें ती गोहिंसा (गाईची हिंसा) करि काय? सांगा. असा सार्थान्वय. ११. दोन पायांनां. १२. विश्वमना (सर्व जगताचा हेतु) जाणसि. रे! माझिया मना न जाणसि (काय)? असा अन्वय. १३. तया हातीं (त्या चोराकडून) शिर (त्या मृत) ब्राह्मणाचें मस्तक) विप्रधडीं (ब्राह्मणाच्या धडाला) लावबुनी असा सार्थान्वय. १४. सिंचून. १५ प्राण. हें कर्म 'वाहाती'चें. १६. बोलावूं लागले. १७ सूर्य. १८. रात्र. १९. भस्मरूप अमृत. २०. ब्राह्मणाच्या शरिरावर. २१. शिंपडणें २२. अ (नाहीं) क्षर (नाश) ज्याचा असें अर्थात् अमर. २३. तापविलेलें सोनें. २४. वीज.

द्विज सन्मुख मग तिष्ठे तस्कर जोडुनि करासि तेंचें[1] पळा. ॥ ६२
सावध होऊनि द्विज विचारि चोरासि कोणि तस्कर हे ।
वधिले; वृत्त[2] श्रुत करिं मजला, केलें तुला यशस्कर, हें. ॥ ६३
'चोर म्हणे द्विजराजा! एक मुनी तापसी जसा शर्व[3], ।
येउनियां मात्र मला रक्षी तस्कर वधोनियां सर्व. ॥ ६४
प्रोक्षुनि भस्म, करी तुज सजीव शिर लावबूनि मजकरवीं[4], ।
मज वाटे शंकर तो, होति तया तेजिं कोटि गरक रवी[5]. ॥ ६५
आतांचि गुप्त जाला मज वाटे पाळि तोचि विश्वास.' ।
ऐकोनि तें द्विजमनीं ठसला मग पूर्ण साच विश्वास. ॥ ६६
आला कुरवपुरीं मग पूजुनि गुरुपादुकांस, उच्चार ।
नवसाचा करुनि, करी ब्राह्मणभोजन सहस्र तो चार[6]. ॥ ६७
गुरुपादुकांसि तेथें पूजुनियां भक्त ते अपार असे, ।
इच्छित पावति शिष्या! प्रख्यातचि म्हणुनि कुरवपूर असे. ॥ ६८
श्रीगुरु तत्क्षेत्रातें धरोनियां गुप्तरूप आहेत, ।
भजतांचि पादुकांसी सद्भावें पुरविती पुरा हेत[7]' ॥ ६९
सिद्ध मुनी कथि ऐसें, त्यावरि[8] करि हे बच्याजिबाल टिका, ।
श्रीगुरुपद सेवेविण करिती अवघा प्रपंच हा लटिका[9]. ॥ ७०

---

## अध्याय नवंवा[10].

शिष्य म्हणे सिद्धासी 'कोठें श्रीगुरु कसे जि अवतरले, ।
सांग कथा ती ज्याचे पादस्पर्शेंचि भक्त भव[11] तरले.' ॥ १
सिद्ध म्हणे 'विप्रस्त्री पूर्वी मंदप्रदोष[12] आचरित, ।
पोटिं तिच्या अवतरती शिष्या! आतांचि ऐक तें चरित. ॥ २

---

१. त्याच पळाला. त्या क्षणीं. २. मजला आणि तुला कोणी यशस्कर (यशस्वी) केलें हें वृत्त श्रुत करिं असा अन्वय. ३. शत्रूचा नाश करणारा. शंकर. ४. मजकडून. ५. तया तेजिं कोटि रवी गरक होती, असा अन्वय. ६. हें सहस्र याचें विशेषण. ७. हेतु. ८. त्यावरी बच्याजिबाल (बच्याजीचा मुलगा) टिका करी. असा अन्वय. वास्तवीक पाहतां ही टीका नसून रूपान्तर आहे कारण मुळांतील कथा येथें निराळ्या शब्दांनीं व वृत्तामध्यें सांगितली आहे. क्वचित इतर ठिकाणची माहितीही सामील केली आहे. ९. खोटा. १०. मूळ पोथीच्या अकराव्या अध्यायांतील कथा यांत आहे. ११. संसार. १२. शनिप्रदोष.

ते द्विजपत्नी मृत्यूअंतीं पावोनि होत जन्म तिचा, ।
कारंज[1] ग्रामातें विप्रोदरिं[2], विप्र तो सुसन्मतिचा[3]. ॥ ३
होतां बारा दिन तो ठेवी तिस बाप नाम अंबा हें, ।
अष्टाब्दें[4] होतां मग विवाहकार्या[5] सुविप्र तो बाहे[6]. ॥ ४
त्याच पुरींचा नवरा त्यास बरें नाम थोर माधव गा!
मोठा शिवभक्त असे, कैसा जैसाचि तो रमाधव[7] गा! ॥ ५
त्या माधवविप्रासी देउनि कन्या सुलग्न करि तात[8], ।
द्विज मंत्रघोषें[9] तेव्हां, हरिखें[10] होउनि मग्न, करितात. ॥ ६
होतां विवाह, कन्या नांदे जाऊनि माधवागेहीं[11], ।
जैसें मनीं पतीचे, करोनि सेवा तसेंच वागे ही. ॥ ७
दोघें[12] शिवभक्तचि तीं[12] शनिप्रदोष व्रतास आचरिती, ।
आणिक शिवव्रतें[13] जीं तीं हीं करिती समग्र याच रितीं. ॥ ८
ऋतुदर्शन होतां स्त्री पतिआज्ञें पूजि नित्य हो भव[14] ती, ।
तिजला षोडशे[15] वर्षीं होतां मग होत ते सगर्भवती. ॥ ९
त्र्यं[16] मासांपासुनि करि गर्भाचे विप्र सर्व संस्कारें[17], ।
प्रसवे नवमासीं सुत बोले तो उपजतांचि ॐकारें[18]. ॥ १०
द्विज मग तद्ग्रामींचे करावया जातकर्म[19] बोलावी, ।
माधव करुनि स्नाना बाळमुखीं मग मधासि[20] तो लावी. ॥ ११
पाटी[21] घालुनि गणकीं[22] वर्तवुनी बाळजातकाशी[23] ते, ।
म्हणती 'हा अवतारी याचे पदिं सर्वतीर्थ[24] काशी ते. ॥ १२

---

१. हें गांव कोठें आहे? २. ब्राह्मणाच्या पोटीं. ३. फार चांगल्या बुद्धीचा. ४. आठ वर्षें ५. लग्नकृत्याला. ६. आमंत्रण करी याचें कर्म 'सुविप्र' आणि कर्ता 'तो' (अंबेचा बाप.) ७. विष्णु. ८. बाप. ९. (वेद) मंत्राचा गजर. १०. हर्षें, आनंदानें. ११. माधवाच्या घरीं. १२. उभयतां स्त्रीपुरुष. १३. शिवरात्र, प्रदोष, सोमवार, नक्तभोजन, रुद्राक्षधारण इत्यादि. १४. शंकर. १५. सोळा. १६. तीन महिन्यांपासून. १७. गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, इत्यादि गर्भसंस्कार. १८. (अ+उ+म) हे तीन वर्ण मिळून ॐ हा शब्द झाला आहे. ह्यांचा अर्थ अनुक्रमें विष्णु, शिव आणि ब्रह्मदेव असा आहे. हा शब्द परम पवित्र असून वेदपठनाच्या आरंभीं व शेवटीं याचा उच्चार करितात. १९. पुत्रप्रसवानंतर नाळच्छेदनापूर्वीं बापानें मंगलस्नान करून समलंकृत होऊन स्वस्तिपुण्याहवाचनपूर्वक करावयाचा जो विधि त्यास जातकर्म असें म्हणतात. हें पहिल्या दिवशींच करितात. २०. जातकर्मांत मुलास मधाचें बोट चाटवितात. २१. (गणित करण्याकरितां) पाटी मांडून. २२. जोशानीं. २३. मुलाचें जातक वर्तवून (पत्रिकेवरून भविष्य ठरवून). २४. सर्वांचें तीर्थ (पूज्यस्थान).

योग्यचि गुरु हा सकळां याचा उपदेश ज्या नरा होत, ।
तो वंद्य होय विश्वा, संशय मनिं हे द्विजा! न राहोत. ॥ १३
न[1] करी स्त्री हा, याचे दर्शनमात्रें पतीत[2]उद्धार, ।
भवसिंधु तरायासी याचें पदयुग्म हेंचि आधार.' ॥ १४
मग ते उठोनि सर्वहि बाळाचे करित बा! पदां नमन, ।
तोषवि[3] मग विप्रांचें देउनि इच्छीत बाप दान मन. ॥ १५
बोले शिशु ॐकारा ऐकुनियां थक्क सर्व जन कानें, ।
खर्चुनि बहुधन तेव्हां केला उत्साह थोर जनकानें. ॥ १६
दृष्टी[6] पडेल बाळा, म्हणोनियां तंतु[7] मंत्रुनी काळा ।
बांधुनि, माया[8] मोहें[9] दृष्टीसी उतरि ती तिनी[10] काळा. ॥ १७
त्रैमूर्ती अवतरला त्याला लागेल केंवि जनदृष्टी? ।
परि माता ममतेनें लावी मंत्रोनि राख अदृष्टीं[11]. ॥ १८
ज्याच्या सहस्रनामें दुःखी जन ते आराम[12] होतात, ।
त्याला द्वादश दिवसां ठेवी **नर**सिंह नाम हो! तात[13]. ॥ १९
महदुत्साहें[14] द्रविणें[15] तोषविलें ब्राह्मणोत्तमां तातें, ।
घालोनि पाळखीं[16] शिशु कुतुक[17] करुनि हालवीत माता ते. ॥ २०
मिळती सुवासिनी बहु कुरवंड्या[18] पाळणे[19] तथा गाती, ।
वर्णावें उत्साहा त्या तरि वाढेल बहु कथा गा! ती. ॥ २१
देतां स्तनपानातें जननी मुख पाहि लावुनी नेदर[20], ।
उदर न भरे शिशूचें, म्हणे, 'मनीं फळ[21] नसे धरून दर. ॥ २२
थोडें दुग्ध मम स्तनिं न पुरे बाळा' म्हणोनि मायेनें, ।

---

१. हा स्त्री न करी (हा लग्न करणार नाहीं). २. पातकी जे त्यांचा उद्धार. ३. मग बाप इच्छीत दान देउनि विप्रांचें मन तोषवि—असा अन्वय. ४. बालक. ५. बापानें. ६. दृष्ट लागेल. ७. दोरा. ८. आई. ९. प्रेमानें. कारण अशा मुलाला पापदृष्टि बाधण्याचा संभव नाहीं हें माहित असूनही पुत्रस्नेहामुळें ती त्याची दृष्ट काढीत असे—असा भाव. १०. सकाळीं, दुपारीं आणि संध्याकाळीं. ११. कपाळाला. १२. आराम होणें=सुखी होणें. १३. बाप. १४. मोठ्या आनंदानें. १५. द्रव्यानें. १६. पाळण्यांत. १७. कौतुक. १८. पिशाचबाधा होऊं नये म्हणून दिवा ओवाळतात तत्संबंधी गाणें. १९. मुलाला पाळण्यांत घालून निजवितानां म्हणावयाचें गाणें. रामाचा पाळणा, कृष्णाचा पाळणा वगैरे प्रसिद्ध आहेतच. २०. नजर, लक्ष. २१. मनीं दर (भय, काळजी) धरून फळ नसे (उपयोग नाहीं).

सांगीतलें वेंरा[1] मग सोडुनि भिड कळवळोनि मायेनें. ॥ २३
'आणा' म्हणे पतीसी, 'दाई स्तनपान द्यावया बाळा, ।
मीही एकटि यास्तव होईल हि ती घरांत रांबाला.[2]' ॥ २४
जननीचीं हीं वचनें ऐकुनि मग बाळ फार हास्य करी, ।
पाहे करुणाक्षीं,[3] स्तन[4] स्पर्शी, कुरवाळि मातृआस्य, करीं. ॥ २५
हस्तस्पर्शें धारा पयोधरीं[5] सर्व सुटति बत्तिसही, ।
अंचळ[6] भिजोनि वाहे पय,[7] मग आश्चर्य वाटलें तिस ही. ॥ २६
सांगे मग पतिला तो वृतांत हर्षें उमाप[8] ती सर्व, ।
'न म्हणावा मानव हा, अवतारी कीं उमापती[9] सर्वे.[10]' ॥ २७
पालन करितां जाला जरि बाळक पूर्ण एक वर्षाचा, ।
बोले न कांहिं म्हणउनि सोहाळा न करि तात हर्षाचा. ॥ २८
बहुधर्मोपायांची करोनि बोलावया सीमा[11] तातें, ।
रात्रदिवस शिशुलागीं शिकवी बोलावयासि माता ते. ॥ २९
बाळक हास्य करुनियां बोले ॐकार शब्द, परि समज ।
न पडुनि माता बोले, 'शिशु! दे बोलोनि सौख्य, परिस[12] मंज.[12]' ॥ ३०
शिकवी किति जरि माता, ॐकारा वेगळें दुजें न वदे, ।
सांगति[13] जोशि तिला 'ग्रहदानें पूजुनि नवग्रहां नव दे.' ॥ ३१
बोले न कांहिं केल्या जाला जरि पुत्र मुंजि[14] बांधाया,[14] ।
मातृपिता म्हणती तैं 'जाली तरी काय भूतबाधा या. ॥ ३२
मोना[15] जरी म्हणावा बोले ॐकार, ऐकती कान; ।
मग ॐकारावांचुनि फुटे सुवाचा बरीक ती कां न? ॥ ३३
जालीं वर्षें सातहि करुनि तरी व्यर्थ काय उपनयना,[16] ।

---

१. नवऱ्याला. २. कामकाजाला. ३. दयार्द्रदृष्टीनें. ४. करीं स्तन स्पर्शी (आणि) मातृआस्य कुरवाळि (आईच्या तोंडावरून हात फिरवी). ५. स्तनांत. ६. पदर. ७. दूध. ८. उमाप (अतिशय). हर्षें ती तो सर्व वृतांत (वृत्तांत) सांगे–असा अन्वय. ९. शंकर. १०. विष्णु. ११. पराकाष्ठा. १२. माझें ऐक. १३. नवग्रहां (सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहु व केतु यांना) पूजुनि नव (नऊ) ग्रहदानें (अनिष्टग्रहनिवारणार्थ दानें) दे असें तिला जोशि सांगति–असा सार्थान्वय. १४. मुंज बांधण्याला योग्य. मौंजी=मुंज नांवाच्या गवताची मेखला. १५. मुका. १६. उपनयन. याचा मूळचा अर्थ 'गुरूजवळ नेणें' असा आहे. पूर्वी व्रतबंध करून वेदाध्ययनास गुरुगृहीं ठेवित असत. यावरून या संस्कारास 'उपनयनसंस्कार' असें नांव पडलें.

वडसचि वाढति नेत्रीं लावुनि तरि व्यर्थ काय उपनयना[1]!' ॥ ३४
ब्राह्मण म्हणती, 'विप्रा! करिं तूं बाळासि मुंजिबंधन रे! ।
विप्रकुळींचा बाळक संस्कारीं[2] स्वल्प वेंचुनी धन रे!' ॥ ३५
विप्र म्हणे, 'जी, परि मी करुं या बाळासि केंवि उपदेश, ।
जाला मूका निपटचि[3] म्हणोनि वाटे मनांत अंदेश.' ॥ ३६
ब्राह्मण म्हणती, 'बाळक जपेल ऐकोनि मंत्र तो बरवा, ।
ऐकतसे तो श्रवणें[4] करिही ॐकार मुख्य शब्दरवा[5].' ॥ ३७
मातृपिता बहु चिंता करोनि म्हणताति, 'हे कपाली[6] रे! ।
भजतां तुज, विधिकरवीं[7] लिहविशि हें आमुचे कपाळीं रे! ॥ ३८
एकचि बाळक आम्हां त्यास न कां देशि सांबजी! वाचा[8]?' ।
माता म्हणे, 'शिवा रे! करीन मी नाश या स्वजीवाचा.' ॥ ३९
करुनि विलापहि[9] बोले, 'आम्हांविशिं सांबजी कसा निजला?' ।
ऐकुनि तें बाळक तो समजावी, दावुनी खुंणा[10] तिजला. ॥ ४०
'सदनीं[11] ये' म्हणवुनियां मातेप्रति करिं धरोनि हाटकितो[12], ।
येतां तिच्या करीं दे लोहविळा[13] जो करोनि हाटकि[14] तो. ॥ ४१
पाहुनि करि आश्चर्या जाला महहर्ष[15] हो! उमाप[16] तिला, ।
दाखवि भर्त्याला, मग दोघें ही स्तविति तैं उमापतिला. ॥ ४२
होय शिशुकरस्पर्शें लोहविळा शुद्ध सोनियाचा हा, ।
स्त्रीस म्हणे, 'शोध चला एकांतीं करुं बसोनि याचा हा.' ॥ ४३
प्रतिती[17] पहावयासी नेउनि एकांतिं पुत्र, लोह करीं[18] ।
देती, मग तेंचि अमृतनयनीं[19] पाहोनि शुद्धं[20] लोह करी. ॥ ४४
कनकसमृद्धी जाली तेजाची बहु चढे कला गेहा. ।
माधव म्हणे स्त्रियेसी, 'वाटे शिव अवतरे मला गे! हा.' ॥ ४५

---

१. उपनेत्रांला. २. संस्कार कर, मुंज कर. ३. अगदीं. ४. कानानें. ५. ॐकार हाच जो मुख्य शब्द त्याच्या रवा म्हणजे ध्वनीला. ६. रे हे कपाली! (शंकरा!) ७. विधिकरवीं (ब्रह्मदेवाकडून). ८. वाणी. ९. दुःख. १०. हाताच्या खुणा. ११. घरीं. १२. बोलावितो. १३. लोखंडाचा कोयता. जो लोहविळा तो हाटकी करोनि दे—असा अन्वय. १४. सोन्याचा. १५. मह (उत्साह)+हर्ष (आनंद). १६. अतिशय. १७. अनुभव. १८. हातांत. १९. अमृतदृष्टीनें. २०. सोनें.

पावुनि आनंद मनीं मग म्हणती [1]म्हणुनि 'ये' सुतनयासी ।
करुणावचनें बोलति होउनि रोमांचिता [2]सुतन [3]यांसी. ॥ ४६

'बहु सौख्य तव दयेनें पावों परि बोल ऐकिले कानें, ।
नाहीं, यास्तव बोलें.' दाखविलें मग खुणेस लेंकानें. ॥ ४७

मुंजीबंधन होतां येइल बोलावयास खास मज. ।
[4]कटिं कर लावुनि दावी [5]संज्ञा मग तो तयां पडे समज. ॥ ४८

पडतां समज खुणेचा जाला आनंद तातमातेतें, ।
साहित्य मुंजिला मग लागे जें जें करी जमा तें तें. ॥ ४९

व्रतबंधा सुमुहूर्ता पाहुनि बोलावि आप्त इष्टांला, ।
बोलावि शास्त्रि, वैदिक, ज्योतिषि, याज्ञीक, थोर [6]शिष्टांला. ॥ ५०

घालुनि मंडप बहुलें वरि [7]पीतारक्तचित्रवर्णांचे, ।
देती [8]सुरंग, कौतुक पाहति जन सर्व [9]चारि वर्णांचे. ॥ ५१

द्विज तो बहु धन खर्चुनि करि मग उत्साह थोर आनंदें, ।
गोकुळिं हरि अवतरतां केला उत्साह तो जसा नंदें. ॥ ५२

पाहुनि ते जन म्हणती, '[10]मोन्यां पुत्रास थोर [11]संभ्रम हा ।
करिती व्यर्थ कशाला? [12]मोहानें विप्र पावला [13]भ्रम हा. ॥ ५३

बहु धन खर्चुनि जरि हा मुंजीबंधन करील [14]तनयाचें, ।
उपदेश परि न होयचि, कैसें गेलें भुलोनि मन याचें?' ॥ ५४

कांहीं जन ते म्हणती, 'मिळतें मिष्टान्न दक्षिणा धन कीं, ।
[15]चौंड नसे मंत्रांची, न होय आम्हां तयांत साधन कीं.' ॥ ५५

सोहाळा द्विज करि जो, पाहूं [16]उत्साहिं [17]मौत नयनांहीं, ।
कारण उपदेशाचें आम्हां वदला हि [18]मति नय नाहीं. ॥ ५६

---

१. (तीं दोघें) (त्या) सुतनयासी 'ये' म्हणुनि (असें) म्हणती—असा अन्वय. प्रेमानें बोलावून जवळ घेती—हें तात्पर्य. २. तन—तनू—देह. ३. या मुलाला. ४. कंबरेला हात लावून. ५. खूण. ६. सभ्यांना. ७. पीत+आरक्त+चित्रवर्ण=पिवळा, तांबडा अशा नानाप्रकारच्या रंगांचे. ८. चांगले रंग. ९. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र ह्या चार वर्णांचे. १०. मुक्या. ११. तयारी. १२. ममतेमुळें. १३. भ्रम पावणें=वेड लागणें. १४. मुलाचें. १५. आवड. १६. उत्साहांत. १७. मौज. १८. आम्हां उपदेशाचें कारण नाहीं हि मात (गोष्ट) नय (न्याय, शास्त्र) वदला—असा अन्वय. आम्हांला उपदेशाशीं काय करावयाचें आहे? आपणाला बोलावणें आलें म्हणजे जेवावयास जावें हेंच आमचें शास्त्र—असा अर्थ दिसतो.

केलें स्थापन देवक हर्षें स्मरुनि द्विजें उमाधव[1] तो, ।
'घाला'[2] म्हणे 'जननिचे पुढें सुता शीघ्र जेवूं' माधव तो. ॥ ५७
मोठ्या उत्साहानें जालें मग तें सुमातृभोजन कीं, ।
भोजनहि[3] बहुत देउनि भो! जन केलेहि तृप्त हो! जनकीं. ॥ ५८
भोजन करोनि बाळक ये, मग मुंजीस बांधितो जनक, ।
मंत्रोपदेश करि, मग वांटी विप्रांसि दक्षिणा[4] कनक[5]. ॥ ५९
मंत्रोपदेश केला तातें जो, बहु जपे[6] मनीं; मग ती, ।
घालाया भिक्षाळे[7] माता घेऊनि येत शीघ्रगती[8]. ॥ ६०
देउनि वस्त्राभरणें घालुनि भिक्षाळ बटुसि[9] जननी ती ।
बोले[10], 'मागुनि ऐसी भिक्षा पढ चारि, सा, सुजननीती'. ॥ ६१
करिं घालितांचि भिक्षा जाला बटु चारि बोलका निगमें[11], ।
मातृपित्यांसी मग तो पडला[12] ऐकोनि बोल कानिं गमें[12]. ॥ ६२
वदतां बटु निगमासी केलें आश्चर्य तें सभालोकीं[13], ।
म्हणती विधि हरि हर हा अवतरला ऋत[14] पडे प्रभा लोकीं[15]. ॥ ६३
'टाकुनि थोरपणासी, सांडुनि गर्वा, उठा, नमा[16] यातें', ।
ऐकुनि बुधलोकवचें[17], पावे आनंद तात माया[18] ते. ॥ ६४
मग तो म्हणे बटु तिला, 'केला उपदेश तूं मला माते! ।
भिक्षा माग म्हणोनी त्याचा मनिं वेध[19] लागला मातें. ॥ ६५
सत्य तुझीं हीं वचनें, आणिक मी ब्रह्मचर्य आश्रम हा ।
धरिला; यास्तव[20] मज दे निरोप तीर्थां, न मानुनी श्रम हा'. ॥ ६६

---

१. शंकर. हें 'स्मरुनि' याचें कर्म. २. जननीचे पुढें सुता (मुलाला) शीघ्र जेवूं घाला, असें तो माधव म्हणे–असा अन्वय. ३. भो! हो (हे नामधारका)! भोजनहि देउनी जनकीं बहुत जन तृप्त केले. ४. बापानें. ५. सोन्याची दक्षिणा. ६. जप करिता झाला. याचा कर्ता 'पुत्र' अध्याहृत. ७. भिक्षाळ=मुंजींतील नव्या ब्रह्मचाऱ्यानें मागितलेली भिक्षा. ८. जलदीनें. ९. ब्रह्मचाऱ्याला. १०. 'ऐसी भिक्षा मागुनि चारी (वेद) सा (सहा शास्त्रें) (आणि) सुजननीती पढ (शीक) (असें) ती जननी वदे–असा सार्थान्वय. ११. वेद. १२. गम पडला=स्वास्थ्य प्राप्त झालें. १३. सभेंतल्या मंडळींनीं. १४. खरोखर. १५. जगांत. १६. नमस्कार करा. १७. शहाण्या लोकांच्या (तोंडचे) शब्द. १८. ते माया=ती आई. १९. नाद. २०. हा श्रम न मानुनी मज तीर्थां (जाण्याला) निरोप दे (परवानगी दे).

भिक्षा मागत हिंडूं समस्त तीर्थां करीत या [1]क्षितिचे.' ।
पुत्राचीं हीं वचनें ऐकुनि दुःखाश्रु येति [2]अक्षिं तिचे. ॥ ६७
मूर्छागत पडुनी मग करपतसे दुःखअग्निनें माया, ।
बोले, '[3]दुर्घट ऐशा पुत्रा! सहसा न पाळिं नेमा या. ॥ ६८
[4]तव बोलेंदू उदया येतां ये हर्षसिंधुसी [5]भरितें, ।
[6]सकळहि तें प्राशोनी करिती हे बोल मेघ कुइभ रितें. ॥ ६९
पोसावयासि आम्हां, नाहीं दुसराहि पुत्र [7]तनया रे! ।
तूं जरि टाकुनि जासी, सत्यचि जीवासि [8]ठेविर्त न या रे!' ॥ ७०
मातेचीं हीं वचनें ऐकुनियां पुत्र तो वदे तीतें, ।
'होती सुत चार तुला, तुम्हांसि पोसोनि सौख्य देती ते. ॥ ७१
जननी! तूं [9]प्राग्जन्मीं [10]सुतइच्छेनें शनिप्रदोषाचें ।
करिसी जें व्रत तेणें [11]किल्मिष राही न [12]शेष [13]दोषाचें.' ॥ ७२
ठेवुनि शिरिं कर मग तो दावी प्रकटोनियां स्वरूपा ही, ।
[14]प्राग्जन्मस्मृति जाली तिजला, मग नमुनि पद धरूं पाही. ॥ ७३
पाहुनि गुरुस्वरूपा आठवि ते पूर्वजान्मिचे चरिता, ।
बोले, 'हा गुरु माझा अवतरला मज [15]संदेह उद्धरिता.' ॥ ७४
गुरु म्हणती, 'हे माते! सारे हे पूर्व बोल [16]गुप्त कर.' ।
झांकी स्वरूप मग तें, [17]श्रोत्री आच्छादि जेंवि [18]सप्तकर. ॥ ७५
मागुति म्हणे तिला तो, 'भक्तिस्तव जाहलों तुझा सुत मी, ।
परि मी यति संन्यासी न राहि गुंतोनियां [19]प्रपंचतमीं. ॥ ७६
हिंडेन सर्व तीर्थें घेउनि [20]संन्यास एक साचार, ।

---

१. पृथ्वीवरचे. २. डोळ्यांत. ३. कठीण. हें 'नेमा' याचें विशेषण. ४. तव बोलेंदू (बोल+इंदू=भाषणरूपी चंद्र) उदया येतां (माझ्या–आईच्या) हर्षसिंधुसी भरितें ये–असा अन्वय. तूं प्रथम बोलूं लागलास, त्या वेळच्या शब्दांनीं मला अति आनंद झाला व आतांच्या या कठोर शब्दांनीं तो सर्व आनंद नाहींसा केला–असा या सर्व गीतीचा भाव. ५. भरतें, उचंबळणें, भरती. ६. हे (आतांचे) बोल (हेच कोणी) मेघ कुइभ (पृथ्वीचे हत्ती–दिग्गज) तें (भरितें) सकळहि प्राशोनि रितें करिती–असा अन्वय. ७. मुला. ८. (मी) या जीवासि सत्यचि न ठेवित (ठेवणार नाहीं). ९. पूर्वजन्मीं. १०. मुलगा व्हावा या इच्छेनें. ११. घाण. १२. बाकी. १३. पातकांचें. १४. पूर्वजन्मींची आठवण. १५. देहासुद्धां. १६. गुप्त ठेव. १७. विद्वान् ब्राह्मण. अग्निहोत्री ब्राह्मण होम झाल्यावर अग्नि आच्छादित करून ठेवितात–ही गोष्ट येथें लक्ष्य आहे. १८. सप्तहस्त, अग्नि. १९. संसाररूप मोहांत. २०. सर्वसंगपरित्याग करणें.

न करीं चिंता सहसा होतिल सत्पुत्र गे! तुला चार. ॥ ७७

जननी म्हणे, 'सुपुत्रा! म्हणसी होतील पुत्र चार मला, ।
सत्यचि वाटे, परि [1]हृदिं [2]दुःखानळ [3]गमन बोल हा [4]रमला. ॥ ७८

बाळपणीं यति होउनि हिंडसि तीर्थांसि तूं कसा [5]चरणें, ।
बोले सुधर्म शास्त्रहि [6]चारीही आश्रमांसि आचरणें. ॥ ७९

बारा वर्षें आश्रम आचरुनी ब्रह्मचर्य, मग [7]जाया ।
करुनी धर्माऽचरुनी शांतवणें [8]मीनकेतनगजा या. ॥ ८०

आश्रम मुख्य गृहस्थचि आचरतां सौख्य आणिक [9]सुकृत हीं, ।
हीं धर्मशास्त्रवचनें बोले कीं, मी नवीन न; [10]सुकृतही. ॥ ८१

यज्ञादिक जीं कर्में करूनि कन्यासुतादि [11]लाधावें, ।
नंतर बारावर्षें वानप्रस्थाश्रमासि साधावें. ॥ ८२

त्रय आश्रमासि ऐसें आचरुनी मग चतुर्थ आश्रम तो ।
घेणें, हीं [12]श्रुतिवचनें, बाळपणीं जीव कीं बहु [13]श्रमतो. ॥ ८३

बाळपणीं संन्यासा घेतां इच्छा पुरे न, [14]रहे तूं. ।
शास्त्रश्रुति बोले [15]भवसागरिं बुडवी पुरे नरां हेतू. ॥ ८४

इच्छा पुरवुनि घ्यावें संन्यासा मोक्ष व्हावयाकरितां, ।
विघ्न[16] घडे अविचारें जरि धारण अल्प या वया करितां.' ॥ ८५

**सिद्ध** म्हणे, 'शिष्या! हे मातेचे बोल ऐकतां कानें, ।
**गुरु** म्हणती जो सेवी [17]सुधारसा तो न तृप्त ताकानें.' ॥ ८६

**शिष्या!** बोध **गुरूनें** केला जो जननिच्या मना तूं तो ।
ऐकें सादर चित्तें. सदैव अवलोकिं [18]रामनातू तो. ॥ ८७

---

१. अंतःकरणांत. २. दुःखरूप अग्नि. ३. जाणें. ४ उत्कर्षानें राहिला. याचा कर्ता 'दुःखानळ.' ५. पायानें. ६. ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम, संन्यास, हे चार आश्रम. ७. स्त्री. ८. मदनरूपी हत्तीला. ९. पुण्य. १०. (पूर्वींचीच) चांगलीं केलेलीं. ११. मिळवावें. १२. वेदवाक्यें. १३. कष्ट पावतो. १४. (घरीं) रहा. १५. हेतू (अतृप्त राहिलेली वासना) नरां भवसागरिं पुरे बुडवी–असा अन्वय. १६. जरि (जर) या अल्प वया (लहानपणीं) अविचारें (संन्यास) धारण करितां (संन्यास ग्रहण केलें असतां) विघ्न घडे–असा अन्वय. १७. अमृतरसाला. हें सुभाषित आहे. १८. रामाचा नातू, परशुराम कवि.

## अध्याय [1]दहावा.

विनवी शिष्य गुरूसी, 'ज्ञान गुरूनीं अपूर्व मातेतें ।
उपदेशिलें, तयाचें चरित्र सांगेचि सर्व मातें तें.' ॥ १
शिष्यविनंतीश्रवणें पावुनि गुरु हर्ष तो [2]अभेदमन, ।
ऐक म्हणे शिष्यासी, '[3]षड्रिपुंसी ज्ञान तें असे दमन. ॥ २
श्रीगुरु म्हणती, 'माते! नाहीं विश्वास सत्य देहाचा, ।
जाणुनि ऐसें ज्ञानी करिती गे! त्याग सत्य [4]गेहाचा. ॥ ३
तूं म्हणसी मजलागीं आश्रम चारीहि आचरे [5]सांग, ।
आहे काय भरंवसा देहाचा क्षणभरी तरी सांग? ॥ ४
[6]क्षणभंगुर देह, असें जाणुनि [7]गुरुदेवधर्म घे करुनी, ।
[8]सुकृतसुमार्गें चालुनि करणें तीर्थें सुआश्रमा धरुनी. ॥ ५
[9]पर्णाग्रीं [10]जलबिंदू नोहे स्थिर जेंवि देह तैसा हा, ।
[11]पूर्ववयीं म्हणउनियां तीर्थें हिंडोनि जिंकणें [12]सोहा. ॥ ६
मिथ्या [13]स्वप्न जसा तो तैसा संसार [14]ओळला खोटा, ।
येतां बलावणें दे न क्षण अवकाश [15]काळलाखोटा. ॥ ७
[16]आयुर्दिन यम मोजी जैसा [17]ऋणकरि दिनांसि व्याजाचे, ।
सुकृतचि करणें, नातरि विषयाचें सौख्य या जिवा [18]जाचे. ॥ ८
[19]होतांचि लिप्त विषयीं दाखविती मार्ग साहि नरकाचा, ।
श्रीगुरुची करि सेवा पुण्य करी, तो न राहि नर [20]कांचा. ॥ ९
[21]आयुर्दाव घडि घडी सरत असे, [22]हा खरा तुला समजो; ।

---

१. मूळ पोथीच्या बाराव्या आणि तेराव्या अध्यायांतील (ओवी ५८ पर्यंत) कथा यांत ग्रथित केली आहे. २. अभेद (एकरूप आहे) मन ज्याचें असा. ३. तें ज्ञान षड्रिपुंसी (काम, क्रोध, मोह, लोभ, मद, दंभ यांसी दमन (नाश करणारें) असें. ४. घराचा. ५. परिपूर्ण. ६. क्षणांत नाश पावणारा. ७. गुरु आणि देव यासंबंधीं धर्म. हें 'करुनि घे' याचें कर्म. ८. पुण्यरूप मार्गानें. ९. पानाच्या शेंड्यावरचा. १०. पाण्याचा थेंब. ११. लहानपणीं. १२. कामक्रोधादिक. १३. हा शब्द नपुंसकलिंगी व पुल्लिंगी आहे. १४. रचलेला, मांडलेला. १५. यमानें पाठविलेलें पत्र. १६. आयुष्याचे दिवस. १७. रिणको. १८. दुःख देतें. १९. विषयीं लिप्त (निमग्न) होतां साहि (कामक्रोधादिक) नरकाचा मार्ग दाखविती—असा अन्वय. २०. कच्चा. २१. संस्कृत 'आयुर्दाम.' आयुष्याची दोरी. २२. हा (आयुर्दाव) तुला खरा (खऱ्या स्वरूपानें) समजो (कळूं दे).

न करी शिवहरिभजना सुकृता वाटे मला [1]खरासम [2]जो. ॥ १०
ऐसा या देहाचा नाहीं पळभरिहि सत्य विश्वास, ।
यास्तव करणें पुण्या, टाकुं न दे काळ [3]ऐरविं श्वास. ॥ ११
मातातातसुतादिक अवघीं मिथ्याच जेंवि [4]मृगजामी, ।
म्हणउनि ऐकें माते! [5]वश्य नव्हें मीनकेतनगजा मी.' ॥ १२
ऐसा बोध श्रीगुरु करिती जननीसि जो अनेक रितीं, ।
ऐकुनि पुन्हां विनंती वंदुनि पायांसि [6]सन्मनें करि ती. ॥ १३
'सांगितले [7]अम्हांसी भवाब्धिसी हे तुं मार्ग [8]सुतराया, ।
[9]बुडवाया परि दावी भवाब्धिसी हेतुमार्ग सुत राया! ॥ १४
राहीं तूं मजपासीं यास्तव जों पुत्र एक मी [10]प्रसवें. ।
नेदी निरोप; [11]येथें घेउनि करिं वेदघोष विप्र सवें. ॥ १५
वदलासि भविष्या तूं आणिक होतील [12]सूनु चार मला, ।
परि होती कीं नाहीं, मनिं हा [13]संदेह आमुच्या [14]रमला. ॥ १६
कुळदेव आमुचा तूं पूजूं; मम गृहिं करोनि जी [15]वास ।
राही, जों सुत होई तोंवरि, नातरि त्यजीन जीवास.' ॥ १७
हीं जननीचीं वचनें श्रीगुरु ऐकुनि [16]उदंड हास्य करी, ।
'चिंता न करीं' म्हणउनि कुरवाळी जननिचें [17]सुआस्य करीं. ॥ १८
श्रीगुरु मग जननीसी म्हणती, 'तुज पुत्र होति जंव दोन, ।
तों तव घरिं राहिन, हें दाखविलें सत्य मी तुज वदोन. ॥ १९
राहुनि वर्षभरी मी पुरविन तव पूर्ण सत्य हेतूला, ।
मग दे निरोप मातें सांगितलें वचन सत्य हें तूला.' ॥ २०

---

१. गर्दभाप्रमाणें. २. हा 'न करी' याचा कर्ता. ३. एरवीं काळ श्वास टाकूं न दे. असें केलें नाहीं आणि मृत्यु आला तर तो श्वास देखील टाकावयास फुरसत देणार नाहीं. मग पुण्य करावयास कसचें सांपडणार–असा भाव. ४. मृगजळ. ५. मी मीनकेतनगजा (मदनरूप हत्तीला) वश्य नव्हें–असा अन्वय. ६. निर्मळ मनानें. ७. हें 'सांगितलें' याचें कर्म. ८. चांगल्या रीतीनें तरण्याला. ९. सुत राया! परि हेतुमार्ग भवाब्धिसी बुडवाया दावी–असा अन्वय. माझा हेतु मला संसारांत बुडवितो–असा भाव. १०. प्रसवेन (तोंपर्यंत). ११. येथें (घरींच) विप्र सवें घेउनि (ब्राह्मणांबरोबर) वेदघोष करिं–असा अन्वय. १२. पुत्र. १३. संशय. १४. गुंतला. १५. वसति. १६. पुष्कळ. उदंड हा शब्द संस्कृतांतील 'उद्दंड' शब्दापासून झाला आहे. याचा मूळचा अर्थ 'उंच' आहे दांडा ज्याचा तें' म्हणजे छत्री वगैरे. पण अर्थापभ्रंशानें 'पुष्कळ' असा अर्थ झाला. (व्यु० प्र० पृ० ७). १७. चांगलें तोंड.

श्रीगुरु ऐसा राहुनि शिष्यांसी वेद[1]शास्त्र तो शिकवी, ।
पाहुनि बुधजन म्हणती '[2]बुद्धिविषीं साम्यते न याशिं [3]कवी. ॥ २१
सातचि वर्षी बटु परि सांगे शिष्यासि शास्त्र वेदा हा, ।
ईश्वर निश्चय, याचे [4]दर्शनें [5]भववन्हिचा निवे [6]दाहा. ॥ २२
एवं गुरु राहे; मग तातें वंदोनि सांबपाद, [7]रती ।
देतां अंबेलागीं, जाली तात्काळ हो! गरोदर ती. ॥ २३
भरतां, जालें [8]युग्मचि सुंदर दैदीप्यमान, [9]नउ मास, ।
ठेवी [10]द्वादश दिवशीं [11]नामार्चुनि [12]लोहितनयनउमास. ॥ २४
येउनि मातेसन्निध श्रीगुरु, होतां त्रिमास तनयासी ।
सांगति, 'हे सत्पुत्रचि तुम्हांस रक्षिति, करा [13]जतन यांसी. ॥ २५
माते! हे दीर्घायू असती. आणीक दोन सुत होती, ।
कन्या नंतर होइल.' हर्षे ऐकुनि असें बहुत हो! ती. ॥ २६
श्रीगुरु म्हणती, 'माते! पुरला आतां तुझा खरा हेतू. ।
आतां निरोप दे मज, हृत्कमळीं सांब राख, [14]राहें तूं. ॥ २७
ऐशीं गुरुचीं वाक्यें ऐकुनि मग ती शिरा पदां ठेवी ।
बोले, '[15]सांसारिक मजपासीं ठेवीं न आपदाठेवी. ॥ २८
गुरु कुळदैवत आम्हां तूं अवतरलास सत्य ताराया. ।
महिमा स्वरूप न कळुनि तुजला आम्ही [16]म्हणों '[16]सुता!' 'राया!' ॥ २९
जासी आम्हां टाकुनि नंदयशोदेस जेंवि [17]कंसारी ।
तुचवांचुनि वांचुनि मग कंठूं काळासि केंवि संसारीं?' ॥ ३०
ऐकुनि ऐसें श्रीगुरु दाखविती [18]स्वस्वरूप [19]सांग तितें, ।
'चिंता न करीं, देइन करितां स्मरणासि भेट' सांगति ते. ॥ ३१
'करितां तूं मत्स्मरणा येइन धांवोनि सत्य ते क्षणिं मी, ।
मज चिंता भक्तांची, यास्तव तिष्ठें स्वभक्तरक्षणिं मी. ॥ ३२

---

१. चार वेद व सहा शास्त्रें. २. बुद्धीविषयीं. ३. शुक्राचार्य. ४. दर्शन झालें असतां. ५. संसाररूप अग्नीचा. ६. दाह, ताप. ७. रती देतां=संभोग दिला तेव्हां. ८. जुळें. ९. नउ मास भरतां—असा अन्वय. १०. बाराव्या दिवशीं. ११. नाम+अर्चुनि. १२. लोहितनयन (शंकर) व उमा (पार्वती) यांस अर्चुनि. १३. जतन करा=सांभाळा. १४. स्वस्थ रहा. १५. मजपासीं सांसारिक आपदाठेवी (विपत्तीची ठेव) न ठेवी (असें) बोले. असा अन्वय. १६. सुता (बाळा!) राया! (राजा,) असें म्हणों (म्हणतों अथवा म्हणत होतों). १७. कृष्ण. १८. आपलें स्वरूप. १९. संपूर्ण.

सुक्ततहि शनिप्रदोषव्रत करिसी म्हणुनि मागिले[1] जननीं ।
ईह[2] संपति भुक्त्यंतीं[3] तुम्हांस हें सत्य बोलिलें जननी ! ॥ ३३
प्रॉग्जन्मव्रतपुण्यें[4] अवतारा मी तुझ्याच घे उदरां, ।
पुनरपि जन्म तुम्हांसी नाहीं आतां नकाच घेउं दरा.[5]' ॥ ३४
सांगुनि ऐसें श्रीगुरु निघती मग जावयासि काशीतें, ।
तातांबा[6] बोळविती, पाहति जन मिळुनि सावकाशीं तें, ॥ ३५
नगरींचे श्रीगुरुसी मिळती जन सर्व बोळवायास ।
ते म्हणती, 'बोळविती संतोषें केंवि आई बा[7] यास? ॥ ३६
घडतां पुत्रवियोगा एक घडी दुःख होय हो! तनया ।
किंचितही दुःख कसें बोळवितां हर्ष होय होत न यां?[8]' ॥ ३७
बुधजन म्हणती, 'बटु हा अवतारी[9] द्रुहिणशीवदेवांचा[10] ।
अथवा हरिचा; याची निगमार्था[11] हे कशी वदे वाचा? ॥ ३८
नमन करा साष्टांगीं या बटुदेवा धरोनि पायांसी, ।
तारुनि[12] भवाब्धि हि तुम्हां नेइल, येवोनियां कृपा यासी.' ॥ ३९
ऐसें वदोनि बुधजन भावें नमनासि तनुमनें[13] करिती ।
येती स्वगृहासी मग करीत गुरुची स्तुती अनेक रिती ॥ ४०
आले जन सर्व गृहा, मातृपिता जाउनी पुढें नमिती ।
म्हणती, 'तव उपकारा हे सुत! देवाधिदेव! रे! न मिती[14] ॥ ४१
विश्वगुरो! देवाधीदेवा! त्रैमूर्ति! तूंचि अवतरसी. ।
सांगुनि आम्हां ज्ञाना, तारुनि भवसिंधु सत्य उद्धरसी. ॥ ४२
पुनरपि येउनि आम्हां दाखविं तूं एकदां स्वरूपा या ।
जातां स्वर्गा आम्ही श्रीगुरुराया! तुझ्या धरूं पायां.' ॥ ४३
श्रीगुरु म्हणती, 'माते! देइन तुज दर्शनास एकतिस ।
होतां वर्षें, चिंता न करीं' म्हणवोनि देति भाक[15] तिस. ॥ ४४

---

१. जन्मीं. २. या जन्मीं. ३. मुक्ति+अंतीं=मरणानंतर. ४. पूर्वजन्मींच्या व्रताच्या यानें. ५. भीतीला. ६. तात+अंबा=बाप आणि आई. ७. वाप. ८. यां (आईबापांना) या बोळवितां हर्ष होय, किंचितही दुःख न (होय) (हें) कसें?—असा अन्वय. ९. अवतार रण करणारा. १०. ब्रह्मदेव, शंकर या देवांचा. ११. वेदाच्या अर्थाला. १२. यासी कृपा ोनियां तुम्हां हि भवाब्धि तारुनि नेइल—असा अन्वय. १३. शरीर व मन यांनीं. ४. गणती. १५. वचन.

यापरि सांगुनि गुरुनीं मातृपित्यांची करोनियां [1]समजी ।
हर्षीं मग मातृपिता म्हणती, 'विधि इंद्रही न यासम जी!' ॥ ४५
जाती गुरु, मग अंबा भर्त्यासह ये गुरूचिया स्तुतिला ।
करित स्वगृहा येतां, दिसुं लागे सर्व [2]ओस [3]वास्तु तिला. ॥ ४६
होउनि गुप्त गुरू [4]मनवेगें काशीस पावला त्वरित ।
भक्तोद्धरणार्थ तपा साधुनि [5]अष्टांगयोग आचरित. ॥ ४७
विश्वेश्वर जो आत्मा अर्चिति गुरु मानसीं तयातें हो! ।
तें पाहुनि [6]तपि म्हणती, 'न शरीरस्वार्थ केंवि यातें हो?' ॥ ४८
म्हणती, 'आम्हां तपयांमाजी हा श्रेष्ठ कीं जसा [7]खग तो ।
श्रेष्ठ [8]ग्रहसमुदायीं, किंवा [9]पक्षीगणीं जसा [10]खग तो. ॥ ४९
स्नाना त्रिकाळ करुनी साधुनि अष्टांगयोग करि तप हा, ।
आम्हां वंद्यचि जरि हा धारण [11]आद्याश्रमासि करित पहा. ॥ ५०
[12]श्रेष्ठ तपी [13]वृद्धयती कृष्णसरस्वति समस्त तपियांतें ।
बोले तो, '[14]न म्हणुनियां सान, नमा तुम्हि समस्त तपि यातें. ॥ ५१
हरि हर विधि अवतारी, नव्हेचि सहसा कदापि मानव हा, ।
[15]श्रेष्ठाश्रम तुमचा तरि याचे पदिं सर्वेही [16]स्वमान वहा. ॥ ५२
आम्ही यति या नमितां, निंदिति ते समजुनी न लाभ जन, ।
विनवुनि श्रेष्ठाश्रम या देउनि, नमुनी करूं चला भजन. ॥ ५३
श्रेष्ठाश्रमासि देतां भक्ती जन सान थोर करिती ते, ।
निंदा मग भी जैसे सिंही येतांचि भीति [17]करि तीतें.' ॥ ५४
कृष्णसरस्वति यापरि बोलुनि घेउनि समस्त ये तपि ते ।
वेष्टिति गुरुतें [18]नवला पाहति [19]नभिंहुनि [20]सुधारसास पिते ॥ ५५
म्हणती तपि, 'बटु! घ्यावा त्वां [21]अंत्याश्रम परोपकारा जी ! ।

---

१ समजूत. २. उदास. ३. घर. ४. मनासारख्या वेगानें. ५. यमो नियमश्चासनं च प्राणायामस्ततः परम् । प्रत्याहारो धारणा च ध्यानं सार्धं समाधिना ॥ अष्टांगान्याहुरेतानि योगिनां योगसिद्धये ॥.' हीं यमनियमादि योगाचीं आठ अंगें. ६. योगी. ७. सूर्य. ८. नवग्रहांच्या समूहांत. ९. पक्ष्यांच्या समुदायांत. १०. गरुड. ११. ब्रह्मचर्याश्रमास. १२. सर्व तपस्व्यांत श्रेष्ठ. १३. वृद्ध संन्यासी जो कृष्णसरस्वती. १४. यातें सान (लहान) न म्हणुनियां तुम्ही समस्त तपि यातें नमा–असा अन्वय. १५. श्रेष्ठ असा संन्यासाश्रम. १६. स्वमान (आपला मान) याचे पदीं वहा (अर्पण करा). याचे पायीं नम्र व्हा–असा भाव. १७. हत्ती. १८. आश्चर्य. १९. आकाशांतून. २०. अमृतरसास पिणारे, देव. २१. संन्यासाश्रम.

सेवा घे आम्हांकरिं, हो तूं त्रि[1]जगास व्यापका! राजी[2]. ॥ ५६
निंदिति जन कलियुगिं या संन्यासा आणि अग्निहोत्रातें[3]। 
दोनीही श्रेष्ठ परी न, होय कोणीहि यास हो! त्रातें. ॥ ५७
पूर्वीं निंदिति तेंव्हां शंकर[4] आचार्यरूप अवतरुनी। 
स्थापुनि चातुर्थाश्रम, देति[5] जया, जाति तेचि भव तरुनि. ॥ ५८
तैंपासुनि आजवरी चालत आला चतुर्थ आश्रम हा। 
प्रबल बहु कलि होतां करिती निंदा पुन्हा; हरा श्रम[6] हा.' ॥ ५९
'स्थापा आश्रम' ऐशा ऐकुनि विनतीस तांपसाचा[7] तो। 
घेउनि चातुर्थाश्रम प्रकट करि गुरु प्रताप साचा तो. ॥ ६०
कृष्णसरस्वति यति गुरु करोनि घे आश्रमासि अंतींच्या। 
हर्षें तपि डुलति, अही[8] कुसुमसुवासें जसें वसंतीच्या[9]. ॥ ६१
सिद्धमुनीचे मुखिंचीं वचनें ऐकोनि शिष्य यापरि हो!। 
बोले, 'गुरु! बोलसि हें ऐकुनि घे चित्त संशया परि हो. ॥ ६२
त्रैमूर्ती अवतरला म्हणसी श्रीगुरु जगद्गुरू हा कीं;। 
तो गुरु करि? हें सांगुनि '[10]संशयमनवृत्तिचें गुरू हांकीं'. ॥ ६३
सिद्ध म्हणे, 'शिष्या! गुरु वसिष्ठ केला सुमित्ररामांनीं[11], । 
श्रीकृष्णें संदीपन करोनि, त्याचेच उत्तरां[12] मानी. ॥ ६४
धरितां मौनववेषा[13] लागे त्यापरि तयास वागावें, । 
यांचक होतां लागे कर्णउदारत्व वासवा[14] गावें.' ॥ ६५
यास्तव कृष्णसरस्वति केला गुरु गुरुंनिं मान देऊनी। 
हर्षुनि समस्त तपि मग अर्चिति गुरुच्या पदांसि सेवूनी. ॥ ६६
शिष्य म्हणे, 'श्रीगुरुंनीं कृष्णसरस्वतियतीस गुरु केला। 
तो काय सर्व यतिंहुनि श्रेष्ठ असे, सांग, फेडिं शंकेला. ॥ ६७

---

१. स्वर्ग, मृत्यु, पाताळ यांस व्यापून राहणाऱ्या. २. कबूल हो. ३. अग्नये होत्रमस्मिन् [कर्]मणि तत् अग्निहोत्रम्. ज्यांत अग्नीला हवि दिलें जातें तें कर्म, त्यास. ४. शंकराचार्य. [५]. शंकर, 'तो (चातुर्थाश्रम)' जया (ज्यांना) देती. चातुर्थाश्रम हा प्रयोग अशुद्ध पण [रू]ढींतला आहे. ६. निंदेपासून होणारें दुःख. ७. तापसाच्या; तपस्व्याच्या. ८. सर्प. ९. वसं[त]ऋतूंतल्या फुलांच्या सुवासानें. १०. संशयरूप मनोवृत्ति हेंच गुरु (जनावर) हांकी. [११]. सौमित्र लक्ष्मण, व श्रीराम यांनीं. १२. वचनांला. १३. मनुष्यदेहास. १४. वासवा [(]इंद्राला) याचक होतां कर्णउदारत्व (कर्णाचा उदारपणा,) गावें लागे—असा अन्वय. इंद्र [क]र्णाकडे कुंडलें मागण्यास गेला होता—ती कथा येथें अनुसंधेय आहे.

त्याचा कोण गुरू ? गुरुपरंपरेच्याच सांग तूं चरिता, ।
जाइल मत्संशय तूं गुरुपिढिनामावळीस उच्चरितां.' ॥ ६८

प्रश्नोत्तर[1] शिष्याचें ऐकुनि, गुरु सिद्ध, मस्तकीं कर तो ।
ठेउनि, म्हणे, 'गुरुपिढी[2] ऐकाऽदीगुरु[3] भवानिशंकर[4] तो. ॥ ६९

विष्णू शिष्य तयाचा, त्याचा चतुरास्य[5], जो वसिष्ठ तया, ।
शिष्य तयास पराशर. शिष्य[6]! अशा गुरुपिढीस ऐक तया. ॥ ७०

---

१. प्रश्नरूपी भाषण.

२. **गुरुपरंपरा.—**

३. ऐक+आदीगुरु (पहिला गुरु). ४. भवानीयुक्त शंकर; हें शंकराचेंच एक नांव आहे.
५. ब्रह्मदेव, ६. नामधारका!

शिष्या पराशराचा व्यासमुनी, जो वदोनि भागवत ।
उपदेशी शुकतनया, स्त्रीधन ज्या [1]शंभुच्या विभागवत. ॥ ७१
त्या शुकमुनिचा शिष्या गौडपदाचार्य, शिष्य त्याचा तो ।
गोविंदाचार्य मुनी, शंकर आचार्य त्यास साचा तो. ॥ ७२
आचार्यापासुनियां जाला तो विश्वरूपवर्य मुनी, ।
बोधज्ञगिरी त्याचा, जाला तो शिष्य रे! पदा नमुनी. ॥ ७३
बोधज्ञापासुनि यति [2]सिंहाळगिरीय होय, त्या जाला ।
ईश्वरतीर्थ. तया तो म्हणती नरसिंहतीर्थ यति ज्याला. ॥ ७४
विद्यातीर्थ तयाचा, त्याचा शिवतीर्थ, भारतीतीर्थ, ।
त्याचा [3]विद्यारण्य श्रीपादमुनी [4]क्षितीपदीं [5]तीर्थ. ॥ ७५
विद्यातीर्थ दुजा त्या मळयानंदयति जो तया, त्याचा ।
जो सुरतीर्थसरस्वतिवृद्ध पुढें यादवेंद्रमुनि ज्याचा ॥. ७६
त्या यादवेंद्रमुनिचा कृष्णसरस्वति यतींद्र सुमुनि भला ।
वृद्ध बहुत, शास्त्रार्था जाणे, [6]वेदार्थिंही असे निभला. ॥ ७७
[7]बुधजन [8]विशिष्टयतिही नमिती त्यातें, म्हणोनि गुरु गुरुनीं ।
करुनि, [9]स्वभक्तभवभय पळविति पशु व्याघ्र जेंवि [10]गुरुगुरुनी. ॥ ७८
चातुर्थाश्रम यापरि घेउनि गुरु आश्रमासि स्थापिति त्या, ।
जाला हर्ष यतींला तसाचही स्वर्गिं जे [11]सुधा पिति त्यां. ॥ ७९
श्रीगुरु निर्गमार्थासीं सांगति मग कीर्ति हे [12]रिपा पसरे. ।
जन म्हणति, 'यास नमि जो, तो सुकृतचि बीज पेरि, पाप सरे.' ॥ ८०
म्हणती, 'हा नर नोहे, आहे साक्षात देव अवतारी.' ।
बोलुनि असें, गुरुपदां नमोनि 'आम्हांसि' म्हणति '[13]भवें तारीं ॥.' ८१

---

१. शंभुच्या (शंकराच्या) विभागाप्रमाणें (कालकूट विषाप्रमाणें). २. याचेंच दुसरें नांव 'सिद्धिगिरी' असें मूळ पोथींत आहे. ३. विद्यारण्य ही श्रीपादमुनीस पदवी होती. ४. भूमंडळांत. ५. वंद्य. ६. वेदार्थींहि निभला असे—वेदांचा अर्थ करण्यांत सुद्धां अडत नसे. वेदांचा अर्थ करतां येत नाहीं अथवा तो करूं नये अशी समजूत गुरुचरित्रकारांच्या वेळीं नव्हती असें स्पष्ट होतें. ७. पंडित. ७. श्रेष्ठ यती. ८. आपल्या भक्तांची संसारभीति. १०. गुरगुरून, गर्जना करून. ११. (जे) सुधा (अमृत) पिति (पितात) त्या (देवांना). १२. रीफ, तक्तपोशी करण्याची फळी. रिफा पसरणें म्हणजे दाट आच्छादन करणें. त्याप्रमाणें कीर्ति पसरणें. १३. संसार.

जाले शिष्य बहुत मग **गुरु** जाती त्यांसहीत [१]बदरिवनीं ।
घालुनि उजवा **मेरू**[२], तीर्थासी करित हिंडती [३]अवनीं. ॥ ८२
आले [४]**गं**गासागरिं, तेथुनि आले **गुरु प्र**यागा, तों ।
द्विज एक शरण आला त्यागुनियां [५]विषयदुष्टसंगा तो. ॥ ८३
ब्रह्मज्ञान तयासी उपदेशी **गुरु**, करोनि संन्याशी. ।
त्यासीं प्रीती बहु धरि जैसा [६]**नारायणो**पमन्यासी. ॥ ८४
**मा**धवसरस्वती या [७]प्रीती ठेविति तयासि नामाला ।
[८]**गु**रुउपदेशितमंत्रा जप करि तो धरुनियां मनां माला. ॥ ८५
ऐसे बहुतचि शिष्ये, त्यांच्या नामास एक दिवसांत ।
शक्य न सांगाया, परि त्यांतिल सांगेन मुख्य जे सात. ॥ ८६
**बा**ळसरस्वति पहिला; **कृ**ष्णसरस्वति, **उ**पेंद्र, **मा**धव जो ।
मोठा प्रियकर **गुरु**चा, श्रीकृष्णाचा जसाहि **उ**द्धव तो. ॥ ८७
एक **स**दानंदयती [९]**ज्ञा**नज्योती सरस्वती, सा रे ! ।
जालेचि, सातवा [१०]मी, सांगूं आतां [११]कशा यती [१२]सारे ? ॥ ८८
सर्वहि शिष्यांसह रे ! आले **गुरु** दक्षिणेस हिंडत रे ! ।
जो नर **गुरु**पदिं लागे, तो हा भवनिधि महाप्रचंड तरे. ॥ ८९
येउनि हिंडत ऐसे मातृपित्या भेट देति [१३]**का**रंजीं ।
म्हणती, 'मी यति जालों, म्हणउनि होऊं तुम्ही नका [१४]रंजी. ॥ ९०
अंत्याश्रम नर घेतां पावे संतोष हो ! उदंड; [१५]धरा ।
त्याची मातृपिता; मग' म्हणती 'आम्हीं न [१६]भेउं [१७]**दं**डधरा. ॥ ९१

---

१. बदरिकाश्रमीं. हा आश्रम हिमालयांत आहे. येथील महादेवाचें लिंग हें बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक आहे. मागें अ० ७ गी० ४ वरील श्री**शै**लावरील टीप पहा. २. मेरु उजवा घालुनी=मेरुपर्वतास प्रदक्षिणा करून. ३. पृथ्वीवर. ४. **गं**गेचा समुद्राशीं संगम होतो तेथील तीर्थ. ५. विषयांचा जो दुष्ट संग (स्वीकार) त्याला. हें 'त्यागुनियां' याचें कर्म. ६. **ना**रायण+**उ**पमन्यासी. **उ**पमन्यु हा ईश्वरभक्त होता. याला आकल्प आयुष्य आणि दुधाकरितां क्षीरसमुद्र मिळाला होता–अशी कथा महाभारत–अनुशासनपर्व–अध्याय १४ यांत आहे. ७. ही प्रत्ययाभाव तृतीया. ८. तो माला (माळ) धरुनियां गुरूउपदेशितमंत्रा मनां (मनांत) जप करि–असा सार्थान्वय. ९. सहा. १०. ही कथा सांगणारा सिद्धमुनी. ११. कशाला. १२. सर्व. १३. कारंज (करंजें नांवाच्या गांवीं). १४. रंजीस, कष्टी. याचा संबंध 'होऊं नका' याकडे १५. पृथ्वी. १६. भिणार नाहींत. १७. यमाला.

यति सुत होतां भें मग लागुं न दे **वा**सुदेवदत्ताचें[1]।
जेंवि रवेंच[2] सुरांचें **पा**र्थ न दे वासुं **दे**वदत्ताचे.' ॥ ९२

ऐसें श्री**गुरु** वदतां तातंबा[3] भगिनि भाउ नमनासी।
मग करुनि म्हणति, 'आणी आम्हां भविं[4] निभाउन मनासी.' ॥ ९३

श्री**गुरु** ऐकुनि म्हणती पूजितसां तुम्हि पदाब्ज सुं[5] **भं**[6]वाचें।
भें हृदिं यास्तव तुमचे किमपिहि **भ**व तो न दे वसुं भवाचें[7].' ॥ ९४

श्री**गुरु** आले ऐकुनि येउनि भेटीस सर्व जन, पद ते[8]।
वंदुनि **गुरु**चे जाले तें ऐका **मा**धवासि जें वदते. ॥ ९५

'**गु**रुकीर्तिसी तुळाया[9] घालीतां हाटका[10] नगा वजना,[11]।
न पुरे, अशा **गुरू**च्या भेटिस कां हाटका न गांवजनां[12]? ॥ ९६

बोलुनि यापरि करिती श्री**गुरु**चें, धरुनि भाव, पूजन ते.।
म्हणती[13], '**गुरु**! तुजवरुनी ओंवाळुन टाकुं हें वपू[14]' जन ते. ॥ ९७

आग्रह करोनि सर्वहि स्वगृहा भिक्षे **गुरू**सि बोलवुनी।
'यावें अगत्य' ऐसी नमोनि करिती विनंति हो! लवुनी[15]. ॥ ९८

'**गुरु**! तुज पायघड्यांसी पसरूं क्ष्मां[16] एक एक देहातें।
परि तूं भिक्षेलागीं येइन ऐसोच भाक[17] दे हातें.' ॥ ९९

येतों असा **गुरु** तिहीं भक्तिबळें गोंविला[18] सुभाकेला।

---

१. सुत (मुलगा) यति होतां मग (तो) वासुदेवदत्ताचें (वासुदेवाच्या संरक्षणाखालीं असणारांचें—देवाच्याहि प्रीतींतल्यांचें) भें (भय) लागुं न दे—असा भावार्थ दिसतो. २. जेंवि देवदत्ताचे रवेंच (देवदत्तनामक शंखाच्या नादानेंच) (देवांच्या शत्रूंना भिववून) सुरांचें (तोंड) वासुं न दे (घाबरूं दिलें नाहीं). या गीतीचा अर्थ यापेक्षां चांगला होईल तर बरें. ३. तात+अंबा=आईबाप. ४. आम्हां भविं (संसारांत) निभाउन (पार पाडून) मनासी आणी (आवडून) घे. ५. चांगल्या रीतीनें. ६. **शं**कराचें. ७. यास्तव तो **भव** (**शं**कर) तुमचे हृदिं भवाचें (संसाराचें) भें वसुं न दे—असा अन्वय. ८. ते (जन) गुरुचे पद वंदुनि माधवासि (श्रीगुरूच्या पित्यास) जें वदते झाले तें ऐका—असा अन्वय. ९. मापण्याकरितां. १०. सोन्याच्या पर्वतास, मेरूस. हें 'घालितां' याचें कर्म. ११. याचा कर्ता 'नग'. १२. 'कां न हाटका?= कां बोलावीत नाहीं? १३. याचा कर्ता 'ते जन'. १४. शरीर. १५. नम्र होऊन. १६. पृथ्वीवर. १७. भाक देणें—वचन देणें, कबूल होणें, इ०. १८. सुभाकेला गोंविला—(मी येईन) अशा वचनांत बांधिला; याचें कर्म 'गुरु'.

[1]पुंडलिकें श्री**विठ्ठल** कटिं कर ठेवुनि जसा उभा केला. ॥ १००
घेउनि भाक **गुरू**ची करिती मग सर्व ते घरा गमन ।
पावे [2]त्यांचें तोषा, घेतां [3]गुरुपदकमलपराग, मन. ॥ १०१
श्री**गुरु** असंख्य रूपें धरोनि मग ते घरोघरीं जाती ।
**गुरु**पूजनासि आणिति पुष्पें द्विज कमल मोगरे [4]जाती ॥ १०२
[5]नानोपचारिं **गुरु**चें पूजन केलें मग [6]वसुधामरिं तें ।
श्री**गुरु**वांचुनि एकहि न राहि त्या गांविं [7]विप्रधाम रितें ॥ १०३
विस्मय मानुनि ते जन म्हणती, '**गुरु** साच हो [8]रमाधव हा ।
अवतरला घरिं याचे; [9]दैवाचा विप्र थोर **मा**धव हा.' ॥ १०४
आलिंगीत **गुरु**पदा जननी पूजोनि जेंवि, तातेंही ।
आलिंगिलें पदा; मग होय **गुरु** [10]स्वस्वरूप दावित ही ॥ १०५
पाहुनि तें [11]रूपांऽबा आठवला पूर्विचा प्रताप तिला ।
मग सांगे, '[12]प्राग्जन्मीं मज हा गुरु होय रक्षिता' पतिला. ॥ १०६
[13]यांचे प्राग्जन्मीं मीं केली पूजा म्हणोनि पायांची ।
जाला जन्म सुफळ हा आम्हांवरि होउनी कृपा याची.' ॥ १०७
करिती मग साष्टांगीं नमना जोडोनि हस्त दोघें तीं ।
[14]पादसरोजामोदा, त्या सौख्या काय मी वदों? [15]घेती. ॥ १०८
म्हणती, 'हे **गुरु**राया! बसली भक्ती तुझ्या पदानमनीं ।
[16]आतां आम्हा व्हावी भवभय हे दुष्ट आपदा न मनीं.' ॥ १०९
**गुरु** म्हणती, 'यास्तव कीं चवथ्या मी आश्रमा असें धरिलें ।

---

१. पुंडलिक या नांवाचा महाभक्त प्रख्यात आहे. यानें मातृपित्यांची एकनिष्ठ सेवा केल्यावरून श्रीविठ्ठल याचे भेटीस गेले असतां हा सेवेंतच असल्यामुळें मला फुरसत होईपर्यंत ह्या विटेवर उभा रहा असें सांगून त्यानें मागें एक वीट फेंकली. त्यावर देवाला उभें रहावें लागलें—ही कथा येथें लक्ष्य आहे. २. याचा संबंध 'मन' याकडे. ३. गुरु+पद+कमल+पराग (रज). हें 'घेतां' याचें कर्म. ४. जाईचीं (फुलें). ५. नाना+उपचारिं= अनेक उपचारांनीं. ६. भूदेवांनीं, ब्राह्मणांनीं. वसुधा (पृथ्वी)+अमर (देव). ७. ब्राह्मणाचें घर. ८. लक्ष्मीपति. ९. दैवाचा थोर=भाग्यवंत. १०. आत्मरूप. ११. रूप+अंबा (अंबेनें, आईनें). १२. पूर्वजन्मीं. १३. याचा संबंध 'पायांची' याकडे. १४. चरणकमलाच्या सुवासाला. हें 'घेती' याचें कर्म. १५. याचा कर्ता 'तीं दोघें'. १६. आतां आम्हां भवभय हे दुष्ट आपदा (विपत्ति) मनीं न व्हावी—असा अन्वय.

घेतां सुत अंत्याश्रम, न[1] देखिलें आइबा न उद्धरिले. ॥ ११०
भवभय तुम्हांसि नाहीं सत्य बरें ब्रह्मलोकवास करा ।
सिंहाश्रय करितां मग धडका मारील काय जो बकरा? ॥ १११
नातू पणतू पाहुनि भोगुनि ऐश्वर्य काशिला अंतीं ।
पावाल, मुक्ति तेथें तुम्हास होइल, करूं नका [2]खंती.' ॥ ११२
त्यांची कन्या रत्ना विनवी गुरुसी नमोनियां मग ती ।
'श्रीगुरु! [3]व्हाया मी जाइन टाकुनियां तपासि धाम गति.' ॥ ११३
श्रीगुरु म्हणती तिजला, 'पतिची सेवाच हें स्त्रियांला गे! ।
तप [4]बोधिलें असे; तप आणिक न दुजें करावया लागे. ॥ ११४
होइल तुजला मुक्ती, पतिच्या करिं भक्तिनें सुसेवेला.' ।
रत्नि म्हणे, 'वद माझी कैसी [5]प्रालब्धलीप' ते [6]वेळीं. ॥ ११५
श्रीगुरु म्हणती, 'रत्ने! होइल तुज दुःख ऐकतां बहुत ।
मग त्या दुःखाग्नीनें समूळ होईल [7]हर्षकोंब [8]हुत.' ॥ ११६
रत्नि म्हणे, 'हुत होतां [9]पल्लव तुझिया कृपामृतें फुटती ।
उठती सुहर्षकोंबहि, न काळशस्त्रें हि ते कदां तुटती.' ॥ ११७
गुरु मग म्हणती, 'रत्ने! ऐकें प्रालब्धिचें तुझ्या सकळ ।
प्राग्जन्मीं [10]विघंडोनी, त्वां [11]स्त्रीपुरुषासि लाविलीस [12]कळ. ॥ ११८
पांचा [13]मार्जारांसी मारिसिही, आणि [14]भूमिसुरभीसी ।
हाणिसि लाता, आणिहि [15]पीडाया तूं न भूमिसुर भीसी. ॥ ११९
यास्तव होसिल [16]कुष्ठी सर्वांगीं श्वेत[16] तूं जसा [17]दर हो! ।
पाडिसि [18]विघंड म्हणोनी त्यागिल तुज [19]कांत, ऐक सादर हो'. ॥ १२०
यापरि ऐकुनि वचनें रत्ना शोकांनळीं[20] पडे मग ती ।
नमुनि पदा विनवी, 'मज सद्गति दे जसि [21]नगासि हेमगती.' ॥ १२१
'चिंता न करिं' गुरु म्हणे वृद्धपणीं तुज तुझा त्यजील पती ।

---

१. (त्यानें) आइबा न उद्धरिले (असें) न देखिलें—असा अन्वय. २. काळजी. ३. गति (उत्तमगति) व्हाया मी धाम (घर) टाकुनियां तपासि जाइन—असा अन्वय. ४. सांगितलें. ५. प्रारब्धाची लिपी. ६. ते वेळेस. ७. आनंदाचा अंकुर. ८. हुत होईल=भस्म होईल. ९. पानें. १०. बिघाड करून. ११. नवराबायकोमध्यें. १२. भांडण. १३. मांजरांस. १४. या लोकाच्या कामधेनूस, गाईस. १५. तूं भूमिसुर (ब्राह्मण) पीडाया न भीसि—असा अन्वय. १६. श्वेतकुष्ठी=पांढरें कोड उठलेली. १७. शंख. १८. बिघाड. १९. नवरा. २०. दुःखरूप अग्नींत. २१. मेरूपर्वतास.

नंतर होसिल कुष्टी, परि [1]सज्जनसन्मुखीं न हो! लंपती. ॥ १२२
[2]त्वदघानिवारणासी सांगिन तुज तीर्थ नाम **अ**घहरण ।
करितां तेथें स्नाना अघ जाइ, पुन्हा नसे जनन मरण. ॥ १२३
जाई त्या तीर्था तूं, तुझिया भरतांचि कुष्ट देहातें ।
जाइल अघ न [3]भिं' ऐसें श्री**गुरु** अभयप्रदान दे हातें. ॥ १२४
सांगुनि भगिनिसि ऐसें जाती **गुरु** तीर्थ[4]राज **गौ**तमितें ।
शिष्या! तीर्थ दुजें रे! तैसें नच पाहिलें [5]सुगौत मि तें. ॥ १२५
**रा**मात्मज सूनु म्हणे **गो**दामहिमाहि होय ती, **सिद्ध** ।
बोले जी; तच्छ्रवणें मनइच्छा पूर्ण होय ती सिद्ध. ॥ १२६

---

## अध्याय [6]अकरावा.

जोडुनि करद्वयातें लागुनि तो शिष्य **सि**द्धचरणांतें ।
श्रवणीं सादर बैसे युद्धा भेंट जेंवि सिद्ध च रणांतें. ॥ १
विनवि **गुरु**सि 'सांग' म्हणे, 'काय बहुत **गौ**तमीस महिमा जी ।
जाती श्री**गुरु**, याहुनि काय नसे तीर्थ थोर [11]महिमाजी?' ॥ २
**सिद्ध** म्हणे, '**गो**देची कीर्ती मी काय गा! वदावी ते? ।
शिष्या! एकस्नानें मनुजासी [12]मोक्षगांव [13]दावीते. ॥ ३
या [14]ब्रह्मांडाहि बहिर् आहे शिष्या! उभा उगम तीचा ।
त्या सुकथेसि पुसाया माझा तूं होसि [15]भाउ गंमतीचा. ॥ ४
[16]ब्रह्मकटाहा फोडुनि येतां **शं**भू शिरीं धरी तिजला ।
आकर्षि जटामुकुटीं, जैसें [17]शुंडे गिरी धरीति जला. ॥ ५

---

१. सज्जनसंग टाळूं नको. २. तुझ्या पातकाच्या निवारणास. ३. भिऊं नको. ४. सर्व तीर्थांत श्रेष्ठ अशा **गौ**तमीला—गोदावरीला. ५. पृथ्वींत. ६. या अध्यायांत मूळ पोथीच्या तेरा (ओवी ५९ पासून पुढील), चौदा आणि पंधरा या अध्यायांतील कथा आहे. ७. योद्धा. ८. तत्पर. ९. युद्धाला. १०. गोदेस (त्र्यंबकेश्वरीं.) **गौ**तमी=गोदावरी नदी. दीर्घतमाऋषीचा पुत्र **गौ**तम त्याजवरून हें नांव पडलें असावें. (भारतवर्षीय प्राचीन कोश.) ११. पृथ्वीमध्यें. १२. मोक्षस्थान. १३. दाखविते. १४. ब्रह्मांडा बहिः=मृत्युलोकाबाहेर. अर्थात् स्वर्गांत. १५. भावाप्रमाणें आनंददायक. १६. कटाह=कढई. ब्रह्मकटाह=कढईसारखें अंतर्गोल असें ब्रह्मांडशकल. १७. सोंडेनें. मेघ आपल्या सोंडेनें समुद्राचें पाणी प्रथम शोषून घेऊन नंतर तें पृथ्वीवर सोडतात असा समज आहे.

ऐसी जटेंत होती गंगा गुंतोनि शुद्ध नुजगा (?) ती ।
[1]कर्ती ऐसी कीर्ती सदैव [2]निर्जर, मुनी, मनुज गाती. ॥ ६
मुनिवर समस्त मिळुनी गंगा आणावयास [3]गौतूतें ।
योजिति युक्ति बहु बरी चरित्र सांगेन ऐक गा! तूतें. ॥ ७
मुनिवर म्हणती, 'तपिया आहे सर्वांत थोर गौतम हा ।
घालूं संकट यातें गंगा आणील सत्य [4]गौर्ते महा. ॥ ८
आम्हां सुकृत घडेल स्नानें गंगा जरी [5]क्ष्मा येती'. ।
बोलुनि ऐसें गौतममुनिपासीं होउनी जमा येती. ॥ ९
[6]गो दर्भाची करुनी सवत्स ते गौतमाचि या [7]क्षिषितें ।
धाडिति चारायासी, [8]नकळत गौतममुनीस, ते [9]ऋषि तें ॥ १०
श्रेष्ठ ऋषी तो गौतम वाल्मीकासमचि होय हि [10]तंपि [11]कवी ।
तपसामर्थ्यें करुनी पेरुनियां [12]व्रीहि नित्य [13]ऋत पिकवी. ॥ ११
स्थान अनुष्ठानाचें, व्रीही त्याजवळि नित्य पेरीत ।
पिकवुनि दोप्रहरांतीं पूजी अतिथी असी असे रीत. ॥ १२
त्या व्रीहीमध्यें तो गौतम पाहोनि धेनु ते चरतां ।
हांकी टाकुनि दर्भा तिजला तो [14]ब्रह्मकर्म आचरतां. ॥ १३
दर्भस्पर्शें धेनू ते क्षणिं तेथेंचि मृत्यु पावे ती ।
संकटिं पाडायासी मुनिला मुनिलागिं संधि [15]गावे ती ॥ १४
म्हणती मग सर्व मुनी, 'हत्या तुज गौतमा! हि गाईची ।
घडली, यास्तव गंगा आणी [16]भूं, करि [17]निवृत्ति गा! [18]ईची ॥ १५
होशि न शुद्ध बरें तूं भूवरि जरि आणिसी न गंगेला'. ।
गौतम यापरि मुनिंचीं वाक्यें ऐकुनि तपास मग गेला. ॥ १६
दुर्घट तप आचरुनी बहु दिन करुनी प्रसन्न शंभूतें ।
प्रार्थुनि [19]आणी गंगा सकळांसी द्यावयासि [20]शं, [19]भूतें. ॥ १७
गौतम आणी गंगा, पावे म्हणवोनि नाम गौतमि ती ।

---

१. करणारी. २. देव. ३. पृथ्वीवर. ४. तपस्वी. ५. पृथ्वींत, पृथ्वीवर. ६. गाय. ७. शेतांत. ८. तें (ती गोष्ट) गौतममुनीस नकळत (कळलें नाहीं). ९. हा 'धाडित' याचा कर्ता. १०. तपश्चर्या करणारा. ११. पंडित. १२. तांदूळ. १३. सत्य. १४. ब्राह्मणाचीं स्नानसंध्यादि धर्मकर्में. १५. सांपडली. १६. भू (पृथ्वीला). १७. निवारण. १८. हत्येची. १९. पृथ्वीवर आणी. २०. कल्याण.

[1]मार्जन तिचें करी जो त्याच्या पुण्यास नाहिं [2]गौत [3]मिती. ॥ १८
जिचिया [4]नीरावरुनी येउनि झगटोनि [5]वात पाण्याला ।
लागे, तो [6]अघ नाशी, पावे शिवलोक जो [7]क्षपा प्याला. ॥ १९
गौतमिचे स्नानासी करिति तयां जरिहि पापि अवलोकी ।
जाउनि अघ सर्वेहि तो वास करी [8]कल्पकोटि शिवलोकीं. ॥ २०
ऐसा महिमा परि कलियुगांत अज्ञान होउनी नर कीं ।
करिति अधर्म न जाती स्नाना कोणीहि [9]पचति मग नरकीं. ॥ २१
त्यांतें तरावया गुरु महिमा हा करुनि दाविती प्रकट ।
जाती आपण गुरु तत्संगति जाती [10]करोनि विप्र कटं ॥ २२
गौतमियात्रा ऐसी शिष्यासह ये करीत हो! गुरु तो. ।
जे नर लागति पायीं, त्यांचा दे पाय [11]कर्दमीं न रुतों. ॥ २३
[12]मंजरिगावीं आले तेथें [13]माधवअरण्य एक मुनी ।
होता तो श्रीगुरुसी पाहोनि स्तुति करी पदां नमुनी. ॥ २४
तो मानसिं नरहरिची मूर्ती पूजीत नित्य हृत्कमळीं ।
श्रीगुरु मूर्ती त्याला, मनिं मूर्ति पूजि नित्य [14]ते, गमली. ॥ २५
ठेउनि मस्तक गुरुच्या पायीं मग भाव भक्तिनें स्तवित ।
करि मानसपूजन तो स्तोत्र सुरस पूर्ण तेधवां [15]कवित. ॥ २६
आश्वासुनि गुरु बोलति, 'सहसा चिंता कधींहि तूं न करीं'. ।
प्रीतीनें त्याला मग [16]स्वसन्निधीं बसविती धरून करीं. ॥ २७
बोलति, 'नरसिंहाचें मानस पूजनसदैव तूं करिसी ।
म्हणुनि प्रत्यक्ष तुझ्या आलों भेटीस [17]भी नं [18]भवकरिसी. ॥ २८
इच्छित होईल तुझें पावसि तूं पूर्ण सत्य सद्गतितें ।
यापरि सांगुनि येती [19]वोझरगावीं तया [20]मनोगति ते. ॥ २९

---

१. स्नानादिक. २. पृथ्वीवर. ३. गणती. ४. पाण्यावरून. ५. वारा. ६. पाप. ७. पाण्याला. क्षप=पाणी. ८. अनंतकाळपर्यंत. ९. पुष्कळ वेळ कुजत राहतात. १०. कट करोनि=एकत्र जमून. ११. पापरूप चिखलांत. १२. मंजर गांव हें कोठें आहे? मूळ पोथींत 'मंजरिका' (अ० १३ ओ० ८०) असें आहे. १३. माधवारण्य. १४. ती. १५. कवित्व, पद्य. हें 'करि' या क्रियापदाचें कर्म. १६. आपल्या जवळ. १७. भिऊं नको. १८ संसाररूप हत्तीस. १९. नाशिकापासून सहा कोसांवर तांबटाचें ओझर ह्मणून जें गांव आहे तेंच हें गांव कीं काय? मूळांत (अ० १३ ओ० ९२) 'आले वासर ब्रह्मेश्वरासी ।गंगातीर महाक्षेत्र ॥' असें आहे. २०. मनास येईल तिकडे जाणारे.

तद्ग्रामीं[1] स्नानासी घेउनियां[2] शिष्य सप्त संगें ते ।
जाती, तों एक द्विज धाया[3] स्वप्राण येत गंगेतें. ॥ ३०
त्यातें पाहुनि गुरुजी म्हणती शिष्यांसि विप्र तो हटका[4] ।
विटे कां आला त्याला? धाया जो जीव करित[5] तो हट कां? ॥ ३१
गुर्वाज्ञेनें ते क्षणिं आणिति तो विप्र शिष्य गुरुजवळी ।
पाहोनि श्रीगुरुचें स्वरूप तो विप्र गुरुपदा कवळी. ॥ ३२
गुरु म्हणती विप्रासी, 'देसी प्राणा किमर्थ[9] सांग मसी[10]. ।
बहुदोष[11] आत्महत्या, केवळ तूं बुद्धिहीनसा[12] गमसी.' ॥ ३३
विप्र म्हणे, 'मज्जठरीं[13] व्यथा[14] बहू पीडिते यतीराया ! ।
म्हणउनि मी गंगेतें त्यागाया येत काय[15] तीरा या ॥ ३४
पीडी बहु मज उदरीं व्याधी करितांचि अन्न भक्षण हो ! ।
अन्नाविण मुनिराया! कैसा होईल जीव रक्षण हो ! ॥ ३५
फल, कंद, मूल खातों, झालें अन्नासि पूर्ण वैर मला ।
केलें न अन्नदाना म्हणोनि उदरांत शूल[16] हा रमला. ॥ ३६
सोसे न अन्न मजला, भोजन करि मास पंधरा दिवशीं ।
भोजन करितांचिक्षणिं उठती पोटीं तिडीक[17] हे विवशी[18]. ॥ ३७
यां[19] कलियुगीं अन्नगत प्राण असे सर्व मानवांचा, या ।
अन्नचि वैरी मज, मग राहिल कोठोनि शक्ति वांचाया ? ॥ ३८
एका मासीं भोजन केलें कालचि सणा महानवमी[20] ।
त्याणें पोट दुखे बहु आतां कैसा जगेन मानव मी? ॥ ३९
ऐका यति ! सोसेना दुःख' म्हणुनि तो पदा करी नमन. ।
'आतां वांचावें हा निश्चय माझें करी कदा न मन.' ॥ ४०
श्रीगुरु म्हणती, 'विप्रा ! आहे मजपाशिं सत्य औषधि रे ! ।

---

१. त्या गावीं. २. ते सप्त (सात) शिष्य संगें (बरोबर) घेउनियां जाती. ३. बोलावा. ४. कंटाळा. ५. करितो. 'करितो' बद्दल 'करीत', 'कळलें नाहीं' बद्दल 'नकळत' (गी० १०) 'येतों' बद्दल 'येत' (गी० ३४) हे या कवीचे प्रयोग लक्षांत घेण्यासारखे आहेत. ६. आग्रह. ७. गुरूच्या आज्ञेनें. ८. मिठी घाली. ९. कशासाठीं. १०. मला. ११. पुष्कळ आहेत दोष जिच्यामध्यें अशी. १२. सा=असा, प्रमाणें. १३. माझ्या पोटांत. १४. दुःख. १५. देह. १६. पोटशूळ. १७. वेदना. १८. राक्षसी. १९. या कलियुगीं सर्व मानवांचा प्राण अन्नगत असे या मज अन्नचि वैरी, मग वांचाया शक्ति कोठोनि राहिल—असा अन्वय. २०. आश्विन शुद्ध नवमीस.

देइन एक पळानें, घेईं, न धरीं मनांत त्वेष धिरें[1]. ॥ ४१

सोडोनि मित्रउदयीं[2] जाई तम जेंवि जाण नभयासी[3] ।
तैसी जाइल वेथा औषध घेतांचि, धरि तुं न भयासी.' ॥ ४२

करुणाकर जो श्रीगुरु पाळक तो जाण सर्व विश्वास ।
तत्पायीं शिर ठेवी द्विज, तद्वचनीं धरोनि विश्वास. ॥ ४३

तों स्नाना एक द्विज आला त्या ग्रामिंचाचि अधिकारी ।
पाहुनि गुरुलागीं तो साष्टांगीं मग पदा नमस्कारी. ॥ ४४

स्तुति करुनी नमन करी, पुनः पुन्हा धरुनि भाव पायातें ।
बोले, 'करुं[4] पदरक्षा स्वतनूची काढुनी वपा यातें. ॥ ४५

आज सुकृत मजला हो! शैतावधी[5] जन्मिचें हि तें फळलें ।
जालें मज तव दर्शन गुरुजी! दुष्कृत[6] समूळ तें जळलें.' ॥ ४६

गुरु मग पुसे तयासी, 'नाम तुझें वास[7] कोणत्या गावीं? ।
सांग मला, तव संगति[8] घडेल वाटे तुं ही न त्यागावी.' ॥ ४७

विप्र म्हणे, 'गुरुवर्या! सायंदेवाख्य शुद्ध नांवास ।
ठेविति मज मातृपिता उत्तरकंचीस[9] मी करीं वास ॥ ४८

तुझिया कृपें करुनियां असों हि पुत्रादि सर्व सुक्षेम[10] ।
त्वत्पदनमनें वाटे मज गोष्पदवत्[11] भवाब्धिसुक्षेम[12]. ॥ ४९

उदराचे[13] पूर्तिस्तव वर्षभरी करित यवनसेवा ही ।
दुष्ट प्रभु अबरूसी[14] घेइल, चिंतेसि मानसें वाहीं. ॥ ५०

जाली त्वत्पदभेटी आतां तो दुष्ट यवन काय करी? ।

---

१. धिरें (धीर धरून) मनांत त्वेष (दुःखावेग) न धरीं—असा सार्थान्वय. २. सूर्योदयीं. ३. आकाशांत. ४. स्वतनूची वपा काढुनी यातें पदरक्षा करुं. आंतड्याच्या त्वचेचे या पायास जोडे करूं असें बोलला. ५. शेंकडो जन्मांचें. ६. पाप. ७. वसति, राहणें. ८. संगति. ९. दक्षिणेस कावेरीच्या कांठीं कांजीवेरम् (पूर्वीचें नांव कांचीपुर) म्हणून गांव आहे. त्याचे दोन भाग नदीच्या दोन तीरांवर आहेत. उत्तरतीरावरील भागास उत्तरकांची अथवा शिवकांची हें नांव असून दक्षिणेकडील भागास दक्षिणकांची अथवा विष्णुकांची असें म्हणतात. १०. कुशल. ११. गोष्पदवत्=गोष्पदाप्रमाणें. गोष्पद म्हणजे गाईच्या पावलानें पडणाऱ्या खळग्यांत सांठलेलें पाणी. १२. भव+अब्धि+सुक्षेम. मूळ पोथींत 'सुक्षेम जल'=संसारसमुद्राचें जल—असा अर्थ दिला आहे. त्याला आधार काय? १३. पोट भरण्याकरितां. १४. अब्रूला.

सिंहाश्रयें अजाला महान् जरी तो भिये न काय करी ? ॥ ५१
कल्पतरू शशि **गं**गा नाशिति दारिद्र ताप पापातें ।
त्रय तीं नाशुनि, नाशा पावे भव तव **गुरो**! कृपापातें ॥ ५२
**गुरु**! तव अतर्क्य महिमा तो वर्णन जाहला न वेदांस ।
मग मज वदवेल कसा ? होउन येईन तव सर्वे दास.' ॥ ५३
**गुरु** म्हणती, 'आइक रे! मद्वचना; या द्विजा स्वधामातें ।
नेउनि भोजन देई याचे उदरीं बहु क्षुधा माते.' ॥ ५४
**गुरु**वचनश्रवणें तो बोले **गुरु**च्या नमोनि पायाला ।
'मरतोऽन्न भक्षितां हा, देइल तरि कोण अन्न पां याला ? ॥ ५५
हत्या घडेल याची देतां अन्नासि सत्य मातें हो! ।
भक्षण करितांन्नोदरिं वेथा बहु पीडि नित्य यातें हो! ॥ ५६
एकामासीं काल ब्राह्मण नवमीस हा पहा जेवी, ।
त्याणें उठोनि पोटीं तिडिक, दिसे विप्र कुणप हा जेंवी.' ॥ ५७
**गुरु** म्हणति, 'यास घाली अपूप वटकादि जेउ पायस रे! ।
ते क्षणिंच भोग याचा, करितां हे औषधी उपाय, सरे.' ॥ ५८
**सायंदेव** म्हणे, '**गुरु**! तुम्हीहि सहशिष्य भोजना या हो! ।
जाऊनि द्विजवेथा, मनिं हें आश्चर्य भो! जना यां हो. ॥ ५९
मान्य करुनि **गुरु** भिक्षे द्विज घेउनि सप्त शिष्य त्यां सहित, ।
येती श्री**गुरु**, तेणें **सा**यंदेवासि जोडलें स्वहित. ॥ ६०
आले **गुरु** भिक्षे, मग **सा**यंदेवासि हो प्रमोद मना ।
पाहुनि होई जैसा **गु**हकासि जटायुशत्रुच्या दमना. ॥ ६१

---

१. बोकडाला. २. मोठा. हें 'करी'चें विशेषण. ३. हत्ती. ४. कल्पवृक्ष. 'गंगा पापं शशी तापं दैन्यं कल्पतरुस्तथा' या श्लोकार्धाचा उपयोग कवीनें येथें केला आहे. ५. तीं तीन म्ह० दारिद्र्य, पाप आणि ताप. ६. संसार. हा 'पावे' याचा कर्ता. ७. कृपाकटाक्षानें. ८. तव दास होउन सर्वे येईन (असा अन्वय.) ९. आपल्या घरीं. १०. क्षुधा माते=भूक माजली आहे (फार भूक लागली आहे). ११. मरतो+अन्न. १२. करितां+अन्न+उदरिं. १३. व्यथा, पीडा. १४. वेदना. १५. प्रेत. १६. अनरसे. १७. वडे घारगे वगैरे. १८. खीर. १९. या लोकांना. २०. होवो. याचा कर्ता 'आश्चर्य.' २१. आनंद. २२. रामाला गंगानदी पार करून देणारा निषादपति. २३. जटायूचा शत्रू जो रावण त्याचें दमन करणाऱ्या रामाला.

उत्तम आसन घालुनि पाद्यादी[1] धूपदीपपावेतों[2] ।
शिष्यांसह **गुरु**पूजन करि, मग **गुरु** हर्ष फार पावे तो. ॥ ६२
स्तुति गायन करुनि म्हणे, '**गुरु**! तव शेषा न वर्णवे लीला.' ।
मांडी पात्रें मग तो स्वकरें काढी सुरंगवेलीला[3]. ॥ ६३
**सा**यंदेवाची स्त्री पतिव्रतापणिं[4] समर्थ, **जो**खाई ।
नाम तिचें, चपळत्वें वाढी जो जो पदार्थ जो खाई. ॥ ६४
करंबटि[5] कोशिंबिरि बहु करोनि चतुराइ शाकभाजीची ।
वाढित, तें पंक्तिवरी पडे शशिसरी[6] तनुप्रभा[7] जीची. ॥ ६५
षड्रस[8] पक्वान्नांची केलि तिणें बहुत फार चतुराई ।
त्यांची शिष्यांसह **गुरु** घेति रुची स्वस्थ चित्तिं मधुराई. ॥ ६६
भोजन जाल्यानंतर देउनि तांबूल आरती करि तो ।
मंत्रें सुपुष्पवृष्टी श्री**गुरु**वरि करित आपुले करिं तो. ॥ ६७
साष्टांगीं[9] दंडवता घालुनि **गुरु**चें स्वरूप पाहात ।
तिष्ठे, मग आश्वासी[10] **गुरु** तो शिरिं ठेउनी कृपाहात. ॥ ६८
**गुरु** म्हणति, 'माझि भक्ती तुझिया वंशीं परंपरा[11] होती ।
चालेल; यवनसेवा आतां न करींच दुष्ट[12], राहो ती. ॥ ६९
अक्षय[13] तुझे घरीं श्री[14] वंशोवंशीं असेल संतते[15] ती ।
भवभय तुज नाहिं, तुझी वाढे बहु कीर्तिवंत संतती[16]. ॥ ७०
भोजन करिं तूं आतां, तुला बहुत होय जाइजे उशिर ।
ठेउनि मग **गुरु**पायीं स्त्रीसह तो विप्र, जाइ जेउं[17] शिर[18], ॥ ७१

---

१. पाय धुण्याकरितां दिलेलें पाणी वगैरे. २. धूपदीपापर्यंत (सर्व उपचार). ३. चांगल्या रांगोळीला. ४. पातिव्रत्यामध्यें. 'पतिं या नाभिचरति मनोवाग्देहसंयता । सा भर्तृलोकानाप्नोति सद्भिः साध्वीति चोच्यते ॥' म० स्मृ० ९–२९. अर्थ–जी स्त्री मन, वाणी व देह यांनीं नियमित असून पतीचा त्याग करीत नाहीं, तिला मरणानंतर भर्तृलोक प्राप्त होतो. व तिला शिष्टलोक **साध्वी** असें म्हणतात. ५. करंबुटी=लहान हिरवा आंबा. ६. चंद्राप्रमाणें. ७. शरीराचें तेज. ८. मधुर, कडवट, आंबट, तिखट, खारट व तुरट असे सहा रस. त्यांनीं युक्त अशीं म्हणजे अत्यंत रुचकर पक्वान्नें. ९. मस्तक, हृदय, २ हात, २ गुडघे, २ पावलाचीं बोटें, हीं आठ अंगें. १०. अभयवचन देई. ११. परंपरेनें. पिढीन् पिढी. १२. हें 'यवनसेवे'-चें विशेषण. १३. नाश न पावणारी. १४. लक्ष्मी. १५. चिरकाल. १६. संतती, मुलेंबाळें. १७. जेवण्याकरितां. १८. हें 'ठेवुनि' याचें कर्म.

पोटशुळी विप्राची श्रीगुरुदर्शनिं समूळ वेथा कीं ।
गेली भोजन करितां, सांगे तुज सत्य हें, नव्हे थाकी.[1] ॥　　७२

श्रीगुरुकृपावलोकनिं विप्रव्याधी हि मूळसहित मरे ।
होतां उदय रवि जसा उडवि दिगंतास[2] रात्रिसहि तम[3] रे ! ॥　　७३

हेम[4] करी लोहाचें दवडुनियां काळिमा जसा परिस ।
गुरु तो कृपावलोकनिं दवडी द्विजरोग तो तसा परिस.[5] ॥　　७४

होतां कृपा गुरुचि ते निरसे[6] भवरोग तो; कथा काय ।
त्या द्विजरोगाची मग? जाला ते क्षणिंच निर्व्यथा काय.[7] ॥　　७५

सायंदेव म्हणे मग, 'आतां[8] मी त्वद्यति प्रभू! पद रे! ।
सोडिं न, संगतिनें[9] न्हें, वाहिं बहुत धाक यवनभूपदरें.[10] ॥　　७६

प्रतिवर्षी विप्राचा करित असे म्लेंच्छराव हा वध[11] रे ! ।
मज बोलावी, मद्वध[12] करणें त्याच्या मनीं हि हाव[13] धरे.[14]' ॥　　७७

सायंदेवासी गुरु म्हणती, 'न भियेंचि यवनभूपासी ।
दवंडिल सन्मानोनी,[15] चिंता तूं न करिं, जा प्रभूपासीं. ॥　　७८

येसी जों परतोनी तोंवरि येथोनि सत्य जाइ न मी.' ।
ऐसें वचन श्रवणें, गुरुपदिं ठेवोनि विप्र डोई[16] नमी. ॥　　७९

आश्वासितां गुरु असें भेटिस गेला प्रभू अविंदाचे[17] ।
क्रोधें यवन पहातां ध्यान करी गुरुपदारविंदाचें.[18] ॥　　८०

विप्रातें नयनाचें[19] वटारुनी पाहतां प्रभू पातें ।
ध्याउनि मनीं गुरूसी 'रक्षिं' म्हणे भिउनि विप्र भूपातें. ॥　　८१

गुरुसि म्हणे, 'मनिं यवनक्रोधानिळि[20] मी उडेन विप्र भुस[21] ।
करुणापर्वत घालुनि रक्षिं मला आणि शांतविं प्रभुस.' ॥　　८२

---

१. औपचारिक भाषा. २. दिक्+अंत=दिशेच्या शेवटाला. ३. अंधकार. ४. जसा परिस काळिमा दवडुनियां लोहाचें हेम (सोनें) करी. ५. ऐक. ६. नाहींसा होतो. ७. देह. ८. रे यति प्रभु! आतां मी त्वत् (तुझें) पद (पाय) न सोडिं (सोडणार नाहीं) असा सार्थान्वय. ९. बरोबर न्हें. १०. यवन राजाच्या भीतीनें. ११. हत्या. १२. मला ठार मारणें. १३. मोठी इच्छा. १४. धरिली जाते, उत्पन्न होते. याचा कर्ता 'हाव'. १५. आनंदानें परत पाठवील. १६. मस्तक. १७. विंध्=भोंक पाडणें, यावरून अविंध=ज्यांचे कान टोचीत नाहींत ते; यवन. १८. अरविंद=कमळ. १९. नयनाचें पातें=डोळ्याच्या पापण्या. हें 'वटारुनी' याचें कर्म. २०. मुसलमानाच्या क्रोधरूपी वायूनें. २१. (धान्याचें) भूस.

क्रोधभरें मग भूपति जाउनि तो शयनमंदिरीं निजला ।
होउनि सर्व तनूचा [1]दाहा, तद्देह सर्वही शिजला. ॥ ८३
जाली निस्तेज तनू [2]परार्धशिशिरांत जेंवि होय [3]वन ।
तो स्वप्नीं मग पाहे, [4]तांडण करि विप्र एक हो! यवन, ॥ ८४
जागृत होऊनि म्हणे, 'किमर्थ हे होय [5]अग्न कायेची? ।
औषधि उपाय इतके करिती तरि गूण हा न [6]कां येची?' ॥ ८५
तों त्याला स्मृति जाली अन्यायाविणच्चि बसवि मी विप्र, ।
कोणि म्हणे बैसविलें, मग तो त्याजवळि जाउनी [7]क्षिप्र ॥ ८६
'तूं आपल्याऽ[8]मलावरि जाई, तुजलागिं कोणि हाटकिलें?' ।
या परि गुरुभक्तांनीं शिष्या! मुनि [9]कौशिकादिकां [10]ठंकिलें. ॥ ८७
यवनें मान करुनि मग, देउनि वस्त्रें सुविप्र गौरविला, ।
अतिहर्ष मनीं तेणें होता जाला [11]सुविप्रगौरविला. ॥ ८८
होई[12] न कसा तयांतें? विप्राचीं दैवतें सुधेनुरवी, ।
[13]पुरविति मनिंचें भजतां, [14]त्यांचें मग पाप जें सुधें नुरवी· ॥ ८९
जाउनि मग तो ब्राह्मण भेटे गुरुला नमोनि पायांसी ।
जो गुरुभक्त असा तो कैसा पावेल रे! [15]अपायासी? ॥ ९०
अग्नीच्या [16]स्फुलिंगा सांग कसें भक्षवेल [17]वाळविला ।
[18]लघु वन्ही जरि मोठा तृण पुतळा भक्षि काय वाळविला?॥ ९१
सिंहाचे बाळासी न होय शक्ती गजासि [19]माराया, ।
तैसी त्या गुरुभक्ता माराया [20]शक्ति कैंचि मा राया? ॥ ९२
कितिसें म्लेच्छाचें भय, नाहीं भय ज्यास [21]काळमृत्याचें? ।

---

१. भडका. २. शिशिरऋतूच्या दुसऱ्या अर्धांत म्हणजे फाल्गुनांत. ३. अरण्य. या वेळीं झाडांचीं पानें गळून गेल्यामुळें अरण्याची शोभा नाहींशी होते. ४. मारित आहे. याचा कर्ता 'विप्र' व कर्म 'आपणाला' (अध्याहृत). ५. आग. ६. कां न येची=कां येत नाहीं. ७. लौकर. ८. अधिकारावर. ९. विश्वामित्रादिकांना. १०. फसविलें. ११. सुविप्र (चांगले ब्राह्मण)+गौ(गाय) रवि (सूर्य) यांना. १२. याचा कर्ता 'हर्ष' (अध्याहृत). १३. याचा कर्ता 'धेनु' आणि 'रवि' (अध्याहृत). १४. मग त्याचें जें पाप तें (धेनु अथवा रवी) सुधें (धड, शाबूत) नुरवी—असा अन्वय. सुधें नुरवी=(पापाचा) फडशा पाडी. १५. दुःखाला. १६. ठिणगीला. १७. वाळवी=उधई. १८. वाळविला (वाळविलेला) तृणपुतळा जरि मोठा (असला) (तरि) लघु वन्ही भक्षि काय?—असा अन्वय. १९. याचें कर्म 'सिंहाचे बाळासी'. २०. राया (राजाला) कैंचि शक्ति, (अर्थात्) मा (नाहीं). २१. यमाचें.

यापरि सामर्थ्य असे ऐकें श्रीगुरुपदाब्जभृत्याचें[1]. ॥ ९३
मग सायंदेवें त्या श्रीगुरुपदिं ठेउनी शिरा, नमुनी ।
बोले, 'हे गुरुराया! न दुजा क्षितिवरि तुझ्या समान मुनी. ॥ ९४
अघटित करिसी करणी होसी गुरु! तूं त्रिमूर्ति अवतारी ।
देउनि पदाब्जसेवा सेवक मजला करोनि अव[2] तारीं. ॥ ९५
येइन तव संगतिनें, त्वत्पदसेवा करोनि राहिन मी, ।
त्या यवनाचें आतां मुख ही परतोनि सत्य पाहिं न मी'. ॥ ९६
श्रीगुरु म्हणती, 'आम्ही हिंडों तीर्थें करीत हे गातू[3] ।
वर्षें[4] पंचदश पुढें देऊं तुज भेट ऐक हें गा! तूं. ॥ ९७
त्वद्ग्रामाचे सन्निध सदैव मग मी करीन रहिवास[5]; ।
उडवीन भक्तभवभय, उडवी जैसा दिवाकर[6] हिंवास[7]. ॥ ९८
येई मग तूं माझे भेटिस घेऊनि लेंक दारा[8] हीं ।
चिंता न करीं आतां तुला यवनभय नसे कदा, राहीं'. ॥ ९९
त्या सायंदेवाची समजी[9] श्रीगुरु करोनि यापरि तो. ।
गमन करी विप्रावरि लोभ मनीं बहु धरोनियां परि तो. ॥ १००
शिष्या! यापरि गुरु ते सायंदेवासि जाहले त्राते. ।
सुक्षेत्रवैजनाथीं[10] आले मग करित तीर्थयात्रा ते. ॥ १०१
त्या स्थानीं गुप्त वसे श्रीगुरु मग वैजनाथसन्निधिं तो.' ।
शिष्य म्हणे, 'गुप्त वसे किमर्थ जी! श्रीगुरू दयानिधि तो? ॥ १०२
होते अनेक शिष्ये तेजें भृगु[11]चंद्रभास्करासम जे ।
कोठें गुप्त करी? ते सांग असे जें मंदतरा समजे[12]. ॥ १०३
गुरुरवि लपवी कोठें कीर्तिप्रभा आणि शिष्यकिरणास? ।
येतां लपवील कसा शौर्यासी शूर सांग किं रणास[13]?' ॥ १०४
ऐशी शिष्यविनंती ऐकुनि आनंदलांऽतरीं[14] सिद्ध ।
ऐक म्हणे, 'सद्भावें होइल तव कामना पुरी[15] सिद्ध. ॥ १०५
म्हणसी किमर्थ गुरु तो गुप्त वसे आणि शिष्य जे होते ।

---

१. गुरुचरणींच्या सेवकाचें. २. रक्षण. ३. पृथ्वीवर. ४. पंधरा. ५. वसती. ६. सूर्य. ७. थंडीस. ८. स्त्री. ९. समजूत. १०. हें बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक असून परळी (वऱ्हाड)—ह्या गांवीं आहे. ११. भृगु=शुक्र. १२. माझ्या मनाला. १३. समरांगणावर. १४. आनंदला+अंतरीं (मनांत). १५. पूर्णपणें.

कोठें गुप्त करी ते, तारिं चरिता पूर्ण ऐकिजे हो! तें. ॥ १०६
मलिन जरी तें असलें लोह, तया हेम शुद्ध करि परिस ।
तैसें श्रीगुरुपादस्पर्शे उद्धरति खलहि ते [1]परिस. ॥ १०७
श्री गुरुदर्शनमात्रें होई [2]सत् तेक्षणीं तसाचि खल ।
गुरुच्या कृपाघनें तद्दोषाचा राहि तो कसा चिखल? ॥ १०८
महिमा असा प्रकटतां येती खल कामना मनीं धरुनी ।
त्यांचें मनिंचें पुरवुनि लागे न्यावें तयांसि उद्धरुनी. ॥ १०९
यास्तव गुप्त वसे गुरु, [3]जलदिं वसे गुप्त जेंवि ते [4]चपला ।
भूतीर्थें आचरणा शिष्यांसी दे निरोप तेच [5]पला. ॥ ११०
होतां निरोप शिष्यां भूतीर्थें जीं समस्त आचरणा, ।
विनविति ते गुरुलागीं समस्त शिष्ये धरोनियां चरणा. ॥ १११
म्हणती, 'हे गुरुराया! त्वत्पदिं तीर्थें समस्त [6]गातूचीं ।
वसती, हीं सांडुनि भू कशास हिंडावि सांग गा! तूंची.' ॥ ११२
श्रीगुरु म्हणती, 'तुम्ही संन्यासी, वास पांच दिन एका ।
ग्रामीं करूं नयेची; करितां दूषण तुम्हासिच नये कां? ॥ ११३
घेतां संन्यास मना करावया स्थिर समस्त तीर्थासी ।
हिंडावें, धर्मचि हा नातरि यति पावती अनर्थासी. ॥ ११४
प्राधान्य मद्वच तुम्हां, संग्रह [7]दुकळांत जेंवि बहुधान्य ।
तीर्थां[8]ऽचरुनी या मद्भेटिस संवत्सरासि [9]बहुधान्य. ॥ ११५
[10]श्रीशैलीं जाइन मी त्या संवत्सरिं तुम्हास ही खुण गा! ।
रक्षा मनांत सकळ हि [11]कुणगेली रक्षिती जसा [12]कुणगा. ॥ ११६
होतां निरोप, शिष्ये वंदुनि गुरुच्या पदास त्या, गमना ।
करितां म्हणती गुरुसी, 'करवेना त्वत्पदास त्याग [13]मना. ॥ ११७
सोसे वियोग न पदा परंतु तुझिही न मोडवे आज्ञा, ।
आतां हृदयीं [14]अस्मत् त्वत्पद [15]रक्षीं सदैव हे प्राज्ञा! ॥ ११८

---

१. एक. २. सत्=चांगला. ३. मेघांमध्यें. ४. वीज. ५. पळा, क्षणीं. ६. पृथ्वीचीं. ७. दुष्काळांत. ८. तीर्थीं+आचरुनी (करून). ९. हें एका संवत्सराचें नांव आहे. १०. हें बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक असून तेलंगणाच्या तोंडींच आहे. ११. कुणगा करणारे (?). १२. कुणगा=स्वतःच्या उपयोगाकरितां कुटुंबांतील एखाद्या मनुष्यानें गुप्त रीतीनें केलेला संग्रह. १३. मनाला. १४. आमच्या. १५. राखूं, ठेवूं.

कोठें कोठें तीर्थें, कोण कसीं, जीं कसें जि! आचरण? ।
सांगावीं आम्हासी.' शिष्य म्हणति ते धरोनियां चरण. ॥ ११९

श्रीगुरु म्हणती ऐका, 'देउनि चित्तास मान सादरता ।
श्रवणेंचि भवभयाची उडेचि न ठरेचि मानसा [1]दरता ॥. १२०

श्रीविश्वनाथ काशीक्षेत्रिं, तयाचें करा सुदर्शन; तें ।
[2]सर्वाघनाशि; [3]जैसें सर्वासुर नाशि हरिसुदर्शन तें. ॥ १२१

काशी करा, मग करा प्रयाग, तत्स्नान [4]तीर्थराजाचें ।
मार्जन करितांचि अघें पळती कांपतिच थरथरा [5]जाचें. ॥ १२२

जावें गयेसि मग हो! सद्भावें पूजिजे [6]हरिपदातें ।
त्या [7]सिद्धवटसुदर्शन मुक्त्यादिक इच्छिलें [8]अमुपदातें. ॥ १२३

[9]श्रीज्योतिलिंगबारा करणें, करणेंचि [10]संतमुक्तिपुरी, ।
जा क्षेत्रपंढरीतें श्रीविठ्ठलदर्शनेंच मुक्ति [11]पुरी. ॥ १२४

गोदा, कृष्णा, वेण्या, [12]ककुद्मती, सरयु, नर्मदा तीजी ।
भीमा,ऽमरजा स्नानें अमर करी [13]स्वर्गधाम [14]दाती जी. ॥ १२५

नाना तीर्थें क्षेत्रें सांगति गुरु सर्व ही क्षितीवरि तीं, ।
तीं जरि सांगावीं तरि वाढेल ग्रंथ [15]सागरारीती. ॥ १२६

श्रीगुरु सांगति, ऐकति शिष्ये देउनि समस्त कान मन, ।
निघती करोनि मग ते गुरुपादें ठेवोनि मस्तका नमन. ॥ १२७

गेले शिष्ये, मग गुरु गुप्त वसे आणि मीहि संनिध रे! ।
होतों करीत सेवा तेथें ही प्रकट कीर्ति होत [16]धरे. ॥ १२८

रामात्मजपुत्र म्हणे कीर्ती ऐसी समस्त त्या गुरुची ।
वर्णन करुं सद्भावें, वि[17]षयांची या समस्त त्यागु रुची. ॥ १२९

---

१. भीति. २. सर्व पापाचें क्षालन करणारें. ३. ज्या प्रमाणें श्रीविष्णूचें सुदर्शन नामक चक्र सर्व असुरांचें नाशक आहे त्याप्रमाणें. ४. तत् तीर्थराजाचें=त्या तीर्थाचें. ५. ज्याचें. ६.(गयेतील) विष्णुपदाला. ७. गयेजवळील वड. ८. पुष्कळ देणारें. हें 'सुदर्शन' याचें विशेषण. ९. ज्योतिर्लिंगें बारा आहेत. याबद्दल मागें दिलेली अ० ७ गी० ४ वरील टीप पहा. १०. सात पवित्र क्षेत्रें. (१ अयोध्या, २ मथुरा, ३ माया, ४ काशी, ५ कांची ६ अवंतिका, ७ द्वारावती.) ११. पूर्ण. १२. ककुद्मान् हें हिमालयाच्या एका शिखराचें नांव आहे. त्यापासून निघालेली नदी कीं काय? १३. वैकुंठपद. १४. देणारी. १५. समुद्राप्रमाणें. १६. पृथ्वीचे ठायीं. १७. या समस्त विषयाची रुची (गोडी) त्यागु.

## अध्याय[1] बारावा.

चरणीं मस्तक ठेउनि **सिद्ध**मुनीसी सुशिष्य तो विनवी ।
त्वन्मुखिंची चरितसुधा[2] होउन मी अमर नित्य[3] सेवि नवी. ॥ १
त्वत्पादस्पर्शगुणें आतां न पडे कृतांतपाश मला ।
चिंताग्नी मद्धृदिंचा[4], मजवरि होतांचि तव कृपा, शमला. ॥ २
होतो बहु हर्ष मला श्री**गुरु**चें चरित ऐकतां कानीं, ।
मन्मनकणिंची[5] उडवी चरितानिळ सर्व मूढताकानी. ॥ ३
यापरि शिष्यविनंती **सिद्ध**मुनी तो करोनि पैं श्रवण ।
'ऐक' म्हणे, शिष्यासी, 'श्री**गुरु** अवतार मित्र[6] वैश्रवण[7]. ॥ ४
ऐक तयाचे चरितामृतसिंधूंतील सार सादर[8] तूं, ।
सांडी[9], हो निर्जर, घे **गुरु**चरितामृतकथारसा, दर तूं. ॥ ५
**गुरु** वैजनाथ[10]क्षेत्रीं असतां ये शरण येक दीन मुनी ।
जोडुनि पदकर तिष्ठुनि विनवी **गुरु**लागिं तो पदा नमुनी. ॥ ६
'नाशीं' म्हणे 'भवाचें[11] मजवरि तूं करुनियां कृपा दर[11] जें ।
ज्ञानुपदेशुनि[12] मजला दवडी मत्पाप जें स्वपादरजें[13]. ॥ ७
ऐकुनि तवपदकीर्ती आलों मी त्यागुनी स्वदेशातें ।
ज्ञानप्राप्त्यर्थ मला आतां करणें गुरूपदेशातें.' ॥ ८
मुनिवचनें **गुरु** ऐकुनि म्हणती, 'तूं गुरुविणें कसा यति रे! ।
होसी, सांगाऽग्निविणें दुग्धीं येईल केंवि साय ति रे!' ॥ ९
मुनि मग म्हणे **गुरू**सी, 'होता मजलागिं गुरु असा कपटी ।
ब्रह्मज्ञान न सांगे, केलें मजलागिं मात्र कावपटी[14]. ॥ १०
सांगे न वेदशास्त्रा, सांगे मजला अकृत्य[15] सेवा ही, ।

---

१. ह्या अध्यायांत आलेला कथाभाग मूळ गुरुचरित्राच्या सोळाव्या अध्यायांत आहे. २. अमृतासारखें चरित्र. ३. देव. स्वर्गांत देवांचें नित्याचें पेय अमृत आहे असें मानतात. ४. माझ्या अंतर्यामींचा चितारूप अग्नि. ५. चरितानिळ=गुरुचरित्ररूपी वायू. मन्मनकणिंची (माझें मन हेंच धान्यकण त्याची) सर्व मूढताकानी (अज्ञानरूप रोग) उडवी (नाहींसा करी). कानी=जोंधळ्यावर पडणारा एक रोग. ६. सूर्य. ७. कुबेर. ८. आदरबुद्धीनें. ९. तूं दर (भीति) सांडी; गुरुचरितामृतकथारसा घे; निर्जर (अमर) हो. १०. परळी वैजनाथ. ११. भवाचें दर=संसारभीति. हें 'नाशी' याचें कर्म. १२. ज्ञान+उपदेश=ज्ञानोपदेश–परंतु छंदास्तव 'नुपदेश' असा पररूपसंधि कवीनें केला आहे. १३. रज=धूळ. १४. कावेनें युक्त (भगवें) आहे वस्त्र ज्याचें असा. १५. अयोग्य.

आणवि मातितृणादिक जळ काष्ठें, सर्वदा असें वाहीं[1]. ॥ ११
त्यागुनि आलों यास्तव कंटाळुनि फार मीच त्या गुरुतें, ।
दुःखाचे चिखलांतुनि काढी गज गुरु नकोच त्यागुं, रुतें[2]. ॥ १२
श्रीगुरु म्हणती मुनिसीं, 'उलंडुनी[3] जेंवि दुग्ध तूप शुची[4] ।
प्राशुनि मद्या भ्रमतो, तैसा मतिमंद शुद्ध तूं पशुची. ॥ १३
अपशकुन करि परासी छेदुनियां दुर्जन स्वनासा[5], रे! ।
तैसा स्वार्थ त्यागुनि सांगसि गुरुदोष तूं जना सारे. ॥ १४
चूलींत मळ विसर्जुनि लावितसे बोल पूर्वकर्मातें, ।
तैसा तूं द्वेषुनि गुरु म्हणसी ज्ञानोपदेश कर मातें. ॥ १५
कैंची ज्ञानप्राप्ती गुरुनिंदक पापिया[6] तुला होती ।
गुरुसेवासुकृताची[7] कोणास हि न करवे तुला[8] हो, ती. ॥ १६
मनिं नाणुनि गुरुदोषा भावें सेवा करीत जो गुरुची ।
सकळाभीष्टें पावे; घे यास्तव, तुज कथेस सांगु, रुची. ॥ १७
द्वापारीं धौम्यऋषी तच्छिष्ये त्रय, तयांसम तिघे ते ।
गुरुशुश्रुषा करुनितेऽखिल विद्या जाहले सुमति घेते. ॥ १८
अरुणी[9], उपमन्यु दुजा, वेद त्रय, शुश्रुषेस सादर[10] ते, ।
आन[11] नसेचि तयांचे गा! उपमा द्यावयास साद[11], रतें[12]. ॥ १९
निशिदिन ते त्रय शिष्ये गुरुसेवा भावभक्तिनें करिती ।
त्यांचें पहावया मन धौम्यगुरू छळितसे अनेक रिती. ॥ २०
उपमन्यूदर[13] मोठें यास्तव लागेचि बहुत भक्षाया ।
बहुभक्षें[14] मंदमती म्हणउनि गुरु लावि धेनु रक्षाया. ॥ २१
वसतें[15] शास्त्रीं वेदीं गुरुपदिं दावावया तया प्रचित, ।
गोधन रक्षी म्हणउनि उपाय गुरु त्यास अल्प हा रचित[16]. ॥ २२
गुर्वाज्ञें धेनु वनीं नेई तो मित्र जों नये उदया ।
चित्तिं म्हणे मद्गुरुसी बहुक्षुधा मज म्हणोनि येउ दया. ॥ २३

---

१. 'वाहीं' ह्या क्रियापदाचा कर्ता 'मी.' २. (चिखलांत) अडकलों आहें. ह्याचा कर्ता 'मी'. ३. टाकून. ४. शुद्ध. ५. आपलें नाक. ६. पाप्याला. ७. गुरु+सेवा+सुकृताची=गुरूच्या सेवेपासून होणाऱ्या पुण्याची. ८. बरोबरी. ९. अरुणी, उपमन्यु व वेद, हीं धौम्य-गुरूच्या शिष्यांचीं नांवें आहेत. १०. तत्पर. ११. आन साद=दुसरा शब्द. १२. (तूं या कथेंत) रममाण हो. १३. उपमन्यूचें उदर. १४. जास्त खाण्यानें. १५. याचा कर्ता? १६. योजिता झाला.

दिनभर तिष्ठुनि रानीं चरवुनि बहु आणि गाइला गेहीं ।
कोपेल गुरु म्हणोनी शिष्या उपमन्यु पायिं लागे ही. ॥ २४
पाहुनि धेनू, गुरुला जाला संतोष फार अंतरिं तो ।
बाह्य बहु क्रोध गुरू शिष्यावरि करि अपार हो! तरि तो. ॥ २५
दिनभर चारुनि रात्रीं आणि म्हणे गुरु नकोचस त्वरित ।
आणूं, [1]यापरिची मुनि! ऐके पाहावयाचि सत्व रित. ॥ २६
पोटभरी हि कधीं तो अन्न तयाला न घालि जेवाया ।
छळणा करोनि [2]दवडी सेवा दिनरात्र केलि जे [2]वायां. ॥ २७
[3]भिक्षा मागुनि जेवी, करुनि असा मग उपाय, रजनींत ।
सुरभी आणी; ऐसी होती, वंदि गुरुपायरज, नीत. ॥ २८
माध्यान्हीं [4]गोठवुनी धेनू, भिक्षान्न मागुनी जेवी; ।
गुरु म्हणत, 'स्थूल बहुत होसि कसा [5]वृष [6]निबंधनीं जेवीं.' ॥ २९
सांगे शिष्य गुरुस मग, 'मागुनि भिक्षान्न नित्य जेवित मी.' ।
[7]गुरु म्हणत, 'वंचुनि मला निर्फळ तें, होय नृत्य जेंवि तमीं. ॥ ३०
मागुनि भिक्षान्न मला आणुन देऊनि, गोधनें [8]चरवी, ।
आणित जा रात्रीं, [9]जों उदय न सोडी निबंधनें च रवी. ॥ ३१
आज्ञा करि गुरु जैसी, नेउनियां नित्य शिष्य चरवितसे ।
भिक्षान्न देउनीयां गुरुचे दुःशब्द चित्तिं जिरवितसे. ॥ ३२
एकदिनीं शिष्याचें गुरुगेहीं उदर जेवुनी न भरे ।
[10]परि तो मन करि निर्मळ, परार्धशरदीं जसे मुनी! नभ, रे! ॥ ३३
मग तो शिष्य [11]दुजानें मागुनि भिक्षेसि रे! भरी उदर; ।
पहिली देउनि सदनीं, भक्षि दुजी, चित्तिं दे न येउं [12]दरें. ॥ ३४
जाला पुष्ट बहुत मग पाहुनियां पुसतसे गुरू त्यास ।

---

१. हे मुनि! ह्या परिची सत्व पहाण्याची रीत ऐके. २. वायां दवडी=व्यर्थ करी. ३. भिक्षा मागुनि जेवी. मग असा उपाय करुनि रजनींत (रात्रौ) सुरभि आणी गुरुपायरज वंदी ऐसी नीत (क्रम) होती. ४. गोठण (गोस्थान)=दोनप्रहरच्या वेळीं गांवाबाहेर गाई उभ्या करण्याची सावलीची जागा. गोठवणें=गोठणांत गाई उभ्या करणें. ५. बैल. ६. जाग्यावर बांधून ठेवल्यामुळें. ७. गुरु म्हणती मला वंचुनि (फसवून) (जें—तूं केलेली सेवा) तें निर्फळ; जेंवि तमीं (अंधारांत) नृत्य निर्फळ (होय). ८. चारीत जा. ९. जों रवि उदय न तोंच निबंधनें सोडी १०. रे मुनी! परि तो (शिष्य) जसे परार्धशरदीं (कार्तिकमासीं) नभ निर्मळ, (तसें) मन निर्मळ करी. ११. दुसऱ्यांदा. १२. शंका, भय.

सांगे तो मग सकळहि गुरुपासीं शिष्य नित्यकृत्यास. ॥ ३५
शिष्य म्हणे, 'द्वय वेळां भिक्षा मी करित विप्रधामीं हो ! ।
पहिली देउनि सदनीं शमवी भक्षुनि दुजी क्षुधा मी हो ! ॥ ३६
कोपुनियां मग गुरु तो सांगे मागूं नकोचि भिक्षा हो ! ।
सावध आझुनि तरि, रे ! द्विज पीडिसि, तुज करीन शिक्षा हो !' ॥ ३७
मागूं नको म्हणे गुरु भिक्षा म्हणवोनि मागतां [1]राही ।
शमन क्षुधा कराया कोठें मग तो न त्यास थाराही. ॥ ३८
ऋषि मुनि तपि क्षुधेनें विसरति तें जप, तप, क्षमा, ध्यान, ।
हो[2]तां शिष्य भुकेनें पीडुनियां होय वक्र माध्यान्ह. ॥ ३९
तों पाहे धेनूचें करितां स्तनपान वत्स फेंस गळे ।
जात व्यर्थ म्हणोनी प्राशी मग शिष्य धे[3]नुचे सगळे. ॥ ४०
नित्य क्रम या परिचा चाले तों होय पुष्ट शरिरानें ।
चरवी धेनुस, घाली मोडुनि बहु वृक्ष, वो[4]सें करि रानें. ॥ ४१
अवलोकुनि गुरु मग तो पुष्ट कसा होसि हें विचारीत ।
सांगे, 'वत्सोच्छिष्टा गळतां मी पीत, गाइ चारीत'. ॥ ४२
'उच्छिष्टें मंदमती' त्यास म्हणे गुरु 'न जाइ भक्षीत, ।
नाहींच बोलण्याची तुजलागीं, तूं दुजा इ[5]भ, क्षीत.' ॥ ४३
गुर्वाज्ञेनें शिष्या भक्षण करणेंहि पायसा राही, ।
निववावया क्षुधानळ मग तो राहे उपाय साराही. ॥ ४४
'पीडी क्षुधा' म्हणे 'मज काय करूं ईश्वरा ! अगा इजला, ।
चिंतन करी मनिं असें आणु[6]नि, चरवीत शिष्य गाइ, [7]जला. ॥ ४५
तों अर्कीच्या गळतां चीकासी पाहि जेंवि पय; पान ।
तोडोनि द्रोण करी; धरि करिं; मग शिष्य [8]जेंवि पयपान. ॥ ४६
तों अंध होय गा ! तो, उडोनियां चीक युग्मनेत्रातें ।
मग तो म्हणे कवण मज आतां होउनि गृहास [9]ने, त्रा[10]तें. ॥ ४७

---

१. मागणें सोडून दिलें. २. माध्यान्ह होतां शिष्य भुकेनें पीडुनियां वक्र (भुकेनें व्याकुळ होऊन वांकडा) होय. ३. याचा संबंध 'फेंस' (अध्याहृत) याकडे. ४. ओसाड, वृक्षरहित. ५. तूं दुजा इभ (बैल), तुजलागीं बोलण्याची क्षीत (पर्वा, लाज) नाहींच—असा अन्वय. ६. बैल. ७. शिष्य गाई जला आणुनि चरवीत (गाई पाण्यावर नेऊन चारित होता). ८. पयपाना जेवि=दुग्धपान करिता झाला. ९. नेईल. १०. तारणारें.

मग धेनूसी हांकित येतां घेऊनि चांचपित यष्टी ।
तों पडिला कूपातें तेणें तो शिष्य होय बहु कष्टी. ॥ ४८
कोणी काढील म्हणुनि कूपांतुनि शिष्य थोरें[1] ओरडत ।
धेनू चुकतां रानीं श्रीगुरु शापील म्हणुनि तो रडत. ॥ ४९
'आझुनि शिष्य नये कां?' गुरु म्हणत 'जरीं पडे बहुत शोकी[2].' ।
यास्तव ये गोष्टीं[3] तो, न पाहुनी गौ, पडे बहुत शोकीं. ॥ ५०
मग चिंता करित ऋषी, जात वनीं तों उभ्याच भूसुरभी[4] ।
शिष्य न देखे म्हणउनि बहु चिंता करित धौम्य भूसुर[5], भी[6]. ॥ ५१
'ये रे बाळा! शिष्या! उपमन्या!' करुनि मारितो हाका ।
'काय' म्हणे 'व्याघ्रानें भक्षियला अझुनि ये न तो हा, कां?' ॥ ५२
गुरुहांक शिष्यकानीं पडतां ओ देइ, तोचि[7] गुरुकरणीं ।
पडतां, गुरु ये जवळी, सांगे मग शिष्य आपली करणी[8]. ॥ ५३
पाहोनि गुरु कृपेनें, 'स्तवी' म्हणे 'अश्विनीकुमारा हो[9]! ।
दिव्याक्षी, ये बाह्य[10], त्वत्पुण्या उभि रमा उमा राहो.' ॥ ५४
गुर्वाज्ञेनें तेव्हां स्मरेऽश्विनीपुत्र[11] शिष्य; कूपातें ।
येउनि ते देत्यक्षां[12], भक्षाया देउनी अपूपातें[13]. ॥ ५५
येतां सुनेत्र बाहिर येउनियां शिष्य तो तिघां नमना ।
करुनि म्हणे श्रीगुरुसी 'माझे अपराध आणि गा! न मना.' ॥ ५६
'येवोत सर्व विद्या तुज' म्हणुनि तया शिरीं स्वहस्तक तो ।
ठेवितसे गुरु मग तच्छिष्यहि ठेवी पदीं स्वमस्तक तो. ॥ ५७
मुनि! या परिचे कष्टा भोगुनि दुःशब्द शिष्य साही ही ।
श्रीगुरुवरप्रसादें शिष्यहृदीं शिरति, चौरि[14] साही[15] ही. ॥ ५८
गुरु मग तया म्हणे 'जा नांदे स्वगृहीं, करीं विवाहातें ।
आनंदें सत्कर्में करिं, पूजीं नित्य अविवाहातें[16].' ॥ ५९
होतां निरोप गुरुचा, गुरुच्या वंदोनि पादपद्मातें ।

१. मोठ्यानें. २. रात्र. ३. गोठ्यांत. ४. पृथ्वीवरील कामधेनू. ५. ब्राह्मण. ६. भ्याला. ७. तो (ओ) गुरुकरणीं (कानीं) पडतां. ८. कृत्य. ९. याचा कर्ता 'तूं' अध्याहृत. १०. बाहेर. ११. अश्विनीकुमार. १२. देती+अक्षां (डोळ्यांनां). १३. अपूप=अनारसा. १४. चार वेद. १५. सहा शास्त्रें. १६. अवि=मेंढा. तो वाहन आहे ज्याचें असा अग्नि त्यातें. 'हविर्वाहातें' हा पाठ असल्यास चांगला.

आनंदानें शिष्या नांदे जाऊनियां स्वसद्मातें. ॥ ६०

मग जो अरुणी शिष्या सेवा करि भक्तिसी धरुनि भावें, ।
चित्तिं म्हणे मन माझें गुरुसेवे राहुनि स्थिर निभावें[1]. ॥ ६१

आज्ञापि गुरु तया 'जा, लावि जळ क्षिप्र भातवाप्याला[2], ।
ये मग सत्वरचि' म्हणे 'झाली[3] लक्षी प्रभात वाप्याला. ॥ ६२

केदार[4] अर्णे शिष्याऽगालावुनि कृषिंत लक्ष पाजावें, ।
बांधा या थंड करी, वोलावुनि कृषितल, क्षपा जावें'. ॥ ६३

आज्ञापितांचि गुरुनें शिष्या धांवोनि सरतटाकीं[5] तो ।
बांधावया प्रवाहीं दगड शिळा अपरमीत टाकी तो. ॥ ६४

मोठा[6] खळाळ; जें जें घाली तो आड विप्र, वाहात; ।
न चले उपाय मग तो तनु घाली आडवि प्रवाहांत. ॥ ६५

एकीकडेस पायां टेकुनि हातें धरी दुजी दरडी ।
ऐसा उपाय करि, परि सांगाया शिष्य ये न खेदें रडी[7]. ॥ ६६

गुरुच्या व्रीहीमध्यें जाई तैं आंतिल क्षपातें हो. ।
नीरांतुनि अवलोकी व्रीही, लावोनि लक्षपातें[8], हो. ॥ ६७

होयाऽस्तमान तों तो शिष्या असतां प्रवाह ओघांत ।
सद्गुरु म्हणे 'अझुनि कां ये न; जळीं काय पावला घात ?'॥ ६८

चिंता करित गुरु असा आला मग जों स्ववृत्तिपासीं[9] तों ।
पाहुनि जलभरपूरी[10], 'शिष्य' म्हणे 'भागला उपासी तो'. ॥ ६९

शिष्या दृष्टि न पडतां हांकारी 'ये' म्हणे 'भुकेलासी. ।
ब्रह्मानंद[11] मम मनीं राहेसा तूं स्वयंभु केलासी'. ॥ ७०

ऐकोनि दीर्घ हांका[12] श्रीगुरुच्या शिष्य तो प्रवाहातें[12], ।
तेथुनि निघोनि धरि मग गुरुपायां शिष्य तेधवां हातें. ॥ ७१

---

१. टिकावें. २. भाताच्या वाफ्याला. ३. प्रभात झाली, वाप्याला लक्षी—असा अन्वय. वाप्य=पेरणीकरितां तयार केलेलें शेत. ४. अगा शिष्या ! कृषींत (शेतकींत) लक्ष लावुनि केदार (शेताला) अर्ण (पाणी) पाजावें. या बांधा थंड करी (पाणी घालून घट्ट कर); कृषितल (शेतकीची जमीन) वोलावुनि (भिजवून) क्षपा (पाणी) जावें. ५. तळ्याच्या कांठीं. ६. खळाळ मोठा; तो विप्र जें जें आड घाली तें तें वाहात (वाहून जाई). ७. रडगाणें. ८. नजर. ९. आपल्या शेताजवळ. १०. पाण्याची चंगळ, विपुल पाणी. ११. मम मनीं ब्रह्मानंद (फार आनंद) स्वयंभु राहेसा (तूं) केलासी—असा अन्वय. १२. हांकाप्रवाह=हाकांचा सपाटा.

आनंदानें गुरु मग कर ठेवुनि शिष्यमस्तकावर तो ।
'हो निपुण चारि साहीं' म्हणुनि तया देत तेधवां वर तो. ॥ ७२

[1]येवोनि वेद शास्त्रें गुरुवरदें, शिष्य शक्तितेजाला ।
चढला; त्यास घडेऽसें मुनि! गुरुचरणीं सुभक्ति ते ज्याला. ॥ ७३

देतां निरोप गुरु मग जाउनि गेहास शिष्य नांदे तो ।
करितां सेवा गुरुची शिष्यांनीं इच्छिलें मना देतो. ॥ ७४

आतां तिसरा शिष्या वेद, तया ठेवि शेत राखाया ।
निशिदिन राखि जपोनी क्षण हि न ये अन्न तो घरा खाया. ॥ ७५

पिकतां व्रीही मग तो कापुनि करि सर्व रास झोडोनी ।
येउनि सांगे गुरुसी शिष्या मग तो करास जोडोनी. ॥ ७६

आज्ञा करि गुरु मग तो 'आणि' म्हणे 'धान्य सर्व गेहातें.' ।
[2]दे म्हणुनि एक रेडा गाड्या जुंपोनि लगबगें हातें. ॥ ७७

शिष्य निघे परि न चले एकचि रेडा म्हणोनियां [3]शकटीं ।
[4]स्वग्रीवें मग बाधुनि जूं वोढी ठेउनी [5]करास [6]कटीं. ॥ ७८

एकीकडेस रेडा वोढी एकीकडेस आपण तें ।
ऐसा नेउनि गाडा खंडीद्वय तो भरीतसे [6]कण ते. ॥ ७९

चोढित आणी शकटा तों रुतला [7]महिष [8]कर्दमीं [9]वाटे ।
संकट पडोनि तेव्हां शिष्यास मनीं [10]अमर्द मी वाटे. ॥ ८०

काढी मग बहु नेटें रेड्यासह वोढुनी शकट सगळा ।
कासाविस बहु जाला तेव्हां त्याचे पडोनि फांस गळां. ॥ ८१

शिष्य नये म्हणउनि गुरु येउनि जों पाहि पाश मानेला ।
पडिला; पाहुनि काढुनि, [11]घरीं, करुनि दुःख तें शमा, नेला. ॥ ८२

ठेवुनि शिरिं हात म्हणे 'केले त्वां कष्ट फार वेदा! हो ।
त्वत्कीर्ति बहुत भूवरि, [12]जाणुनि तूं पूर्ण शास्त्र वेदा, हो. ॥ ८३

---

१. गुरुवरदें (गुरुनें दिलेल्या वराच्या योगानें) वेदशास्त्रें येवोनि शिष्य शक्तितेज्याला चढला. (हे) मुनि! ज्याला गुरुचरणीं ते (ती) सुभक्ति (त्याला) असें घडे—असा अन्वय. २. याचा कर्ता 'गुरु' अध्याहृत. ३. गाड्याला. ४. स्वतःच्या मानेवर. ५. कंबरेवर हात ठेवून. ६. धान्य. ७. रेडा. ८. चिखलांत. ९. वाटेंत. १०. असमर्थ, नेभळा. ११. तें दुःख शमा करुनी (तो शिष्य) घरीं नेला. १२. तूं शास्त्रवेदा जाणुनि पूर्ण हो.

होती शिष्य बहु तुला त्यामाजीं श्रेष्ठ नाम उत्तंक[1] ।
त्वद्दक्षिणेस[2] आणिल, जिंकुनुरग[3], कुंडलास निःशंक. ॥ ८४
जनमेजयरायासी करोनि उपदेश सर्पसत्रास ।
करवुनि, देइल सर्पां जाळुनि तो, जेंवि कर्पास[4], त्रास. ॥ ८५
मुनि! ऐक नृपाकरवीं तेणें सर्पक्रतू[5] महा केला ।
दहनासि शक्र[6] तक्षक[7] आणी भू[8], गर्जवीत हाकेला ॥ ८६
सामर्थ्य गुरुकृपेचें ऐसें आहे मनीं मुनी! समज ।
जा तूं स्वगुरुजवळि रे! पुससि जरीं' गुरु म्हणे मुनीस, 'मज'. ॥ ८७
ऐकुनि मुनि गुरुवाक्या विनवी स्वशिरास ठेउनी चरणीं ।
'मजलागिं उद्धरिं' म्हणे 'न त्यज जरि मी चुकेंहि आचरणीं. ॥ ८८
मूर्खें मी दुःशब्दें दुखवीलें बहु मनास त्या गुरुचे ।
आतां मच्छब्दें सुख[9] न त्यास, मज तूं नकोच त्यागुं, रुचे. ॥ ८९
लोहसुवर्णादिक तें [10]संदपडाकें सु[11] एकदां होतें ।
फुटकें मोतीं, तुटलें मन, सांदेना, गुरो! कदां हो! तें. ॥ ९०
आतां गुरु! मद्गुरुचें पावे संतोष तें कदा न मन, ।
त्यागीन प्राण म्हणुनि निघेचि तो करुनि गुरुपदा नमन. ॥ ९१
वैराग्या धरुनि निघे प्राणत्यागार्थ काननामाजी ।
अनुतापें 'केलि' म्हणे 'हे काया व्यर्थ तूं' मनामाजी. ॥ ९२
श्रीगुरुनीं त्या मुनिचें पाहुनियां सर्वहावभाव मन ।
पाचारुनि मग म्हणती 'संशय तूं त्याग रे! जसें वमन'. ॥ ९३

---

१. ह्या उत्तंकाची आदिपर्वांत अशी कथा आहे कीं गुरू (धौम्यशिष्य वेद) कडून सर्व विद्या प्राप्त झाल्यावर यानें गुरुदक्षिणा मागावी अशी गुरूस प्रार्थना केली तेव्हां गुरूनें मला कांहीं इच्छा नाहीं असें सांगितल्यावर उत्तंकानें गुरुपत्नीचीहि तशीच प्रार्थना केली. तेव्हां तिनें सूर्यवंशीय पौष्यराजाच्या स्त्रीचीं कुंडलें मागितलीं. त्या राजपत्नीकडून तो तीं घेऊन येत असतां वाटेंत तीं हरण करून तक्षक बिळांत शिरला. उत्तंकानें त्याच्या मागोमाग पाताळांत जाऊन तीं परत आणून गुरुपत्नीस दिलीं. पण तक्षकानें आपणास वाटेंत त्रास दिल्यामुळें त्याजवर रागावून पुढें जनमेजयाकडून त्यानें सर्पसत्र करविलें. २. तुझ्या दक्षणेकरितां. ३. जिंकुन+उरग (तक्षक). ४. कर्पास=कापूस. ५. सर्पयज्ञ. ६. इंद्र. तक्षकाला इंद्रानें आश्रय दिल्यामुळें जनमेजयानें इंद्रासुद्धां आहुति दिली. ७. जनमेजयाचा पिता परीक्षित् त्यास दंश करणारा सर्पविशेष. ८. पृथ्वीवर. ९. याचें कर्म 'सुख'. (?) १०. संदप म्हणजे सवागी कीं काय? सवागीच्या डाकानें लोखंड, सोनें वगैरे सांधतां येतें पण फुटकें मोतीं व बिघडलेलें मन पुनः एक होऊं शकत नाहीं, असा अर्थ दिसतो. ११, चांगलें.

ठेवुनि शिरीं कर म्हणे 'जाई तूं आपले गुरूपासीं ।
होउनियां ज्ञान तुला वोळखिसी पूर्ण चित्स्वरूपासीं'. ॥ ९४

सिद्ध म्हणे, श्रीगुरुचे हस्तस्पर्शें सशास्त्र तो निगम[१] ।
जाणुनि जाला ज्ञानी निघे स्वगुरुभेटिसी पडोनि, गमें[२]. ॥ ९५

श्रीगुरुराज मुनीसी निरोप देउनि गुरूकडे दवडी ।
आपण सैंवडा[३]सवडी निघोनि तेथोनि येत भिंल्लवडी[४] ॥ ९६

कृष्णापश्चिमतीरीं गुप्त वसे मग उदुंबरातळिं[५] तो ।
श्रीगुरुराजकृपेनें इच्छित पावे उदुंबराऽतळि[६] तो. ॥ ९७

नामांकितासि सिद्धें सांगितलें ज्यारिती चरित्रास ।
वर्णुनि बच्याजिसुतें सांसारिक[७] दूर ते करि त्रास. ॥ ९८

---

## अध्याय तेरावा[८].

नामांकित सिद्धपदीं ठेउनि मस्तक म्हणे, 'कृपामृतजी ! ।
अमृताहुनि गोड बहुत वाटे, उठतील ऐकतां मृत जी. ॥ १

सांग पुढें श्रीगुरुनीं चरितें केलीं भिलावडीमाजीं, ।
गोडी पाहुनि बसली ऐकाया बहुत आवडी माजी.' ॥ २

सिद्ध म्हणे, 'हर्ष मनीं तुझिया प्रश्नें सद्या अपार मला, ।
कृष्णातटिं भिल्लवडिस गुरु तो पाहुनि सुपादपा[९] रमला. ॥ ३

भुवनेश्वरिदेवीचा पाहुनि तो गुप्त पृष्ठभाग वसे, ।
भक्तजनां तेथें ही पडतां तत्कीर्तिची प्रभा गवसे. ॥ ४

ग्रामीं भिक्षा मागुनि गुप्तचि तो पादपीं करी वास, ।
राहिल परि तो कैसा, गुप्तहि जरि ठेवि कस्तुरी वास.' ॥ ५

शिष्य म्हणे, 'श्रीगुरु जो गुप्त वसुनियां किमर्थ राहे तो ? ।
मागे किमर्थ भिक्षा ? सांगुनि मज पूर्ण हा करा हेतो[१०]. ॥ ६

---

१. वेद. २. स्वास्थ्य. ३. सवडीप्रमाणें. ४. भिलवडी हें प्रसिद्ध स्थान तासगांव तालुक्यांत कृष्णेच्या कांठीं आहे. ५. औदुंबर वृक्षाखालीं. हा वृक्ष भिलवडीजवळ कृष्णेच्या दुसऱ्या तीरावर आहे. ६. (जो) उदुंबरा+आतळी (त्या औदुंबर वृक्षाजवळ जाई) तो श्रीगुरुराजकृपेनें इच्छित पावे—असा सार्थान्वय. ७. हें 'त्रास' याचें विशेषण. ८. या अध्यायांत मुळांतील १७ आणि १८ या दोन अध्यायांतील कथाभाग आहे. ९. सु+पादप=उत्तम वृक्ष (औदुंबर). १०. हेतू.

त्रैमूर्ती अवतारी गुरु तो तीर्थीं करी कशा गमन? ।
भिक्षेचा तोष तया; ऐकूं इच्छी, कथेस सांग, मन.' ॥ ७
सिद्ध म्हणे, 'गुरु तीर्थे हिंडे भक्तांस उद्धरायाला, ।
येती भेटिस दुर्जन, कारण गुप्तस्थळा धरायाला. ॥ ८
भिक्षान्न शुद्ध आणिक धरिलें मुख्यान्न तेंचि हो! यतिला, ।
श्रीगुरु मागति भिक्षा म्हणउनि बहुमान हाचि होय तिला.[1] ॥ ९
गुरु कल्पद्रुम ठेविल गुप्त कसा कीर्तिच्या प्रकाशाला? ।
प्रकटे इच्छित देतां, ज्ञानाच्या भक्तयाचकां शाला.[2] ॥ १०
गुरुपादस्पर्शगुणें अमित्र ते होति मित्र ते ज्याला,[3] ।
राहिल दवडोनि कसा कोठें तो कीर्तिमित्र[4] तेजाला? ॥ ११
जाला प्रकट कसा तो चरित सुरस ऐक नामकरणी तें! ।
करवीरीं द्विज होता त्याचें तूं ऐक नाम करणीं[5] तें. ॥ १२
वेदरत नाम जाला होता संपन्न वेदशास्त्रींही, ।
त्याला मतिमंद कुमर ज्याला, असतां पतिव्रता स्त्री ही. ॥ १३
मंदमती सुत म्हणुनी दुःख मनीं बहुत आठवे दरत(?) ।
त्यजुनि तनू, मग सुस्थळ पाही हरिचरण निकट वेदरत. ॥ १४
स्त्री करि मग सहगमना करणें सहगमनचि स्त्रियेस हित, ।
मग वेदरत हरिपदीं वैकुंठीं राहि तो स्त्रियेसहित. ॥ १५
मतिमंद पुत्र मागें रडत गृहीं पाहिं राहि एकटका,[6] ।
खर्चायासि तयासी देखिल गेहीं न राहि एक टका.[7] ॥ १६
मग सुजन तया कुमरा पोषिति आणोनियां स्वगेहाला, ।
उच्छिष्ट शिळें देती; तें भक्षुनि, सोसुनी तगे हाला.[8] ॥ १७
त्या मग मतिमंदाचा केला व्रतबंध विप्रलोकांनीं, ।
शिकविति जरि मनिं न ठरे, केला उपदेशमंत्र जो कानीं. ॥ १८
येईना गायत्री, कैंचा मग वेद विप्रपुत्रास ।
येइल? ताडण करितां बहु पावे मात्र तद्वपु[9] त्रास. ॥ १९
नुपंतिष्ठे[10] बहु संथा घोकविती विप्र ते जरि तयाला, ।
जाली हद्दचि म्हणती, 'न फळ श्रम करुनियां बहुत याला.' ॥ २०

---

१. भिक्षेला. २. (गुरु) भक्तयाचकां ज्ञानाच्या शाला (शाळा) आहे. ३. ज्या (ज्या कोणाला). ४. कीर्तिरूप सूर्य. ५. कानांनीं. ६. एकटा. ७. आणा. स्वल्पद्रव्य. ८. (तो) हाला सोसुनी तगे (टिके, कष्टानें जगला). ९. त्याचें शरीर. १०. स्मरणांत राहीना.

निर्भर्त्सुनी तया मग म्हणती, 'जन्मसि असा पशु कसा रे ! ।
ज्ञानी पिता तव महा वेद म्हणे तीनही अचुक सारे. ॥ २१
त्वत्तात कसा ज्ञानी विद्वान् गुणवानति बहु गौसुतसा[1] ।
न दुजा. तत्पोटीं तूं होसी मतिमंद शुद्ध गौसुतसा[2]. ॥ २२
घालुनि जेवाया तुज जालासी मूर्ख तूं खरा गवळी, ।
लाज न ये, भाळिं[3] पडे, येउनियां मात्र देख राग, वळी.' ॥ २३
येउनि कोप तया मग जेवी मागोनि नित्य माधुकरी. ।
'ताडण करा' म्हणे 'परि, शब्दशरें मज नकाच[4] विंधुं, करीं[5]'. ॥ २४
विनवी बहु जोडुनि कर विप्रांच्या त्या धरोनि पायांला, ।
'विद्याप्राप्त्यर्थ' म्हणे 'सांगा जी कांहिं तरि उपायाला'. ॥ २५
द्विज म्हणती, 'तुज आतां दे विद्यासौरभी[6] कदा न फळ, ।
पूर्वी विद्येस्तव तूं न देसि कांहींच भीक दान फळ.' ॥ २६
म्हणती, 'तूं प्राग्जन्मीं विद्या रे! दिधलियाच[7] वांचोनी, ।
ये कसि? उपाय याला नसेच तूं जन्मि याच वांचोनी[8]. ॥ २७
विद्वान् पूजिति नृपती रे! विद्येविण मिळे न वसु[9] साच, ।
भिक्षा मागसि खासि न लाजसि माजसि महान वसुसा[10] च. ॥ २८
होसी[11], आतां इकडे नकोच येऊं, न होसि विप्र खर; ।
मर जा, उपाय हाची!' म्हणती[12] देऊन हो! सिवि प्रखर. ॥ २९
'दूषण लाविसि ताता, ठेविसि जीवा कशास? मर जा च' ।
बोलुनि कुशब्द नाना त्यास असा करिति भूअमर[13] जाच. ॥ ३०
ऐशा दुर्वचनें त्या विप्रसुताची अपार तनु तापे, ।
योजी मग युक्ति मनीं प्राणत्यागार्थ फार अनुतापें. ॥ ३१
'आतां प्राणत्यागोपाय[14] करुं' म्हणे, 'करोनि कृत्यसुरी[15], ।
छेदूं शिरा' म्हणुनि घे, मनांत ऐसें धरोनि कृत्य, सुरी. ॥ ३२

---

१. सरस्वतीपुत्राप्रमाणें. २. बैलाप्रमाणें. ३. राग येउनियां भाळीं (कपाळाला) वळी (आंठी) मात्र पडे, देख (पहा)—असा अन्वय. ४. घरे पाडूं नका. ५. हातांनीं. याचा संबंध 'ताडण करा' याकडे. ६. विद्यारूप कामधेनू. ७. दिल्यावांचून. ८. पुढल्या जन्माशिवाय विद्या येणार नाहीं—असा भाव. 'गुरुशुश्रूषया विद्या पुष्कलेन धनेन वा । अथवा विद्यया विद्या चतुर्थं नोपलभ्यते ॥'. ९. द्रव्य. १०. पोळाप्रमाणें. ११. (तूं) खर होसी, विप्र न होसि. १२. झोंबण्यासारखी शिवी देऊन (ते विप्र) म्हणती—असा अन्वय. १३. भूदेव, विप्र. १४. प्राण+त्याग+उपाय. १५. कृति+असुरी=राक्षसी उपाय.

'निंदिति मज जन आतां नाहीं ठेवोनि काय उपयोगी.' ।
म्हणुनि निघे तो रानीं धरोनि वैराग्य होय उपयोगी. ॥ ३३

ये भिलवडीस हिंडत तो तेव्हां होत नैव घटि घृताची, ।
भुवनेश्वरीस नमुनी नेत्रींच्या धार धरि पादिं घृताची. ॥ ३४

अंबेसि म्हणे, 'माझें दवडावें तूंचि सर्व अज्ञान, ।
सर्वहि दुःखा दवडुनि उपदेशावें तुवां मला ज्ञान. ॥ ३५

ज्ञानावांचुनि न उठें' म्हणोनियां ठेवि पायिं डोईला, ।
त्रिअहर्निशि कष्टे बहु मग हत्या तरि म्हणे घडो ईला. ॥ ३६

'त्रय उपवास करीं जरि अंबे! दृष्टांत दाविनास मज, ।
कैसा पडेल मजला दृष्टांता दाविल्याविना समज. ॥ ३७

करिसी जरि मदुपेक्षा होइल कीर्ती जगांत आजि भली.' ।
बोलुनि ऐसें पायीं वाही छेदुनि करोनि आ जिभली. ॥ ३८

जिव्हा वाहोनि म्हणे, 'अझुनि तरी सदय हृदय होउ, शिर ।
छेदुनि वाहिन नातरि या उपरी लागल्यास हो उशिर'. ॥ ३९

पाहुनि निर्धार असा मग ते देवीस येउनी करुणा, ।
स्वप्नीं उपाय सांगे तों प्राची प्राप्त जाहली अरुणा. ॥ ४०

देवि म्हणे स्वप्नीं, 'यति बसला औदुंबरातळीं जा हो! ।
शिव अवतारी ज्ञानी, लवकरि तत्पाद आंतळीं जा हो'. ॥ ४१

पडतांचि स्वप्न असा उठला ते क्षणिंच होउनी जागा, ।
काढी श्रीगुरु जेथें गुप्तस्थळ तेंचि शोधुनी जागा. ॥ ४२

पाहुनियां श्रीगुरुसी पायीं मग डोइला जसी ठेवी, ।
ज्ञानी होय द्विज तो, ये जिव्हा, सांपडे जसी ठेवी. ॥ ४३

श्रीगुरुपादस्पर्शें येउनि साचार, विप्र तनु ज्याची, ।
होउनि, बहु भूं कीर्ती होई साचार विप्रतनुजाची ॥ ४४

देवोनि ज्ञान तया, तेथुनि गुरुराय शीघ्र वातगती ।
निघती; मजवांचोनी, न संगती कोण तेधवां तगती. ॥ ४५

---

१. देह. २. योग्यासारखा. ३. नऊ घटका. ४. रात्र. ५. पाण्याची. ६. त्रि+अहः+निशा=तीन+दिवस+रात्र. अहोरात्र तीन दिवस. ७. अंबेला. ८. तीन. ९. माझी उपेक्षा. १०. जीभ. ११. पूर्वदिशा. अरुणोदय झाला—असा अर्थ. १२. जवळ जा, धर. १३. जेव्हां. १४. ठेव. १५. सा+चार. सहा शास्त्रें आणि चार वेद. १६. तेजस्वी? १७. पृथ्वीवर. १८. ब्राह्मणपुत्राची. १९. वायुवेगानें.

निरखित येती, जेथें[1] संगम कृष्णाणि वारणासरितें, ।
उद्धरिते पापि, तिला[2] स्वर्धुनिची अघनिवारणा सरि ते. ॥ ४६

दक्षिणवाराणसि[3] ते म्हणती, तेथुनि पुढेंहि जाती रे, ।
ज्या[4] तीरें कृष्णेच्या[5] वागति अष्टादशादि जाती रे. ॥ ४७

आले गुरु अवलोकित कुरवपुरा[6] जाण कृष्णितीरांनीं, ।
पंचनदी[7]कृष्णेचा संगम पाहोनि राहती रानीं. ॥ ४८

तें क्षेत्र महा मोठें, ज्यापरि काशी प्रयाग. महिम्यातें, ।
वर्णिति कवि. तत्तुल्यनि देखियलें क्षेत्र थोर महिं[8] म्यां तें. ॥ ४९

भोगावती सरस्वति आणि शिवा आणि कुंभिनी भद्रा, ।
पंचनदीचे स्नानें पावे नर सौख्य पावुनी भद्रा[9]. ॥ ५०

श्रेष्ठ महा पंचनदी आली ते कृष्णवेणिच्या संगा, ।
म्हणउनि तत्क्षेत्राच्या ये न दुजें क्षेत्र सत्य पासंगा[10]. ॥ ५१

हरिहरतनु[11] भोगावति भद्रा कुंभी शिवा सरस्वति तें, ।
नदिसतसंग[12] यास्तव राहति गुरु नरहरीसरस्वति ते. ॥ ५२

आणिकहि बहुत तीर्थें असती कृष्णेचिया तटाकींते, ।
सतखणी[13] तरें[14] मनुजा स्नानें भवपरतटांत[15] टाकीते[16]. ॥ ५३

सद्भक्त मूढजन जे दुस्तर भवसागरा कसे तरती, ।
म्हणवोनि गुरुकृपाळें प्रगट जगीं केलि हो असे तर ती. ॥ ५४

जेथें स्वयें उतारू होउनि गुरुराय देव नावाडी ।
घे भक्ति याचि दामा[17], राहे वसवोनि ते वनां[18] वाडी[19]. ॥ ५५

---

१. जेथें कृष्णा आणि वारणा सरितें (नद्यांना) संगम (होय). २. अघनिवारणा (पाप नाहींसें करण्याच्या कामीं) तिला (कृष्णा व वारणा या प्रत्येकीला) ते त्या (प्रसिद्ध) स्वर्धुनिची (गंगेची) सरि (बरोबरी, उपमा, तुलना) (आहे)–असा अन्वय. कृष्णेचा आणि वारणेचा संगम सांगलीजवळ हरिपुरास होतो. ३. करवीरक्षेत्रास दक्षिणवाराणशी (दक्षिणेंतील काशी) म्हणतात. ४. ज्या कृष्णेच्या तीरीं. ५. अठरापगड जाती. ६. कुरुंदवाडास. ७. पंचगंगा. ८. पृथ्वीवर. ९. कल्याणाप्रत. १०. तराजू समतोल करण्याकरितां किरकोळ वजन घालतात तें. पसंगा नये=थोड्याशा अंशानें सुद्धां बरोबरी करीत नाहीं. ११. विष्णु आणि शंकर (महाबळेश्वर) यांपासून उत्पन्न झालेल्या. १२. सात नद्यांचा संगम. पंचगंगा आणि कृष्णा वेण्या अशा सात नद्या. १३. सात खणांची. खण=भाग. येथें नदी. १४. नाव. १५. संसाराच्या दुसऱ्या तीराला. १६. टाकते, नेऊन सोडते. १७. द्रव्याला. १८. रानांत. १९. लहान गांव. नरसोबाची वाडी.

अमरेश्वर शंभु असे, सन्निध पट्टण[1] हि तें तया नांवें, ।
अमरापुर तें म्हणती, तेथिल महिमेस काय वानावें? ॥ ५६

बाराब्दें गुरु तेथें राहति ते भक्त उद्धरीत असे, ।
भिक्षा मागुनि भोजन ऐसीं तज्जाण शुद्ध रीतें[2] असे. ॥ ५७

त्या ईश्वरसन्निध हो योगिनि[3] ज्या चार[4] आगळ्या साठी ।
वसती, श्रीशिवदर्शनभक्ती[5] त्यांलागिं लागल्या पाठी. ॥ ५८

काशीविश्वेश्वरसम अमरेश्वर देव तोचि, तद्ग्रामीं ।
दर्शनमात्रें देतो मुक्ती वीरांसि जेंवि संग्रामीं. ॥ ५९

सप्तनदीचे संगीं तेथें तीर्थें अपार रे! वसत, ।
प्रतिदिवशीं स्नानासी जाती जे भक्त भूमिदेव[6] सँत. ॥ ६०

शक्तयमरकोटिशुक्लप्रयागकाम्यादि सिद्ध अघहरण, ।
हीं अष्ट असति आणिक हि बहु स्नानें समूळ अघहरण[8]. ॥ ६१

तेथें उदुंबराचे खालीं तें स्थळचि गुरुमनांत रुचे, ।
श्रीगुरु राहे म्हणउनि येतो द्रुम[9] साम्यतेस सुरतरुचे. ॥ ६२

स्नानाऽनुष्ठानादिक तेथें राहोनि करिति ते सर्व, ।
पर्व महा तद्दर्शनिं शिष्या! अवतारि पूर्ण ते सर्व[10]. ॥ ६३

भक्तां रक्षि कृपेनें कुरवाळी बाळ जेंवि आइ करें, ।
ऐसें असतां तेथें जालें जें चरित केंवि[11] आइक रे! ॥ ६४

होता द्विज अमरपुरीं दारिद्री अति जसा सुदामा तो, ।
गुरु भिक्षे एक दिनीं ये त्याचे शुद्ध तो सुधामा तो. ॥ ६५

तों द्विज देखुनि भिक्षे राहवि गुरुसी करोनि आदर तो, ।
गुरुपद धरुनि भवाचा गीळी सगळा करोनि आ दरें[12] तो. ॥ ६६

गुरुपूजन करुनि शिरा ठेवि पदीं कारें म्हणे कृपा त्राहीं, ।
मग वाढी शाककण्या घेवडि निष्पाप[13] वरण पात्राहीं. ॥ ६७

---

१. शहर. २. तत्+रीत=त्याची रीत. ३. पार्वतीच्या दासी. ४. चार अधिक साठ=चौसष्ट. ५. (ज्यांनां) श्रीशिवदर्शनभक्ति त्यांलागिं (त्यांनां) पाठी लागल्या. त्या योगिनी शिवभक्तांचे मनोरथ पुरविण्यास आपण होऊन त्यांजकडे जातात–असा भाव. ६. ब्राह्मण. ७. चांगले. ८. पापनाश. ९. वृक्ष (औदुंबर). १०. विष्णु. ११. कसें. १२. भीति (भवाची). १३. पवित्र (ब्राह्मण).

केल्या बहु शाका परि त्यामाजी मुख्य फार घेवडिया, ।
वडिया तच्चूर्णाच्या करुनि करी आणि घारगे वडिया. ॥ ६८

शक्ति नसे त्या विप्रा चिपट्याचाही करावया चरु[1] तो, ।
भोजन करि भक्ति रुची घेउनियां श्रीगुरू दयाकरु[2] तो. ॥ ६९

विदुरगृहीं श्रीकृष्णें प्रीतीं कणियाच चाखिल्या जेंवीं, ।
तेंवी गुरुनें शाका कणियादी त्या न टाकिल्या जेवीं[3]. ॥ ७०

यापरि भोजन करुनी श्रीगुरुजी तृप्त होत यावर ते ।
प्राप्ती संतति संपति मुक्त्यंतीं देत हो तया वर[4] ते. ॥ ७१

वर देउनि गुरु निघती स्वस्थाना जावयास जे[5] वेळीं[5], ।
ते वेळीं छेदिति ते घेवडि महदंगणांत जे वेली. ॥ ७२

शेंगा नित्य निघति बहु त्यावरि तो काढि विप्रवर वेळा[6], ।
परवेला[7] न धरुनि ते टाकिति छेदोनि भूमिवर वेला. ॥ ७३

गेल्या गुरु द्विजस्त्रीसुत आक्रोशा करोनि आरडती, ।
आरड ती द्विज ऐकुनि समजावी, परि करोनि आ रडती. ॥ ७४

म्हणती 'छेदी भक्षा, केलें तरि आम्हि काय हो! यतिचें, ।
उपजीविका बुडाली' दुःखी मन हो न काय होय तिचें. ॥ ७५

विप्र म्हणे, 'चिंतार्णव[8] धीरंतरीनें[9] तरोनि सर्व असा, ।
तुमचें दैन्य हराया आला तो अवतरोनि सर्व असा. ॥ ७६

भक्तजना रक्षितसे स्वकृपेची करुनि साउली तो कीं, ।
न विसंबे क्षण जैसी आपलि रक्षीत माउली तोकीं[10]. ॥ ७७

गेला भक्ष म्हणुनियां रडतां कां करुनि थोर आकांत, ।
मुंगीपासोनि गजा पुरवितसे भक्ष तो रमाकांत. ॥ ७८

आहारा निर्म्यादी[11], पावति मग सर्व जीव ते जनन, ।
जाणुनि हें सत्य मनीं करिती चिंतेसि मूर्ख ते जन नें[12]. ॥ ७९

लावा चित्त तदंघ्रीं रक्षिल तो रडुं नका उगा राहा, ।
मोहपशू मत्त, तया विवेकदृढदंड घ्या उगारा हा. ॥ ८०

---

१. मात. २. दयालु. ३. भोजनांत. ४. आणखी. ५. ज्या वेळीं. ६. दिवस—प्रसंग. ७. परवा=मीड. ८. दुःखसमुद्र. ९. धैर्यरूपी नावेनें. १०. मूलावर. ११. निर्मी+आदि= आधीं आहाराची उत्पत्ति—तयारी—करी. १२. याचा 'जाण' धातूकडे संबंध म्ह. न जाणुनि.

गुरु भक्तांसि दयाळु ज्याची शेषा न वर्णवे लीला, ।
येउनि गेहीं, तुमच्या समूळ तो छेदि दैन्यवेलीला[1]'. ॥ ८१
यापरि शांतवि त्यांतें श्रीगुरुची कीर्ति शुद्ध वाखणित, ।
मग तो आंगणिंचे त्या घेवडिमूळासि तेधवां खणित. ॥ ८२
खणतांचि मूळ तेथें धनघट[3] त्यालागिं एक सांपडला, ।
बहु पावे हर्ष, जसा अमृत समुद्रांत जो कैसा पडला. ॥ ८३
बहु हर्षति सुतकांता देखोनी द्रव्यकुंभलाभाला, ।
म्हणती, 'धन्य गुरु खरा ह्यचिंता हाचि उपटला भाला.' ॥ ८४
मग म्हणती, 'जाउं चला त्या गुरुचें ध्यावया सुदर्शन जें, ।
दैन्यासुर[5] जो पळवी धनघट हें दावुनी सुदर्शन[6] जें'. ॥ ८५
जाउनि सकळ हि मग त्या नमिती भवगजविदारकेसरिला[7], ।
म्हणती, 'कल्पद्रुम हा देणें तरि काय आणिके सरिला[8].' ॥ ८६
मग गुरुसन्मुख तिष्ठुनि विप्रस्त्रीपुत्र तीं समस्त वनीं, ।
श्रीगुरुपदीं निमग्नचि जालीं त्या भूधरासम[9] स्तवनीं. ॥ ८७
सांगति वृतांत अवघा श्रीगुरुचा त्या करोनियां स्तव तो, ।
गुरु सांगे, 'प्रकटुं[10] नका, विघ्न तयावरि[11] पडेल यास्तव तो'. ॥ ८८
श्रीगुरु मग विप्रा दे पहिल्यासम हर्षयुक्त वरदानें, ।
शिष्या! यापरि कौतुक केलें गुरुराजभक्तवरदानें. ॥ ८९
गुरुचे जाले[12] ज्यापरि पावे तैसेचि सर्व विप्र वर, ।
ज्यावर[13] न श्रेष्ठ दुजा होइ असा श्रेष्ठ सर्व विप्रवर. ॥ ९०
रामात्मजपुत्र म्हणे मद्धृदयाकाशीं सद्गुरू रवि तो ।
प्रकटुनि वदवी स्वकथा, चाले कवितरथ[14] केंवि येरवि[15] तो. ॥ ९१

---

## अध्याय चवदावा[16].

नामांकित शिष्य पुसे सिद्धगुरुज्ञानभानवा[17] नमुनी, ।
'प्रिय औदुंबर गुरुसी किमर्थ जी! सांग भाग्यवान मुनी! ॥ १

---

१. दारिद्र्यवेलीला. २. स्तवित. ३. धनाचा डेरा. ४. जोख (?)=जळू. ५. दैन्यरूपी राक्षस. ६. विष्णुचक्र. ७. संसाररूप हत्तीचा नाश करणाऱ्या सिंहाला. ८. दुसऱ्या—उपमेला. ९. शेषाप्रमाणें. १०. प्रसिद्ध करूं नका. ११. धनावर. १२. ज्यापरि गुरुचे वर जाले तैसेचि सर्व विप्र पावे. १३. ज्यापेक्षां. १४. कवितेचा गाडा. १५. नाहींतर. १६. या अध्यायांत मूळांतील १९ व्या अध्यायांतील कथाभाग आहे. १७. ज्ञानसूर्यास.

[1]धात्र्यश्वत्थवटादिक पुण्यद्रुम हेचि ऐकिले महि म्यां, ।
**गु**रुसि प्रिय औदुंबर कां तो मज सांग त्याचिया महिम्या.' ॥ २

**सि**द्ध म्हणे, 'प्रिय **गु**रुसी औदुंबर कां विचारतोस मज, ।
ऐकें सादरचित्तें चरितासी मग पडेल तो समज. ॥ ३

**प्र**ऱ्हादा रक्षाया स्तभीं अवतार धरित **न**रहरि तो, ।
[2]**कां**चनकश्यप दैत्या विदारुनी, [3]अंत्रमाळिका हरितो. ॥ ४

त्या दैत्याचे जठरीं होतें विष तप्त अग्निच्यापरि तें, ।
जठरा विदारितां जें भिने नखीं फार अग्न हो करितें. ॥ ५

घेउनि आली तेव्हां श्री औदुंबरफळांऽणि आरतिला, ।
पाहोनि तत्स्वरूपा वाटे भय तेधवां अपार तिला. ॥ ६

ते वेळीं रोवि नखें उदुंबरफळीं विषाग्नशांतवन, ।
जाला मग **न**रहरिही शांत करी श्रीसुभक्त तो[4] स्तवन. ॥ ७

आलिंगुनि मग दोघां[5] औदुंबरपादपास दे वर **तो**, ।
'होसी सफळ सदा तूं' कल्पद्रुमास म्हणे **र**मावर तो. ॥ ८

'त्वच्छाये बैसुनि जो जप करि होमादि सर्व दानाशी ।
पावे अनंत फळ तो, आल्या विघ्नाशि सर्वदा नाशी. ॥ ९

त्वच्छाये जळ जेथें जरि तेथें स्नान होय मार्जन तें, ।
**गं**गास्नानासम फळ घडेच न च भीति होय मा[6]र्जन तें[7]. ॥ १०

यापरि वर दे म्हणउनि **क**लीं तयासम सुरद्रुमा तरु तो ।
सेवा करितां मनुजा न दे भवींच्या कुकर्दमांत रुतों[8]. ॥ ११

महिमा अपार जो नर त्यास नमोनि त्रिकाळ [9]आतळितो, ।
[10]नातळितो क्रोध तया राहे **गु**रु म्हणुनियां तया तळिं तो. ॥ १२

ऐकें आणिक, **नृ**हरी त्याचा **गु**रुराज हाचि अवतारी, ।
राहे स्वस्थळ म्हणउनि उदुंबरीं भक्त दर्शनें तारी. ॥ १३

**नृ**हरी अवतार **गु**रू उदुंबरीं शांतवोनि उग्रपणा, ।
शांत बसे **धर्म** जसा राज्यश्री घालुनी समग्र पैणा[11]. ॥ १४

---

१. धात्री=आवळीचें झाड. २. हिरण्यकश्यपु. कांचन=हिरण्य, सोनें. ३. आतड्यांच्या माळा. ४. प्रऱ्हाद. ५. लक्ष्मी व प्रऱ्हाद. ६. नाहींसें होणें. ७. ती (भीती). ८. बुडों—बुडूं. ९. भजतो. १०. वश करीत नाहीं. ११. पैजेम.

ते स्थानीं **गुरु** असतां संगमिं चौसष्ट योगिनी होत्या, ।
नेत्या जाल्या स्वगृहा पाहुनि **गुरु**लागिं पूजुनी हो! त्या. ॥ १५

योगिनि म्हणती, '**गुरु** हा अवतारी ब्रह्मदेव, सर्वाचा[1], ।
शर्वाचा किंवा; हा नमितां भवदर हरील सर्वांचा.' ॥ १६

श्री**गुरु**सी माध्यान्हीं योगिनि नेवोनि आपुले सदनीं, ।
देउनि षड्रस भोजन पूजुनि बहु करिति त्या स्तुती वदनीं. ॥ १७

म्हणती, 'हे **गुरु**वर्या! अशक्य वर्णावयास तव महिमा, ।
ज्ञानरवी तूं नाशिसि, अज्ञान कुबुद्धि हेचि [2]हीम, हिमा. ॥ १८

त्रैमूर्ति एकरूपें अवतारा धरिसि पूर्ण या महिंत, ।
पावति तव पदसेवा करितां जन अष्ट पूर्ण [3]याम हित. ॥ १९

स्तुति करिति यापरी त्या वोवाळुन पंच पंच दीपातें, ।
भोजन अर्पिति मग ज्या नेत्राचें लावुनी पदीं पातें. ॥ २०

तद्देहीं **गुरु** जेवी. गांविं न करि भोजनासि मध्यान्हीं, ।
म्हणती सज्जन यति हा योगि महा श्री**शि**वासम [4]ध्यानी. ॥ २१

ग्रामीं न जेवि **गुरु** हा ये चित्तीं कधिंहि भोजनाशयन, ।
परि म्हणती कुजन द्विज कोठें तरि पाहुं भोजना शयन. ॥ २२

म्हणती, 'एकादा नर ठेवुनियां पाहु अंत तो याचा, ।
म्हणवुनि गुप्तचि ठेविति नदीतटीं करुनि [5]आश्र तोयाचा.' ॥ २३

असतां गुप्त नदीचे तटीं मनुज पावतो भय, [6]प्रहरीं ।
[6]माध्यान्हीं भय पावे, जाला व्याकूळ वो [7]भयप्रहरीं. ॥ २४

पावुनि बहु भय पोटीं [8]मूत्रपुरीषें भरूनियां पेट कीं, ।
धांवत येऊनि पडे व्याकुळ जैसी भरोनियां पटकी. ॥ २५

द्विजगण पुसती त्यातें, 'ऐसा भयभीत होसि पैं कां रे!?' ।
बोले तयांसि मग तो, 'न सहे बहु फार तेज ऐका रे! ॥ २६

अति बहु थोर भयाचे माझ्या हृदयांत बैसले धडके, ।
भडके ताप शरीरीं, शुष्क तृणीं अनळ जेंवि तो भडके. ॥ २७

पुरता अंत **गुरू**चा पाहुं असें चित्तिं धरित मानुज जो, ।
घालुनि नरकीं त्यातें जाचणि अति बहुत करि [10]तमानुज जो.' ॥ २८

---

१. विष्णूचा. २. बर्फ. ३. प्रहर. ४. ध्यान करणारा. ५. आश्रय. ६. मध्यान्हसमयीं. ७. भयाच्या प्रहारानें. ८. मूत्र आणि मल यानें. ९. वस्त्र. १०. केतू (?) तम=राहू.

योगिनि जल द्विभागुनि जाल्या गुरुसी स्वधामिं त्या नेल्या, ।
होतां गंगासुत तटिं देखियल्या नेत्रपद्मिं त्यानें त्या. ॥ २९
आश्चर्या करुनि म्हणे, 'केंवि नदीचें द्विभागलें ज्यामी[1], ।
अवतारी हरि हर हा जालों भूधन्य[2] पाहिले ज्या मी. ॥ ३०
जरि हा नसता ईश्वर तरि मग कां देवकन्यका नेल्या? ।
देवचि मी वोळखिला गर्भिं जसा हरि परीक्षकानें[3] त्या. ॥ ३१
गंगापुत्र गुरुपदीं मग तो लावूनि चित्तवृत्तीतें, ।
कृष्णातटिं बैसे त्या रक्षित सेतोंस तो स्ववृत्तीतें[4]. ॥ ३२
इकडे भोजन करुनी श्रीगुरु दुक् खंड आयुधानीतें (?) ।
द्वैभागुनि मग येती स्वस्थानीं दंडेआयुधानी[5] ते. ॥ ३३
योगिनि दुसरे दिवशीं येउनि गुरुची करोनि पूजा त्या, ।
स्वगृहीं मग माध्यान्हीं घेउनि गुरुलागिं जाहल्या जात्या. ॥ ३४
होता गंगासुत जो लक्षित तन्मार्ग आपल्या क्षेत्रित[6], ।
जैसा मार्गस्थ नदी कूपतडागासि लक्षितो तृषित. ॥ ३५
तो गेला गुरुसंगें योगिनि ज्या त्या सुरत्नगेहा जों, ।
तों त्या म्हणती, 'आला गुरुसंगें मनुज कोण गे! हा जो.' ॥ ३६
पुसती तयासि गुरु मग, 'येथें तूं कोळिपूत[7] कां येसी?' ।
तो बोले, 'यास्तव ये करुं तव दर्शन सुपूत कायेसी.' ॥ ३७
गुरुची स्तुति करि मग तो ठेवुनियां मस्तका गुरुपदातें, ।
'धन्य' म्हणे 'जन्मुनि मी जालों, जाइन महागुरुपदातें[8]. ॥ ३८
गुरु म्हणती, 'सांगुं नको पुसती जरि विप्र वर्तमानासी, ।
मरशिल; न पवसि, होतां सांगाया तूं प्रवृत्त[9], मानासी[10].' ॥ ३९
भोजन करुनि श्रीगुरु आले मग, कोळिपूत त्या सहित; ।
पादस्पर्शें गुरुच्या जोडे सज्ञान हेंचि त्यास हित. ॥ ४०
गुरु येतांचि उदुंबरिं नमन करुनि करि सुचित्तवृत्तीतें, ।
वृत्तिस्थानीं जातां सांपडलें धननिधान वृत्तीतें. ॥ ४१

---

१. पाणी (?) ज्यामि (सं)=प्रवाह. २. पृथ्वीवर धन्य. ३. परीक्षित् राजा उत्तरेच्या गर्भांत असतांना अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रापासून कृष्णानें त्याचें रक्षण केलें. त्या वेळींच त्यानें कृष्णाची ओळख धरिली—अशी कथा आहे. ४. आपल्या वृत्तीच्या शेतास. ५. दंडधारण करणारे. ६. शेतांत. ७. कोळ्याचा पुत्र. ८. फार मोठ्या योग्यतेला. ९. तयार. १०. 'न पवसी' याचें कर्म.

श्रीगुरुची मग सेवा करुनि पदीं करि अनेकदां नमन, ।
न चळे गिरि जेंवि, चळे तदहंकृतिवायुनें कदा न मन. ॥ ४२
मग गुरुसि म्हणे नर तो, 'येतां जी पुनव माघमासाची, ।
नाशी माघस्नानें प्रयाग दुरितें अमोघ मासांचीं[1]. ॥ ४३
ऐसा द्विजगण वदतां ऐके कानें विशेष महिम्यातें, ।
केंवि प्रयाग काशी? न पाहि उत्तम विशेष महिम्यातें.' ॥ ४४
गुरु म्हणती ईषुगंगाकृष्णासंग[2] प्रयाग त्यासम हा, ।
एक स्नान घडे ज्या पुण्य घडे स्नान माघ त्यास महा, ॥ ४५
इच्छी तव पाह्याला जरि हो! प्रत्यक्ष तो प्रयाग मन, ।
व्याघ्रांबर आसन हें धरि रे! करुं शीघ्र हो! तया गमन. ॥ ४६
व्याघ्रांबर धरि म्हणतां दृढ धरिलें स्वकरिं हो! तयानें तें, ।
प्रातःकाळीं मनगति प्रयागिं गुरु जाहले तया नेते. ॥ ४७
तेथें स्नान करोनी माध्यान्हीं त्यास न्हेति काशीला, ।
श्रीविश्वेश्वर दाविति तेथें स्नानासि करुनि त्या शीला. ॥ ४८
तेथुनि गयेसि येउनि दावुनियां हरिपदास्तमानीं[3] तो, ।
स्वस्थानीं गुरु येतां धन्य मनीं कोळिपूत मानी तो. ॥ ४९
ऐशी किरातपुत्रा दाखविली सुस्थळीं सुयात्रा ते, ।
भक्तिस्तव सद्गुरु ते यापरि हो! जाहले तया त्राते. ॥ ५०
यापरि अपार महिमा प्रगटे मग गुरु विचार ते करिती, ।
गुप्त वसोनी तेथें प्रगटूं गाणगपुरीस लोकरिती. ॥ ५१
कळतां विचार म्हणती योगिनि येऊनि सद्गुरूपासीं, ।
'अम्हां हर्ष बहु मनीं नित्य तुझ्या देखुनी स्वरूपासी. ॥ ५२
हर्षामृतपान सदा अम्हां तुझिया सुदर्शनें होतें, ।
दुरितहनन होय जसें दैत्यहनन हरि सुदर्शनें हो! तें. ॥ ५३
कोठें जावें सांगा मित्रानें त्यागितां स्वकिरणातें? ।
अम्ही कसें वसावें सोडुनि तुझिया गुरो! सुचरणातें? ॥ ५४
तुजवांचुन रक्षीना येतां तो करुनि काळ आ जवळ, ।
करुणावळ[4] तूं श्रीगुरु अम्हां केकीकडेस[5] आज वळ. ॥ ५५

---

१. पुष्कळ दिवसांची. २. पंचगंगा आणि कृष्णेचा संगम. ३. सायंकाळीं. ४. दया—मेघ. ५. मोराकडे.

मातृरहित बाळक जो तो त्यागुनि जाइ जेंवि हो ! तात, ।
तेंव्यम्हां[1] न त्यागी जातां तूं कष्ट फार होतात. ॥ ५६
तुजजवळ अन्नपूर्णा श्रीगुरुराया ! सदा वसोनि असे, ।
न त्यज अम्हां.' मग गुरु बोलति तद्बोल आयकोनि असे. ॥ ५७
कृपण मन खिन्न होतें जाल्या तद्धरण[2] जेंवि ठेवि, न हो ।
तेंवि तुमचें मन कदा; उदुंबरीं अन्नपूर्णि ठेविन हो ! ॥ ५८
ठेवीन पादुका या उदुंबरीं गुप्त मी अभंग वसें, ।
गवसे न अभक्तासी नवसें हि, सुभक्त जे तया गवसें. ॥ ५९
आतां स्वगृहींच तुम्ही उदुंबरा धरुनि हे नदि वसाची, ।
साची प्रभातसमयीं देइन भेटी तुम्हां न दिवसाची. ॥ ६०
सतुम्हां[3] उदुंबरा मत्पदमुद्रा पूजितील मानव ते ।
इच्छित पावति, त्यातें होत्यंतीं[4] हरिहरादि मानव ते. ॥ ६१
करणेचि पादुकांचे द्रुम आणि तुम्ही हि साह्यतेलाही, ।
तेलाहि वर्तिकेच्या[5] दीप जसा पूर्ण साह्य ते लाही[6]. ॥ ६२
आणोनि पादुकांचें करितां जो पूजनासि होय शमी[7], ।
इच्छित देउनि मनिंचें देइ सदा त्या जनास हो ! यश मी. ॥ ६३
वाटे संसार वृथा नकोचि, हा त्याचिये मग मनासी.' ।
करिती गाणगनगरा ऐसा सांगोनि नेम गमनासी. ॥ ६४
होऊनि गुप्त तेथें प्रगटे गुरुराज गाणगागावीं, ।
शिष्या श्रीगुरुचीं ही चरितें हि सदैव जाण गा ! गावीं. ॥ ६५
भावें सदैव गुरुची रामात्मजपुत्र कीर्ति हे गायी, ।
श्रवणें इच्छित दाती चरितकथाकामधेनु हे गायी. ॥ ६६

---

## अध्याय[8] पंधरावा.

पद वंदुनि सिद्धाचे शिष्य वदे त्यास नामकर्णी तो, ।
'श्रीगुरुचरित सुधारस घालिं' वदे 'करि अराम, कर्णीं तो. ॥ १
गुरुचरितौषधि मोठी भवरोगाचें करी निवारण ते, ।

---

१. तेंवि+अम्हां. २. तत् (त्याची) ठेवि (ठेव, पैसा) हरण जाल्या. ३. तुम्हासुद्धां. ४. होती+अंतीं. ५. वातीच्या. ६. प्राप्त होई. ७. मनोविकारांचें शमन करणारा. ८. या अध्यायांत मुळांतील २० आणि २१ या दोन अध्यायांतील कथाभाग आला आहे.

अरविंदाचें करिती समूळ निर्दलन जेंवि वारण ते.' ॥ २
सिद्ध म्हणे, 'तूं ज्ञानी होसी शुक याज्ञवल्कि तैसाची, ।
श्रीगुरुचरितश्रवणीं जडली तव चित्तवृत्ति तैं साची. ॥ ३
आतां म्यां तुज नलगे सादर ऐसें कदा वदावें तें, ।
मन पोळ मत्त बांधिसि लावुनियां तू विवेकदावें तें. ॥ ४
विषयपशूसि तथापिहि सन्निध देखोनि फुस्कटोनि बुजे[1], ।
त्याच्या फुस्कटवातें कर्णाचें द्वार आटपोनि बुजे. ॥ ५
सादरतेचा वायू कर्णाचें द्वार पूर्ण तो उघडी, ।
रगडी विषयपशूसी उडवुनियां नेत दूर तेच घडी. ॥ ६
वायूसादरतेचा मनपोळा लागतांचि शीतळ तो, ।
मळला संति कथेचा देखुनियां वसक घेत शीतळ तो.' ॥ ७
शिष्य म्हणे, 'गुरुराया! मजलागीं धन्य तूंचि उद्धरिलें, ।
सावध सादरवातें केलें म्हणउनि पुन्हा पदा धरिलें. ॥ ८
निर्भयहि मी स्थिर मनीं होयि जसा धीर वीर संग्रामीं, ।
चरितकथा सांग पुढें गेल्या गुरुराज गाणगाग्रामीं.' ॥ ९
सिद्ध म्हणे, 'प्रकटपणें गेले गुरुराज गाणगापुरितें, ।
परि त्या उदुंबरींचें सुस्थळ गुरुनीं न पाडिलेंच रितें. ॥ १०
गुरु गेल्यावरि मागें जालें जें चरित तें करीं श्रवण, ।
श्रवणें इच्छित पावुनि मानससह पूत तें करी श्रवण. ॥ ११
वर देउनि ठेवुनियां स्वपादुका गुरु उदुंबरीं ते हो! ।
गेल्या महिमा तेथें होय कथा ऐकतां बरी ते हो. ॥ १२
ब्राह्मण शिरोळगांवीं गंगाधरनाम तत्सती समती[2] ।
होती पतिव्रतापणि; न सती तसि ते पुरीस[3], तीसम[4] ती. ॥ १३
होती पतिव्रता परि न होय कधिं ती सजीवपुत्रवती, ।
पावे अति बहुकष्टा गर्भिणि होऊनि गर्भ ते स्रवती. ॥ १४
नानाव्रतें करी परि न जालि ती स्थीरगर्भिणी होती, ।
सज्जन सांगति काढुनि कर्माची शास्त्रदुर्बिणी[5] हो! ती. ॥ १५
म्हणती पाडिति गर्भा, वा[6] ऋण घेउनि न देत यास गती, ।

---

१. भरून जाई. २. बुद्धिमती. ३. त्या गांवीं तेथें तिच्यासारखी दुसरी पतिव्रता नव्हती. ४. तिच्यासारखी तीच. ५. शास्त्ररूपी दुर्बिण (दूरचें दाखविणारें यंत्र.) ६. अथवा.

कर्मविपाक वदे हें ऐकुनि नमुनि द्विजां वदे मग ती. ॥ १६
'म्यां काय पाप केलें सांगा जें साच पूर्वजननीं तें, ।
सांगुनि उपाय मजला रक्षा शिशु रक्षि जेंवि जननीतें.' ॥ १७
सांगति मग तिजलागीं पूर्वार्जितपाप तेच विप्रवर, ।
घेसी ऋण विप्राचें शौनक हें गोत्र ज्या त्रय प्रवर. ॥ १८
देशि न ऋण म्हणउनि तो बोले तुज विप्र धरुनि कोपाशा,[1] ।
लावीन म्हणे[2] ग्रीवे, दे मद्धन लोभ धरुं नको, पाशा.[3] ॥ १९
नायकशी तूं म्हणुनी कोपे मानेस पाश तो लावी, ।
करिसी क्रियाहि नच तत्. कोणाच्याशे[4] तवाश तोलावी. ॥ २०
तो झाला ब्रह्मग्रह तुझिया पाडीत तोचि गर्भास, ।
वाढों न देचि वंशा होई आम्हासि सत्य हा भास. ॥ २१
सांगूं उपाय यासी तुझिया जरि सत्य हें मनांत रुचे, ।
कृष्णातीरा जाउनि पूजन करि त्या उदुंबरा तरुचें. ॥ २२
औदुंबरातळीं त्या श्रीगुरुच्या दिव्य पादुका असती, ।
पूजी उदुंबरासह तेथें गुरुराज गुप्त ते वसती. ॥ २३
अघहरणीं[5] न्हा, स्नपना[6] उदुंबरा सातदां करी स्वकरीं, ।
गुरुपादुकाऽभिषिंचुनि पुनरपि तूं स्नान काम्यतीर्थि करीं. ॥ २४
गुरुपादुकांसि पूजुनि त्या विप्राचें करीं क्रियाकर्म, ।
त्याच्या गोत्रज विप्रा देइ शतद्रव्य जाण हें वर्म.[7] ॥ २५
गुरुपादुकाऽर्चितां मग गुरु तव दवडील विप्रहत्त्या ते, ।
भजतां उदुंबरीं गुरु संहारित अघ असे महत्त्यातें.' ॥ २६
विनवी पुन्हा नमुनि ती, 'अर्चिन मी सांग गुरुपदें हातें, ।
परि न मिळे शतधन तें सेवे श्रमवीन पापदेहातें. ॥ २७
काय करूं मद्गेहीं शत रुपये ते कदा न सांपडती, ।
तदभिमुख[8] म्हणुनि नमना जालि करुनि शुद्ध मानसा पडती. ॥ २८
शतधन न मिळेचि कधीं मज सांगा स्पष्ट नीत्यहो[9] तात! ।

---

१. कोप+आशा=कोप आणि आशा. २. मानेस. ३. फांस. ४. कोणाच्या आशेबरोबर तुझ्या आशेची बरोबरी करावी? तात्पर्य तूं अशी लोभी. ५. पापविनाशी तीर्थांत. ६. धुणें, स्नान घालणें. ७. गुह्य. ८. म्हणुनि मानसा शुद्ध करुनि तदभिमुख (त्यांचे पुढें) नमना पडती जालि—असा अन्वय. ९. नीति+अहो. अहो तात! मज स्पष्ट नीति सांगा.

गर्भ स्रवती याचे अति बहु मज कष्ट नित्य होतात.' ॥ २९

द्विज म्हणती, 'भज गुरुसी द्रव्य तुला जरि मिळे न शंभर तें, ।
दुःखाग्नि शांतविल तो करुणाब्धी, ये म्हणोनि शं[1] भरतें. ॥ ३०

जितकें मिळेल तुजला खर्ची विप्रक्रियेस त्या धन तें, ।
सांगितलें पूर्वीं जें करि गुरुपदअर्चनादि साधन तें.' ॥ ३१

मग ती त्या अवहरणीं न्हाउनि न करी विलंब राबुं[2] सती, ।
लागे गुरुपदसेवे नमोनि घाली उदुंबरांऽबुस[3] ती. ॥ ३२

अभिषेकुनि मग पूजी भावें गुरुपादुका द्रुमासह ती, ।
सेवा करि, उष्णहिमा[4] त्या जाली त्रय दिवा हिमा सहती. ॥ ३३

सेवा करितां तिसरे रात्रीं स्वप्नीं कुविप्र जो ग्रह तो, ।
येउनि धन दे बोले मारिन नातरि करीन निग्रह[5] तो. ॥ ३४

नेदिसि शत धन जरि तें वाढुं न दे करिन लांडगा[6] वंश, ।
घेईन तुझे प्राणा म्हणुनि करीं घेत दांडगा वंशीं[7]. ॥ ३५

मारावयासि येतां धावुनि मागें उदुंबरांत लपे, ।
तों देखे गुरुमूर्ती दिव्य जसी वीज अंबरांत[8] लपे. ॥ ३६

देखुनि गुरुमूर्तीसी नमुनि पदा पृष्ठभागिं ते दडली, ।
जडली मनवृत्ति पदीं तों विप्रा गुरुसि गांठ ते पडली. ॥ ३७

विप्र म्हणे, 'यति! माझ्या अरिचा तूं पक्षपात कां करिसी?' ।
पडतां दृढ मगरमिठी सोडिल अमुप क्षेपांत[9] कां करिसी[10]? ॥ ३८

तापसि तुम्ही यतीनीं न करावा पक्षपात सहसाही, ।
ध्यावें हरिनाम सदा वदती अठराणि[11] चारसह साही.' ॥ ३९

गुरु म्हणती 'ब्रह्मग्रह होउनि तूं वदसि गोष्टि शास्त्रींच्या, ।
दुष्टा! हो मागें या पाडिसि गर्भासि नित्यशा[12] स्त्रीच्या. ॥ ४०

हें अव न जाणसि कसें स्त्रीहत्या करुंहि पाहसी पापा! ।
कोठें हें भोगिसि रे! स्त्री पीडुनि घेसि या बहु हें[13] पापा. ॥ ४१

---

१. शं (सुख त्यातें) भरतें ये. २. सेवा करण्यास. ३. उदुंबरा+अंबुस (पाण्याला). ४. त्या त्रय दिवा (तीन अहोरात्र) उष्णहिमा (उष्णता आणि थंडी) सहती जाली. ५. दाबून ठेवणें, नष्ट करणें. ६. लांडा, छिन्न. ७. वेळू, काठी. ८. आकाशांत. ९. पाण्यांत. १०. हत्तीस. ११. अठरा+आणि. अठरा पुराणें, चार वेद आणि सहा शास्त्रें. १२. नित्यशः, नेहमीं. १३. 'निश्चयानें' या अर्थी अव्यय.

अम्ही सांगूं जैसें ऐकसि जरि जासि उद्धरा गतिसी, ।
करिल क्रिया तुझी हे न धरि, करि सुचित्त वृत्ति, रागासी. ॥ ४२
नैकसि तरि जा येथुनि रक्षिन भक्तासि पामरा! नरकीं ।
पच जा, पिशाच होसी शास्त्रीहि असोनि विप्र तूं नर कीं.' ॥ ४३
श्रीगुरुवाक्यें ऐकुनि अंघ्री साष्टांग तो करी नमना, ।
बोले, 'जें गुरु! सांगसि ऐकुनि तें शुद्ध मी करीन मना.' ॥ ४४
गुरु म्हणती, 'द्विजपत्नी करितां त्वत्कर्म सत्य उद्धरसी, ।
धरसी मानें जरि जासी स्वर्गी, हे तुटुनि कर्मबद्धरसी.'[१] ॥ ४५
'कर्मांतर करि याचें' त्या सांगति मग सुविप्रयुवतीस, ।
'होतिल सत्पुत्र तुला' वदती गुरु हर्ष होय तव तीस. ॥ ४६
स्वप्नीं गुरुनीं ऐसें दाखविलें प्रकटुनि स्वरूप तिला, ।
जागृत होउनि येउनि सांगे मग वर्तमान ते पतिला. ॥ ४७
श्रीगुरुआज्ञा जैसी क्रिया सती तेंवि करित आचरण, ।
जाली मुक्ती विप्रा श्रीगुरुचे दृष्टि देखतां चरण. ॥ ४८
करि मग आनंद बहुत विप्रसती श्रीगुरुप्रसादें ती, ।
प्रसवे द्वय दिव्य सुता, स्वप्नीं वर सद्गुरू जसा देती. ॥ ४९
करणें म्हणती चौला होतां पुत्रासि तीन वर्षें तीं, ।
गंगाधर आणि स्त्री दोघें साहित्य करिति हर्षें तीं. ॥ ५०
तों ते दिवशीं झाला तीव्र धनुर्वात एक पुत्रास, ।
गेला प्राण निघुनियां तिजे दिनीं पावुनी वपु त्रास. ॥ ५१
जातां प्राण सुताचा त्या दुःखें शोक ती करी बहुत, ।
दुःखाग्नीनें सतिचा समूळ मग हर्ष[२] होय कोंब हुत. ॥ ५२
'गुरुदत्तबाळ माझा नेसी तूं केंवि हो यमा! यातें.' ।
मज दुःख वर्णवेना तेव्हां ती करिति होय माया तें. ॥ ५३
'केलें काय असें हें श्रीगुरुराया!' म्हणोनि आरडत, ।
प्रेतावरि लोळुनि ती दुःखें पसरोनि दीर्घ आ रडत. ॥ ५४
शांतविती जन मिळुनी विवेक बोधुनि तिला अनेक रिती, ।
शांत परंतु न होइच अति बहुदुःखें प्रलापनें करिती. ॥ ५५

---

१. कर्मबंधनरूप दोरी. २. हर्षरूप कोंब (अंकुर) हुत (दग्ध) होय.

द्विज म्हणति, 'होइल निशी, दे नेउनि जाळुं पुत्रदेहातें,' ।
ती 'मजसह दहन करा' म्हणे 'न[1] तरि[1] उचलुं शव[2] न दे हातें.' ॥ ५६
ते म्हणति, 'सुतासंगें देइ प्राणा न देखिली माया[3], ।
संस्कारूं दे प्रेता व्यर्थ तुला हे झळंबली माया.' ॥ ५७
नेदीच कुणप विप्रीं केला जरि फार बोध हो तीतें, ।
गेले द्विज मग रात्रीं शोकें ती कुणप धरुन होती तें. ॥ ५८
द्विज म्हणती, 'हे नारी सांगितलें नायके, पडो शोकीं, ।
निद्रा करूं चला हो! उपवासचि आजचे घडो शोकीं.' ॥ ५९
मग म्हणती, 'प्रेतासीं संस्कारूं येउनी महत्सकळ[5],' ।
बोलुनि ऐसें निद्रा करिती होऊनि तोषहृत्[6] सकळ. ॥ ६०
प्रातःकाळीं द्विज ते येउनि तिजला विवेकवचनांहीं, ।
बोलुनि म्हणती, 'शव दे संस्कारूं, धरुनि कांहिं फळ नाहीं.' ॥ ६१
परि ती न देचि शव तें सांगे जरि बोध तो तिचा कांत, ।
आला द्व्य प्रहर दिन वर्ते ग्रामींहि थोर आकांत. ॥ ६२
उपवासी ग्राम सकळ केला आकांत रडुनि [7]तोकांहीं, ।
ऐके न कर्कशा स्त्री चालेना तैं उपाय तो कांहीं. ॥ ६३
तों ब्रह्मचारि वेषा श्रीगुरु ये धरुनि ते स्त्रियेजवळ, ।
बोधी विवेक तिजला करुणाकर तोचि गुरु सतेज वळ[8]. ॥ ६४
तिजला म्हणे, 'रडुं नको व्यर्थातां[9] सांग फळ रडुनि काय? ।
मृत्यू न चुके कोणा जाती देवादि ते पडुनि काय. ॥ ६५
संसार [10]हरिणजलवद्देह कसा जेंवि साच बुद्बुद[11] कीं, ।
येती फुटती येती न स्थिर ते राहती कदा उदकीं. ॥ ६६
प्राग्जन्मीं तव भर्ता कोण, असे पुत्र सांग तुजला गे! ।
व्यर्थचि मायामोहें रडसी कां? वेड काय तुज लागे? ॥ ६७
नभ, [12]अनिलानल, जल, भू मिळणी होऊनि पंचतत्वांहीं, ।
त्रिगुणापासुनि घडली देहाची जाण आकृत[13] [14]त्वां ही. ॥ ६८
तत्वां तत्वें मिळतां आकृत नाशोनि जाय देहाची, ।
मायेची लटकी हे कृति, निश्चय चित्ति येउं दे हाची. ॥ ६९

---

१. नाहीं तर. २. प्रेत. ३. (अशी) आई. ४. रात्रीं. ५. मोठ्या पहाटेस. ६. हर्षित मनानें. ७. मुलांनीं. ८. मेघ. ९. व्यर्थ+आतां. १०. मृगजलवत्. ११. बुडबुडा. १२. अ-निल+अनल=वायु+अग्नि. १३. आकार. १४. तूं.

प्राण नये प्रेतासी जरि ऐसी आठ दिनहि गे! रडसी ।
बुडसी मायाजळिं हे पडसी कां व्यर्थ दीर्घ आरडसी. ॥ ७०
देहा संगतिं जीवा घडतें हें पूर्व कर्म आर्जवतें,[1] ।
भोगावयासि लागे जीवा, मीपण मनीं असे जंव तें. ॥ ७१
कैंची मातृपितासुत, कैंची भगिन्याणि[2] बंधु जे दुहिता, ।
मायाकृति लटकी हे जाणें, त्यज शोक तूं करीं स्वहिता. ॥ ७२
आपणचि आपलें गे! सांगातें ये न बांधव सुत पती, ।
मूर्खचि जाणावे जे कष्टुनि इच्छोन पुत्र वसु[3] तपती[4].' ॥ ७३
ब्रह्मज्ञानादि तिला सांगे तो ब्रह्मचारि जननीती,[5] ।
नमुनि तया मग बोले सर्वहि ऐकोनि कुणपजननी[6] ती. ॥ ७४
'म्हणसी भोगायाचें न सुटे जें पूर्वकर्म आचरण, ।
तरि मग किमर्थ धरणें स्वामी! मज सांग सद्गुरूचरण? ॥ ७५
लोखंडाचें कांचन शुद्ध करी स्पर्शनें जसा परिस,[7] ।
त्रैमूर्ती गुरु तैसा दवडी मद्दोष दर्शनें, परिस[8]. ॥ ७६
त्याणें मज हें दिधलें पुत्रद्वय पूर्ण आयु तें ज्याला, ।
सांगे गुरु मजलागीं दाखवुनी पूर्ण तो स्वतेज्याला. ॥ ७७
बोल तयाचे अनृतचि कैसे होतील सांग हो! मातें? ।
त्यास घडो मम हत्या देइन जीवा चिताग्निहोमातें.' ॥ ७८
ऐसा निर्धार तिचा पाहुनि तो ब्रह्मचारि मग तीतें ।
सांगे, 'गुरुस्थळीं ने शव तरि सुत जाइलुत्तमगतीतें[9]. ॥ ७९
आल्यास दया त्याला उठवीलचि सत्य पुत्र तव हा तो, ।
भक्ताची बहु चिंता अहर्निशीं तो सदोदित वहातो. ॥ ८०
या वचनाचें वाटे गुरुचें ध्यातांचि रूप तीस हितें[10], ।
घेउनि मग कुणपासी गेली गुरुचे स्थळा पतीसहित. ॥ ८१
टाकुनि कुणपासि पुढें श्रीगुरुच्या घट्ट पादुका धरिल्या, ।
स्वशिरासि आपटी मग रक्तानें सर्व पादुका भरिल्या. ॥ ८२
द्विज म्हणति, 'कर्कशा तूं पाडिसि गुरुपादुकांवरि असृग्द[11], ।

---

१. सरळपणानें, बिनचुक. २. भगिनी+आणि. ३. द्रव्य. ४. तप करितात. ५. लौकिक-न्याय. ६. प्रेताची आई–मृतमुलाची आई. ७. स्पर्शमणि. ८. ऐक. ९. जाइल+उत्तम+गतीतें=पररूपसंधि. १०. हें 'वाटे' याचें कर्म. ११. रक्त.

ग्रामुपवासी[1] मारिसि करिसी हें कर्म सर्वहि अशुद्ध.' ॥ ८३
मग विनवुनि शव मागति याचक दानासि जेंवि दात्यांला, ।
परि नैके, कुणपासी लावुं न दे हात ती कदा त्यांला. ॥ ८४
तों अस्त होय मग ते म्हणति, 'चला आज होउ उपवास, ।
तस्करभय बहु थंडी येथें प्रावर्ण नाहिं उपवास[2]. ॥ ८५
राहो धरोनि शव, हे भर्त्यासह कर्कशा असो रानीं; ।
काय करावें रात्रीं येथें जरि लुटलियास चोरांनीं? ॥ ८६
दुर्गंधी सुटतां मग देइल टाकुनि निकें शवाऽपाप[3], ।
पदरीं असे किती तरि ईचें न कळेचि केशवा! पाप. ॥ ८७
येऊं प्रात:काळीं आतां येथें नसा[4] चला गेहा, ।
गंगाधर विप्रहि कीं स्त्रीचे बुद्धीस साच लागे हा.' ॥ ८८
बोलुनि ऐसें द्विज ते गेले परि ती धरी मनीं न दर, ।
गुरुपादुकांस धरुनी शोक करी ध्यानिं लावुनी नेदर[5]. ॥ ८९
अतिदु:खानें मग ती बोले, 'गुरुला करोनि शोकास, ।
बुडविशि शोकसमुद्रीं धरिली असतां तुझी गुरो! कास[6]. ॥ ९०
देउनि विश्वास मला घालुनि पाठीस अंगिकाराही ।
करुनी शोकसमुद्रीं लोटिसि, तव कीर्ति हे न कां राही?[7]' ॥ ९१
गंगाधर गुरुसि म्हणे, 'केला अपराध काय गा! ईनें, ।
वत्सापराध होतां त्यागावें वत्स काय गाईनें? ॥ ९२
मत्त मदें होयहि जरि शिक्षासी[8] हे करावि ते करिसी, ।
स्वशिशूवरि तो कोपे तैसें गुरुराज! काय हें करिसी? ॥ ९३
कोप न करिं आलिंगीं बोले जरि शिशु कुबोल आइ कसी, ।
मातृ पिता तूंचि गुरो! कां बा! हे तूं न बोल आयकसी?' ॥ ९४
शोकहि करोनि गुरुचा वार्णिति तीं स्तुति करोनियां महिमा, ।
द्विअहर्निशि नीज नसे तों जाली पूर्ण एक याम[9] हिमा[10]. ॥ ९५
या [11]महिम्या होई तों दु:खें ये नीज विप्रयुवतीला, ।
स्वप्नीं प्रगटोनि तिच्या स्वरूप गुरुराज दावि तंव तीला. ॥ ९६

---

१. ग्राम+उपवासी=सगळा गांव उपाशीं ठेवतेस. २. उपवस्त्र, आंगवस्त्र. ३. शव (प्रेत)+अपाप (आपोआप—न मागतां). ४. राहूं नका. ५. लक्ष. ६. आश्रय. ७. हा तुझा लौकिक (असें केल्यावांचून) राहणार नाहीं काय? ८. शासनास योग्य. ९. प्रहर. १०. रात्र. ११. हकीकत.

सर्वांग भस्मचर्चित पिंगट जटि पीत वास कासेला, ।
करिं दंड शूल भूषण रुद्राक्ष, व्याघ्रचर्म तो सेला[1]. ॥ ९७
आला उदुंबरतळीं तेज जसें कोटि मध्य[2] अर्कांचें, ।
तर्कांचें बळ न चले नामें भय उडवि साच नर्कांचें. ॥ ९८
बोले, 'मज लावुनि कां बोलसि' ते भूमिदेवनारीस[3], ।
दीर्घ स्वरीं रडसि कां आरडतें कीं जसें वना रीसें[4]. ॥ ९९
जाळें काय तव सुता गेला विसरोन वातसा जीव, ।
वायू[5] हा जीव, पुन्हा शव करुं घालोनि वात साजीव.' ॥ १००
काढुनि भस्म, शवाचे वदनीं घालोनि, लावितां भाळीं, ।
होउनि संजीव उठे, दिसे शशी जेंवि उगवतांऽभाळीं[6]. ॥ १०१
इतकें पाहुनि जागी होउनि सांगे वृतांत ती पतिला, ।
तों सुत वदे, 'क्षुधा मज लागे सत्वरित लावि दीप' तिला. ॥ १०२
अत्यानंदें मग ते वाटुनि आश्चर्य फार तैंव्[7] जीतें, ।
घाली क्षुधा क्षमाया स्वथान पुत्राचिया मुखाब्जीं तें. ॥ १०३
स्तन घालितांचि वदनीं बत्तिस वदनींहि सुटति पयधारा, ।
म्हणती मग, 'धन्य गुरो! भक्तांच्या पालका! दिनोद्धारा!' ॥ १०४
दीप प्रदीप्त करुनी पुत्राचें पाहिलें वपू जनकीं[8], ।
तों दिव्य देखुनि म्हणे, 'आतां करुं पादुकांस पूजन कीं.' ॥ १०५
स्नान करुनि मग करिती प्रक्षालन पादुकांस धरुणानें[9], ।
भावें पूजा करिती, केला तों त्या प्रकाश अरुणानें. ॥ १०६
जोडुनि कर मग तिष्ठुनि म्हणती, 'जय जय गुरो! दयाघन गा! ।
रक्षिसि भक्तां पादस्पर्शें नासोनियां तयाऽघनगा[10]. ॥ १०७
त्वद्गुणकीर्तीचा तो लागे न च अंत गा! बहु विशेष, ।
वर्णन करितां दशशतवदनें राहे थकोनि कवि[11] शेष.' ॥ १०८
जोडुनि करा असें जों स्तविती गुरुराजसदय अद्रीतें[12], ।
तों तो उगवुनि आला सतेज आदित्य उदय अद्रीतें. ॥ १०९

---

१. शेला, उपवस्त्र. २. मध्यान्हींच्या सूर्यांचें. ३. त्या ब्राह्मणस्त्रीस. ४. अस्वल. ५. जीव हा वायू (आहे) (तो) वात घालून शव (प्रेत) साजीव (सजीव) करुं. ६. आभाळीं, आकाशांत. ७. तेव्हां. ८. आईबापांनीं. ९. जलानें. १०. तया+अघनगा, त्या (त्याच्या) पापपर्वतास. ११. विद्वान्, शहाणा. १२. अद्री=मेघ.

तों आले द्विजगण तैं पाहति कुमरासि खेळतां, होते ।
जाले आश्चर्य करुनि हर्षभरित कुमर देखतां हो! ते. ॥ ११०
मग गुरुसुपादुकांची पूजा ते करिति [1]भूमिसुरगण ती, ।
ब्राह्मणभोजन जालें ते दिवशीं लागली न नरगणती. ॥ १११
सश्रीस्त्रीसुतपौत्रीं गंगाधर मग सदैव नांदे तो, ।
गुरुपादुकार्चितां गुरु भक्तजनीं इच्छिलें मना देतो.' ॥ ११२
शिष्यासी सिद्ध म्हणे, 'होय असा फार [2]तन्मही महिमा, ।
श्रवणें ज्ञानार्कोदय नाशी [3]अज्ञानदुःखहीमहिमा.' ॥ ११३
रामात्मजसुत अर्ची गुरुमूर्ती बसवुनी हृदब्जातें, ।
अति आनंदें अर्ची जेंवीं श्रीकृष्णमूर्ति [4]कुब्जा [5]ते. ॥ ११४

---

## अध्याय सोळावा.[6]

जोडुनि करांबुजातें शिष्य नमी गुरुपदांबुजाला तो, ।
गुरुचरितामृतपानीं होय बहुत हर्ष फार ज्याला तो. ॥ १
विनवी, 'हे गुरुराया ! श्रीगुरु गेल्या जि गाणगागावीं, ।
कैसा महिमा तेथें प्रकटे मज ते कथा जि! सांगावी.' ॥ २
ऐकुनि सुशिष्यवाक्या गुरुचें पावोनि फार तोष मन, ।
बोले सादर, 'ऐके नाशे अघ, होय ताप तो शमन. ॥ ३
गाणगपुरीं वसे गुरु जेथें [7]भीमाणि जे अमरजेचा ।
संगम तो थोर, जसा यमुनाणी [8]विष्णुचे पदरजेचा. ॥ ४
अश्वत्थ, संगमीं त्या, कल्पतरू तोचि साच या लोकीं, ।
येउनि गुरु ते स्थानीं सुस्थळ तें जाण पूर्ण अवलोकी. ॥ ५
राहे श्रीगुरु मग त्या अश्वत्थातळिं करोनि वास्तव्य, ।
उद्धाराया तो भू अवतरला [9]भक्तसाधवा [10]स्तव्य. ॥ ६
ज्याच्या चरणीं तीर्थें करिती क्षितिचीं समस्त जीं वास, ।
त्यास कशा तीर्थें? परि हिंडुनि उद्धरित भक्तजीवास. ॥ ७
तीर्थें क्षेत्रें क्षितिवरि होतीं जीं प्रकट तीं समस्त करी, ।

---

१. ब्राह्मणसमुदाय. २. मही तत् महिमा होय=त्याचा महिमा पृथ्वीवर पसरला. ३. अज्ञानदुःखरूपी शीतरात्र. ४. कंसदासी. ५. ती. ६. या अध्यायांत मुळांतील अध्याय २२, २३ आणि २४ यांतील कथाभाग घेतला आहे. ७. भीमा+आणि. ८. विष्णुची पदरजा–भागीरथी. ९. भक्त व साधु यांना. १०. विष्णू.

भक्ताच्याऽघसमूहा[1] संहारी सिंह जेंवि मस्त[2] करी. ॥ ८
चरित तुला श्री**गुरु**चें ऐकें सांगेन जाण गा! पुरतें, ।
**का**शी **प्र**याग तैसें क्षेत्र करी थोर **गा**णगापुर तें. ॥ ९
**गा**णगपुरिचा महिमा बहु जो सांगेन तो पुढें तूतें ।
प्रकटी **गुरु**, तत्क्षेत्रा राहुनि पुरवीत भक्तहेतूतें. ॥ १०
प्रकटे तेथें **गुरु**चा महिमा तो पूर्ण ऐक सादर हो, ।
श्रवण करी जो भावें त्या **य**म दावील तो कसा दर[3] हो! ॥ ११
होता द्विज दारिद्री तद्ग्रामीं कर्ममार्ग आचरत, ।
जाउनि **गुरु** भिक्षेसी तद्गेहीं करित ऐक तें चरित. ॥ १२
होते बहु त्या ग्रामीं क्षेत्रीं अभिमानि वेदपाठक ते, ।
अभिमानें नच जाणुनि **गुरु**सी, स्वहितासि जाहले मुकते. ॥ १३
म्हणती, 'अम्ही श्रोत्री[4] कैसा यति ये न आमुच्या सदनीं, ।
दैन्यकगेहीं[5] जातो भिक्षेसी, सर्व निंदिती वदनीं. ॥ १४
मिष्टान्नास्मद्गेहीं[6] प्रतिदिवशीं सुरुचि बहुत शाकाही, ।
कणियाहि तया गेहीं सदैव मिळती न बहु तशा कांहीं. ॥ १५
वास नसे दुभत्याचा अभावचि तया मिळावया कांजी[7], ।
बहु दुभतें अस्मद्गृहिं करि यति अनमान यावया कां जी!' ॥ १६
यापरि नानारीती द्विजगण ते फार जल्पना करिती, ।
भुंकति जरि बहु कुतरीं नाणि मनीं भीति कल्पना करि[8] ती. ॥ १७
विषयाची न प्रीती, प्रीति जसी साधवा विरक्तीची; ।
मिष्टान्नीं श्री**गुरु**सी अप्रीती, प्रीति तेंवि भक्तीची. ॥ १८
न प्रिय नृप जरि कुरव[9], प्रिय बहुतचि **ह**रिस तो जसा **वि**दुर, ।
भक्त प्रिय **गुरु**सि तसे, अभक्तगेहें म्हणे असावि दुर. ॥ १९
सुमनासंगें देवा होय प्रिय जरि असो निसत्व[10] गुण, ।
प्रिय **गुरु**सी तैसा, जो धरि जरि दैन्यक असोनि सत्वगुण. ॥ २०
श्रीमंतासी जैसे प्रिय निर्फळ वृक्ष जरिहि ते सुरु[11] ची, ।
दैन्यकगेहीं तैसी **गुरु**सी भाकरि[12]चि लागते सुरुची. ॥ २१

---

१. भक्ताच्या+अघसमूह. २. माजलेला हत्ती. ३. भय. ४. वेदपारंगत. ५. दरिद्र्याच्या घरीं. ६. मिष्टान्न+अस्मत्+गेहीं. ७ पेज. ८. हत्ती. ९. कौरव. १०. सत्वरहित किंवा कुजकट दोरा. ११. सुरूचें झाड. १२. भाकरी.

भिक्षा मागे द्विज तो दैन्यक जो तद्गृहीं गुरू जाती, ।
नित्यहि भिक्षेसी द्विज भावें करि गुरुचि पादपूजा ती. ॥ २२
ऐसें वर्तन असतां जाला नवलात्र[1] आइका हो! तो, ।
श्रवणें आनंद जसा माता देखोनि बाळका होतो. ॥ २३
एकदिनीं द्विज गेला भिक्षा मागावयास नगरींत, ।
येतां भिक्षेसि घरीं श्रीगुरु तो, केंवि होय मग रीतें[2]. ॥ २४
येतां गुरुविप्रस्त्री पाय धुंवी[3] देउनी बसायाला, ।
चित्तिं म्हणे, 'धान्य नसे उपाय मी तरि करूं कसा याला?' ॥ २५
नमन करी जों पायां, बोले 'भिक्षेसि' गुरुमुनी तंव 'दे.' ।
'बैसा ये पति तों, कण नसेच' सति होउनी विनीत वदे. ॥ २६
गुरु म्हणती, 'धान्य नसे बोलसि हे भूसुराचिये[4] महिषी! ।
घालीं पय भिक्षेसी त्वद्वारीं बांधिली असे महिषी[5].' ॥ २७
द्विजपत्नी मग गुरुसी बोले करुनी पदासि नमना कीं, ।
'वांझ असे जी! महिषी घातलि वेसण वृषाचिसम[6] नाकीं. ॥ २८
भाड्यानें देतों हे खारी[7] मळियांत वाहि मातीतें, ।
मागाया जन येती उदयीं सरतांचि हो हिमा[8] तीतें. ॥ २९
भाडें देउनि नेती वहावया नित्य मृत्तिका जन ते, ।
आले न कोणि आजी लागे, त्यांलागिं वृत्तिकाज[9] न तें. ॥ ३०
गेहीं म्हणुनि असे हे! सांगे गुरुसी नमोनियां लवुनी, ।
'भिक्षेवरि भाड्यावरि आहों संसार अम्हि चालवुनी. ॥ ३१
नाहीं कण आजि घरीं, गेले भिक्षेसि कांत या गांवीं, ।
ते येती तों बैसा श्रीगुरु! किति हे हलाखि[10] सांगावी.' ॥ ३२
गुरु म्हणती, 'जा दोहीं महिषी कां तूं असत्य बोलतिस?' ।
वाटे विश्वास मनीं गुरुचे ऐकोनि सत्य बोल तिस. ॥ ३३
चित्तिं म्हणे, 'देव हरिच भासे मज काय एक हा न करी, ।
कृष्णावतारिं गोधन रक्षी, वरि धरि गिरी महान[11] करीं. ॥ ३४
द्वय घट घेउनि हातीं बैसे मग दोहनास कांस[12] [13]रितीं, ।

---

१. नवल, आश्चर्य. २. चरित्र, चमत्कार. ३. धुवावयास सांगे–धुववी. ४. ब्राह्मणाचे स्त्रिये! ५. म्हैस. ६. बैलाप्रमाणें. ७. हें 'माती'चें विशेषण. ८. रात्र. ९. शेतकाम. १०. गरीबी. ११. मोठा. १२. ओटी. १३. रिकामी–पोकळ.

होय न पयविरहित ती भरि जरि [१]युगभाजनास [२]कासरि ती. ॥ ३५
मानुनि आश्चर्य म्हणे, 'भरिले जरि दोन कुंभ हे परि हें ।
सरलें न पय स्तनिंचें होय नवल कामधेनुचे परि हें. ॥ ३६
दोहन करवेना मग दुग्धें जे दोनि पूर्ण घट होती, ।
आणी उचलुनि गेहीं धरुनि करीं दोनि पूर्ण [३]घट हो! ती. ॥ ३७
पय मग तापवुनीयां निववुनियां देइ **गुरु**वरा सति तें. ।
मग तो प्रसन्न होउनि तेक्षणिं हो! देइ गुरु वरास तितें. ॥ ३८
'[४]भाग्यार्कोदय होइल दैन्यचि हे निरसुनी [५]रजा गेहीं, ।
वचनें सत्यचि नांदा सुत पौत्रीं राहु [६]**नी**रजा गेहीं.' ॥ ३९
देउनि अशा वराला **गुरु** गेले स्वस्थळासि हो! जंव ते, ।
द्विज घेउनि ये धान्यें गेहीं गहुं [७]यावनाळ [८]यव [९]जव ते. ॥ ४०
ऐकुनि वृत्तांत मग तो 'धन्य' म्हणे 'भाग्य आमुचें फळलें, ।
टळलें भवभय तेंही, जळलें अघ, '[१०]पृष्ठिं दैन्य तें वळलें.' ॥ ४१
विप्र म्हणे, 'पत्नीसी अवतारी तो **गुरु** [११]**द्रु**हिण [१२]**भा**व, ।
अथवा **शिव** तद्दर्शन घेउं चला धरुनि सत्वगुणभाव.' ॥ ४२
जाऊनि संगमीं मग पूजिति **गुरु**पदसरोज दोघें तीं, ।
नमिती, षट्पद होउनि जालीं पदअब्जमोद हो घेतीं. ॥ ४३
मग **गुरु**राज तयाला पुनरपि पहिल्या सरीच वर देती, ।
पावे सुत, पौत्र, श्री श्री**गुरु**च्या मग वरप्रसादें ती. ॥ ४४
शिष्या! दुसरे दिवशीं महिषी मागावया सकाळीं ते, ।
जन आले द्विजगेहीं बोले द्विज तो तयांस काळीं ते. ॥ ४५
'दुभती महिषी देऊं वहावया केंवि मृत्तिकेला हो! ।
यति संगमीं, तयें हा मजवरि उपकार पूर्ण केला हो.' ॥ ४६
दुभवी वंध्या महिषी ऐकुनियां तो वृत्तांत राजानें, ।
येउनि म्हणे, 'द्विजा! यति दाखावें मज तुज दिलें वरा ज्यानें.' ॥ ४७
सांगे द्विज राजासी, '**भी**मामरजानदीसुसंगम तो, ।
जेथें तेथें राही तो, मज अवतारि **विष्णु शिव** गमतो. ॥ ४८

---

१. दोन भांडीं. २. म्हैस. ३. बळकट. ४. भाग्यसूर्याचा उदय. ५. रात्र. ६. लक्ष्मी. ७. धान्यविशेष. ८. सातू. ९. जवस. १०. परत गेलें. ११. ब्रह्मा. १२. विष्णु.

संगमिं अश्वत्थतळीं राहे यति पाहुनी सु[1] जागा ती, ।
ऐकुनि परिवारें नृप जाय, सकळ तत्सवें प्रजा गा! ती. ॥ ४९
गुरु म्हणती, 'भूपा! कां मजवरि तूं येसि सैन्यसमुदायीं, ।
वनवासी यति अम्ही काय असों [2]चोरिचाडिसमुदायीं.' ॥ ५०
हांसुनि नृप नमनातें करुनि म्हणे, 'श्रीगुरो! यतीराया! ।
शिवहरि अवतारी तूं तुज कैशा[3] वास[4] नद्यतीरा[5] या? ॥ ५१
शिव, हरि, विधि, यतिरूपें अवतरसी भक्तलोक पाळाया, ।
जालों धन्यचि आजी लागति तव पाद मत्कपाळा[6] या. ॥ ५२
देतों मठ बांधोनी, ग्रामीं करिं वास भक्त उद्धरुनी.' ।
बहु रीतीं नृप विनवी श्रीगुरुचें चरणयुग्म तो धरुनी. ॥ ५३
विनवुनि बहु रीती गुरु, करावया ग्रामिं वास, नेला तो, ।
'पुरवूं' म्हणे नृपतिच्या मनीं गुरुस्वामिवासनेला तो. ॥ ५४
गुरु म्हणती, 'हे भूपा! भक्ति जसी मानसीं तुझे वसत, ।
करिं तैसें, मान्य तया मी, पूजीं सर्व तूं हि देव सं[7]त.' ॥ ५५
गुरुचीं वाक्यें ऐकुनि बसवी नृप आणवोनि शिबिकेला, ।
बसतां सुखासनीं गुरु देवीं दुंदुभिसुनाद नभिं केला. ॥ ५६
वाद्यें वाजत गाजत कीर्ती गुरुला पुरीं तया मिरवी, ।
तो उत्साह पहाया स्थिर पळ राहे द्वितीय या[8]मिं रवी. ॥ ५७
मिरवत नेतां गुरुसी जाला नवलाव, पूर्ण आइकसी ।
तरि तुजवरि करुनि कृपा रक्षिल गुरु बाळकासि आइ कशी. ॥ ५८
अश्वत्थ एक होता त्या ग्रामाउत्तरेस थोर बहू, ।
वरि होता ग्रह, बोले नमुनि पदा गुरुसि मा[9]नवाहुबहू. ॥ ५९
'हे गुरुराज! दयार्णव वाटसि तूं सत्य विष्णु ईश मला, ।
त्वत्पददर्शन होतां मन्मनिंचा सर्व मन्यु[10]ही शमला. ॥ ६०
आतां त्वत्पदसन्निध वास करिन उद्धरोनि ने मातें, ।
नाशीं पिशाचतनु हे, पूजिन तव पद धरोनि नेमातें.' ॥ ६१
गुरु म्हणती, 'संगमिं जा. करितां स्नानासि मुक्त होशील. ।

---

१. चांगली. २. चोरी, चाहाडी वगैरे कृत्यांत. ३. कशास. ४. राहणें. ५. नदीचे कांठीं. ६. मत्कपाळ—माझें कपाळ. ७. भले लोक. ८. प्रहरीं. ९. अगदीं मनुष्याप्रमाणें. १०. क्रोध.

जनक नळा धर्मासम स्वर्गीं वाढेल कीर्ति हो! [1]शील.' ॥ ६२
श्रीगुरु यापरिचा वर त्याचा स्पर्शोनि भाळ दे हातें, ।
करितां स्नान सुमुक्ती तो पावे त्यजुनि भूतदेहातें. ॥ ६३
मिरवत नेतां गुरुसी पहावया पुरुषनारिंच्या [2]झुंडा, ।
[3]घसणी होय जसी ते हरलग्नीं नर गणेश चामुंडा. ॥ ६४
[4]गुरुवरि उधळुनि म्हणती गुलाल परिमळ अपार वेचु [5]बुका ।
[6]क्रयकर फुकाच देती हर्षें धरुनीहि आर्जवें [7]चुंबुका. ॥ ६५
वाजत गाजत गुरुसी उत्साहें नृपति नेत ग्रामांत, ।
देई मठ बांधोनी वर्ते जे पुढिल ऐक गा! [8]मात. ॥ ६६
नानापरि करि सेवा बसवुनि गुरुला सुखासनीं राजा, ।
नेई नित्य स्नाना भीमामरजासुसंगमीं राजा. ॥ ६७
एकादे दिनिं गुरुसी बसवुनि शिबिकेंत पारधीशि वना, ।
नेउनि 'धन्य' म्हणे नृप 'अवतारी हा उदारधी शिव [9]ना. ॥ ६८
भक्ति करी नृप भावें पूजी गुरुपद सुगंध[10]सुमनानें, ।
वाद्यें वाजवुनी करि गुरुसन्मुख गीत नृत्य [11]सुमनानें. ॥ ६९
भक्ताधिन गुरु वर्तति जैसें भक्ताचिया मनांत असे, ।
पसरे कीर्ति दिगंतीं गुरु प्रकट होति ते जनांत असे. ॥ ७०
ऐसें वर्तत असतां एक यती कुमसिपट्टणीं असत, ।
तो निंदी गुरुस सदां दांभिक गुरु [12]संत नव्हे म्हणे असत. ॥ ७१
त्रैविक्रम भारति या नामें तो नरहरीस मानस तें ।
पूजन करि परि निंदी लावी दूषण गुरूत्तमा [13]नसतें. ॥ ७२
निंदी श्रीगुरुसि, म्हणे, 'यति होउनि वाढवीत दंभातें, ।
चातुर्थाश्रम घेणें उतराया भवनिधी [14]तदंभातें. ॥ ७३
ते नरसिंह सरस्वति होउनि, आचारत्याग हो यतिचा ।
करुनी, राज्यश्री जे निशिदिन अंकीत पूर्ण होय [15]तिचा. ॥ ७४

---

१. स्वभाव–वर्तन. २. समुदाय. ३. गर्दी–चेंगराचेंगर. ४. गुरुवरि अपार बुका गुलाल उधळुनि परिमळ वेचु म्हणती; क्रयकर हर्षें चुबुका धरुनीहि आर्जवें (तो बुका) फुकाच देती-असा अन्वय. गाणगापुरींत श्रीगुरूचा प्रवेश होतेवेळचें सकलजनोत्साहाचें हें चित्र आहे. ५. बुका. ६. (बुका) विकत घेणारे. ७. हनुवटीला. ८. गोष्ट, हकीकत. ९. नर. १०. सुमन=पुष्प. ११. शुद्ध मनानें. १२. चांगला. १३. भलतें. १४. तत्+अंभस्=त्या (संसारसमुद्राचें) पाणी. १५. त्या राज्यश्रीचा.

नाना रीती यापरि गुरुनिंदा करि मनीं त्रिविक्रम तो, ।
जाणे तन्मनिंचें[1] गुरु, साक्षाज्जो[2] अवतरे त्रिविक्रम[3] तो. ॥ ७५

श्रीगुरु मग म्हणति, 'नृपा! यति त्रिविक्रम मनांत निंदि मला, ।
विमलार्क मी, मज कसा निंद्यतमाच्याच तोचि लावि मला? ॥ ७६

निघणें आजि वनातें सिद्ध करुनि सैन्य येधवां राया! ।
जाणें कुमसीस असे त्या यतिच्या संशया निवाराया. ॥ ७७

हस्ती अश्व रथादिक सज्ज करुनि चाल सर्व सेनेला, ।
आज्ञा वंदोनि नृपें बसवुनि शिबिकेंत गुरु वना नेला. ॥ ७८

पारधि करोनि नृपती घेउनि गुरुलागिं जाय कुमशीला, ।
भीमातीरीं आले गुरुसंगें हर्ष फार नृपशीला, ॥ ७९

तद्दिनिं मुनि त्रिविक्रम नृहरीपूजा करूं बसे, तरि तें ।
ध्यानीं स्वरूप न च ये, म्हणे, 'पडे आजि केंवि चित्त रितें?' ॥ ८०

चिंता करी मनीं यति, मूर्ति न ये आजि कां मनामाजी[4], ।
तपफळ व्यर्थचि गेलें, व्यर्थ दिसे मोक्षकामना माजी[5]. ॥ ८१

चिंता करि मनिं असि जो नृपसह यतिरूप ते चमू पाही, ।
अवलोकीत मनींचे नृहरीरूपें गुरू स्वरूपाही. ॥ ८२

विस्मय अति बहु मानी नृहरीरूपासि पाहुन मनातें, ।
घालित लोटांगण ये श्रीगुरुचे जवळि करित नमनातें. ॥ ८३

नमन करित जों आला लोटांगण घेत सद्गुरूपासीं. ।
तों नृहरीरूपासी लपवुनि गुरु धरित तो स्वरूपासी. ॥ ८४

होतां गुरु यतिरूपें भारतियति घाबरोन हृदयातें, ।
विनवी गुरुस 'कारिं' म्हणे 'मजवरि, मी अल्पबुद्धि नृ[6], दया ते. ॥ ८५

होता गर्व मदुदरीं अवतरुनि त्वांचि सर्व तो हरिला, ।
केलें सार्थक माझें आजवरी पूजिलेंचि नरहरिला. ॥ ८६

साक्षांत नरहरी तूं अवतरसी भूमिं[7] भक्त ताराया, ।
अज्ञानें निंदीं मी मजवरि न धरींच वक्रता राया! ॥ ८७

यतिरूप सर्व दाविसि न कळे हें कोण सान थोर मला, ।

---

१. त्रिविक्रम भटाच्या मनांतलें. २. साक्षात्+जो. ३. वामनरूपी विष्णू. ४. मनामध्यें. ५. माझी. ६. नर, मनुष्य. ७. पृथ्वीवर.

कोणा नमूं दयानिधि! चिं[1]तागज हृदयकाननीं रमला. ॥ ८८

भक्तजनासी तारक तुजवांचुनि मज रिपा[2] दिसेना जी! ।
दावोनि मुख्यरूपा दावी सर्वहि नृपादि सेना जी. ॥ ८९

गुरु तूं अनंतरूपी, अंत नसे, तूं परात्पर, तुझा कीं; ।
बहुरूप, एक होयी, कृपा तुझी मजकडे प[3]रतु, झा[4]कीं.' ॥ ९०

यापरि नाना रीती त्या करितां स्तुति अपार हो य[5]तिनें, ।
श्रीगुरुराज दयाघन संतोषी बहुत फार होय तिनें. ॥ ९१

होउनि कृपाळु गुरु मग करि प्रकट नृपतिसहित सेना कीं, ।
दावी स्वरूप गुरु मग दु[6]राइ काढीत मुनि असे ना[6]कीं. ॥ ९२

श्रीगुरु म्हणति मग तया, 'म्हणसी मजलागिं दंभ आचरित, ।
दंभ कसे ते, कैसी यत्याचरणाचि सांग साच रित.' ॥ ९३

ऐकुनि गुरुचीं वाक्यें नमना यति गुरुचिया पदा करितो, ।
'अज्ञानें गर्वमदें होय' म्हणे 'मत्त मी जसा क[7]रि तो. ॥ ९४

अपराधी मी, मजला तारीं तूं करुनियां क्षमा सर्व, ।
जड मूढ तारण्यासी येसी अवतरुनि तूं क्ष[8]मा स[9]र्व.' ॥ ९५

नानापरि स्तुति करी पुनःपुन्हा गुरुपदांबुजा नमुनी, ।
गुरु म्हणती, 'मद्भक्तीं लागुनि होशील [10]सर्वजान मुनी!' ॥ ९६

मागति निरोप मुनिसी स्वस्थानीं गुरु करावया गमना, ।
म्हणत मुनी, 'त्वत्सेवे येइन मी, नावडे वियोग मना.' ॥ ९७

गुरु म्हणति नृहरिरूपें [11]त्वद्धृत्कमळीं सदैव मी वसत, ।
अर्ची नित्य मनीं तूं, वदति तुला श्रेष्ठ भूमिदेव सत.' ॥ ९८

नानापरि बोधुनियां भारतियति कुमशिलाचि राहविला, ।
हर्ष बहु मनीं मुनिच्या जें[12]व्यनळीं अर्पितां सु[13]रां [14]हविला. ॥ ९९

मुनिला राहवुनी गुरु येती गाणगपुरीं नृपासहित, ।
शिष्या! गुरुसंगानें यापरिचें जोडिलें नृपास हित. ॥ १००

---

१. माझ्या हृदयवनामध्यें चिंतागज रमला. मला फार काळजी लागली आहे. २. दुजा (?). ३. परतो, परत येवो. ४. याचें कर्म 'बहुरूप'. ५. त्या यतिनें (त्रिविक्रमानें). ६. नाकीं दुराई काढणें=नाक घांसून शरण येणें, क्षमा मागणें. ७. हत्ती. ८. पृथ्वी. ९. विष्णु (?). १०. सर्वज्ञ(?). ११. त्वत्+हृत्+कमळीं=तुझ्या हृदयकमळांत. १२. जेंवि+अनळीं (अग्नीमध्यें). १३. देवांना. १४. अग्नींत टाकिलेली आहुति.

यापरि **गुरु** प्रकटुनी केली क्षिति कीर्ति; या चरित्रास, ।
करितां पठण श्रवणें क्षणहि बसों नेदि अंतरिं त्रास. ॥ १०१

**गुरु**सेवेविण करणें, जाणें संसार हा मना! तूस; ।
**गुरु**कीर्ती वर्णाया छंद अहवस्वि[१] (?) **रामनातूस**. ॥ १०२

---

## अध्याय सतरावा.[२]

ठेवुनियां शीर्ष पदीं विनवी **सिद्धा**सि शिष्य शीरमणी,[३] ।
बोले मंजुळवचनीं, पतिव्रता पतिसवें जशी रमणी. ॥ १

'**सिद्ध**गुरो जी! श्री**गुरु**चरितसुधेहून गोड न सुधा ती, ।
चरितसुधा भव तारी, तारक[४] दावी हि मार्ग न सुधा ती. ॥ २

सांग कथा **गुरु**रायें **त्रिविक्रमा** विश्वरूप दाखविलें, ।
चरितामृत पुढिलें मज हें गुरु! तूं पाहिजेच चाखविलें. ॥ ३

चरितसुधा मजलागीं श्रुतिमुखि[५] पाजुनि पवित्र केलें हो! ।
लागे गोड म्हणुनियां अधिकाधिक चित्त हें भुकेलें हो.' ॥ ४

**सिद्ध** म्हणे, 'बा शिष्या! धन्यचि तूं भक्तिनेंचि आइकसी.' ।
सांगे, कुरवाळि तया हर्षें, कुरवाळि बाळ आइ कसी? ॥ ५

प्राप्ती गुरुपद होण्या श्रवणचि हा योग, नों[६] शशिश्रवण,[७] ।
साधी निःसंशय रे! करिं तूं भवरोगनाशशिश्रवण.[८] ॥ ६

**विदुरा** नगरीं होता दुष्टचि नृप जातिहीन तो यवन, ।
विप्रांसी त्रासा दे; मार्गस्थां जेंवि हीनतोय[९] वन.[१०] ॥ ७

यवन म्हणे तो विप्रां, 'म्हणणें माझे सभेंत निगमातें,[११] ।
देइन धना, न पीडि त्याला, होईल हर्ष मग मातें. ॥ ८

सांगे निगमार्थ मला त्या देइन बहुत आइका द्रव्य, ।
ऐकुनि बुध जे त्रासा पावति, अहिसत्रिं जेंवि काद्रव्य.[१२] ॥ ९

मतिमंद मूर्ख जे द्विज यवनसभे पठति शास्त्रवेदास, ।

---

१. अहोरात्र. २. या अध्यायांत मुळांतील अध्याय २५, २६ व २७ यांतील कथाभाग आला आहे. ३. शिरोमणि. ४. ती (स्वर्गांतील प्रसिद्ध अमृत) तारक (असा) सुधा (सरळ) मार्ग हि न दावी—असा अन्वय. ५. कर्णद्वारा. ६. नाहीं, नव्हे. ७. अमृतसिद्धियोग. ८. दिव्यौषध. ९. ज्यांत पाण्याचा तोटा आहे असें. १०. अरण्य. ११. वेद. १२. सर्प.

म्लेंच्छाज्ञेनें वर्तति धनइच्छेंकरुनि ते जसे दास.' ॥ १०

कपटमतीनें म्लेंच्छें ऐकुनि यज्ञक्रियेसि धन दे; तें ।
होउनि पशुवधविषयीं, करिती मग बहुत विप्र निंदेतें. ॥ ११

मुख नाक धरुनि मुटकुनि पशुचा द्विज करिति ते असा वध कीं, ।
म्हणविति पवित्र अम्ही भक्षक मुडदार ते असावध कीं. ॥ १२

पशुहिंसक यवन म्हणुनि निंदिति अम्हा स्वकर्म लपवूनी, ।
मिरविति पवित्रतेला व्यर्थचि ते द्विज करोनि तप ऊनीं[1]. ॥ १३

पढती, चर्चा करिती, त्यांसि यवन भूप फार धन देतो, ।
ज्या विप्रा पूजि यवन, पूजियलें मानि चित्तिं धनदें[2] तो. ॥ १४

देशोदेशीं कीर्ती गेली धन देत यवन राजा ती, ।
ऐकोनि मंदधी द्विज बहु उन्मत्त तत्पुरा द्वि[3] जाती. ॥ १५

म्हणती षडशाह्यम्ही[4] त्रिवेदि[5] विद्ये न अंत रीजाला[6], ।
बोलावि विप्र चर्चे विद्याअभिमान अंतरा[7] ज्याला. ॥ १६

त्या विप्रां यवनप्रभु बसवी देऊन फार अभि[8] मानें; ।
'चर्चा करा' म्हणे नृप 'या स्वपुरींच्या द्विजांसि[9] अभिमानें[10]. ॥ १७

जिंकिति जे चर्चेसी देइन त्यां बहुत जातरूपातें[11], ।
मिरविन बैसवुनि गजीं पावति ते विप्रजात[12] रूपातें[13].' ॥ १८

ऐकुनि नृपवच बुधजन विप्र म्हणति, 'कोण यांस समतेला, ।
नाहिं कराया चर्चा, होईल कशी घृताचि[14] समें[15] तेला.' ॥ १९

मानें म्हणती, 'ज्या झाला मद्याचा स्पर्श शुद्र आप्याला, ।
होइल काय न दोषी हर्षे तें जो करोनि आप्याला. ॥ २०

ऐसे मद उन्मत्त द्विज हे यवनाचिये सभे पढती. ।
कोण करिल चर्चेला? बुधविद्वज्जन मनीं बहुत कढती[16]. ॥ २१

बाह्य[17] म्हणति, 'भूपा! हे द्विज, यासम नाहिं; मान[18] यांला जो ।

---

१. उन्हांत. २. कुबेरानें. ३. दोन. हें 'द्विज' याचें विशेषण. ४. षट्शास्त्री+अम्ही. ५. ऋक्, यजुस् आणि साम असे तीन वेद जाणणारे. ६. ह्याचा संबंध 'म्हणती'कडे. ७. अंतःकरणांत. ८. सन्मुख, समोर. ९. ब्राह्मणांबरोबर. १०. चढाओढीनें. ११. जातरूप=सोनें. १२. सर्व विप्र. १३. महत्त्वाला. १४. तुपाची. १५. बरोबरी. १६. संतापती. १७. बाहेरून, तोंडापुरतें. १८. या क्षितिवरिचा विद्वज्जन (ह्या ब्राह्मणाशीं) समान नच असा जो मान (तो) यांला देई; यां (ब्राह्मणांस) (तो विद्वज्जन) लाजो—असा अन्वय.

देई या क्षितिवरिचा विद्वज्जन (न)च समान; यां लाजो.' ॥ २२

भूप म्हणे, 'द्विर्द्विज[1] हे बसवुं मिरवुं तोषवुं निज गजयानीं,[2] ।
वेदार्थ वदुनि केलें तृप्तचि हें तोषवुनि जग[3] जयांनीं.' ॥ २३
स्वपुरीं मिरवूनि म्हणे नृप त्या स्तुति करुनि फार विप्राची, ।
'शोभविली यवनसभा, उदयीं शोभवि जसा रवि प्राची. ॥ २४
यवनाचा नृप मी, हे उभय द्विज विप्रभूप पैं साच, ।
यासम नाहीं द्विज, भूं गाजवि तत्कीर्तिघोष ऐसाच.' ॥ २५
ऐसे यवनपुरीं ते म्हणवोनि श्रेष्ठ असति सर्वांतें, ।
एके दिवशीं येउनि नृपसन्मुख धरुनि वदति गर्वातें. ॥ २६
'हे नृपति! अम्हि जालों व्यर्थ शिकुनि शास्त्र पढुनि वेदाही, ।
चर्चा करुनि क्षिति हे जिंकूं, आज्ञा तरी निवेदों ही.' ॥ २७
जाला संतोष बहुत यापरि वदतांचि विप्र भूपाला, ।
हर्षे सकुटुंब, जसा देखुनि वनिं मर्कटप्रभू पाला. ॥ २८
'विप्रगणा द्या चर्चा करुनि क्षितिच्या' म्हणे नृप 'त्रास, ।
ध्या[6] तदजिंक असें जो चर्चा न करा म्हणे नृ पत्रास'. ॥ २९
भूपाज्ञेनें द्विज ते जिंकित विप्रासि जाति गांतूतें, ।
जालें नवल पुढें जें शिष्या! सांगेन ऐक गा! तूं तें. ॥ ३०
घेतचि अजिंकपत्रें हिंडत याम्येसि येत कुमशीतें,[9] ।
हर्षति बहु ते जैसें हर्षे देखोनि शुंनकमन[10] [11]शीतें. ॥ ३१
त्या कुमशिग्रामातें 'चर्चा करुं' म्हणति विप्रवर्गा 'या'. ।
ते म्हणति, 'भारती यति, तत्कीर्ती योग्य भूमिवर गाया. ॥ ३२
जाणे निगमार्थासी [12]त्रिवेदि शास्त्रज्ञ तो समर्थ कवी, ।
विकवील (?) बुद्धि तुमची, तुमच्या गर्वासि तोचि नर थकवी.' ॥ ३३
ऐकुनि जाती द्विज ते होता मुनि जेथ तो नदीपासी, ।
म्हणती, 'त्रिवेदि ऐसें म्हणविसि लावूनि कीर्तिदीपासी. ॥ ३४
चर्चा करि अम्हासीं, त्रिवेदगर्वा धरूं नको, पाहूं; ।

---

१. दोन ब्राह्मण. २. हत्तीवरून. ३. सर्वलोक. ४. पृथ्वीवर. ५. सांगा. ६. जो नृ (मनुष्य) चर्चा न करा असें म्हणे तदजिंक पत्रास ध्या—असा अन्वय. ७. पृथ्वीला. ८. दक्षिणदिशेला. ९. कुमसी हें भीमेच्या कांठचें एक गांव. १०. कुत्र्याचें मन. ११. (भाताचीं) शितें. १२. ऋक्, यजुस् आणि साम असे तीन वेद जाणणारा.

आरंभीं, धरिं धीरा, व्यर्थचि फळ नच धरून कोपा, हूं'. ॥ ३५
म्हणत मुनी, 'वेदत्रय कैंचे मज वेद, ये न एक वच, ।
वनवासी यति अम्ही, धरितां अभिमान हें नये कवच. ॥ ३६
वेदत्रय जरि येतें करितों कैशासि या वना वास ? ।
भोगुनि भोग तुम्हासम धरितों मेंहिं विप्रेरावनांवास'. ॥ ३७
यतिवच ऐकुनि म्हणती, 'तरि दे जयपत्र विप्र ते उभय, ।
असल्या अभिमान मनीं चर्चा करिं, दे न चित्तिं येउं भय. ॥ ३८
पाहें हीं जयपत्रें अवनींचे विप्र जिंकिले सर्व, ।
यापरि देइ लिहोनी' बोलति अति मनिं धरोनियां गर्व. ॥ ३९
भारति म्हणे, 'यतींला अम्हा तें हार जीति सम, जावें, ।
जिंकुनि तुम्हा यति जय होतां जोडे न लाभ समजावें. ॥ ४०
नलगे वाद यतींला जयइच्छा मानसीं न मानी ती, ।
जावें परतोनी हे मदुक्ति ऐका द्विजोत्तमा! नीती.' ॥ ४१
सांगे यति हितवचनें परि तीं विप्रांसि लागलीं अहितें, ।
अहितें पय जरि पाजिति वमिती विषगरळ, साठतें महितें. ॥ ४२
द्विज म्हणति, 'बहुत न वदे दे पत्रा कीं करीहि वाद मुनी ! ।
टाकूं त्वद्गर्वसह श्रेष्ठपणा सर्व येर्धवां देमुनी.' ॥ ४३
मनिं करि विचार यति कीं, 'जाले द्विज हे मदांध उन्मत्त, ।
शिक्षा करणें यां, फळ शास्त्राचें काय हें? वदुनि मत्त.' ॥ ४४
विप्रां म्हणे मुनि, 'चला, मद्गुरु करि गाणगानगरवास, ।
तेथें देइन पत्रा किंवा तुमच्या हरीन गर्वास. ॥ ४५
चित्तिं म्हणे मुनि, 'दंडूं दुःखविले बहुत विप्रनर यांनीं.' ।
निघतां मुनिसंगें ते निघती बैसोनि विप्र नरयानीं. ॥ ४६
शिबिकायानीं बैसुनि येती द्विज ते, यतीस चालवुनी, ।
म्हणुनि जवळि आणियला ब्रह्मद्वेषेंहि मृत्यु पोलवुनी. ॥ ४७

---

१. आरंभीं (आरंभ कर), धीरा धरिं, कोपा धरून व्यर्थचि, फळ नच, हूं (सुरू कर)—असा सार्थान्वय. २. त्रिविक्रममुनि. ३. वाह्यवेष. ४. पृथ्वीवर. ५. विप्रश्रेष्ठ या पदवीस. ६. अम्हा यतींला तें हार (हरणें) (अथवा) जीति (जय) सम (सारखें); (तुम्ही) जावें, तुम्हा जिंकुनि जय होतां यति (मी त्रिविक्रमयति) लाभ न जोडे (असें) समजावें—असा अन्वय. ७. सर्वांना. ८. आतां, इतक्यांत. ९. नाहींसा करून. १०. (हे) वदुनि (बोलून चालून) मत्त (आहेत). ११. पालखींत. १२. खूण करून, बोलावून.

आले गाणगपुरें ते, देखुनि मुनि सद्गुरूसि नमनातें ।
करि, तिष्ठोनि स्तुति करि मग तो होऊनि उन्मन मनातें. ॥ ४८

'हे नरसिंह सरस्वति! करुणाकर सद्गुरो यतीराया! ।
ताराया भक्त वससि भीमामरजासुसंगमीं राया! ॥ ४९

देवाधिदेव गुरु तूं त्रैमूर्त्यवतार हे जगन्नाथा! ।
साक्षात नरहरी तूं, त्वत्पदिं माझा असो सदा माथा. ॥ ५०

विश्वंभर सर्वेशा भवतारक नरहरी कृपाला हे! ।
केलें तप बहु दिन, तत्फल हें श्रीगुरु! तुझी कृपा लाहे. ॥ ५१

गुरुराजा! सुरपूज्या! तेजा कोट्यर्कविधु दया कर हे ।
विश्वप्सु (?) दाविलें मज, मच्छिरिं ठेवोनि तूं दयाकर हे'. ॥ ५२

स्तुति ऐकोनि श्रीगुरु म्हणती, 'हे मुनि! किमर्थ आलासी ?' ।
म्हणत मुनी, 'द्विद्विज हे आले, ये जसि करोनि आ लासी. ॥ ५३

उन्मत्त मदांध मला चर्चा करुं म्हणति तीनि वेदांची; ।
बोधीं बहु, परि नैकति, आज्ञा मज कसि मती निवेदाची.' ॥ ५४

मुनिवचन ऐकुनी गुरु म्हणती विप्रां, 'किमर्थ येणें हो ?' ।
केले वाद यतिसवें, केल्या मग लाभ काय येणें हो. ॥ ५५

हार जिती यतिला सम, न धरी मानापमान आंच मन; ।
क्रोधा प्राशन केलें; अगस्तिनें जेंवि सिंधु आचमन. ॥ ५६

ब्रह्मद्वेषें मृत्युचि, वाद करानाऽविवेक न करा हो, ।
न मरा, जगा, घरा जा, राजा देईल जें कनक राहो. ॥ ५७

वेदानंत, म्हणवितां चौवेदी धरुनि कवच गर्वाचें, ।
साद्यंत एक निगमा कोण वदे ब्रह्मयाविगर वाचे.' ॥ ५८

गुरुवचन ऐकुनी द्विज मदांध गर्वास फार हो! चढिले. ।
म्हणती, 'आम्ही सांग त्रिवेदपठणीं, करा नहो च ढिले. ॥ ५९

दोघे तुम्ही यती हो! जाणतसां कितिक शास्त्र वेदाही? ।
दोघेहि बसा पट्टिसि चर्चा ग्रंथा करा जेंवें दांही. ॥ ६०

---

१. उन्मन होउनि मनातें (मनांत) स्तुति करी–इत्यादि अन्वय. २. प्राप्त होई, मिळे. ३. कोटि+अर्क+विधु=असंख्य सूर्यचंद्र. ४. लास, राक्षसी. ५. काळजी. ६. वेद+अनंत. ७. ब्रह्मदेवाशिवाय. ८. कमजोर. ९. वेगानें, लवकर. १०. दशग्रंथास. संहिता, ब्राह्मण, आरण्यक, शिक्षा, कल्प, व्याकरण, निघंडु, निरुक्त, छंद आणि ज्योतिष् असे दहा ग्रंथ.

अम्हांसम नाहीं द्विज, समस्त जे विप्र जिंकिले भूचे, ।
सन्मुख न ठरे कोणी, क्रोधा सन्मुख जसेचि शंभूचे. ॥ ६१
भारति मुनि त्रिविक्रम दे म्हणतां हारिपत्र ये कोपा, ।
येत तुम्हां जवळि, करा चर्चा दोघे करोनि येक्रोपा.' ॥ ६२
श्रीगुरु म्हणती, 'द्विज हो! चित्तिं अहंकार गर्व सह न धरा, ।
क्षिति गर्वभार होतो, ब्रह्मद्वेषाहि करि न सहन [1]धरा. ॥ ६३
गर्वें झाली बाणासुर [2]सुत धृतराष्ट्रराज गति काय? ।
रावण कोटिसहस्रायुषि परि [3]तद्राहि हि न जगति काय. ॥ ६४
ऐका प्रसन्न केला [4]द्रुहिण धरुनि पादपद्म ज्यानें, तो ।
पाहि भरद्वाज मुनी, दाखविला वेद पद्मजानें तो. ॥ ६५
ब्रह्मयास म्हणे ऋषि तो, 'वेद मला सांग येत वर दे हा,' ।
'वेदाऽनंत' विधि म्हणे 'पढसि कसा, राखिसी [5]तवर देहा. ॥ ६६
पाहे सावध चित्तें, दाविन मी वेद पूर्ण हे तूला; ।
करि तूं जाल्या शक्ती अभ्यासा, करुनि पूर्ण हेतूला.' ॥ ६७
मुनि पाहे निगम महा त्रिनग जसे [6]कोटिमित्रतेजाचे, ।
अवलोकितांचि कंपुनि झांकिति ते उभय नेत्र ते [7]ज्याचे. ॥ ६८
नमुनि मुनी विधिसि म्हणे, 'आणिति मज नेत्रिं [8]गिरिगिरीला जे, ।
ते कैसे वेद शिकूं? ज्यातें देखोनि [9]अयगिरी लाजे. ॥? ६९
हे विधि! दयानिधे! मज शक्ति पढायास नाहिं वेदास, ।
जे देशी ते घेइन ऐसे दे चित्तिं, हा निवे दास. ॥ ७०
त्या मुनिलागीं विधि मग मुष्टित्रय वेद [10]तीं नगांतील, ।
देउनि वर दे सज्जन कीर्ति तुझी काळ तीन गातील.' ॥ ७१
मुष्टित्रय वेदाचे भाग करी चार ते [11]चतुर्निगम, ।
आजुनि पुरे न होती त्याला, परि [12]तो पडे पढोनि गम. ॥ ७२
होते कठिण पढाया [13]गांथा ते म्हणुनियां महर्षी तो, ।
नारायण अवतरुनी [14]शाखाभेदा करीत हर्षी तो. ॥ ७३

---

१. पृथ्वी. २. धृतराष्ट्रसुत, दुर्योधन (?). ३. तत् कायहि (त्याचें कांहींही) जगतीं न राही—असा अन्वय. ४. ब्रह्मदेव. ५. तोंपर्यंत. ६. कोटिसूर्यांच्या तेजानें युक्त. ७. ज्याचे ते=आपोआप. ८. भोवंड. ९. मेरूपर्वत. १०. तीन पर्वतांपैकीं. ११. चार वेद. १२. तो पढोनि गम पडे (थांबे)—असा अन्वय. १३. व्यवस्थेनें न लावलेला ग्रंथ. १४. शाखारूप भाग.

शाखाभेद करोनी **व्यास**मुनी पढवि शिष्य चवघे ते, ।
जाले अथर्रसाची पढोनि होऊनि तुष्य[1] चैवघेते[2]. ॥ ७४

त्या शिष्यांचीं नामें ऐका हो! **पैल** नाम पहिल्याला, ।
**ऋग्वेद** भेद बारा[3] पढोनि जो तेजकत्रच महि त्याला. ॥ ७५

**वैशंपायन** दुसरा शाऐशीं **यजुः**सुभेद जो पढला, ।
त्या श्री**व्यास**कृपेनें तेजा सत्कीर्तिलाहि तो चढला. ॥ ७६

**जैमिनि** तिसरा शिष्या सांग म्हणे **साम**वेद पद नमुनी, ।
ऐका सावध चित्तें त्याला दे उत्तरा वदोन मुनी. ॥ ७७

**व्यास** म्हणे **जैमिनि**सी सहस्र कीं भेद **साम**वेदातें, ।
सर्वहि पढवेना तुज परि पढ रे! मुख्य अष्ट भेदांतें. ॥ ७८

साधी मग **जैमिनि** तो भेदाष्टचि पढुनि वेद **साम** हित, ।
जाला शास्त्रज्ञकवी **व्यासगुरू** जेंवि तो जसा महित. ॥ ७९

चवथा **सुमंतु** शिष्या पढला नव भेद ते **अ**थर्वाचे, ।
ऐसे चौ वेदांचे **व्यास** मुनी भेद, तो वदे वाचे. ॥ ८०

साद्यंत एक भेदा कोण असे बोलका नर क्षातें[4]? ।
व्यर्थ भ्रमोनि गर्वें स्वकीय जीवित्व कां न रक्षा तें? ॥ ८१

आपणचि आपल्या द्विज! करोनि घ्यावी न आपदा[5] हातें, ।
अंतरिं जळाल बहु हो! त्या मग निववी न आप[6] दाहातें[7]. ॥ ८२

या मी बोधक वदलों ऐकुनि करणें विवेक वचनास, ।
जा परतोन धरा नच, गर्वाचें करि जिवें कवच नास. ॥ ८३

पत्र लिहुनि मागतसां गर्व धरुनियां **त्रि**विक्रमापासीं, ।
तुमच्या सर्व अघा या मोजित लावूनि **काळ** मापासी ! ॥ ८४

चर्चा करितां, घेतां पत्रा पीडोनि सर्व विप्रगणा, ।
पढतां यवनसभेसी, करितां अघ फार हें कसें न गणा?' ॥ ८५

---

१. तुष्ट? २. रुचि घेणारे. ३. हे बारा भेद मुळांत येणेंप्रमाणें दिले आहेत.:—'आतां भेद सांगेन ऐका। प्रथम चर्चा श्रावका । द्वितीय चर्चा श्रवण ऐका । पराक्रमी दोनीं शाखा ॥ ३५ ॥ षट्क्रम शाखा दोन्ही । सातवा दंड म्हणोनी । भेद सप्त निर्गुणी । पांच भेद आणीक असती ॥ ३६ ॥ आश्वलायनी शांखायनी दोनीं। शाकल बाष्कल दोन्ही । पांचवी मांडुक्य म्हणूनि । ऐसे भेद द्वादश ॥ ३७ ॥' (अध्याय २६.) ४. पृथ्वीवर. ५. संकट. ६. पाणी. ७. दाह=आग, तळमळ.

[1]श्रीगुरु करि, परि नैकति ते लागाया सुपंथिं, बोधास, ।
वंध्या गो जसि दुहितां, लागे स्तनिं बिंदुहि न थिंबोधास. (?) ॥ ८६
विप्र म्हणति, 'करुं चर्चा ना तरि नृप आमुचेंहि महिमान ।
वाढवि, आजवरी जो मेळविला तो बुडेल महि मान. ॥ ८७
वाद न करुं सांगति मग जाइल अस्मन्महत्व राजाला, ।
यास्तव करूं च चर्चा' म्हणती 'करणें महत्व राज्याला.' ॥ ८८
श्रीगुरु म्हणती, 'मरण न जाणुनि उडि डोहिं घेत लेंकरु हो! ।
तैसे मदांधचि तुम्ही, बरें असो चित्तिं इच्छिलें करुं हो!' ॥ ८९
इतक्यांत मठद्वारीं पाहति गुरुराज एक मर्त्याला, ।
शिष्याला म्हणती, 'तो बोलावा कोण जात नर त्याला. ॥ ९०
बोलावितांचि शिष्यें येउनि करितो गुरूसि नमनाला, ।
बोले, 'जाला हर्ष त्वच्छ्रीगुरु! चरण देखुन मनाला.' ॥ ९१
श्रीगुरु म्हणती त्याला, 'सांग तुझी कोण होय ती जात.' ।
तो बोले, 'मांग असें; होतों कार्यासि, हो यती! जात.' ॥ ९२
ऐकोनि श्रीगुरु मग शिष्याचे देउनी स्वदंड करीं. ।
म्हणती, 'काढी भूमिसि रेषा सप्त न कमी उदंड करीं. ॥ ९३
गुर्वाज्ञेनें शिष्यें तत्सन्मुख काढितांचि रेखांस, ।
गुरु म्हणति त्या नरातें, 'ये लंघुनि एक एक रेखास.' ॥ ९४
गुर्वाज्ञेनें नर तो लंघन करितांचि एक रेघेतें, ।
म्हणती गुरु त्यास, 'तुझी कोण असे जात? नाम रे! घे तें.' ॥ ९५
गुरुवच ऐकुनि बोले, 'वनराखा म्हणति हो मला [6]भील, ।
लाभील त्वत्प्रसादा, हा आतां काय भवजला [7]भील?' ॥ ९६
पुनरपि वदे 'रजक मी' लंघन करितांचि रेष ते दुसरी. ।
सर्व जनांचीं वस्त्रें प्रक्षाळुन करित शुद्ध [8]इंदुसरी. ॥ ९७
तिजि[9] लंघितांचि बोले, 'मज गंगापुत्र म्हणति [10]नांवा हो! ।
नावा हो जळिं तारुनि नेतो सहसा जना न दे वाहो! ॥ ९८
चवथी, पांचवि, सात्री लंघन करितां वदे प्रमोदानें ।

---

१. ते सुपंथिं लागाया श्रीगुरु बोधास करि; परि (ते) नैकति (न ऐकति)—असा अन्वय. २. उधास (कासेला) स्तनिं बिंदुहि न थिबो लागे—असा अन्वय. ३. पृथ्वीवर. ४. मनुष्याला. ५. श्रीगुरु! त्वच्चरण देखुन मनाला हर्ष झाला—असा अन्वय. ६. भिल्ल. ७. भिईल. ८. चंद्राप्रमाणें. ९. तिसरी. १०. नांवानें.

'पादज[1], ऊरुज[2], बाहुज[3]; केले द्विजें[4] तृप्त इच्छिले[5] दानें.' ॥ ९९
बोलांडितां म्हणे, 'मी चौवेदी विप्र' रेख सप्तम ती, ।
'बहु विप्र जिंकिले म्यां चर्चा करितां सदैव तप्तमती'. ॥ १००
श्रीगुरु म्हणती, 'म्हणविसि तूं रे! चौवेदि विप्र हटवादी, ।
आले द्विज हे चर्चे, चर्चा करि पाहुं यांस हटवादी[6]'. ॥ १०१
त्याच्या विभूतिसिंचन गुरुंनीं करितांचि सर्व देहातें, ।
ऊरू[7] थापटुनि द्वै[8], 'टाका[9]' विप्रास तो वदे हातें[10]. ॥ १०२
चौवेदींच्या तो द्विजें[11] टाकित तैं वदुनि मूळभेदातें, ।
पाहुनि जन आश्चर्या मानिति हो! धरुनियां जिभे दातें. ॥ १०३
जिव्हा लुडब्या जाल्या, जे वादक विप्र हट्टि, उभयांच्या. ।
गुरुपादिं लोळुनि म्हणती, 'अम्ही मद्यासि हो! पिउं भयाच्या. ॥ १०४
थरथर कंप सुटे हो! धरवे अम्हा मनीं न धीरा ही, ।
बधिरा ही मति जाली निगमाक्षर तें सुचे न धी[12] राही. ॥ १०५
करुणाकर गुरुराजा त्रैमूर्त्यवतार विश्वदेव मुनी! ।
नमुनी त्वत्पद अम्ही क्रोध अहंकार टाकिले वमुनी. ॥ १०६
धिक्कारिले द्विज बहू ब्रह्मद्वेषासि बांधु पदरा हे, ।
न[13] दरा हे धरुनि जसें दाणिस तें चौपद द्विपद राहे. ॥ १०७
केला द्रोह तुजसवें दयानिधी! तूं करीं क्षमा सर्व, ।
अम्हा कळलें पूर्णचि अवतरुनी येसि तूं क्ष्मा[14] सर्व[15]. ॥ १०८
अम्ही अपराधि असों, देसी अम्हासि कोण गतिला ते ।
भय वाटे यम रगडी, तेलि जसा कार्डिभूमुगतिलातें.' ॥ १०९
गुरु म्हणति, 'तुम्हीं केलें ब्रह्मद्वेषाणि, भारती यतिला ।
क्षोभविलें, ब्रह्मग्रह[16] व्हा भोगा जोडिलीच जोड तिला.' ॥ ११०

१. शूद्र. २. वैश्य. ३. क्षत्रिय. ४. चवथी लंघन करितां पादज, पांचवी लंघन करितां ऊरुज, सहावी लंघन करितां बाहुज असें वदे. आणि त्या त्या जन्मीं इच्छिले दानें मी द्विज तृप्त केले असें तो बोलला-असा अर्थ. ५. इच्छिलेले. ६. हटव+आदी=आधीं जिंकून टाक. ७. मांड्या. ८. दोन्ही. ९. याचें कर्म 'जयपत्र' (अध्याहृत). १०. याचा संबंध 'थापटुनि'-कडे. ११. अंत्यजाचा जो ब्राह्मण केला होता तो. १२. बुद्धि. १३. जसें हें चौपद दरा (भीति) न धरुनि दाणिस (दावणीस) राहे तसे हे (आम्ही) द्विपद (दोन पायांचीं जनावरें) (राहिलों आहों)-असा सार्थान्वय. १४. पृथ्वीवर. १५. शंकर किंवा विष्णु. १६. ब्रह्मराक्षस.

ऐशा वचना ऐकुनि पुनःपुन्हा **गु**रुपदासि लागति ते, ।
म्हणती, 'यांतूनि कधीं पार पडूं, जाउं उद्धरागतितें.' ॥ १११
**गु**रु म्हणति, 'शुक शुकाक्षर बोलत राहाल वर्ष बाराही, ।
ये विप्र एक हिंडत तुम्हासि देखोनि तो उभा राही. ॥ ११२
अनुताप होय म्हणउनि द्रुमीं रहा धरुनि शांतरूपासी, ।
'शुक शुक' ऐकोनि क्षण तिष्ठे तो विप्र ते तरूपासीं. ॥ ११३
[1]तुमचे नारायण हा करील उपदेश तो मना कानीं ।
ठसतां, जाल सुगतितें, दुराइ काढोनि त्यास नाकांनीं. ॥ ११४
आहे नदीतिरीं स्थळ बैसायासि क्षेपापि[2] योजावें, ।
मोजावे शुकजाप्या[3] दुष्कर्म मनीं न पापि योजावें.' ॥ ११५
**गु**रुचा निरोप घेउनि निघतां बाहीर विप्र गांवाचे, ।
हृदि शूळ उठुनि मेले 'शुक शुक' तात्काळ वदति गा[4]! वाचे. ॥ ११६
ब्रह्मग्रह होउनि मग नदीतिरीं बसति पादपावर[5] ते, ।
'शुक शुक' जपोनि जाले दुष्कर्मांवरिल चित्त आवरते. ॥ ११७
शुकनाम वर्ष बारा करितां जप धरुनि ते मना माला, ।
उद्धारैकुनि जाला **ना**रायण अक्षरा सुनामाला.' ॥ ११८
**सिद्ध** म्हणे, 'गा! श्रवणें प्रकटे सुज्ञान[6] हाचि सविता[6] कीं, ।
प्राशन करितांचि सुधा लागे मग ते कदा न चवि[7] ताकीं[8].' ॥ ११९
**रा**मात्मजपुत्र म्हणे चरितकथा सुरस फार ऐका, व्हा ।
सावध, जन्ममरणही चुकेल, संसारिं कितिक पैका व्हा[9]. ॥ १२०

---

## अध्याय अठरावा[10].

**सिद्ध**पदाब्जा वंदुनि शिष्य म्हणे, '**गु**रुकथासुधा पाजी, ।
मधुरत्रि(ऽति?) श्रोतृमुखा लागे निववीहि सर्व तापा जी.' ॥ १
**प्रश्नाक्षर** शिष्याचें ऐकुनि पावोनि [11]हर्षराश मनीं, ।

---

१. तुमचे कानीं (तो) नारायण (मंत्राचा) हा उपदेश करील; हा मना ठसतां (तुम्ही) नाकांनीं त्यास दुराइ काढोनि सुगतितें जाल—असा अन्वय. २. क्षप (पाणी)+अपि. ३. शुक-मंत्र. ४. अगा शिष्या! ५. वृक्षावर. ६. सुज्ञानरूप सूर्य. ७. चव. ८. ताकाचे ठिकाणीं. ९. वहा, मिळवा. १०. या अध्यायांत मुळांतील २८ व्या अध्यायांतील कथाभाग आहे. ११. हर्षाचा ढीग; अतिहर्ष.

सिद्ध म्हणे, 'ऐक कथा आतां [1]भवरोगभेदरा शमनीं. ॥ २
होय पतित जो ज्ञानी लंघन करितांचि [2]सप्तरेघांस. ।
'जाइं न घरा' म्हणे 'मज अमृताचा प्राप्त होय रे ! घांस.' ॥ ३
गुरुस म्हणे, '[3]विप्रगणीं मेळविं मज तूं' म्हणोनि [4]पांव नमी, ।
'लोहपरिस भेटीपरि होई त्वद्दर्शनेंच पावन मी.' ॥ ४
गुरु म्हणति, 'सप्तजन्मापूर्वींचा विप्र तूं परंतू, [5]हे ।
जन्मीं मांगतनूसी पावसि अत्यंत नीच गा! तूं हे.' ॥ ५
मग तो गुरुसि म्हणे, 'मी [6]कोणें अघाचरणिं मांगजन्मातें ।
ये, विस्तारें सांगें; म्हणती अत्यंत नीच जन मातें. ॥ ६
कोण अघाचरणें हा होतो चांडाळ जन्म मर्त्याला, ।
सांगा स्वामी! मातें असतां शास्त्रज्ञ [7]भूअमर त्याला.' ॥ ७
प्रश्ना ऐकुनि त्याचे श्रीगुरु अवलोकुनी [8]कृपापातें, ।
'बैस' म्हणति 'तुज सांगूं व्हाया चांडाळ जन्म पापातें. ॥ ८
कुळदेवता त्यजुनियां पूजी जो क्षुद्रदेव मानुज तो ।
चांडाळजन्म पावे पीडुनियां [9]बहुत यांत [10]मानुज तो. ॥ ९
मातापिता गुरूसी त्यागुनि जो विप्र वेगळा वसत, ।
चांडाळजन्म पावे देखुनि जो न नमि विप्र देव [11]संतें. ॥ १०
त्यागोनि धर्मपत्नी संग करित रमत अन्य योषांतें, ।
चांडाळजन्म पावे करि जो [12]क्रय [13]गोहयादि दोषांतें.' ॥ ११
कर्मविपाकादिक जीं नानापरि बहुत पातकें, गुरुंनीं ।
चांडाळजन्म होण्या सांगितलीं त्या नरासि विस्तरुनी. ॥ १२
भारतिमुनि त्रिविक्रम, ऐकुनि गुरुच्या धरोनि पायांला, ।
पुसत, 'जरिहि अघ घडलें, जाइ कसें सांग जी उपायाला?' ॥ १३
श्रीगुरु म्हणती मुनिसी, 'होतां अनुताप चित्तिं पापातें ।
नाशी, श्रीगुरुची तो सेवा करितांचि, [14]गुरुकृपापातें. ॥ १४
अथवाहि वेदपठणीं अघ नाशे [15]वा [16]सुतीर्थआचरणीं, ।

---

१. भवरोगाच्या भेदराच्या (भीतीच्या) शमनार्थ. २. अ० १७ गी० ९३ ते १०० पहा. ३. ब्राह्मण कर. ४. पाय. ५. ह्या. ६. कोणत्या पापाचरणामुळें. ७. विप्र. ८. कृपादृष्टीनें. ९. पुष्कळ जाती (लोक). १०. मनुष्य. ११. साधु. १२. क्रय; विकत घेणें व देणें. १३. गोहय=गाई-घोडे. १४. गुरुकृपादृष्टीनें. १५. अथवा. १६. पवित्र तीर्थांचें दर्शन वगैरे केल्यानें (घेतल्यानें).

[1]आच असो परि धरि नृप पर जिंकायासि जेंवि आच रणीं. ॥ १५
ऐकोपाया[2] आणिक प्राशन करितांचि पंचगव्याला, ।
रक्षिल अस्थिगतहि अघ, रक्षि न खल जेंवि जो खग[3] व्याला[4]. ॥ १६
परि हो! शेर[5] सुरभीच्या मेळवुनी पूर्ण पंचगव्यास, ।
प्राशन करितांचि नरें जातें अघ म्हणतसे मग व्यास. ॥ १७
[6]नीलाणि कृष्ण लोहित[7] सित[8]वर्णी पांचवी सुकपिला[9] हे ।
गोच्यां[10] पंचसुगव्या पीतां अघनाश, पुण्य अपि[11] लाहे. ॥ १८
नीळीचे गोमुत्रा, गोमय तें कृष्णवर्णिचें, पय तें ।
तांबडिचें, पांढरिचें दधि, कपिलाघृत करी अघक्षय तें. ॥ १९
न मिळति धेनू इतक्या तरि कपिलेचेंच घेइजे सर्व, ।
सर्व स्मरोनि हृदयीं मेळविजे घालुनी कुशें[12] सर्व. ॥ २०
त्यांचें[13] प्रमाण सांगें, थोडें, नच वाढविं, क्रमा श्रवण ।
उघडी सादर; करणें थोडें, न च वाढ विक्रमा श्रवण. ॥ २१
गोमूत्र पावशेरचि, गोमय अर्धांगुठा[14]प्रमाण असे, ।
शेरेकदुग्ध, पाउण शेर दहीं, तूप पावशेर असे. ॥ २२
ऐशा या पांचांतें मेळवुनी जो कुशें क्षपा[15] प्याला, ।
दवडुनि अस्थिगतहि अघ तें तें त्या होय रक्ष[16] पाप्याला. ॥ २३
नानापरि सांगितलीं प्रायश्चित्तें अघास जरि असती, ।
अनुतापाविण निर्फळ कीं सहगमनासि जेंवि करि असती[17]. ॥ २४
यास्तव अनुतापाग्निचि[18] जाळी मोठ्याहि दीर्घ पापाला, ।
जाळी वणवा जैसा पडिला वाळोनि जो रिपां[19] पाला.' ॥ २५
श्रीगुरु म्हणती, 'मांगा! करिसी तूं द्वेष आइबापांचा, ।

१. परि (परंतु) रणीं पर (शत्रु) जिंकायासि नृप (एखादा राजा) जेंवि आच (काळजी) धरि (तेंवि) [तुज पापनाशाबद्दल] आच असो–असा अन्वय. २. ऐक+उपाया. ३. पक्षी, गरुड. ४. सर्पास. ५. एक शेर (?). ६. नील+आणि. ७. तांबडी. ८. शुभ्र. ९. काळी. १०. गाईच्या. ११. देखील. १२. दर्भानें. १३. (मी) त्याचें (पंचगव्याचें) प्रमाण सांगें, (तें) थोडें (थोडक्यांत आहे), नच वाढविं (विस्तारानें सांगत नाहीं); क्रमा (तें कसें घ्यावें तो प्रकार ऐकण्यास) सादर श्रवण (कान) उघडी; (तें) करणें थोडें (आहे) [आणि] श्रवणविक्रमा वाढ नच (कानाला ऐकण्यालाही श्रम नाहींत)–असा सार्थान्वय. १४. एका अंगठ्याचे अर्धाइतका. १५. क्षमा=पृथ्वीवर, या लोकीं ? १६. रक्षणास समर्थ. १७. व्यभिचारिणी. १८. पश्चात्तापरूप अग्नी. १९. भूमीवर.

तैसाचि करिसि गुरुचा; ठेवा त्वत्पदरिं याच पापाचा. ॥ २६
आतां स्नान सुसंगमिं करितां या, पाप एक मासें तें ।
नासे, तें द्विजजन्महि होइल, तुजला भविष्य भासे तें. ॥ २७
जाशील विप्रजन्मा आतां तूं जाइ रे स्वधामातें.' ।
मांग म्हणे, 'गा मृत्यू! देशि कसा पाजुनी सुधा मातें? ॥ २८
अभिमंत्रुनि विप्रगणीं मेळविं मज जेंवि [१]उडुगणीं चंद्र, ।
केला [२]परिसें लोहा, न रुचे तो काय [३]नगगणीं चंद्र. ॥ २९
[४]हेमं करी [५]जांबुनदी पडतां जडकाष्ठमृत्तिकादिक तीं, ।
[६]दिकती वाटे कां गा! श्रीगुरु! चित्तीं धरूं नका दिक ती. ॥ ३०
युष्मत्कृपाकटाक्षें विप्रत्वें मी [७]द्विजाच परि [८]साजें, ।
न म्हणेल कोण कांचन लोह बरें लागतांच परिसा जें?' ॥ ३१
श्रीगुरु म्हणती, 'मांगा! कैसे द्विज विप्र म्हणति गा! तूतें, ।
मांगोदरिं जन्मुनि, न च कळे कसें होसि विप्र [८]गातूतें. ॥ ३२
[९]व्रीहीसम ये सुरुची यद्यपि परिपूर्ण [१०]कोद्रुनामातें, ।
तरि कोणीहि न म्हणती व्रीहीच्या त्यास साच नामातें. ॥ ३३
चांडाळ[११]शुक्रशोणितसंपर्कें होय सत्य तुज [१२]जनन, ।
निंदिति तुज मज मात्रहि, [१३]कोणि कदा म्हणति विप्र तुज जन न. ॥ ३४
सांगूं एक कथा तुज पूर्वीं तप थोर [१४]गाधिजानें तें ।
केलें, [१५]शीतोष्णघना साहुनि लावुनि समाधि ज्यानें तें. ॥ ३५
त्यागोनी अन्नफळा, कंदमुळा भक्षि लोहपिष्टासी, ।
आचरला दीर्घ तपा निशिदिनिं भोगुनि अपार कष्टासी. ॥ ३६
विश्वामित्र तयाचें नाम, म्हणे तपबळें सुरा [१६]हरिला, ।

---

१. नक्षत्रसमूहांत. २. परिसानें. ३. दागिन्यांत. लोखंडाचा चांद परिसाला लागल्यामुळें तो सोन्याचा झाला तर प्रथम तो लोखंडाचा होता म्हणून सोन्याच्या इतर दागिन्यांत शोभणार नाहीं कीं काय? त्याचप्रमाणें गुरूच्या प्रसादानें मी मांगाचा ब्राह्मण झालों तर इतर ब्राह्मणांप्रमाणें मी मान्य झालोंच पाहिजे—असा भाव. हा दृष्टांत फार चांगला आहे. ४. सोनें. ५. जांबूनदांत जो पदार्थ पडतो त्याचें सोनें होतें—असा भावार्थ. यावरून जांबूनद म्हणजे सोनें असा अर्थ झाला आहे. ६. दिक किंवा दिकती=संशय, चिंता. ७. ब्राह्मणाप्रमाणें शोभतों. ८. पृथ्वीवर. ९. तांदुळाप्रमाणें. १०. कोद्रु=एक हीण धान्य. ११. शुक्र=रेत. शोणित=रक्त. १२. जन्म. १३. कोणी जन विप्र न म्हणती—असा अन्वय. १४. गाधिज=विश्वामित्र. १५. थंडी, ऊन आणि मेघ (पाऊस). १६. इंद्राला.

'विप्र म्हणा मज, मुनिचा तपविषयीं गर्व मीं पुरा हरिला.' ॥ ३७
इंद्रादि देव म्हणती, 'श्रेष्ठ ऋषी जो वसिष्ठ तो ऋषिंत, ।
जैसा रवि ग्रहातें श्रेष्ठचि कीं [१]व्रीहि जेंवि ते [२]कृषिंत. ॥ ३८
तो जरि म्हणेल तुजला विप्र असें मग समस्त देवांनीं, ।
बोलावें सहजचि रे! तो जैसे तव गुणा वदे [३]वांनी.' ॥ ३९
तो मग म्हणे वसिष्ठा, 'विप्र मला म्हणुनि करिं धरा, विनवीं'. ।
तों ऋषि म्हणे, 'नृपतनू सांडुनि विप्रोदरीं धरावि नवी. ॥ ४०
ब्रह्मर्षी तेव्हां तुज म्हणती आतां समस्त राजऋषी, ।
गोधूम पेरिल्यानें व्रीहीची म्हणति काय कोण कृषी. ॥ ४१
ऐकुनि वसिष्ठवाक्या गाधिज कोपेचि जेंवि [५]कामारी, ।
होउनि तसाच मुनिचे द्वेषानें शतहि बालकां मारी. ॥ ४२
ब्रह्मज्ञानी मुनि परि न म्हणे ब्रह्मर्षि तो न कोपाही ।
धरि, 'रक्षि' म्हणे 'तप रे! कोपें तपहानि करुं नको पाही.' ॥ ४३
मग तो वसिष्ठ मुनिसचि माराया घेत शैलशिखराला, ।
केला बोध कळेना जैशी [६]गुडगोडि आळशि [७]खराला. ॥ ४४
'मारुनि' म्हणे 'वसिष्ठा, जाळूं [८]जाळ्यन्न जेंवि [९]काशाला, ।
रात्रीं जातां भी परि, तो तत्पाहोनि तप विकाशाला. ॥ ४५
[१०]दडुनांगणींच राहे आला तो मुनि वसिष्ठ बाहेरी, ।
शशिपूर्ण चांदणें तें स्फटिकोपम शुद्ध तेधवां [११]हेरी. ॥ ४६
बोले, 'सुचांदणें हें केवळ गाधिजतपाचिसम पडलें'. ।
गाधिज ऐकोनि म्हणे अनुतापें, 'थोर पाप मज घडलें. ॥ ४७
तोंडावरि मज न म्हणे ब्रह्मर्षी, परि तपासि वाखाणी, ।
ऐसा मुनि माराया व्यर्थचि नगशिखर शिव! शिवा! [१२]खाणी. ॥ ४८
मारीं व्यर्थचि याचे सुत, केलें थोर पातकाला त्या, ।
शिव! शिव!' म्हणे, तयाला ऐसा अनुताप होत [१३]काला त्या. ॥ ४९
ब्रह्मर्षि म्हणूं म्हणती याच्या वचनेंच देव [१४]मघवा ही, ।

---

१. तांदूळ. २. शेतांतील जिनसांत. ३. स्तवी. ४. याचा कर्ता 'मी' अध्याहृत. ५. शंकर. ६. गुळाची रुचि. ७. गर्दभाला. ८. जाळी+अन्न. ९. सड; जोंधळ्याच्या वगैरे ताटाच्या मुळ्या. ह्यांचा उपयोग सर्पणाप्रमाणें करितात. १०. दडुनांगणीं=अंगणांत दडून. ११. पाही. १२. खणिलें. १३. त्यावेळीं. १४. इंद्र.

ऐसा मुनि वधितां, नच समुद्रभरि तपजळेंहि अघ वाही. ॥ ९०
यावांचुन सुर भूसुर म्हणति, 'मला केंवि विप्र भूमीतें, ।
[2]अन्यायकर्म केलें, जाणुनि असुनिहि कवि प्रभू मी तें.' ॥ ९१
ऐशा अनुतापें तो ऋषि सन्मुख येउनी करी नमना, ।
बोले, 'पावन करिं मज [3]पुत्रहननविषमता धरीं न मना. ॥ ९२
[4]जालें ब्रह्म हृदय मग अनुतापें दुरित भूमि दे वमुनी, ।
वळखुनि **व**सिष्ठ ऋषि तो बसवि [5]तैया म्हणुनि [6]भूमिदेव मुनी. ॥ ९३
**वि**श्वामित्र विनंती करि जोडुनि मग [7]करा **व**सिष्ठाला, ।
'भोजन करि मद्गेहीं घेउनि मुनि थोर थोर शिष्टाला. ॥ ९४
'[8]स्वशिरीं पाक करि म्हणे मुनि रवितेजें' तयासि; कानें तें ।
ऐके उत्तर ऐसें, परि केलें मान्य **कौ**शिकानें तें. ॥ ९५
दुर्घट जें मुनि वदला परि हो कर्तव्य कार्य तें ज्याला, ।
केला पाक स्वशिरीं प्रकटुनि बाराहि सूर्य तेजाला. ॥ ९६
[9]बारा मित्र उगवुनी जाले कीर्णी सहस्र तपते, जें ।
क्षत्रियवपु जाळुनि, तो **गा**धिज धरि नव तनू स्वतपतेजें. ॥ ९७
ब्रह्मर्षि होउनी मग मान्य बसे तो महर्षि [10]सांतांत, ।
प्रतिसृष्टी करणारा जाला, [11]देवर्षिचा जसा तात. ॥ ९८
तैसें या संगमिंच्या स्नानें त्यज सर्व तूं अघें, शील ।
वाढेल तुझें मग तूं सत्यचि रे! विप्रजन्म घेशील. ॥ ९९
ऐसें त्याला सांगति **गुरु** परि तन्मनिं नये कदापी तें, ।
[12]सोडीन स्थळ जैसें, बहु पय मार्जार एकदां पी तें. ॥ ६०
इतक्यामाजी ये तज्जाया घेऊनि लेंकराला जे, ।
स्पर्शों नको तिस म्हणे तो, मग ती स्पर्शितां करा लाजे. ॥ ६१

---

१. ऐसा मुनि वधितां (जें पाप होईल तें) अघ समुद्रभरि तपजळेंहि नच वाही (धुवून जाणार नाहीं). २. मी कवि (शहाणा) (आणि) प्रभु (समर्थ) असूनही (म्यां) अन्यायकर्म केलें—असा अन्वय. ३. मुलगे मारिल्याचा राग. ४. अनुतापें मग हृदय ब्रह्म झालें. दुरित (पाप) भूमि (पृथ्वीवर) वमुनि दे (ओकून टाकी)—असा अन्वय. ५. विश्वामित्रास. ६. विप्र. ७. हात. ८. रवितेजें स्वशिरीं पाक करि (असें) मुनि (वशिष्ठ) म्हणे—असा अन्वय. 'सूर्यकिरणीं शरीर पचवावें' असें मुळांत आहे. ९. बारा मित्र उगवुनी सहस्रकिरणीं तपते झाले. १०. सप्तर्षींत. ११. नारदाचा बाप; ब्रह्मदेव. १२. मार्जार एकदा (जेथें) बहु पय पीतें तें स्थळ जैसें न सोडी इ०—अन्वय.

माराया तिस धांवे करोनि मग ऊर्ध्व बाहु [1]दंडवत, ।
विनवी मग ती **गुरु**सी प्रेमें साष्टांग करुनि दंडवत. ॥ ६२

**गुरु**सि म्हणे, 'बहु सुत मज, रक्षिल यां कोण?' मांगजाया ती, ।
[2]त्यागी स्वधर्म काय ज्ञानी जरि, जन्म सांग ज्या याती. ॥ ६३

करणें श्री**गुरु**जि ! तुम्ही कांहिं बरा बोध या भ्रतारा हो ! ।
तारा हो ! हा मजला त्यागी पति, जेंवि [3]अभ्र तारा हो.' ॥ ६४

**गुरु** मग म्हणती त्याला, 'तूं त्यजितां हे सुतादि [4]भाज गती, ।
सुगती मग ती न तुला होय, घरा जाइ, कां उभा [5]जगती? ॥ ६५

[6]रविभूमीचे साक्षी वरिशी हे, [7]त्याग तूं अशा स्त्रीचा ।
करिसि, महद्दोषी रे ! होसि पहा मार्ग हा [8]अशास्त्रींचा.' ॥ ६६

मग तो श्री**गुरु**सि म्हणे, 'प्राशुनि पीयूष सांग [9]हळहळ तें, ।
कैसें प्यावें, पुनरपि घडेल नीचत्व, चित्त हळहळतें. ॥ ६७

ज्ञानार्क अस्त करुनी न करी अज्ञान हेचि [10]सांज खरी, ।
त्यागुनि [11]कामदुघा [12]गो दोहावी काय सांग वांज खरी.' ॥ ६८

**गुरु** म्हणति मनीं, 'याचे प्रक्षाळावी [13]विभूति देहाची, ।
विसरे प्राग्जन्मींचें मग हें सुज्ञान जो वदे हाची.' ॥ ६९

एक द्विज [14]लुब्धक अति पाचारुनि म्हणति, 'आणुनी पाणी, ।
आंघोळि घालि मांगा, चोळी आंगासि लावुनी [15]पाणी.' ॥ ७०

**गुर्वाज्ञे**नें त्याणें तनु धूतां पूर्ण सर्व मांगाची, ।
प्राग्जन्मविस्मृती मग झाली जातां विभूति आंगाची. ॥ ७१

पाहुनि धांवुनि मग तो मोहें आलिंगि पुत्रयुवतीला, ।
चुंबुनि शिशु समजावी, नेत्रींचें पुसुनि करि [16]आंसुंव [17]तीला. ॥ ७२

'कां आलों मी येथें त्या असतां जात गे ! स्वकामातें? ।
कैसा भुललों? पडली हे ऐशी भ्रांत थोर कां मातें?' ॥ ७३

ऐसें बोलत गेला मांग घराला वधूकुमरसहित, ।

---

१. काठीप्रमाणें. २. ज्या याती (जातींत) जन्म (ती) ज्ञाती जरि टाकी (तरी) तो स्वधर्म काय हें सांग—असा अन्वय. ३. आकाश. ४. भार्या. ५. जमिनीवर. ६. सूर्य व पृथ्वी यांसमक्ष. ७. ही. ८. शास्त्रविरुद्ध. ९. हालाहल विष. १०. सायंकाळ. ११. इच्छिलेलें देणारी. १२. गाय. १३. अंगाला लाविलेलें भस्म. (अ० १७ गी० १०२ पहा.) १४. लोभी. १५. हात. १६. (मुलांचे) अश्रू. १७, स्त्रियेस.

**गुरु**वरदें त्या जोडे विप्राचा जन्म हेंचि सुरस हित. ॥ ७४
मासेक संगमीच्या स्नानें त्या त्यजुनि तो कलिवराला,[1] ।
द्विज जन्मुनि सुख पावे श्री**गुरु**च्या जेंवि आकलि वराला. ॥ ७५
**सिद्ध** म्हणे, 'जन पाहुनि करिती आश्चर्य फार नवला ह्या, ।
**गुरु**वरि उडविति हर्षे पुष्पें जीं शुभ्र जेंवि नव लाह्या. ॥ ७६
चरितपठणिं या नलगे करणें भवभीतिधाक विप्रासी, ।
भावें **रा**मात्मजसुत सदैव चरितचि सुधा कवि प्राशी. ॥ ७७

---

## अध्याय एकोणिसावा.[3]

**सि**द्धासि शिष्य विनवी वंदुनियां तो तदंघ्रिकमलातें, ।
'उडवी दोषमलातें श्री**गुरु**चें चरित सांगचि मला तें. ॥ १
गेलें चांडाळांगा धूतां घालोनि अंबु धामातें, ।
वर्ते चरित पुढें जें विस्तारुनि सांग तूं बुधा! मातें.' ॥ २
**सिद्ध** म्हणे, 'श्रवण करी **भा**रति, देखोनि कौतुकाला त्या, ।
प्रश्न करी; **गुरु**सि म्हणे 'मनीं वसे एक हेतु' कालां त्यां. ॥ ३
'द्या सुज्ञानचि मांगा, धूतां कैसें जि! सर्व आंगा तें ।
गेलें, कृपा करुनि मज दयानिधी पूर्ण सर्व सांगा तें.' ॥ ४
श्री**गुरु** म्हणती, 'गेलें जातां सर्वांगिंची विभूती जी.' ।
ऐकुनि मुनि 'सांग' म्हणे 'विभूतिमहिमाकथा विभू! ती जी.' ॥ ५
श्री**गुरु** म्हणती, 'पुससी विभूतिमहिम्यास, ऐक गा! तूं तें, ।
भावें लावि सदा जो तोचि मनुज धन्य एक गातूंतें. ॥ ६
संतुष्ट निस्पृह असा होता भूं एक **वा**मदेवमुनी, ।
कामक्रोधादि सहा ज्याणें संमूल टाकिले वमुनी. ॥ ७
सर्वांग भस्मचर्चित भूषण रुद्राक्ष; आननाशीं त्या ।
मौन सदा; तो आला एकदिनीं **क्रौंच**कानना सी त्या. ॥ ८
राक्षस विक्राळ महा होता त्या करुनि कानना वास, ।

---

१. कलिवर=कलेवर=देह. २. ग्रहण करी. ३. यांत मुळांतील अध्याय २९ मधील कथाभाग आहे. ४. अंबु (पाणी) घालोनि अंगा धूतां, चांडाळ धामातें (घरीं) गेला. ५. त्यावेळीं, याचा संबंध 'म्हणे' ह्याकडे. ६. प्रभो! महाराज! ७. पृथ्वीवर. ८. ओकून. ९. मुखाला. १०. अरण्यविशेषाला.

हिंडे [1]मानवपशुचा काढित, पसरोनि आनना, वास. ॥ ९
तो देखुनि मुनिसि म्हणे, 'लाधे पक्वान्न आजि गोधूम[2].' ।
भक्षाया मुनिसी मग कवळी[3], [4]देऊनि थोर [5]गो धूम. ॥ १०
मुनिअंगस्पर्शें मन जालें सुज्ञानि राक्षसाचें तें, ।
प्रश्न करी मग मुनिसी ऐका देऊनि लक्ष साचें तें. ॥ ११
राक्षस म्हणे मुनीसी, 'सुज्ञानचि लागतां त्वदंग मला ।
जालें, जालें क्षाळण पापाच्या [6]हृदयअंतरंगमला. ॥ १२
दशशत जन्मांतरिंचे पापाचें सर्व होय तें स्मरण, ।
त्यामाजि [7]पंचविंशति जन्मांचें ऐक पापआचरण. ॥ १३
दुर्जय नामा मी नृप असतां करिं बहु अपार दोषातें, ।
पीडीं प्रजांसि, भोगीं बळेंचि आणुनि असंख्य योषातें[8]. ॥ १४
[9]विप्रिणि [10]शतत्रि, [11]वाणिणि [12]सौशत, [13]शतचार [14]राजरामातें, ।
शूद्रिणि सहस्र भोगीं, इतरहि बहु; येत मग [15]जरा मातें. ॥ १५
एकेक एक वेळां भोगुनियां ठेविं सर्व बंदांत, ।
पुनरपि दर्शन नेदीं म्हणोनि त्या खात मजवरी दांत. ॥ १६
ऐशा भोगीं बहु जरि माझें तृप्तहि न होय मानस हें, ।
मेल्यावरि यमलोकीं माझें हें पाप हो यमा न[16] सहे. ॥ १७
यमधर्म म्हणे मज, 'तुज ऐसा पापी न पाहिं नर कांहीं, ।
बहुकाळवरी आतां पापें भोगीं पचोनि [17]नरकांहीं, ॥ १८
[18]दश अयुताब्द [19]निरयें मी भोगुनि मग येत [20]भूत जन्मातें. ।
दशशत शिश्नें अंगा भ्यासुर कोणी न पाहि जन मातें. ॥ १९
अन्नोदकाविणें मी त्या जन्मीं भोगिं कष्ट अति बहुत, ।
पुनरपि यमलोकातें नेउनि निरयांत घालि [21]अर्कसुत. ॥ २०
आलों मग वाघाच्या जन्मा मग [22]अजगराणि [23]वृकें जालों, ।

---

१. मनुष्यें व पशू यांचा (वास). २. गव्हाचें. ३. हातानें धरी. ४. धूम देऊन=धांव मारून, धूम ठोकून. ५. पृथ्वीला, जमिनीवर. गो=पृथ्वी. ६. हृदयांतील मळाला. ७. पंचवीस. ८. स्त्रियांनां. ९. ब्राह्मणस्त्रिया. १०. तीनशें. ११. वैश्यस्त्रिया. १२. सहाशें. १३. चारशें. १४. राजस्त्रिया. १५. म्हातारपण. १६. सहन होईना. १७. नरकांच्या योगानें. १८. दशसहस्र वर्षेंपर्यंत. १९. नरक. २०. पृथ्वीवर. २१. यम. २२. अजगर+आणि. २३. लांडगा.

ग्रामडुकर, सरड, श्वा[1], जंबुक, मृग, शशक[2], जन्मुनी आलों. ॥ २१
मर्कट, गृध्र, नकुल[3], मग वायस, मग रीसें[4], रानकुक्कुट[5] मी, ।
खर अंध, ओतु[6], मंडुक, कासव, झष[7], मूष[8] करित पट कुट मी, ॥ २२
तेवीसावे जन्मीं उलूक[9] मग मत्त बहुत वारण[10] मी, ।
पंचविसावा आतां मी राक्षस'. म्हणुनि बहुत[11] वार नमी[12]. ॥ २३
'भक्षाया तुज येतां न होय शंका मनांत लेश मला, ।
त्वत्स्पर्शें अघ नाशे, क्षुधाग्नि बहु तोहि नातले[13], शमला. ॥ २४
ईश्वर! मदुद्धरा या येशी प्रत्यक्ष याचि महिमाजी, ।
त्वत्स्पर्शें ज्ञान मला जालें कैसा त्वदंगमहिमा जी!' ॥ २५
मग वामदेव मुनि तो बोले, 'रे! ऐक राक्षसा कानीं, ।
मद्वपुभस्मस्पर्शे त्वदघ[14] उडवि, कणिचि वातसा[15] काननीं[16]. ॥ २६
भस्माचा बहु महिमा, वर्णि कवण? वंद्य जें त्रिनेत्रांस[17], ।
पावति[18] नर लावि तया पाहुनि यमदूतलोचनें त्रास. ॥ २७
द्राविडदेशीं होता द्विज पापी जारचोरकर्मी तो, ।
होउनि रत शूद्रीतें भक्षि तिचे हातिंचें अधर्मी[19] तो. ॥ २८
करितां चोरी रात्रीं, एक्या शूद्रासि विप्र सांपडला, ।
वधिला शूद्रें तत्क्षणिं वैवस्वतदूतपाश[20] गळिं पडला. ॥ २९
काढुनि जीव यमाचे[21] नेती मारीत धबधबा हेर[21]', ।
प्रेतपदा धरुनी मग टाकी तो शूद्र नगरिबाहेर. ॥ ३०
श्वानैक तत्पुरीतें बसला होता श्मशानभस्मांत, ।
प्रेता पाहुनि वरि तो भक्षाया बैसला अकस्मात. ॥ ३१
श्वानोदरिची रक्षा लागे प्रेता ललाटभुजहृदया, ।
पाहुनि शिवदूतीं तें चित्तीं बहु कळवळोनि आलि दया. ॥ ३२
म्हणती, 'या प्रेताचे नेलें काढोनि कोणि जीवास? ।
भाळीं त्रिपुंड्र टीळा सदैव शिवलोक यास जी! वास'. ॥ ३३
पाहति तों दूरवरी नेती ताडीत जीव यमचार[21], ।

---

१. कुत्रा. २. ससा. ३. मुंगुस. ४. आस्वल. ५. रानकोंबडा. ६. मांजर. ७. मत्स्य. ८. मी (मूष होऊन) पट (वस्त्र) कुट (पूड, तुकडे) करित (असें). ९. घुबड. १०. हत्ती. ११. अनेक वेळां. १२. नमन करी. १३. न टिके. १४. तुझें पाप. १५. वाऱ्याप्रमाणें. १६. काननीं? १७. शंकरास. १८. (जो) नर (भस्म) लावि तया पाहुनि यमदूतलोचनें त्रास पावति—असा अन्वय. १९. भ्रष्ट. २०. यमदूतांचा पाश. २१. यमाचे हेर (दूत).

त्यामागें सत्वरि ते देती शिवदूत थोर धुम चार. ॥ ३४
घेती हिरोन जीवा करिती यमदूत मग पलायन हो! ।
म्हणती आतां दंतस्वामीचे पडति दृष्टि पाय न हो. ॥ ३५
धापा देत भयानें पळतां जाली तयां उदंड धरा, ।
'जाउं न आतां क्षितिवरि' म्हणती साष्टांग नमुनि दंडधरा. ॥ ३६
'पाप्यास आणितांऽम्ही मारिति शिवगण बुडे नय; मराया ।
क्षितिवरि जाउं न आतां चित्तींचें भय उडे न यमराया!' ॥ ३७
कोपे यापरि वचनें दूतांचीं आयकोनि कानिं यम, ।
शिवगण गांठोनि म्हणे अधर्म हा, बुडविला निका नियम. ॥ ३८
न मरेचि काय सांगा जाणुनि जो की विषक्षपा प्याला, ।
कैलासासि अधर्में नेतां होऊनि रक्ष पाप्याला. ॥ ३९
अन्यायहि नसतां मचारां कां 'हाय! हाय!' मारा हो? ।
ते म्हणति, 'जीत सोडूं चित्तीं उपकार हा यमा राहो. ॥ ४०
भाळीं त्रिपुंड्र टीळा असतां तव दूत ते कसे शिवती? ।
आणा त्रिपुंड्रधारक आज्ञा आम्हांस दे सदाशिव ती. ॥ ४१
आतां सांगे दूतां न शिवा भस्मांकिता, धरा नियमा; ।
भस्मांकिता न लागे दोष कदा सत्य ऐक कानिं यमा. ॥ ४२
शिवदूतवचश्रवणें आंकळि घालुनि विवेकपाश मन, ।
आला स्वात्मपुरा मग समूळ यमकोप जाहला शमन. ॥ ४३
पाचारुनि मग दूतां सांगे 'ऐका' म्हणे तमानुज तो, ।
'बहु दोषी जरि, नाणा लावी जो भस्मपुंड्र मानुज तो. ॥ ४४
रुद्राक्ष भस्मचर्चित पापी जरि असलिया तुम्ही न शिवा, ।
न लगति दोष तयातें आवडती प्रीतिनें महान शिवा.' ॥ ४५
मुनि वामदेव बोले, 'करिसि कथा कीं हि राक्षसा! श्रवण, ।
या परि विभूतिमहिमा; प्रीतीनें लावि मित्र वैश्रवण.' ॥ ४६
राक्षस म्हणे, 'मुनि! कसें लावावें भस्म सांग विस्तरुनी, ।
जाती ज्याच्या स्पर्शें पावन नर, होउनी कवी, तरुनी. ॥ ४७

---

१. यमरायाचे. २. पृथ्वी, जमीन. ३. यमाला. ४. न्याय नाहींसा झाला. ५. साफ. पूर्ण. ६. विषाच्या पाण्याला, विषरसाला. ७. रक्षण. ८. (मत्+चार) माझ्या दूतांना. ९. जीवंत सोडला. १०. आवरि. ११. शनीचा धाकटा भाऊ, यम. १२. वैश्रवणाचा मित्र, कुबेराचा मित्र, शंकर.

प्रत्यक्ष होसि शांभव, जाळिसि माझ्याहि पातकाला हे, ।
कां लाहें त्वत्पद मी, तें आठविलेंचि सुकृत, काला हे(?) ॥ ४८
पूर्वी करितां राज्या, बंधन मी करिं सर, क्षितीदेवा. ।
दे वृत्ति, तेंचे जाली मज माते परिस रक्षिती देवा! ॥ ४९
यमलोकीं मज दूतें सांगितलें पूर्व पुण्य हो! तें हें ।
आलें आज फळासी, देई तव पादभेट होतें हें. ॥ ५०
मुनि मग म्हणे तयातें, 'लावावें भस्म, ऐक विधिला ते, ।
भस्मांकित नर पाहुनि हर्ष बहुत शर्व, विष्णु, विधिला ते. ॥ ५१
एके दिवशीं शंभू क्रीडाया मंदराचळीं बसत, ।
इंद्रादि देव तेथें येती मुनि नारदादि तुंबें संत. ॥ ५२
गिरिजाहि आलि तेथें घेउनि साठी सहस्र हरगण ती, ।
चवदाहि लोक आले, वदतां कांहीं न होय नरगणती. ॥ ५३
ऋषिसह सनत्कुमार श्रीशिवभेटीस पातले हो! ते, ।
रत्नखचित सिंहासनिं गिरिजेसह सांब बैसले होते. ॥ ५४
सप्तप्रभावळीचें नवरत्नांकीत सातरंगी तें, ।
सिंहासन वरि पाहुनि शिव पावति तोष अंतरंगीं ते. ॥ ५५
सिंहासनिं शिव शोभे विनवि तयासी सनत्कुमार मुनी, ।
'अल्पश्रमें सुकृत बहु घडे असें सांग' तो म्हणे नमुनी. ॥ ५६
मुनिची असी विनंती, श्रवणें आनंद फार ईशमनीं, ।
ऐक म्हणे, 'सुकृत महद्भस्मोद्धारण महा अघाशमनीं. ॥ ५७
भस्मोद्धारणिं नाशी सहस्र जन्मार्जितें अघें नर कीं, ।
नेई उद्धरुनी तो बेचाळिस असलिया कुळें नरकीं. ॥ ५८
भस्मोद्धारणिं वाढे तेज बहुत अति चढे वपुस शील, ।
जरि मज, सांगेन तुला मंत्र विधी, द्रव्य, नांव, पुंसशील. ॥ ५९
गोमय शुष्क करुनि तें अग्नी लावोनि पूर्ण जाळावें, ।
तें भस्म शंभुमंत्रें भाळीं सर्वांगिं शुष्क चोळावें. ॥ ६०

१. ह्या कालीं, आतां. २. मी सर बंधन करिं=मी तळें बांधिलें. ३. ब्राह्मणांला. ४. चरितार्थाचें साधन. क्षमादेवा वृत्ति दे–असा अन्वय. ५. ती वृत्ति. ६. ते (त्या) विधिला ऐक. ७. तुंबुरु(?) किंवा पुष्कळ. उ०–'नदी तुंब भरली आहे.' ८. साधु. ९. सौजन्य. १०. भस्माचें द्रव्य (साधन–शेण). ११. याचा संबंध 'मज'कडे. १२. कपाळीं. १३. कोरडें.

अथवा पूर्वीं क्षितिवरि करिती ऋषि पुण्यशीळ यांगा,[1] ती ।
आणुनि विभूति लावा, दवडी अघ तत्क्षणीं लया गा ! ती. ॥ ६१
मंत्रोनि पंचभूतीं [2]त्रिऋचें मार्जन जलें करा मग तें, ।
[3]मंत्रुनि शिवमंत्र्यंगीं लावावें; जाळि थोर [4]अघनग तें. ॥ ६२
[5]अंगुष्ठमध्यनामिक लावुनि तीं बोटिं शोभवी निढ[6]ळ, ।
पद देई कैलासीं त्याला मी तारुनी भवीं[7] निर्ढळ[8]." ॥ ६३
मुनि वामदेव सांगे भस्माचा राक्षसा मही महिमा, ।
ज्ञानरवि प्रकटोनी नाशि [9]अविद्या कुबुद्धि हीमहिमा. ॥ ६४
मंत्रुनि भस्म स्वकरें लावीतां राक्षसा कपाळीं तें, ।
धाडी विमान ते क्षणिं होउनि आनंद बहु [10]कंपालीतें. ॥ ६५
साष्टांगीं मग राक्षस नमुनि मुनिसि सांब जेंवि मानी तो, ।
बैसुनि मग कैलासीं गेला शिव धाडि जे विमानीं तो. ॥ ६६
सिद्ध म्हणे, 'गा शिष्या ! त्रिविक्रमा गुरुंनिं भस्मधारण हें ।
सांगितलें; श्रवणें करि नाशुनि अघभवभया निवारण हें. ॥ ६७
रामात्मजपुत्र म्हणे सुभस्म लावा करोनि [11]भावी तें, ।
श्रवण करा गुरुचरिता अघघ्न भवसागरीं निभावीतें. ॥ ६८

---

## अध्याय विसावा.[12]

बोले शिष्य उभय कर जोडुनि गुरुचें नमोनि पदकमळ, ।
'प्रक्षालिसि मन्मनमल, वस्त्राचा क्षाळि जेंवि उदक मळ. ॥ १
ज्ञानार्क सद्गुरू तूं नाशिसि अज्ञान हेचि दोषा[13] जी ! ।
चरितकथा सांग पुढें समूळ नाशीच सर्व दोषा जी.' ॥ २
ऐकोनि शिष्यवचनें सिद्ध मुनी बहु मनांत मानवला, ।
'ऐक' म्हणे शिष्यासी 'केलें श्रीगुरुंनिं [14]उत्तमा नवला. ॥ ३
[15]मौहूरीं द्विज होता पावति तत्पुत्र जन्मतचि निधन, ।

---

१. यज्ञाला. २. तीन ऋचा म्हणून. ३. शिवमंत्रीं मंत्रूनि अंगीं लावावें. ४. पापपर्वत. ५. अंगुष्ठ+मध्य+अनामिक (या) तीं बोटीं=आंगठा मधलें बोट आणि करंगळी जवळचें बोट या तीन बोटांनीं. ६. कपाळ. ७. संसारांत. ८. न ढळणारें, अचल. हें 'पद' याचें विशेषण. ९. अविद्या आणि कुबुद्धि हीच कोणी हीम (थंड) हिमा (रात्र). १०. शंकर. ११. भक्तीनें. १२. या अध्यायांत मुळांतील अध्याय ३०, ३१ आणि ३२ यांमधील कथाभाग आला आहे. १३. रात्र. १४. अत्यंत आश्चर्यकारक गोष्ट. १५. ग्रामविशेष.

पुत्र जगावे म्हणउनि अपार विप्रांसि देत दानिं धन. ॥ ४
नानाव्रतदानादी करि जरि, तरि न जगती कदां सुत कीं, ।
तें दुःख हृदय भेदी कृष्ण[1] देगड[2] भेदिते जसी सुतकी. ॥ ५
**गो**पीनाथ तयाचें नाम असे, द्रव्यवान तो बहुत, ।
वांचति न पुत्र म्हणउनि जाला तत्सर्वहर्षकोंब[3] हुत[4]. ॥ ६
**द**त्तात्रय आराधन करितो तद्ध्यानिं चित्त मन वसुनी, ।
पावे सुत मग एकचि **द**त्तात्रयमूर्ति उत्तम नवसुनी[5]. ॥ ७
**द**त्तप्रसाद म्हणउनि **द**त्त असें नाम त्यास ठेवी, तें ।
प्रतिपाळी, जतन करी, दिवसनिशीं कृपण जेंवि ठेवीतें[6]. ॥ ८
अष्टमवर्षीं द्विज मग पुत्राचें करित मुंजिबंधन तो, ।
सोहाळा करि मोठा, वेंची विप्रासि देत बहु धन तो. ॥ ९
मेले प्रथम कुमर जे त्यांचा मग होय सर्व खेद शम, ।
नवऱ्या सांगुनि येती वर्ष सुता लागतांचि तें दशम. ॥ १०
द्वादशवर्षें[7] पुत्रा होतांचि प्रौढ पूर्ण त्यास मती ।
जाली, मग करि लग्ना पाहुनि सुंदर वधू रतीसम ती. ॥ ११
मोठ्या उत्साहानें लग्न करी थोर विप्र भोजन हीं; ।
भोजनहि[8] बहुत देउनि तृप्ति करी, कीर्ति गाति भो! जन ही. ॥ १२
सासुश्वशूर म्हणती, 'सुनेस ठेवोनि नांव **सा**वित्री, ।
शीलत्व, दक्षताणिक नम्रपणा हीं मना वसाविं त्री[9].' ॥ १३
जोडा योग्य, वधुवरें म्हणुनि बहुत जन समस्त वानीती, ।
शोभे मंदनरतीसम[10] लेउनि पटें[11] दिव्य, वस्तेंवानी[12] ती. ॥ १४
प्रीती बहु दोघांसी क्षणहि विसंबति न एकमेकांला, ।
ते काला मातृपिता हर्षति पाहोनि सूनलेकांला. ॥ १५
षोडशवर्षीं झाला रोग, न चाले उपाव पुत्रास, ।
पावुनि[13] दुःखजलाक्षें सांडिति मग टपटपा वपु त्रास. ॥ १६
म्हणती, 'हे **द**त्तात्रय! रक्षिं कुमर तूंचि, शें उपाय करीं, ।

---

१. काळा फत्तर. २. दगड फोडण्याचें हत्यार. ३. त्याच्या सर्व हर्षांचें कारण. ४. दग्ध. ५. नवस करून. ६. द्रव्याला. ७. हा विवाहकाल लक्षांत ठेवण्यासारखा आहे. ८. धन. ९. शीलत्वादि तीन गुण. १०. मदनाच्या रतीप्रमाणें. ११. वस्त्रें. १२. दागदागिने. १३. वपु त्रास पावुनि मग अक्षें (डोळ्यांतून) दुःखजल (दुःखाश्रु) टपटपा सांडिति.

किमपिहि[1] रोग शमेना बहु जरि मी औषधी उपाय करीं.' ॥ १७
वैद्या बहु धन देउनि आणोनि तयांस हात दावीत, ।
'देईल आणिकहि[2]' म्हणे, बरा करायास हात दावीत. ॥ १८
रोगा हनन पळातें करणारे [3]कश्यपद्विजासम जे ।
देती औषध वैद्यहि नाडिपरीक्षाहि पूर्ण ज्यां समजे. ॥ १९
[4]वैद्यौषधास देती परि किमपिहि रोग तो न व्हे शमन, ।
[5]दुश्चितपणिं वैद्याचें चिंता करि, केंवि येत येश? मन. ॥ २०
वैद्य म्हणति, 'बहु भिषजें[6], रसायणें केलिं गट्ट रोगें हीं, ।
न चले उपाय' म्हणउनि गेले मग आपुले घरोगेहीं[7]. ॥ २१
सुटली बहुत शरीरीं, न शके कोणीहि ते बघों, घाण; ।
दुर्गंधिनें बहु उठे, माशांची बसुनि [8]चुंब, घोंघाण[9]. ॥ २२
तत्स्त्री पतिव्रता ती सेवा करि सार्वकाळ [10]जीवांहीं, ।
उपवास व्रत करुनी कष्टवि[11], दिनरात्र काळजी वाही. ॥ २३
दुःख करिति मातृपिता, लागे अत्यंत झीज तनयास, ।
म्हणती, 'हे जी दत्तस्वामी! आतां तुझी जतन[12] यास. ॥ २४
तूंचि दिला मज सुत कीं, त्रैमूर्त्यवतार! काय वदुं? पाय ।
धरिले तुझेचि देवा! हरला आतांहि सर्व मदुपाय[13]. ॥ २५
रक्षीं, रक्षीं स्वामी! सन्निध कीं करुनि काळ आ टपला, ।
भक्तां न रक्षिसी मग तव भक्तीचा सुकाळ ओटपला[14].' ॥ २६
मातृपित्यासि म्हणे सुत, 'न कदापिहि भोगतृत्व[15] होय कमी, ।
आलों तुमचे उदरा कुपुत्र होऊनि दुःखदायक मी. ॥ २७
भरलें आयुतुमचा माझाजि! ऋणानुबंध [16]वो सरला, ।
आदा सौख्यनदीचा, तुमचा आनंदपूर वोसरला[17].' ॥ २८

---

१. थोडा(शरीरीं) सुद्धां. २. (गोपीनाथ श्रीमंत आहे तेव्हां) आणिक (द्रव्य) देईल (असें वैद्य) म्हणे (आणि) बरा करायास हात दावीत–असा अन्वय. चढउताराचीं औषधें देऊन पैशाच्या आशेनें वैद्य चांगलें औषध देईना–असा भावार्थ. ३. धन्वंतरीप्रमाणें. ४. वैद्य+औषधास. ५. केंवि येश येत (कसा गुण येईल असें) वैद्याचें मन दुश्चितपणिं (उद्विग्न होऊन) चिंता करि–सार्थान्वय. ६. औषधें. ७. घरोघर. या ठिकाणीं 'आपआपले गेहीं' असा पाठ बरा दिसला असता. ८. चुंवा, गर्दी. ९. पुष्कळ माशा एक ठिकाणीं जमल्यामुळें उत्पन्न होणारी गडबड आणि गोंगाट. १०. पंचप्राणांनीं. ११. याचें कर्म 'शरीर' अध्याहृत. १२. रक्षण, कृपा. १३. माझा उपाय. १४. संपला. १५. भोक्तृत्व, भोगावयाचें तें. १६. अहो! १७. कमी झाला, संपला.

जायेसि म्हणे, 'कष्टा व्यर्थ न करिं, जाय बापगेहाला, ।
मजपासुनि सौख्य तुला न होय पावसि उमाप[1] गे! हाला. ॥ २९
त्वत्स्पर्शें मरण मला होइल, वैधव्य हें तुला [2]भें गे! ।
मी हीनदैव कोठुन मज तव सौंदर्यसौख्य लाभे गे!?' ॥ ३०
पतिवचनैकुनि झालें वदवेना दुःख जें उमाप तिला, ।
'हर! हर! हे शिव!' म्हणउनि 'धांव' म्हणे तेधवां उमापतिला.॥३१
पतिला म्हणे, 'तुम्हातें होतां विपरीत मीहि सांगाती, ।
माहेरा जा म्हणतां मजपासुनि काय चूक सांगा ती. ॥ ३२
वाटे या वचनें मज आंगावरि सर्व कोसळे [3]नभ जें, ।
किंवा [4]गिरिशिख उडवुनि, आणुनि हृदिं ताडिलें बळें [5]नभजें. ॥ ३३
न उपेक्षा मज, तुमची सेवा मी करिन हो! दि[6]वाशोकीं.' ।
उभयांचे बोलैकुनि मातृपिता पडति तेधवां शोकीं. ॥ ३४
कवळुनि पुत्रसुनेतें टपटप गाळीति लोचनिं जलासी, ।
म्हणती, 'हे करुणाघन! दत्तात्रय! देव! काय निजलासी; ॥ ३५
जाल्या विपरीत सुता, न धरूं या गेहिं सत्य जी [7]वास, ।
तत्काळ देउं तुजवरि आपटुनी भाळ सत्य जीवास.' ॥ ३६
अतिदुःखें शोक करिति हृदयीं पावोनि पुत्रमृत्युभया, ।
समजावि सून त्यांसी, 'ऐका जी!' [8]जाहली वदत्युभयां. ॥ ३७
'वांचेल कांत माझा, चिंता तिळमात्र कांहिं न करा ती; ।
धाडा परस्थळातें एकादे' विनवि जोडुनि करा ती. ॥ ३८
'अवतरले दत्तात्रय सध्यां प्रत्यक्ष याचि महिमाजी, ।
गाणगपुरसुक्षेत्रीं सांगति जनलोक थोर महिमा जी! ॥ ३९
नाम नृसिंहसरस्वति, धाडा तद्ध्यावया सुदर्शन तें, ।
छेदी भवरोगादिक तद्दर्शनपुण्य जें [9]सुदर्शन तें. ॥ ४०
त्याच्या दर्शनमात्रें माझा पति हा अरोगता पावे, ।
[10]नं कदां मजवरि तिलहि, न बोलत मी हें अयोग्य, तापावें. ॥ ४१
प्राणपती हा माझा, करुं चित्तीं तिलहि दुःख शोक नका; ।

१. पुष्कळ. २. भय. ३. आकाश. ४. गिरिशिखर. ५. वायूनें. ६. दिवसा रात्रीं-रात्रंदिवस. ७. राहणें. ८. उभयां (सासूसासऱ्यांस) वदती जाहली. ९. सुदर्शन चक्र. १०. मी हें अयोग्य न बोलत, आपण मजवरि तिलहि न तापावें (रागावावें).

प्रार्थुनि देवा रक्षिन पति, लोभी जेंवि रक्षितो कनका. ॥
न करा चिंता दत्तचि माझा कुळदेव रक्षि यांस मेज[1]; ।
द्यावा निरोप.' म्हणतां ऐकुनि पडला मनीं तयां समज. ॥
देती निरोप मग तीं; चित्तीं आनंद थोर होय तिला, ।
पतिला घेवोनि निघे पहावया नृहरिनाम हो यतिला. ॥
नमितां सासुश्वशुरा आशीर्वच देति तीं तिला, मग ती ।
निघती जाली घालुनि पति रोगी डोलिमाजि शीघ्रगती. ॥
मार्गें जातां जाला चढ अति बहु तो त्रिदोष रोग्यातें, ।
आली गाणगपुरिं त्या पुसे जना, 'पाहुं नृहरि योग्यातें.' ॥
सांगति जन ते, 'स्वामी गेले स्नानासि येति माध्यान्हीं, ।
संगमिं अश्वत्थतळीं बसले असती शिवासम ध्यानीं.' ॥
'संगमिं घेऊं दर्शन' म्हणउनि ती येत जों पतीपाशीं, ।
तों यमदूत तयाचे काढुनियां जीव बांधिती पाशीं. ॥
पतिस म्हणे, 'गुरुदर्शन घेउनि रोगास या निवारुं चला.' ।
न वदे पति म्हणुनि म्हणे, 'त्वन्मानिं मच्छब्द हा न कां रुचला? ।
कांहिंच न वदा सहसा, बंधन[3] केला जि काय कानिं पट?' ।
हालवितां परि लागे काष्ठापरि शरिर हस्तका निपट. ॥
गेला प्राण न राही धुगधुगि तिळमात्र तेधवां ही, ती ।
हातां पतिकर धरुनी पाहे तों नाड[4] ही न वाही ती. ॥
जीव नसे म्हणुनि रडे सांडी जळ लोचनीं टपटपा तें, ।
नेत्राचेंहि[5] न हाले, पाहे काढोनि नीट पट[6], पातें. ॥
आक्रोशें करि तेव्हां आठवुनी दुःख सुख विलापाला, ।
दुःखानळें तियेचा देह जळे जेंवि सुकविला पाला. ॥
मस्तक आपटुनि रडे मूर्छा येउनि पडे ति हो! धरणी, ।
शोक करी उठुनि पुन्हा मूर्छित, करि युद्ध जेंवि योध रणीं. ॥
हाणाया घे पाहुनि हृदयस्थळमध्यजीववर्म[7] सुरी, ।
वारिति सज्जन तिजला 'न करिं' म्हणति 'कर्म हें असें असुरी[8]. ॥

---

१. पतीला. २. मला. ३. कानाला वस्त्र बांधिलें काय म्हणजे कानाला वस्त्र बांधल्या कां करितां? ऐकूं येत नाहीं काय? बोलत कां नाहीं? ४. नाडी. ५. पतीच्या नेत्राचें संबंध 'पातें' याकडे. ६. (तोंडावरील) वस्त्र. ७. हृदयाच्या मध्यस्थळीं असणारें जीवाचें ठिकाण. हें 'हाणाया' याचें कर्म. ८. असुरी कर्म=राक्षसी कृत्य.

करिं कां विवेक; पाहसि भोंकाया[१] तूं स्ववक्ष; न रडें गे! ।
आटपिसी; कां देशि न सज्जनवचनासि लक्ष? न रडें गे! ॥ ५६
प्राक्कर्मापरि फल हें, न करीं तूं शोक, भर्तृदेहातें ।
संस्कार करावें, उत्तम गति होण्या दानधर्म दे हातें.' ॥ ५७
समजावितिहि मिळोनी सुवासिनी वृद्ध नारि बहुतरिती, ।
भर्तृस्नेहा ठेउनि शोक करी प्रेतनारि[२] बहु तरि ती. ॥ ५८
'गुरुदर्शनें करूनी [३]पतिचा आरोग्य काय बा! [३]या हो[४]. ।
म्हणउनि आल्यें घेउनि परदेशीं, करुं मि काय [५]बाया हो! ? ॥ ५९
वृक्ष पडोनी मरती येतां छाये, उनांत जे [६]तपती, ।
ती गति जाली मजला, येतां गुरुदर्शनासि सहित पती. ॥ ६०
आशा करोनि आल्यें पतिसह पाहेन मी गुरूचरण, ।
होइलहि अरोग्य पती, करितां गुरुशुश्रुषेसि आचरण. ॥ ६१
विपरीत होय, आतां नाहीं फळ ठेउनी शरीरा हो! ।
त्यागीन जीव मी हा गुरुकीर्ती [७]हेचि भूवरी राहो.' ॥ ६२
पतिस म्हणे, 'जी! कांहिंच न सांगतां बुद्धि तूं बुधा! मातें, ।
माझा त्याग करोनी कां केलें गमन मृत्युधामातें? ॥ ६३
मातृपिता घरिं ठेवुनि, घेउनि तुजलागिं येत [८]परदेशीं, ।
आरोग्य व्हावयास्तव, दुःख तयांलागिं केंवि [९]पर देशीं. ॥ ६४
देतील जीव तीं कीं करोनियां 'पुत्र! पुत्र! हे कुमरा!' ।
त्यागोनि जन्मभूमी कैसे परदेशिं आजि हे[१०] कुं मरा. ॥ ६५
ऐका जि मायबहिणी! पापिण मीं घात करविला पतिचा.' ।
[११]नरनारीजन सर्वेहि गहिंवरती ऐकुनी विलाप तिचा. ॥ ६६
शोकानळ नरनारी विवेकजळ शिंपुनी अनेक रिती, ।
शमविति, परि तो न शमे; प्रेत कवळुनी [१२]विलोपनें करि ती. ॥ ६७
'असतें [१३]पतिमातृपिता पाहति मुख अंतकाळिं जरि धामीं; ।

---

१. भोंक पाडण्यास, फोडण्यास. २. मृताची स्त्री. ३. या पतिचा. ४. होवो. ५. स्त्रियांनो! ६. तापतात. ७. (मला येथें येण्याचा कांहीं उपयोग न झाल्यामुळें मीं प्राण दिला) हीच गुरूची (अप)कीर्ति. ८. ह्या परक्या ठिकाणीं. ९. परंतु किंवा अतिशय. १०. ह्या भूमीस, येथें. ११. नर आणि नारी. १२. विलाप, शोक. १३. जरि मी धामीं (घरीं) असतें (तर) पतिमातृपिता (पतीचे आईबाप) अंतकाळीं ते (आपल्या मुलाचें) मुख पाहति (पाहते).

केलें विघ्न[1] तयाचें प्राग्वैरिण सत्य होय बहुधा मी. ॥ ६८
मद्वदन पाहतांक्षणीं मरतीलचि सासुबाइ मामाजी, ।
अंतरल्यें त्यांसहि मी पडिल्यें चिंतानिळ[2]भ्रमामाजी. ॥ ६९
पतिविण आतां मजला जालें ओसाड[3] दग्ध गेह वन, ।
कैसा ठेवूं प्राण? स्वतनूचें करिन पतिसवें हवन. ॥ ७०
करुणाकर **गु**रुराया! कृपाघना!' म्हणुनि दीर्घ हांकेला ।
मारुनि, शोक करि म्हणे, 'कां जी! मद्घात हा महा केला. ॥ ७१
नानारिति विलपुनि ती दीर्घ बहुत जों रडे करुनि[4] आला, ।
इतक्यांत एक तापसि भस्मांकित शूल करिं धरुनि आला. ॥ ७२
**सा**वित्रीस म्हणे, 'कां आक्रोशें करुनि दीर्घ आ रडसी, ।
जीव नयेचि प्रेता अष्टदिवस जरि समग्र आरडसी. ॥ ७३
न करीं शोक वृथा तूं, केलें प्राचीन जेंवि कर्म असे, ।
भोगावें सुख दुःखहि, जाणावें चित्तिं पूर्ण वर्म असें. ॥ ७४
न ठरे स्थिर क्षणहि तें कमलाचे पत्रिं बिंदु तों जामी[5], ।
तैसा देह असे हा. वचनासी ऐक सांगतों ज्या मी. ॥ ७५
मोहें व्यर्थ भुलुं नको, न स्थिर हा देह, जेंवि बुद्बुद[6] कीं, ।
लहरीच्या संघट्टणिं फुटती उठती पुनः पुन्हा उदकीं. ॥ ७६
टाकुनि गेला म्हणउनि कां रडसी; सांग मागिले जननीं[7] ।
होतीस कोण तूं गे!? कोण पती, पुत्र, बंधु वा जननी? ॥ ७७
सायंकाळीं पक्षी बहु मिळती जेंवि एक वृक्षातें, ।
तैसे ऋणानुबंधें पति, सुत, बा[8], आइ; आणि[9] लक्षातें. ॥ ७८
त्यजिती तरु पक्षि, तसे पत्यादि ऋणानुबंधगवि[10](?) सरल्या, ।
जाती, बुडति भवातें; तरती जे धर्म शर्म न[11] विसरल्या[11]. ॥ ७९
आतां शोक करुं नको सार्थकतेचाचि मार्ग तो कांहीं ।
पाहीं हो माते! 'करिं[12] वचनें ऐकोनि दूर शोका हीं.' ॥ ८०
ब्रह्मज्ञानादिक मग तयामुखें[13] ऐकुनी विवेक करी, ।

---

१. पतीला परक्या ठिकाणीं आणल्यामुळें त्यांची शेवटची भेटही अंतरली. २. चिंतारूप वायूच्या भोंवऱ्यांत. ३. गेह आणि वन ओसाड दग्ध झालें. ४. आ करून. ५. पाणी. ६. बुडबुडे. ७. जन्मीं. ८. बाप. ९. (हें) लक्षातें आणि. १०. गवि=गावी, पक्कड? ११. जे धर्म आणि शर्म ते न विसरणाऱ्या स्त्रिया. १२. हीं वचनें ऐकोनि शोका दूर करिं—असा अन्वय. १३. त्याच्या तोंडानें.

[1]बोधहरिदर्शनें तो [2]हृद्वन सांडोनि जाइ [3]शोककरी. ॥ ८१

बोले तयासि मग ती जोडुनियां हस्त, तत्पदा नमुनी, ।
'जालें शांत मन' म्हणे 'दुःखा आतां धरीं कदा न मुनी! ॥ ८२

आतां मार्ग कवण मज सांग' म्हणुनि, धरुनि तत्पदाशि, वदे, ।
'ज्या मार्गें स्वपदीं स्थळ [4]अढळाक्षय पूर्ण जो सदाशिव दे. ॥ ८३

गति जाली परदेशीं येतां घेवोनि एकटा [5]धव ही, ।
सुहृदिष्ट कोणि येथें नाहिं जननि, तात, भगिनि, बांधव ही. ॥ ८४

तातंबा बंधु बहिण इष्ट सुहृत् सर्व तूंचि आज मला, ।
तारीं; [6]भवसिंधुमगर भक्षाया मज करोनि आ जमला.' ॥ ८५

तापसि म्हणे, 'वदें मी मार्गद्वय ऐक, पूर्ण सादर हो; ।
[7]दर हो तुझाहि दवडी, स्वबळाचा विष्णुचा जसा दर हो. ॥ ८६

पतिशुश्रुषा करावी, असतां पति, जाण हा नियमधर्म; ।
[8]न करी त्या युवतीच्या तो पतिची प्राणहानि यमधर्म. ॥ ८७

शिव हरि तैसाच पती, मानावी सर्वदा [9]तदाज्ञा ती; ।
दारिद्री मूर्खहि जरि न करावी हो! कदां अवज्ञा ती. ॥ ८८

[10]सुरगुरु पतिव्रतेचें आचरण वदे [11]सुकाशिखंडीं तें, ।
[12]चिंताशोकनगातें श्रवणें मोठ्या अघासि खंडी तें. ॥ ८९

सांगे जीव कशास्तव पतिव्रताचरण ऐक कारण तें, ।
भावें ऐकति जरि, करि चिंता भयशोकही निवारण तें. ॥ ९०

एके दिवसीं आला [13]विंध्याद्रीं [14]ब्रह्मपुत्र देवर्षी, ।
पाहुनि सुवनें सुमनें तच्छिरिं तो स्तवनघनपदें वर्षी. ॥ ९१

नारद विंध्यासि म्हणे, '[15]रम्यस्थळ [16]नग नसे तुजसमान, ।
नव्हसि [17]महत् मेरुसरी, लघु असती म्हणउनी नसे मान.' ॥ ९२

---

१. बोधरूपी सिंहाच्या दर्शनानें. २. हृदयरूपी वन. ३. शोकरूपी हत्ती. ४. अढळ+अक्षय. ५. पति. ६.संसारसमुद्रांतील सुसरी. ७.विष्णूचा दर (शंख) जसा स्वबळाचा (आपल्या सैन्याचा) दर (भय) दवडी (तसा माझा उपदेश) तुझाहि दर (भय) (दवडी)—असा सार्थान्वय. ८. तो यम-धर्म त्या (पतिसेवा करणाऱ्या) युवतीच्या पतिची प्राणहानि न करी—असा अन्वय. ९. त्याची आज्ञा. येथून पतिव्रताधर्मास सुरवात झाली आहे. १०. बृहस्पति. ११. स्कंदपुराणांतील 'काशीखंडा'त. १२.श्रवणें तें चिंताशोकनगातें (चिंता आणि शोक हेच कोणी पर्वत त्यांना) (आणि) अघासि (पा-पाला) खंडी (फोडतें, नाहींसें करतें)—असा सार्थान्वय. १३. विंध्याद्रीकडे. १४. ब्रह्मदेवाचा मुलगा. (नारद.) १५. ज्याचें स्थळ (ठिकाण) रम्य आहे असा. १६. पर्वत. १७. मेरुपर्वताप्रमाणें मोठा.

नारद वदतां, [1]वाढे विंध्यमनीं जें लघुत्ववचशैल; ।
कोपुनि मग रविहिवरी वाढे नारद असे तंवच शैल. ॥ ९३
रविवरि वाढत जातां, पडिला तो दक्षिणेस [2]काळोक; ।
जाली अति दीर्घनिशी, न [3]होय रविउदय म्हणति कां? लोक. ॥ ९४
[4]दर्शतिथीसम जाली भरोनि अंधार धुंद गडद [5]रजा, ।
तस्करमनीं न वाटे जनांवरी मारितां दगड [6]दर [7]जा. ॥ ९५
ऋषि तें ध्यानीं जाणति विंध्याद्रीकृत्य [8]अन्वयज्ञाते, ।
म्हणती, 'विघ्न उठविलें ब्रह्मसुतें कर्ममार्गयज्ञातें.' ॥ ९६
'यज्ञादि कर्म राहे,' सांगति ऋषि [9]हरिस [10]विंध्यकर्णी ते, ।
कोपे [11]मघवा तेव्हां [10]विंध्यांकृति ऐकुनी स्वकर्णी ते. ॥ ९७
नग तो अगस्तिशिष्या म्हणउनि, जाला न टाकिता [12]पविला, ।
भ्याला शापभया हरि, कोपें जरि बहुत फार तापविला. ॥ ९८
[13]ऋषिगणसुरसह मग हरि सन्मुख जाऊनि [14]देवदेवाचे, ।
विंध्याद्रिपर्वताचें कृत्य हरी सर्व तें वदे वाचे. ॥ ९९
[15]द्रुहिण म्हणे मग शक्रा, 'एक असे या उपाय जाणावा; ।
काशिपुरींहुनि विनवुनि अगस्तिला दक्षिणेस आणावा. ॥ १००
शिष्या अगस्तिचा नग, पाहुनि गुरुसीं करील दंडवत, ।
त्याला सांगेल मुनी राहे ऐसाचि पडुनि [16]दंडवत.' ॥ १०१
विधिवच ऐकुनि आले इंद्रासह सर्व देव काशीला, ।
भेटुनि अगस्तिमुनिसी वर्णित तत्कीर्ति कौतुका शीला. ॥ १०२
शक्रासह सुरगुरुचें पूजन करि तेधवां अगस्ति मुनी, ।
'जालें किमर्थ येणें' म्हणुनि पुसे सर्वही सुरां नमुनी. ॥ १०३
सांगुनि वृत्त, सुर स्तव करुनि, स्तविती तयाचिही रमणी, ।
म्हणती, 'पतिव्रतांत श्रेष्ठहि नवरत्निं जैंवि [17]हीरमणी. ॥ १०४

---

१. जें लघुत्ववचशैल (लहान आहेस असें म्हटल्यानें होणारें शल्य म्हणजे टोंचणारें दुःख) (तें) विंध्यमनीं वाढे; मग (तो) शैल (पर्वत) कोपुनि नारद असे तंवच (नारद असतां-नाच) रविहिवरी वाढे (सूर्यापेक्षांही उंच झाला). २. काळोख. ३. रवि उदय कां न होय (असें) लोक म्हणति. ४. अमावास्येप्रमाणें. ५. अंधारी रात्र. ६. भय. ७. ज्या (रात्रीं). ८. संबंध जाणणारे. ९. इंद्राला. १०. विंध्याचलाची करणी (कृत्य). ११. इंद्र. १२. वज्राला. १३. ऋषींचा समुदाय आणि देव यांसह. १४. ब्रह्मदेवाचे. १५. ब्रह्मदेव. १६. काठीप्रमाणें. १७. हिरा नांवाचें रत्न.

क्षितिवरि पतिव्रता या बहु जरि परि या सतीसरी[2] नसती, ।
एकानुसया, दुजि हे, [1]देखों सम यांस तीसरी न सती. ॥ १०५
सावित्री, श्री, गिरिजा, [3]स्वाहादिक सर्व अमरजाया हो, ।
लोपामुद्रासतिच्या सेवाया योग्य पदरजा या हो.' ॥ १०६
[4]जीव म्हणे देवांसी, 'पतिच्या हे सति पतिव्रता चरणीं ।
सेवे रत, न असि दुजी देखों रत सति पतिव्रताचरणीं. ॥ १०७
जालों अम्ही सर्वहि सति देखुनि धन्य आज साचार, ।
आचार श्रवण करा युवतींचा बोलिला [6]जैसाचार.' ॥ १०८
तापसि म्हणे, 'बृहस्पति सांगे आचार मीहि त्याच रिती, ।
उद्धरिती उभय कुळें पतिव्रता ज्या तशाच आचरती. ॥ १०९
प्रातःकाळिं उठावें भर्ता जों जाहला नसे जागा, ।
संमार्जनविधि करुनी, करणें शुचि सर्वही दिसे जागा. ॥ ११०
उठतांचि कांत आधीं दावावें [7]स्वमुख शुद्ध दर्पण तें, ।
येतां [8]पुरीष करुनी, करणें मग उष्णजल तदर्पण तें. ॥ १११
स्नान जरी करि गेहीं, द्यावें शुचि तापवूनि [9]सुपवित्र, ।
संध्यापात्रिं भरुनि जल, द्यावीं [1]घर्षण [10]करोनि सुपवित्र. ॥ ११२
द्यावें साहित्य करुनि गंधादिक देवपूजनाचें तें, ।
पूजावें अतिथीसी करुनि समाधान तन्मनाचें तें. ॥ ११३
न करावा पतिआज्ञेवांचुनि धर्मव्रतादि उपवास, ।
कंचुकि सदा असावी अंगीं, पुरुषास जेंवि [11]उपवास. ॥ ११४
करितां व्रतदानादिक पतिआज्ञा घेतल्याविणें हो! तें ।
निष्फळ सर्वहि होउनि पतिचें आयुष्यही उणें होतें. ॥ ११५
पूजा नित्य पतीची करणें पाद्यादि भक्तिनें सुमनें, ।
गंधें सुगंध लावुनि अर्पावीं मग सुगंध जीं [12]सुमनें. ॥ ११६
जरि मूर्ख षंढ असला त्याला शिवहरि समान मानावा, ।
होतें आयुष्य उणें, म्हणउनि घेऊं नये तया नांवा. ॥ ११७
पूजा करणें पतिची प्रक्षालुनि पादतीर्थहि पियावें, ।

---

१. यांस सम तीसरी सती न देखों. २. तिसरी. ३. अग्नीची स्त्री. ४. देवस्त्रिया. ५. बृहस्पति. ६. जसा आचार. ७. आरशासारखें स्वच्छ असें आपलें तोंड. ८. शौच. ९. चांगलें पाणी. १०. घांसून. ११. उपरणें. १२. चांगल्या मनानें.

द्यावें प्रिय भोजन जें, चित्तिं न कृपणपण किमपि योजावें. ॥ ११८

जाल्यावरि पतिभोजन, त्याचें उच्छिष्ट अन्न जेवावें, ।
चरणक्षाळण [1]केलें शुद्धोदक जें तृषार्थ सेवावें. ॥ ११९

वंचन करोनि पतिसी करणें कांहीं कदा न भक्षण तें, ।
[2]रक्षण तन्मन करणें मृदु बोलुनि सर्वदा क्षणक्षण तें. ॥ १२०

भक्षावें तांबूला नारीनें आधि देउनी पतिला, ।
जरि एकटीच भक्षी सांगितलें शास्त्रिं थोर पाप तिला. ॥ १२१

असतां ग्रामीं गेहीं पति, करणें पूर्ण सर्व शृंगार; ।
जातां परगांवासी मानावें तेचि जेंवि [3]अंगार. ॥ १२२

[4]पत्यायुवर्धनार्थी कुंकुम रेखोनि पतिस भुलवावें, ।
[5]डुलवावें पतिकंठा '[6]कश्याज्ञा' म्हणुनि 'मत्प्रभु' लवावें. ॥ १२३

जेवुं नये पतिआधीं सहसा कधिंही पतिव्रता सतिनें, ।
पत्युच्छिष्टचि खावें सुभोजना घालुनी तयास तिनें. ॥ १२४

कोपिष्ट कांत असल्या, कोपें जरि देत फार [7]गाळीतें, ।
धरणें 'क्षमा' म्हणुनि तत्पद, किंचिद्धास्य करुनि [8]गाळीं तें. ॥ १२५

[9]ल्यावेऽळंकार, कृपा करुनि धन दिल्यास मित्र [10]वैश्रवणीं, ।
ल्यावें कुंकुम, कज्जल, हळदीतें, [11]तोंडपत्र पैं [12]श्रवणीं. ॥ १२६

वेणी घालोनि शिरीं सदा असावाहि भांगिं शेंदूर, ।
रात्रीं निद्रा करितां [13]तानवडे चोळि ठेवणें दूर. ॥ १२७

चोळी तानवड्याचा होतांचि स्पर्श तुटतसे [14]आयू, ।
पतिचें दिवसेंदिवसीं वृद्धपणीं जेंवि तुटतसे [15]आयू. ॥ १२८

[16]पदसंवाहन करुनी जाल्या निद्रिस्थ पति मग निजावें, ।
प्रातःकाळीं पति जों उठला नाहींच तों उठुनि जावें. ॥ १२९

असला जरी पति उभा आज्ञेविण तत्कदापि न बसावें, ।
जैसें वसे पतीचे मनीं तसें आपुले मनिं वसावें. ॥ १३०

---

१. केलेलें. २. तन्मन रक्षण करणें=त्याची मर्जी राखावी. ३. निखारे. ४. पतीचें आयुष्य वाढावें म्हणून. ५. (हे) 'मत्प्रभु ! कशी आज्ञा' (असें) म्हणून लवावें (आणि) पतिकंठा डुलवावें (पतीला आनंदित करावें). ६. कशी+आज्ञा. ७. शिवी. ८. गाळीं किंचित् हास्य करुनि. ९. अळंकार ल्यावे. १०. कुबेरानें. ११. कानाच्या पाळींत घालण्याचा एक सोन्याचा जिन्नस. १२. कानांत. १३. दागिने. १४. आयुष्य. १५. अन्न. १६. पाय चुरणें.

बंधन करुनि सदाही रक्षावें कृष्णगळसरीस गळीं, ।
मांगल्यसूत्र कंकण त्यावीं सौभाग्यदायकें सगळीं. ॥ १३१
जाउं नये परगेहीं, गेलें तरि बुडुनि जाय [1]दुरितवनीं, ।
[2]उलूक होउनि तुम्ही राहे मग [3]घुङ्घुम्म करित वनीं. ॥ १३२
यद्यपि कारण लागे, तरि कार्यार्थींच मात्र तें गमन ।
करणें, कार्य करोनी परतावें त्वरित जेंवि [4]वेगमन. ॥ १३३
न कदा परपुरुषाचें मुख, देउनि चित्त, तें [5]निरेखावें, ।
देखावें स्वपतीचें मुख, तैसें हृदय सदनि रेखावें. ॥ १३४
मारी जरि पति कोपें बोलुं नये एक अक्षरा गेहीं, ।
पद धरणें; [6]पाहुं नये मुख करुनी दीर्घ अक्ष रागें हीं. ॥ १३५
संतोषी पति असतां, सतिनें संतोषमन असावेंची, ।
धन्य सती पतिसेवा करुनि सदा काळ जी असा वेंची. ॥ १३६
असतां दुश्चित्त पती तोष किमपि असुं नये मना सतिचे, ।
बोलावें ऐसें कीं शब्द रुचति योग्य बुधजनास तिचे. ॥ १३७
उत्साह होति नगरीं, जाउं नये नारिनेंऽपि सहसाही, ।
वनभोजना न जावें दोष घडति वदति [7]चारिसह साही. ॥ १३८
जाउं नये जेवाया इष्टसुहृद्दरिं; सदैव नारीचें ।
पतिपदिं चित्त असावें, रघुपतिपायीं जसें [8]वनारीचें. ॥ १३९
राहूं म्हणे त्यजोनी सासुश्वशुरादि दीर भाव्यास, ।
ती श्वानजन्म पावे **काशीखंडांत** बोलिला **व्यास.** ॥ १४०
सासुश्वशुरपतिपुढें बोलुं नये करुनि शब्द [9]नेटानें, !
त्यांचे [10]दुर्वचघाया सांभाळावें [11]क्षमासुखेटानें. ॥ १४१
उंबरिया जात्यावरि, पाट्यावरवंटिं मुसळउखळातें ।
बैसुं नये, तैसेंची बोलुं नये एकही वच खळातें. ॥ १४२
वैर धरी जे नारी पुरुषानें केलिया दुजी कांता, ।
दारिद्रि सात जन्मीं होउन कधिं पति मिळे न एकांता. ॥ १४३

---

१. पापरूपी पाण्यांत. २. उलूक, घुबड. ३. घुबडाचा शब्द वास्तविक 'घू घू' असा होतो. ४. वेगयुक्त मन. ५. निरखून पहावें. ६. रागें अक्ष (डोळे) (किंवा) मुख हीं दीर्घ करुनि (पसरून) पतीकडे पाहूं नये. ७. चार वेदांसह सहा शास्त्रें. ८. मारुतीचें. ९. मोठ्यानें, १०. त्यांच्या कठिण शब्दाच्या आघाताला. ११. क्षमारूप चांगल्या ढालीनें.

पतिपद सेवा करुनी ऐसें व्रत आचरीत ज्या असती, ।
त्याच सती जाणाव्या, कुबुद्धि ज्या इतर सर्व त्या असती[1]. ॥ १४४
नाना विलास करुनी तोषवणें पतिमना समयिं रतिचे[2], ।
कोणी बिभित्स दुर्वच वदतां व्हावेचि कर्णं[3] बहिर तिचे. ॥ १४५
जी धन्य धन्य नारी मूर्ख दरिद्रीहि मानवील पती, ।
पतिच्या[4] सेवेविषिं ज्या होती दुर्भाग्य मानवी लपती. ॥ १४६
ऐकेना पतिवाक्या, तिळहि न वाटे जिच्या भय मतीला, ।
अंतीं जाचुनि अति बहु नरकाचा देत लाभ यम तीला. ॥ १४७
असतां रजस्वला तरि, बोलुं नये दावुंही नये वदन, ।
एके ठायिं बसावें, एकिकडे गुप्त पाहुनी सदन. ॥ १४८
तीन दिवस येणेंपरि राहुनि, चवथे दिनीं तिणें न्हावें, ।
पतिमुख अवलोकावें, नसतां घरिं मित्रमंडळ पहावें. ॥ १४९
धन्य सती जे पतिचे धरी, त्यजुनि कोपतीव्रता चरण. ।
सति ! तुज सांगितलें हें त्वद्धृदयिं टिको पतिव्रताचरण. ॥ १५०
आतां काय करावें ऐक मरण जालिया वरास तिनें, ।
सहगमनास करावें, करणें नच जीव बावरा सतिनें. ॥ १५१
सहगमनपुण्य मोठें पदोपदीं अश्वमेधपुण्य घडे, ।
उभय कुळें बेचाळिस उद्धरि शास्त्रार्थ बोलती उघडे. ॥ १५२
पापी जरि पति असला तदघ जळे, वाळला जसा पाला; ।
मग यमदूतकरींचा ने स्वर्गीं, गृध्र जेंवि सापाला. ॥ १५३
त्रयकोटी रोमांगीं[6], सहगमनीं दिधलिया स्वधापतिला[5], ।
एकेक रोमरोमीं नाकीं[8] होयाब्द[7] कोटि वास[9] तिला. ॥ १५४
धन्य तिचीं मातृपिता जीं सासू, सासरा, पती सर्व, ।
धाडुनि विमान नेई स्वपदिं तया इंदिरापती[10] सर्व[11]. ॥ १५५
सहगमनपुण्य ऐसें धीर करी जे पतिव्रता युवती, ।
ती धन्य! धन्य! इतरा काय कराव्या वृथा शतायुवती[12]?' ॥ १५६
देव म्हणति, 'अल्प वयें अपत्य[13] लघु[14], असलिया गरोदर ही, ।

---

१. वाईट स्त्रिया. २. सुरताचे वेळीं. ३. कान. ४. पतिच्या सेवेविषिं ज्या लपती (टाळाटाळी करितात) त्या दुर्भाग्य मानवी (अभागी स्त्रिया). ५. सूर्यमंडळ. ६. रोम (केंस)+अंगीं. ७. अब्दीका. ८. स्वर्गांत. ९. राहणें. १०. लक्ष्मीपति. ११. विष्णु. १२. शंभरवर्षें जगणाऱ्या (स्त्रिया). १३. मूल. १४. लहान.

करणें काय तिणें हें गुरो! वदे चित्तिं जरि असे [1]दर ही.' ॥ १५७
देवांचें यापरिचें ऐकुनि वच 'ऐकणें' म्हणे जीव, ।
'वैधव्यपथें चालुनि विधिपूर्वक रक्षणें तिणें जीव. ॥ १५८
जाल्या मरण पतीला बसला जरि भीतिअग्नडाग मना, ।
वैधव्यच मार्ग तिणें आचरणें करुं नयेचि सहगमना. ॥ १५९
अथवा न ऋतुप्राप्ती जाल्या किंवा असेल गर्भवती, ।
वैधव्यच मार्ग तिणें आचरतां मग तरेल [2]दुर्भव ती. ॥ १६०
असतां स्तनपानिं शिशू करितां सहगमन दोष बहु घडती, ।
वैधव्यच मार्ग तिला स्वर्गाची वाट दावि [3]सवघड ती. ॥ १६१
आतां श्रवण करावा विधवांचा मार्ग सर्व सुरवर हो! ।
तत्क्षणिंच आधिं करणें केशवपन मृत्यु पावतां वर हो! ॥ १६२
राखिति ज्या केशातें केशीं बांधोनि नेति वर नरकीं, ।
जो ऐशा नारीतें वरणारा तोहि पापि हो नर कीं. ॥ १६३
यास्तव वपन करोनी स्नान करावें सदां शिरावरुनी, ।
एकचि वेळाल्पाशन करणें एकान्न [4]अंतरा वरुनी. ॥ १६४
सितवस्त्रा नेसावें धारण करणें कदा न [5]उपवास, ।
एकादशीव्रतादिक करणें ते कडकडीत उपवास. ॥ १६५
[6]लोहीत, कृष्ण, चित्रहि, धारण केल्यास सुकृतहानि पट ।
करिती, दोष घडविती, यास्तव नच रक्षणें [7]गृहा निपट. ॥ १६६
[8]चित्रान्नवृंतकादिक करणें वैभवमदें न भक्षण तें, ।
वैभव नसे स्थिर, [9]जैसें राहि न वैचित्र ये नभ क्षण तें. ॥ १६७
वैभव असतां करणें नाना व्रतदान विप्रभोजन ही, ।
हरि पूजुनी वसंतीं पूजावे थोर विप्र भो जनही. ॥ १६८
शिवहरिपूजा करणें परिमळगंधें सुगंधसुमनानें, ।
पूजा करितां पतिचें आणावें ध्यानिं रूप सुमनानें. ॥ १६९
शिवविष्णुव्रत सर्वहि करोनि, करणें तिणें उपोषण तें, ।

---

१. काळजी. २. कष्टमय संसार. ३. सोपी. ४. अंतर टाकून. वरचेवर खाऊं नये? ५. उपवस्त्र. ६. रक्तवर्ण. हें 'पट' (वस्त्र) ह्याचें विशेषण. ७. घरांत. ८. चित्रान्न=पुष्कळ धान्यांची खिचडी. वृंताक=वांगें. ९. जसें (जें) वैचित्र (चमत्कारिक आकाराचें) नभ (अभ्र) ये तें क्षण न राहि.

येर दिनीं कवलाष्टचि[1] जेवुनि करणें शरीरपोषण तें. ॥ १७०
करि शयन मंचकीं जरि सपति पितर रौरवांत ते पडती, ।
शापिति, धडपडति, जसे पिपीलिकादंशिं[2] कीडु[3] तडपडती[4]. ॥ १७१
जाल्या मरण तिला मग, निजविति यमदूत तप्त अवनीं ते, ।
कुंभीपाकीं शिजवुनि, हिंडविती प्रत्यहीं असिवनीं[5] ते. ॥ १७२
संवत्सरसामग्रीसह[6] विप्रा दान देइजे लैय[7] तें, ।
लग्नार्थ्यांचे लग्ना करणें धन असलिया असें लैय[8] तें. ॥ १७३
नसल्या धन कष्टवुनी स्वतनूसी जळ गृहीं असे भरणें, ।
त्यावीं सुपवित्र तिणें तुळशीचे काष्ठमणि गैळाभरणें[9]. ॥ १७४
सेवा करणें भावें दिवसनिशीं सासुची श्वशूराची, ।
मनवृत्ती राखावी अचळ, जैसी[10] रणिं सअश्व शूराची. ॥ १७५
विधवापणीं अशा परि, मेल्यावरि पति, करीत आचार, ।
नरकीं असतां तेथुनि पावे तो स्वर्गलोक साचार.' ॥ १७६
योगि म्हणे, 'सावित्री! सांगितले दोन मार्ग हे तूला, ।
कोण रुचे त्वन्मनिं जो चित्तींच्या पूर्ण सांग हेतूला.' ॥ १७७
सावित्रि म्हणे, 'जाइन पतिसंगें नमुनि योगिरायाला, ।
विधवांचा मार्ग कठिण अति दुर्घट फार आचरायाला.' ॥ १७८
योगी म्हणे, तिथें, 'तो सहगमनचि थोर, पुण्यमार्ग करीं.' ।
म्हणउनि रुद्राक्ष तिच्या दे चारी तोचि योगिराज करीं. ॥ १७९
'एक सती गळसरिसी द्वय बांधीं, दोन भर्तृकानातें, ।
बांधुनि अनळद्वारें रिघुनि करीं स्वर्गिं सपति गमनातें. ॥ १८०
गुरुदर्शनें बरा पति होइल इच्छा धरोनि आलीस, ।
तों ग्रासि काळ पतिला पक्षी जैसा धरोनि आँलीस[11]. ॥ १८१
होणार देवकरणी जाली त्याला उपाय काय चले, ।
रावण सुयोधनादिक थोर सुकृति पंडुपुत्रही खचले. ॥ १८२
काळास जिंकिणारा गुरुवांचुन नाहिं आणि लक्षातें, ।

---

१. कवल (घास)+अष्ट (आठ). २. मुंग्या चावल्यामुळें. ३. काडवें, दानवें, गांडुळें. ४. तडफडती. ५. तरवारीच्या वनांत. ६. एक वर्षाच्या बेगमीसह. ७. लई, पुष्कळ. हा शब्द ग्राम्य आहे. ८. लक्ष (असावें) ९. गळा (गळ्यांत) आभरणें (अलंकार). १०. रणामध्यें घोड्यावर बसलेल्या वीराचें मन ज्याप्रमाणें स्थिर असावें लागतें त्याप्रमाणें इत्यादि. ११. आळीला.

विधि, काळ, यमहि जिंकुनि भक्तप्राणासि आणिल क्षातें. ॥ १८३
श्रीगुरुराज असा तो जाउनि तद्दर्शनासि तूं आर्दी, ।
तत्पदतीर्थ प्रेतीं प्रोक्षुनि सहगमनयोग संपार्दी.' ॥ १८४
ऐसें वदोनि योगी गेला मग दान धर्म बहु करि ती, ।
सौभाग्यवायनें दे सुवासिनी मेळवोनि लोकरिती. ॥ १८५
नेती मग शव गंगे, तळहातीं अग्नि घेउनी निकट ।
चाले पतिव्रता सति, नेति भरुनि काष्ठशेणिंचा शकट. ॥ १८६
करि दान धर्म बहु मग न्हाणुनि शव ठेविलें रचोनि चिता, ।
रुद्राक्ष बांधि कानीं योगी उपदेश आठवोनि चिंता. ॥ १८७
नर नारी म्हणति, 'पहा पतिसंगें जातसे, धरि न दर ही, ।
लक्ष्मीसम दिसताहे, अल्पवयी तरुण, रूप सुंदरही.' ॥ १८८
कोण्येकि म्हणति तिजला, 'देशी कां व्यर्थ नारि! जीवास, ।
मेल्यासंगें मरुं नको, सुख भोगीं करुनियां घरीं वास.' ॥ १८९
युवती पतिव्रता ज्या 'धन्य सती!' म्हणुनि वदत तद्वारा, ।
'बेचाळिस उभयकुळें सहगमना करुनि करित उद्धारा.' ॥ १९०
म्हणती, 'हे परमेश्वर! अशीच दे बुद्धि सर्व नारींस.' ।
म्हणउनि पतिव्रता ज्या त्या प्रार्थिति मीनकेतनारीस. ॥ १९१
'निर्धव काय करावी प्रेतासम नारि जे शतायुवती.' ।
वदती नानारितिनें स्वमति जसी, सुजन कुजन नर युवती. ॥ १९२
सावित्रि म्हणे, 'आजी सति हो! मद्भाग्यमित्र ये उदया, ।
येत्यें आतां तुमच्याशिर्वचनें हरिहरांस येउ दया. ॥ १९३
स्वग्रामींचे संगातिं होते त्यांला निरोप मागतसे, ।
'सासु श्वशुरा गति हे सांगु नका कांहिं' म्हणुनि सांगतसे. ॥ १९४
'सांगा त्यांस असें कीं गुरुपद सेवोनि तीं सुखी असती, ।
सांगा असेंच माझीं तातंबा इष्टही जरी पुसती. ॥ १९५
कांक जसा नैमित्या, तरुशाखा भंग होय जी! वातें, ।
तैसें सांच वदा तरि हनन घडे, त्यागितील जीवातें.' ॥ १९६

१. पृथ्वीवर. २. गाडा. ३. मनांत. ४. धारा—वाणी. ५. शंकरास. ६. विधवा. ७. शंभरवर्षें जगणारी. ८. बाप, आई आणि आप्त इष्ट. ९. वाऱ्यानें ढापी मोडते आणि कावळा बसायला गांठ पडते त्याप्रमाणें. १०. खरें.

सुजनांचे या परिचा करितां ती स्वहितवाक्यबोध मनीं, ।
ते समयीं तद्धृदयीं पेटवि दुःखाग्न वाक्य तें धमनी. ॥ १९७

हास्यमुखें शवसन्निध धर्म करी विप्रकामिनीमेळीं, ।
राम, हरी, नारायण बोले ती प्रेतकामिनी मेळीं. ॥ १९८

उपदेश योगियाचा आठवितां विनवि भूमिदेवाशी, ।
'श्रीगुरुमूर्ती कशि ते अवलोकिन हेतु' तद्वदे वाशी. ॥ १९९

'जाउनि येयें त्वरितचि तुमची जरि जाहली अनुज्ञा ते.' ।
'त्वरितचि ये' म्हणती जे वृद्ध द्विज, पिकलिले हनु ज्ञाते. ॥ २००

बुधजनआज्ञा होतां श्रीगुरुचे दर्शना निघाली ती, ।
मार्गें जातां गुरुची स्तुति भूषण सुजनकानिं घाली ती. ॥ २०१

'हे गुरुराज! यतींद्रा! करुणानिधि! भक्तपाल! कमलक्षा! ।
विधि हरि हर त्रिगुणी तूं दत्तचि अवतरसि येत मम लक्षा. ॥ २०२

ताराया भक्तजना गुरु! हा अवतार सत्य तूं धरिसी, ।
दर्शनमात्रें मोठ्या ब्रह्मघ्नहि पातक्यासि उद्धरिसी. ॥ २०३

दीनदयाळा! अशि तव कीर्ती विपुल क्ष्मा पसरली ती, ।
कां मजविशिं, अगणित जी लावीतां लक्षमाप, सरली ती? ॥ २०४

तिळमात्र कृपा मजवरि न करिसि कां दीन काय हो! मी न, ।
अपकीर्ति होय तव कीं; अनळीं मी आज काय होमीन. ॥ २०५

प्रन्हादरक्षणीं तूं अवतरसी भंग करुनि खांबाला, ।
रक्षुनि दैत्या, मर्दिसि उदरातें रोवुनी नखां बाला. ॥ २०६

'धावें रक्षीं रक्षीं, विश्वेशा!' बोलतां त्वरा करिसी, ।
अरिसी टाकुनि, अरिसी त्याच्या भंगोनि रक्षिसी करिसी. ॥ २०७

वैकुंठींहुनि धांवसि तूं संकटीं शीघ्र शिबि राजाच्या, ।
उद्धरुनी नगरीसह नेसी जाणोनि अंतरा ज्याच्या. ॥ २०८

१. ती सुजनांचे मनीं यापरिचा स्वहितवाक्यबोध करितां ते समयीं तद्धृदयीं (त्यांच्या मनांत) तें वाक्य धमनी (वाक्यरूपी फुंकणी) दुःखास पेटवि—असा अन्वय. २. विप्रस्त्रियांच्या मेळ्यांत (समुदायांत). ३. त्या समुदायांत. ४. वाणी. ५. जे हनु (हनवटीचे केंस, दाढी) पिकलिले ते वृद्ध ज्ञाते द्विज. ६. पृथ्वीवर. ७. लक्षावधि मापें लावितां, अगणित. ८. प्रन्हादाला. ९. बापाला, हिरण्यकशिपूला. १०. चक्राला, सुदर्शनाला. ११. गजेंद्राच्या शत्रूस, नक्रास. १२. शिबि? १३. अंतराळीं, स्वर्गीं.

बाळक घेतां आळी पुरवाया[1] जाणि[2] एक आइ किळी[3], ।<br>
तैसी भक्तजनेच्छा पुरविसि तूं कानिं कीर्ति आइकिली. ॥ २०९

नाहीं कृपाळु तुजसम उपमन्या देसि दुग्धअर्णव[4] तो, ।<br>
शेषा वर्णन नोहे प्रताप तो मज कसा जि! वर्णवतो. ॥ २१०

सध्यां वोझरगांवीं दूर करिसि विप्रउदरवेथा[5] कीं, ।<br>
आयकि[6] अनृत म्हणूं जरि, लटकिच सुजना न मारवे थांकी[7]. ॥ २११

मूढ करिसि वाचस्पति कामदुहा करिसि वांझ कासरिला[8], ।<br>
वदवुनि वेद विधीचे आणसि हो! हलगिवाजका सरिला.[9] ॥ २१२

ऐसें त्वत्कीर्तिचरितपसर बहुत होय सर्व भूमीतें, ।<br>
ऐकुनि इच्छा धरुनी आल्यें त्वद्दर्शना प्रभू! मी तें. ॥ २१३

मजसम असती नारी खेळविती पुत्रकन्यका तोकीं[10], ।<br>
कैंचीं होतील मला, पति माझा रोगि सर्वदां तो कीं. ॥ २१४

सुत होती त्वद्दर्शनिं होउनि आरोग्य मद्भतार[11] मला, ।<br>
म्हणउनि आल्यें घेउनि, होता विश्वास, आणितां रमला. ॥ २१५

केलीस[12] कृपा मजवरि गुरुराया! आज ही बरी मानू, ।<br>
भानू आहे तोंवरि त्वत्कीर्ति असीच सर्व जन वानू. ॥ २१६

सांगत तव कीर्ती हे जाल्यें गुरुराज! कीं 'परधामीं[13], ।<br>
म्हणउनि पुसावयासी येत्यें तुजलागिं सत्यसंधा[14] मी.' ॥ २१७

श्रीगुरुचि स्तुति ऐसी अनेक रिति करित संगमा आली, ।<br>
अश्वत्थातळिं गुरुसी पाहे वेष्टीत विप्रजनआली[15]. ॥ २१८

साष्टांगीं नमन करुनि गुरुसि म्हणे, 'धन्य! आजि मद्भाग्य.' ।<br>
तों श्रीगुरु म्हणति तिला, 'राहो अक्षय अखंड सौभाग्य.' ॥ २१९

ऐकुनि गुरुवचन असें पुनरपि साष्टांग करित नमनातें, ।<br>
प्राग्वत्[16] गुरु म्हणति पुन्हा 'अष्टसुती होइं' जाणुनि मनातें. ॥ २२०

गुरुवाक्य ऐकुनि द्विज म्हणति गुरुसि हास्य करुनि वदनातें, ।<br>
'होतिल कसे सुत इला? गेला पति मरुनि सर्गसदनातें[17]. ॥ २२१

---

१. हट्ट. २. जाणते. ३. किल्ली, खुबी. ४. क्षीरसमुद्र. ५. ब्राह्मणाची पोटदुखी. ६. ऐकीव गोष्ट. ७. थाप. ८. म्हशीला. ९. वेद वदवुनि हलगिवाजका (हलगी वाजविणाऱ्या अंत्यजाला) विधीचे सरिला (ब्रह्मदेवाच्या योग्यतेला) आणिसि. १०. तोखीं, आनंदानें. ११. (कर्ता) भ्रतार. १२. हें भाषण औपरोधिक आहे. १३. स्वर्गास. १४. सत्यप्रतिज्ञ जो तूं त्यास. १५. ब्राह्मणांची पंक्ति (समुदाय). १६. पूर्वीप्रमाणें. १७. शिवलोकीं.

ही सहगमन करितसे नेलें प्रेत स्मशानगातूतें, [1]।
मागायासि निरोपा आली श्रीगुरु! दयानग, ! तूतें. ॥ २२२
घेवोनि निरोप तुझा जाळुं इला पतिशवाचि सांगातें,' ।
**गुरु** म्हणति, 'दीर्घ आयू, इस कैसें मरण होय सांगा तें. ॥ २२३
अस्मद्धि [2] वचन आतां आलें जें करिति सर्व पैं श्रवण, ।
या बोलाचा आतां करिता [3] परिणाम मित्र वैश्रवण [4]. ॥ २२४
जाळुं नका शव आणा, जा, गेला जीव तो कसा पाहूं.' ।
**गुरु**आज्ञें द्विज धांवति जैसे म्हणतांचि तोक सापा हूं. ॥ २२५
धांवत जाउनि आणुनि ठेविति **गुरु**चेच सन्मुख शवास, ।
**गुरु** म्हणति, 'बंध सोडा, काढा, एकीकडे वरिल वास [5].' ॥ २२६
द्विज रुद्रसूक्तमंत्रें अभिषेकिति गुरुपदासि 'हो! शैव [6] तें,' ।
**गुरु** म्हणति, 'घ्या करीं हें प्रोक्षा सर्वांगिं विप्र हो! शव तें.' ॥ २२७
**गुरु**आज्ञें प्रेतावरि सिंचिति मग भूमिदेव तें पूर्ण, ।
पीयूषाक्षीं [7] श्रीगुरु अवलोकन करिति कुणप [8] तें पूर्ण. ॥ २२८
द्विज म्हणती, 'हो जागा' **गुरु**पद अभिषेकिलें शिपोनि जला, ।
तों **दत्त** नाम नर तो उठुनि बसे जेंवि मर्त्य जो निजला. ॥ २२९
मुरडोनि अंग जृंभा [9] देई मग करुनि दीर्घ तो 'आ' ला, ।
जन म्हणती, 'नवल पहा कैसा प्रेतास जीव तो आला!' ॥ २३०
लज्जायमान जाला होता म्हणवोनि नागवा निपट, ।
नेसाया मग दिधला तत्सन्निधविप्र जे तयांनिं पट. ॥ २३१
नेसुनि कडेस बसुनी स्त्रीस म्हणे, 'निजवुनी असें मजला, ।
जागा न करिसि कां गे! इतका जरि बहुत जन असे जमला.॥ २३२
भूल पडे मोठी कीं कोठें तूं आणिलेंस मजला गे! ।
तेजस्वी भास्करसा कोण यतीश्वर न हा समजला गे! ॥ २३३
जाली निरोगि मत्तनु, ये शक्ति' म्हणे 'मंजामुप' [10] तिला तो, ।
आद्यंत वर्तला जो सांगे मग ती वृतांत पतिला तो. ॥ २३४
श्रीगुरुचे पदकमला नमन करुनि मग उठोनि दोघें तीं, ।
भृंगपरिं स्तुति [11] रुंझी करुनी संतोष मोद तो घेती. ॥ २३५

---

१. स्मशानभूमीला. २. अस्मत् (आमचें) हि. ३. करणारा. ४. कुबेर. ५. वस्त्र. ६. जल. ७. अमृतदृष्टीनें. ८. प्रेत, ९. जांभई. १०. मज+अमुप. ११. गुंजारव.

म्हणती, 'श्रीगुरुराया! दयार्णवा! केलि धन्य हे लीला, ।
उपमा नाहीं जैसी तेजपणाविषयिं अन्य [1]हेलीला. ॥ २३६
वर्णित होते कीर्ती जन जी प्रत्यक्ष पाहुं नेत्रांहीं, ।
श्रीगुरु दयाघना! हे आलों तुज शरण तनुमनें त्राहीं. ॥ २३७
सज्जन रक्षक गुरुजी! होती जे मर्त्य धन्य तव दास, ।
तोषविलें अम्हासी जैसा शशि तोषवीत कुमुदास. ॥ २३८
तुज म्हणति भक्तपालक आला अम्हासि आजि अनुभव तो, ।
त्वत्पदनौकाधारें आतां जाऊंचि उतरुनी भव तो. ॥ २३९
विधिहरिहररूपें तूं करिसी उत्पत्तिपालनलयासी, ।
अस्मत्पाप समूळीं जाळिसि आज्ञापुनी [3]अनल यासी. ॥ २४०
त्वद्गुणवर्णन करितां न पवे [3]तोंड ती सहस्रमुख अहिनें'. ।
प्रक्षाळिति मग गुरुपद वदुनि असें प्रेम अश्रुचे [4]अहिनें. ॥ २४१
श्रीगुरुची स्तुति ऐसी करितां तीं उभयतां अनेकरिती, ।
स्नान करुनि संगमिं मग गुरुपूजा भावभक्तिनें करिती. ॥ २४२
श्रीगुरु मग वर देती, 'होउनि धनधान्यपशुसमृद्धीतें ।
पावे तुमचा आतां संतति होऊनि वंश वृद्धीतें.' ॥ २४३
प्रेत उठविलें गुरुंनीं सर्वहि आश्चर्य होय मनुजाला, ।
'श्रीगुरुकृपाबळें कीं जिंकी दंपत्य हो! [5]यमनुजाला.' ॥ २४४
बोलुनि ऐसें सकळहि उत्साहें आणुनी [6]वपू जन तें, ।
क्षाळुनि गुरुपद, गुरुचें करिती मग धरुनि भाव पूजेतें. ॥ २४५
होता कुतर्कवादी द्विज दुर्बुद्ध्येक तो वदे गुरुतें, ।
'काढीं श्रीगुरु! मज, मी संशयभूगर्तकर्दमांत रुतें. ॥ २४६
वेद पुराण वदतसे न होय सहसाहि विधिलिपि[7]पा लटकी, ।
तें जरि खरें म्हणावें श्रीगुरु! ती आजि जालि पालट कीं. ॥ २४७
झाडावरोनि न पडे, नदींत न बुडे, ऽपमृत्युही न घडे, ।
अहिदंशविषहि न चढे, दिनमरण घडे दिसे जना उघडें. ॥ २४८
बोला, याला आला जीव कसा! लेख वर्तला खोटा, ।
कैसा आला फिरला बोलावूं जो कृतांतलाखोटा?' ॥ २४९

---

१. सूर्याला. २. अग्नीला. ३. टिकाव. ४. पाण्यानें. ५. यमानुज=शनि. ६. जल. ७. ब्रह्मलिखित.

श्रीगुरु म्हणती त्याला, 'माझ्या जो मनुज लागला भजना, ।
त्या चारी मुक्तींचा देई मी करुनि लाग लाभ जना. ॥ २९०
त्रिंशद्वर्षें आयू होतें याला पुढील जन्मीं तें, ।
मागितलें विधिपासीं रक्षायालागिं भक्तजन मी तें. ॥ २९१
जनन मरण खंडियलें घेउन आयुष्य पुढिल जननाचें.' ।
ऐकुनि गुरुवचन असें अत्युत्साहें करोनि जन नाचे. ॥ २९२
संशय निवारिला तो होता जो त्या कुबुद्धि विप्रचित्तीं, ।
प्रचिती दावुनि गुरु मग येति मठा पावतां रवि प्रचिती[1]. ॥ २९३
शिष्या! श्रीगुरु ऐसा सतिचें त्या दुःख जाहला हरिता, ।
भक्तांसह मठिं ये तों पावे मित्र प्रतीचि ते हरिता[2]. ॥ २९४
श्रीगुरुरायें यापरि कुतुकें केली अनेक लीला जे, ।
भावें श्रवण करी जो त्या देखुनि भय मनें कली लाजे. ॥ २९५
रामात्मजपुत्र म्हणे, श्रीगुरुचे पायिं भक्ति लागावी, ।
श्रीगुरुची गुणकीर्ती अंगीं करुनी विरक्तिला गावी. ॥ २९६

---

## अध्याय एकविसावा[3].

गुरुपादिं ठेवुनि विनवी नामांकित शिष्यराज जो शिर तो; ।
आनंदे चित्तिं कसा कल्पद्रुमकाननांत जो शिरतो. ॥ १
'सांग' म्हणे 'चरित पुढें श्रीगुरु ते स्वमठिं आलियावरतें, ।
वर्तें जें सुखदायक अघनाशक षड्रिपूंसि आवरतें.' ॥ २
ऐकुनि शिष्यविनंती सिद्ध म्हणे त्यास, 'एक ऐक वच, ।
रक्षी श्रीगुरु जैसें वज्राचें रक्षिना तसें कवच. ॥ ३
शिष्या! तीच सती मग नमुनि म्हणे श्रीगुरूसि शुद्धमनीं, ।
'पतिजीवहानि होतां वदली बहु शोक फार मद्गमनी[4]. ॥ ४
त्याकाळीं एक यती येउनि बहु सांगुनी विवेक मला, ।
नानाविधि सांगुनि मग मन्मनिंचे उडवि सर्व शोकमला. ॥ ५
रुद्राक्ष चार देउनि सांगे मज कानिं बांधुन शवातें, ।

---

१. येथें प्रतीचि म्हणजे पश्चिम दिशा असें पाहिजे. २. दिशा. ३. या अध्यायांत मुळांतील ३३ व्या अध्यायांतील कथाभाग आला आहे. ४. माझी वाणी.

श्रीगुरुदर्शन घेउनि तत्पदिंच्या शिंपि आणुन शवातें. ॥ ६
'अग्नीद्वारें स्वर्गीं भर्त्यासह मग करी' म्हणे गमन, ।
सांगुनि ऐसें मजला मग गेला त्वरित जेंवि वेगमन. ॥ ७
पतिकर्णीं मजपासीं रुद्राक्षासति' म्हणे महासति ते. ।
गुरु म्हणती 'दिधले तव भक्तिस्तव मीच' म्हणुनि हांसति ते. ॥ ८
'रुद्राक्षधारणानें पापाचा अखिल होय कोंब हुत.' ।
सति ती म्हणे, 'मज पुरें सांगा जें पुण्य आइकों बहुत. ॥ ९
रुद्राक्षधारणासी सांगुनि गुरु! सांग तोहि महिमा जी!' ।
गुरु म्हणति, 'जो सहस्रा धारण करि धन्य तोचि महिमाजी. ॥ १०
एकमुखी पंचमुखी अकरा चवदा मुखीच उत्तम ते, ।
अथवा मिळती जैसे धारण करणेंचि मुख्य शास्त्रमतें. ॥ ११
जाळिति पापा सर्वहि कर्पूराच्यनळ जाळि जशि राशी, ।
ऐकावा धारणविधि कंठीं बत्तीस चाळिस शिराशी. ॥ १२
बारा बारा मणगटिं, बांधा सोळाचि बाहुला दोनी, ।
बांधा सा सा दोनी कानीं, शेंडीस एक बांधोनी. ॥ १३
आणिक अष्टोत्तरशत वोउनि ते सार्वकाल गळिं माला, ।
रक्षावी पाहुनि ते भय वाटे चित्तिं कालगलिमाला. ॥ १४
रुद्राक्ष पूजिला जरि फळ पावे सांबपूजनाचें तें, ।
संतोष पावुनी शिव कार्य करी इच्छिलें जनाचें तें. ॥ १५
रुद्राक्ष कंठिं ज्याचे, पापें त्यालागिं नच कदां शिवती, ।
रुद्राक्षधारणानें मर्कटकुक्कुटहि गौं नृपति होती. ॥ १६
आतां कथा सुरस बहु ऐकें सावित्रि! तूं सपति हो! ती, ।
अंतीं अक्षय वस्ती स्वपदिं तया देत जो सदाशिव ती. ॥ १७
काश्मीरदेशिं होता भूपति तो भद्रसेन नामानें, ।
तन्न्यायनीति कृतिनें क्षितिवरिचे सर्वही जना माने. ॥ १८
होता सुधर्मनामें पुत्र तया नृपति भद्रसेनातें, ।
मंत्रीसुत तारक ते चालविती बंधुचें जसें नातें. ॥ १९

---

१. जलाला, पादतीर्थाला. २. रुद्राक्ष+असति. ३. ती. ४. सर्व. ५. पृथ्वीवर. ६. कर्पूराची (याचा संबंध 'राशीकडे')+अनळ (अग्नि). ७. सहा सहा. ८. गळ्यांत. ९. काळरूपी शत्रूला. १०. पृथ्वीवर.

समवय, सम तनु, सम कृति, विद्याही करिति समचि दोघे ती, ।
शिवभक्त भस्म चर्चुनि अंगीं रुद्राक्षभूषणें घेती. ॥ २०
लेववितो मातृपिता पुत्रासी हेमरत्नआभरणें, ।
सुत तीं टाकुनि सर्वहि म्हणती पाषाण काय हें करणें. ॥ २१
पुनरपिही लेववितो बुद्धी सांगुनि तयां अनेक रीती, ।
परि तीं त्यागुनि सर्वहि, धारण रुद्राक्ष भस्म ते करिती. ॥ २२
मातृपिता चिंतेनें 'करणें तरि काय?' म्हणति तनयांस, ।
शिकविलि राजरिती जरि कांहीं तिळमात्र लागत न यांस. ॥ २३
शक्तीसुत[1] एकदिनीं ऋषि मंडळिसहित पातला गेहीं; ।
नृपगुरु तो, नृपति तया ऋषिंसह पूजोनि पायीं लागे ही. ॥ २४
सांगुनि वृतांत सकळहि पुत्राचा नृप म्हणे तया गुरुतें, ।
'करितिल राज्य कसे हे मी चिंताचिखलकर्दमांत रुतें. ॥ २५
रुद्राक्षाविण घेति न भूषण रत्नादि जातरूपाचें[2].' ।
'आहे नवल' गुरु म्हणे 'यांचें प्राग्जन्मजातरूपाचें[3]. ॥ २६
रुद्राक्षधारणाचें पुण्य महत्' गुरु म्हणे पराशर तो, ।
अघशैल महच्छेदी श्रीरामाचा जसा पेरा[4] शर तो. ॥ २७
वृत्तांता पुत्राच्या ऐकें त्या करुनि तूं महानंदा, ।
नंदिग्रामीं होती वेश्या स्त्री नाम तें महानंदा. ॥ २८
अतिलावण्य तियेचें रूप जसें तेज पूर्णचंद्राचें, ।
संपन्न होति सकळहि ऐश्वर्यें गृहहि पूर्ण चंद्राचें[5]. ॥ २९
कुशळाति नृत्य गानीं नाचे बांधोनि रत्नमंडप ती, ।
म्हणवी पतिव्रताही प्रत्यहिं भोगी जरी उदंड पती. ॥ ३०
मर्कट कुक्कुट पाळी, शिकवी नर्तनकळाहि दोघांस, ।
रुद्राक्षभूषणें तीं बांधुनि दे प्रीतिचा तयां घांस. ॥ ३१
सांबाची भक्ति करी स्तुति करि ती शिवउमापदें[6] गायी, ।
धर्म करी बहुरितिनें, दानहि विप्रां उमाप[7] दे गायी. ॥ ३२
मिरवी पतिव्रतापण, जितके दिन नेम करि नरा ज्या ती, ।
त्याचे तितके दिन ते जाल्याविण होय वश न राजा ती. ॥ ३३

---

१. पराशर. २. सोन्याचें. ३. पूर्वजन्मींची जात आणि रूप याचें नवल (आश्चर्य) आहे. ४. शत्रूला. ५. सोन्याचें. ६. शिव आणि पार्वती यांचीं (स्तुतिपर) पदें. ७. पुष्कळ.

देखाया सत्व तिचें होउनि शिव ये तिच्या घरा वाणी,[1] ।
होतें तत्करिं कंकण नवरत्नी तेज भास्करावाणी.[2] ॥ ३४
देखुनि वैश्यासि म्हणे, 'देइन या कंकणा वैरिव[3] लक्ष, ।
अथवा होईन स्त्री, सांगें जिकडे असेल तव लक्ष.' ॥ ३५
वैश्य म्हणे, 'हें देइन जरि तूं देशील तीन दिवस रती, ।
राहें पतिव्रतापणिं, मद्दिन संपूर्ण तीन जंव सरती. ॥ ३६
कैंचें पतिव्रतापण तुज बहु नरसंग?' म्हणत पुनरपि तो, ।
'सत्य वचन करिल कसा जो प्रत्यहिं मद्य बहुत कुनर पितो?' ॥ ३७
ती त्यास म्हणे मग, '[4]मी सहसा धरिं दुर्मती न वारस्त्री, ।
चंद्रार्कसाक्षिनें तव जाल्यें, घे वचन, तीन वार स्त्री. ॥ ३८
नानाविषयसुखानें तुमचें त्रयदिवस तोषवीन मन, ।
द्या कंकण मज, रक्षिन पातिव्रत्या' म्हणोनि करि नमन. ॥ ३९
दे कंकण तिजला; मग दोघें जाती विलासगेहा तीं, ।
स्वकरींचें मग सोडुनि लिंग म्हणे तीस, 'घेइं गे! हातीं.' ॥ ४०
उघडी जों लिंग गृहीं प्रकाश करि बहुत आंतपाहुन[5] तें, ।
ती मग 'वोवाळुं' म्हणे 'कंकण यावरुनि' लिंग पाहुनि तें. ॥ ४१
'संभोगसमयिं जवळी असों नये लिंग हें जतन ठेवीं, ।
प्राणापरिसहि याचें रक्षण करिं जेंवि लोभि जन ठेवी. ॥ ४२
माझा प्राण असे हें, हानी होतां त्यजीन जीवा गे! ।
न करीं विचार दुसरा, चित्तीं ही धरुनि काळजी वागे. ॥ ४३
ती मग म्हणे, 'करिन मी याचें जीवापरीस रक्षण तें.' ।
ठेवी मग नृत्याचे मंडापिं देव्हारिं लिंग तत्क्षण तें. ॥ ४४
क्रीडति मग तीं जों तों पाहुनि [6]चैत्वारिश्रृंगतेजातें ।
उठवी, तों मंडप तो जळतो, होतें सुलिंग तें [7]ज्यातें. ॥ ४५
जाळी मंडप सकळहि जैसा तो अग्निदेव धूपासी; ।
'मल्लिंग दग्ध जालें' वाणी तो मग वदे वधूपासीं. ॥ ४६
बद्ध सुमंडपिं होतीं जळती तीं [8]मर्कटाणि कुक्कुट हो; ।

---

१. वाण्याच्या वेषानें. २. सूर्याप्रमाणें. ३. सं० वरिवस्=द्रव्य. ४. मी वारस्त्री (वारांगना) [आहें तरी] सहसा दुर्मती न धरिं—असा अन्वय. ५. सूर्यप्रकाशापेक्षां. ६. अग्निप्रकाशाला. ७. ज्या मंडपांत. ८. मर्कट (माकड) आणि कुक्कुट (कोंबडा).

सर्व मिळे जन, विझवी, 'रक्षण तरि' म्हणति 'हें कृशन[1] कुट[2] हो.' ॥
विझवोनि पाहती जों तों जालें जळुनि लिंग तें राख, ।
वैश्य म्हणे वेश्येसी, 'देतों प्राणा, स्ववचन तें राख.' ॥
पेटवुनी मग अग्नीकुंडातें वैश्य तो उडी घाली, ।
पाहुनि 'हा! हा!' करुनी वेश्या मग जावया सति निघाली. ॥
बसलीं होतीं जेथें माता बंधू, धरोनि[3] तीं आली, ।
आणोनि अश्रु तेथें निरोप मागावया सती आली. ॥
मागे सहगमनाज्ञा जननी आणी सहोदराला ते, ।
'धरिशि न किमपिहि केंवी' तीं म्हणती तीस 'हो दराला[4] ते? ॥
कैंचा वैश्य पति तुझा? काढिसि कां व्यर्थ नेत्रिं तुं जला गे!? ।
ऐशा किति वैश्यांची होसी स्त्री? वेड काय तुज लागे? ॥
व्यर्थचि जाळूं पाहसि, न कर्म हें वांकडें तुझें, असुं[5] हें; ।
असुं[6] हें पुसुं ये वेडे! मत दे एकीकडे तुझें असुं हें.' ॥
त्यांस म्हणे, 'वैश्याची जाल्यें स्त्री साक्षि सोमअर्काचे,[7] ।
जाल्यें सति, तुमचे मी ऐकेना बोल हे कुतर्काचे.' ॥
जातां सहगमन, सुखें टाकी ते एक एक पद नारी. ।
तितकेऽश्वमेधफळ ती पावुनि, धाडी विमान मदनारी.[8]' ॥
बोलावुनि मग विप्रां धर्म करुनि बहु 'लुटा' म्हणे 'गेहा' ।
विप्र म्हणति, 'पुण्य,[9] गिरी तव शिव लावीतसे घटा गे! हा.' ॥
नमुनी मग विप्रासी, नमि[10] मग ती मित्र पाहुनी वर तो, ।
कुंडा प्रदक्षिणात्रय करोनि, नमि नीळंनंदिनीवर[11] तो. ॥
'जय जय शिव! सांब!' म्हणुनि मग ती वैश्वानरांत घालि तनू,
तेव्हां प्रकटुनि शिव तिस वरिचेवरि दश भुजांनिं झेलि तनू.[12] ॥

---

१. मोतीं किंवा सोनें. २. पूड, भस्म. चरणाचा अर्थ स्पष्ट नाहीं. ३. आली धरोनि=धरून=रांगेनें. ४. भीतीला, लज्जेला. ५. शरीर. हें 'जाळूं पाहसि' याचें कर्म. ६. [illegible] ये हें असुं (अश्रु) पुसुं; हें तुझें मत एकीकडे असुं दे. ७. चंद्रसूर्यांचे साक्षीनें. ८. शं[illegible] ९. गे हा शिव तव पुण्य (आणि) गिरी घटा लावितसे—असा अन्वय. तुझें पुण्य पर्वता[illegible] आहे—असा भावार्थ. घट=वजन करण्याचीं पारडीं बांधण्याची दांडी. घटाला लावणें=वजन क[illegible] १०. वर पाहुनी ती मग मित्र (सूर्य) नमि—असा अन्वय. ११. पर्वतकन्येचा पति=शं[illegible] अशी मूळ पोथींत बाजूस टीप दिली आहे. १२. शीघ्र.

'जालों प्रसन्न' मग 'वर मागें इच्छित' म्हणे '**म**हानंदे!' ।
'मज सपरिवारिं ने तव सन्निध' मग ती म्हणे महानंदें[1]. ॥ ५९
**सां**ब म्हणे तिजला, 'तूं पतिव्रता साच' मग विमानीं तो ।
बैसवुनी स्वपदीं ने **शि**व तिजला, परम भक्त मानीतो. ॥ ६०
मर्कट कुक्कुट जळती ते तुझिया त्वत्प्रधानउदरा हे ।
येती, रुद्राक्षाचें[2] धारण जें तें उभें सुकृत राहे. ॥ ६१
रुद्राक्ष करुनि धारण होतां त्या **शि**वपदास रत राया! ।
राज्य[3] करिति, यांस पडे जड न भवाचें कदां सर तराया.' ॥ ६२
ऐकुनि पुनरपि गुरुसी प्रश्न करी भूप धरुनि पायांला, ।
'करितिल राज्य कितिक हे आयुः किति असत सांग पां[4] यांला[5].' ॥ ६३
गुरु मग म्हणे नृपातें, 'पुत्राचे पुढिल[6] होईका पुससी, ।
श्रवणें मूर्च्छा पावसि, नेत्राकृति[7] शुक्ल होइ कापुससी. ॥ ६४
पावेल दुःख राज्ञी, आप्त सुहृद हेहि दुःख पावतिल; ।
बोलूं मन[8] रक्षुनि जरि तरि खोटें वदुं नयेचि पाव तिल[9].' ॥ ६५
'सांग' म्हणे मग नृपती गुरुचें पद धरुनियां करानें तो, ।
'अमृतनिधींत वसे जो, सेवि' म्हणे 'काय शुष्क रानें तो? ॥ ६६
बालक ठकविति जैसें गुरु! तूंही गोष्ट सांगसी तसि रे! ।
बैसे रविसन्निध जो तच्छीरीं केंवि सांग शीत शिरे? ॥ ६७
पडतां दुःखसमुद्रीं तेथें गुरु! तूंचि होशि रे! तरं[10] ती, ।
करिति महद्घा[11] जे ते त्वत्पादिं गुरु ठेवितां शिरें तरती.' ॥ ६८
पाहुनि नृपमानस गुरु 'ऐक' म्हणे 'सत्य तव कुमारा हे ।
बाराब्दायुर्[12]यांतिल सात दिनचि रे नृपोत्तमा! राहे. ॥ ६९
अजपासुनि अष्टम दिनिं येइल तव मरण सत्य पुत्रास.' ।
ऐकुनि नृप तो मूर्च्छित पडला, पावोनि तद्वपु त्रास. ॥ ७०
गुरु मग म्हणे तयातें, 'ऐक उपाया सवघड[13], न[14] दरे[14] हो! ।
सावध शरण रिघे त्या दयाब्धि **शं**भूस उघड[15] नेत्रे[15] हो. ॥ ७१

१. मोठ्या आनंदानें. २. जें रुद्राक्षाचें धारण तें सुकृत (पुण्य) उभें राहे (फळास आलें). ३. (हे) राज्य करिति (करितील), यांस भवाचें सर (संसार हेंच सरोवर) तराया जड न पडे. ४. सांग पां=सांग बरें. ५. या मुलांना. ६. पुढें होणाऱ्या गोष्टीला. ७. डोळे कापसासारखे पांढरे होतील. ८. बरें वाटेल असें. ९. पाव तील, अगदीं थोडें सुद्धां. १०. होडी, नांव. ११. महत्+अघा=मोठ्या पापाला. १२. बारा+अब्द (वर्षें)+आयुः (आयुष्य). १३. सोपा. १४. भिऊं नको. १५. डोळे उघडून.

अ[१]तिरुद्र करित शिवशिरिं अभिषेकीं स्वस्थ राहिं हे राया! ।
शिक्षा करील शिव तव सुत य[२]मचर आलियाहि हे[३]राया.' ॥ ७२
भूपति मग गुरुसि म्हणे, 'अतिरुद्राची पडे न हो उमज, ।
म्हणती रुद्र कशातें त्वन्मुखिं तो बोध सर्व होउ मज.' ॥ ७३
मग तो म्हणे गुरु नृपा, 'य[४]जुराम्नायांत दिव्यवस्तू ती, ।
तारकमंत्र म[५]हदसे तो रुद्राध्याय गा! शिवस्तुति ती. ॥ ७४
अकरा वेळे पढतां एकादष्णी नृपा तया म्हणती, ।
एकादष्णी अकरा करितां लघुरुद्र एक गा! गणती. ॥ ७५
अकरा लघुरुद्रांचा रुद्र महा एक तो नृपा! होतो, ।
अतिरुद्र त[६]दकरांचा करिं तो तूं, करिल शिव कृपा हो! तो. ॥ ७६
याहुनि मंत्र नसे म[७]हदाणिक दुसरा चतुर्दशहि भुवनीं, ।
वा[८]ढेलायुष्य सुता धारा शिवमस्तकीं धरविं भु[९]वनीं. ॥ ७७
तेंच उदक घेउनि तूं स्नान प्राशन हि करिव पुत्रातें, ।
[१०]होइल मृत्यापासुनि, तेंचि करुनि दिव्य; तद्वपु त्रातें. ॥ ७८
बोलावावे द्विजगण तेजस्वी शील रुद्रपढकांतें, ।
ला[११]गुं न देती पुत्रा करुनि महामंत्र तो जप ढका ते. ॥ ७९
ऐक कथा पूर्वीची ज्या मंत्रा पा[१२]पमंडळी भ्याली, ।
यमआज्ञे क्ष्मा[१३] येउनि होती जी दूर धरुनि उभ्याली. ॥ ८०
म्हणशिल कोण अधें तीं, ऐक तदुत्पत्तिजन्मनावास, ।
छलक महा करितीं जीं सदैव दुर्बुद्धिजनमना वास. ॥ ८१
धर्माधर्म उपजवी सृष्टी उत्पन्न करि विधी जेव्हां, ।
तदधर्मापासुनि ते होती उत्पन्न पुत्र षट्ट तेव्हां. ॥ ८२
कामैक, क्रोध दुजा, लोभ तिजा, मोह जाण चवथा रे! ।
मद मत्सर हेचि सहा ज्याचे ठायीं जगासि चे[१४]व था[१५]रे. ॥ ८३

---

१. ११×११×११×११=१४६४१ वेळां रुद्राचें आवर्तन करणें यास 'अतिरुद्र' म्हणतात. २. यमदूत. ३. पाहण्यास. ४. यजुर्वेदांत. ५. महत्+असे=मोठा आहे. ६. त्या अकरा महारुद्रांचा. ७. महत्+आणिक. ८. वाढेल+आयुष्य. ९. पाण्यानें. १०. तेंचि (वर सांगितलेलें कृत्य) तद्वपु (त्याचें शरीर) दिव्य करुनि, मृत्यापासुनि त्रातें रक्षण करणारें होईल. ११. ते (ब्राह्मण) तो महामंत्र जप करुनि पुत्रा ढका (धक्का, उपद्रव) लागुं न देती—असा अन्वय. १२. पापें. १३. भूमीवर जी आली (ओळ) धरुनि दूर उभी होती (ती पापमंडळी) इ०. १४. आवड. १५. असे, राही.

जाले क्रोधा त्या सुत ऐकें ब्रह्मघ्न, गोघ्न, तातघ्न, ।
मातृघ्न, बालकाघ्न, स्त्रीघ्न, स्वात्मघ्न, सर्वहि कृतघ्न. ॥ ८४
कामाला सुत जाले मद्यपि, [1]गुरुदारगमनि, जार असे, ।
क्रय विक्रयि लोभातें आणिकही सर्वहरण पुत्र असे. ॥ ८५
मोहापासुनि माया, मत्सर दुर्बुद्धिचा जनक, राया! ।
पापें यांसचि म्हणती, येती क्षितिसी सखे जन कराया. ॥ ८६
आणिकही अघसंज्ञक अपार कामादिकासि होति [2]तुकीं, ।
यमधर्माचे आज्ञे पृथ्वीवरि सर्व येति हो! तितुकीं. ॥ ८७
आज्ञा त्यातें यम करि, भूमीवरि नारि आणि जे नर कीं ।
असती त्यां सकळांतें भुलवुनि जिंकोनि आणिजे नरकीं. ॥ ८८
येती क्षितिवरि तों द्विज होते जप करित रुद्रमंत्राचा, ।
तो जप [3]सुकृतानळ बहु उडे जसा दारु [4]नैलुकयंत्राचा. ॥ ८९
पापें, जपसुकृतानळ उडतां बहु, नेत्रिं पाहती पळती, ।
जाती, यमासि सांगति, अवनीवरि उभि न राहती पळ तीं. ॥ ९०
सांगति, 'जाळी आम्हां रुद्रजपें सुकृतमग्न यमराया! ।
आतां सहसा क्षितिवरि न जाउं कीं, वाटतें भय, मराया.' ॥ ९१
ऐकुनि वचनें त्यांचीं जाउनि विधिपासिं यम वृतांतगती ।
सांगोनि, म्हणे '[5]मेंचर आतां भूलोकिं गा! कसे तगती? ॥ ९२
पाठविलीं होतिं अघें म्यां भू देऊनि [6]काळ सांगातीं, ।
रुद्रजपानळिं पोळति, करितिल तरि [7]युक्त काय सांगा तीं?' ॥ ९३
[8]द्रुहिण म्हणे, 'ऐक यमा! करिती जे जप धरोनि भावातें, ।
[9]सांगें त्या पापांला दावुं नका आपुले स्वभावातें. ॥ ९४
अशुची उभे निजोनी पढती तेथेंचि [10]वांस पापासी, ।
दंड करुनि नरकीं ते घाला' म्हणउनि वदे यमापासीं. ॥ ९५
वंदुनि विधिपद मग यम आला वदतां असे विधात्यानें, ।
याचपरी सांगुनि [11]पंथ दाखविला पातकां [12]सुधा त्यानें. ॥ ९६

---

१. गुरुपत्नीशीं रत होणारा. २. ? ३. पुण्यरूपी अग्नी. ४. नलिकायंत्र=तोफ, बंदूक. ५. माझे दूत. ६. मृत्यु. ७. युक्ति. ८. ब्रह्मदेव. ९. त्या (जप करणाऱ्याला) आपुले स्वभावातें दावूं नका (असें) पापांला (षड्रिपु व त्यांची संतति) सांगें. १०. वसती, राहणें. ११. मार्ग. १२. सोपा, सरळ. हें 'पथा'चें विशेषण.

अल्पायुष्यचि होतें करिती नर पापकृत्य त्यांला जे, ।
रुद्रजपें सांबावरि धरिती जलधार मृत्यु त्यां लाजे. ॥ ९७
आतां तुझिया कुमरा रुद्रजपें वर्धमान रे! आयू, ।
होईल जेंवि वपु हें वाढतसे भक्षितां नरें आयू. ॥ ९८
निर्वैर राज्य मग दशसहस्र संवत्सरें सुखें करिल, ।
जाइल शिवलोकांऽतीं ऐकोत्तरशत कुळेंहि उद्धरिल.' ॥ ९९
नृपती मग गुरुसि म्हणे, 'करणारा पूर्ण तूंचि हा हेत, ।
करवीं अभिषेक शिवा, त्वत्संगतिं मुनिहि बहुत आहेत. ॥ १००
त्वत्संगतिचे ऋषि हे दिसति जसे बैसले अनेक रवी, ।
यांकरवीं अभिषेका शिवशिरसीं रुद्रजप वनें करवी.' ॥ १०१
यापरि ते नृपतीची गुरु तो ऐकोनि नम्र वारा ती ।
धरवी रुद्रजपें शिवशिरसीं ऋषिकरवि नीरधारा ती. ॥ १०२
स्नानहि घालुनि पाजिति ऋषि नृपतनयासि तेंचि सुक्षेम, ।
म्हणती, 'सांबकृपेनें नृपतीचा कुमर हा असु क्षेम.' ॥ १०३
संततधारा शिवशिरिं धरिती मुनि दिवस सातहि घृताची, ।
ऐशा आनंदाच्या गेल्या संपूर्ण सातहि धृताची. ॥ १०४
पाशाऽष्टमदिनिं घेउनि येती यमदूत भीम हातांत, ।
पाहुनि नृपसुत मूर्च्छित पडतां चित्तांत भी महा तांत. ॥ १०५
मुनि रुद्रमंत्र जपती कैंचा नृपकुमर यमचरां लाभे, ।
दूर उभे होते ते अतिबहु पावोनि अंतराला भे. ॥ १०६
भीतमनीं टाकाया पाशा येती कृतांतचर जंव ते, ।
तंव जे शिवदूत तया ताडिति धावोनियां मनोजव ते. ॥ १०७
यमचर मग जे पळती जीवित्वाची मनीं धरुनि आशा, ।
मागें पुढें विलोकित गेले मग याम्य जी धरुनि आशा. ॥ १०८
रुद्रोपनिषदमंत्रें यापरि ते ऋषिंनि जिंकिलें काळा, ।
शिंपुनि रुद्रजपजला जागृत मग करिति राजिलेंकाला. ॥ १०९

---

१. अन्न. २. एकशें एक. ३. शिवाच्या मस्तकावर. ४. पाण्यानें. ५. भाषण. ६. पवित्र पाणी. ७. पाण्याची. ८. रात्री. ९. भयंकर. १०. (राजपुत्राचा) बाप, राजा. ११. यमदूतांना. १२. अंतराळीं. १३. भय. १४. मनाप्रमाणें जव (वेग) आहे ज्यांचा ते. १५. दक्षिण. १६. दिशा. १७. मृत्यूला. १८. राजपुत्राला.

नृपपुत्र उठुनि बसला उगवे शशि पौर्णिमे जसा [1]सकळा, ।
तातंबासुहृदजना जाला आनंद मानसा सकळा. ॥ ११०
नृपसुत सांगे, 'आले होते जे पुरुष अतिभयंकर ते, ।
भस्मांकित नर येउनि जाले मग ताडणा तयां करते. ॥ १११
त्या काळीं [2]ब्रह्मकुमर आला तो मित्र जेंवि ये उदया, ।
नृपति नमी चरणातें आलिंगी त्यास तो धरुनि हृदया. ॥ ११२
बैसवुनी सिंहासनिं षोडश उपचारिं **ना**रदा राजा ।
पूजा करि मग हर्षें नमिति तया सर्व राजदारा जा. ॥ ११३
**ना**रद म्हणे नृपासी, 'येतां [3]नैवलाव पाहिला वाटे, ।
सांगेन ऐक तुजला मोठें आश्चर्य तें मला वाटे. ॥ ११४
आले होते **य**मचर तव पुत्रा न्यावयास तस्करसे, ।
त्या वेळीं रक्षाया आले **शि**वदूत जेंवि भास्करसे. ॥ ११५
**य**मचर म्हणती टाका पाशा जों भीत अंतरा वाचे, ।
तों **शि**वचर ताडिति ते पळती मग दूत [4]अंतरावाचे. ॥ ११६
**शि**वचर भयें करुनि मग पळतां जाली तयां उदंड धरा, ।
रडतचि जाउनि म्हणती, 'आतां क्षितिवरि न जाउ **दं**डधरा! ॥ ११७
हे **य**मराया! अम्हां ताडण केलें तया **शि**वचरांनीं, ।
[5]त्यागोनि मार्ग शिरती, जे कोण वदे तयांशि वच, रानीं? ॥ ११८
[6]नृपतीच्या आणाया जों गेलों क्षिति धरुनि पथ कुमारा, ।
**शि**वचर ताडण करितां, भि[7]योनि पळतांऽति बहुत थकुं मारा.' ॥ ११९
कोपुनि **य**म मग सत्वर जाउनियां म्हणत [8]**वी**रभद्रासी, ।
दंडविसी, मद्दूतां, चिंतिसि कां आमुच्या अभद्रासी? ॥ १२०
अल्पायू नृपसुत तो जातां आणावयासि मच्चर ते ।
कां दंडिले **शि**वचरीं? जाले अन्याय काय आचरते?' ॥ १२१
वार्ता पुसतां जैसा कोपे तापोनि येत जो [9]निर्भरें, ।
तैसा **य**मवच ऐकुनि बोले मग **वी**रभद्र [10]जूर्णिभरें. ॥ १२२

---

१. कलायुक्त, पूर्ण. २. नारद. ३. नवल. ४. यमराजाचे. ५. जे मार्ग त्यागोनि रानीं (आडमार्गांत) शिरती तयांशि कोण वच वदे (भाषण करील). ६. याचा संबध 'कुमारा'कडे. ७. मारा भियोनि अति पळतां बहुत थकुं (थकलों). ८. दक्षयज्ञमथन करणारा शिवदूत. ९. उन्हानें, सूर्यतापानें. १०. क्रोधभरें.

'अयुताब्दें[1] असतांऽयू[2] त्वच्चर ते टाकिति गैळ[3] नु[4] ज्याला, ।
उपकार मानिं जीवें सोडिति हा' म्हणत पिंगळऽनुजाला[5]. ॥ १२३
पुसतां न चित्रगुप्ता आणाया राजबालका हेरें[6] ।
पाठविशी व्यर्थचि, जा काढवुनी लेख अंतका हेरें[7]. ॥ १२४
यम चित्रगुप्त आणवि तत्काळीं त्यांणि काढिलें खातें[8], ।
नृपपुत्रा अयुतायू लिहिलेलें तेथ पाहि लेखातें. ॥ १२५
शंकुनि चित्तीं मग, तो[9] गेला आश्चर्य वाटुनि यमाला, ।
रुद्रजपफळ असें हें केल्या जप भक्ति धरुनि नियमाला. ॥ १२६
पाराशरप्रसादें जिंकिसि तूं हे नृपाल! काला हो, ।
आतां पुढें तुला या तुझिया बहु सौख्य बालकाला [10]हो. ॥ १२७
बाराचें अयुतायू रुद्रजपें होय तव कुमारासी, ।
[11]आयुष्याची करि शिव तोषुनि यमवहिस ते जमा राशी'. ॥ १२८
नारद सांगुनि ऐसें गेला, मग मुनि पराशरादिक ते ।
[12]पूजी, चित्तिं न वाटे धन वेंचायासि नृपवरा दिकें[13] ते. ॥ १२९
षड्रसपक्वान्नानें घालुनि मग ऋषिंस पूर्ण भोजन तें, ।
नानावस्त्राभरणें अर्पुनि देई यथेष्ट भोजेंन[14] तें. ॥ १३०
गेला स्वस्थाना मग गुरु पाराशर तयां ऋषींसहित.' ।
श्रीगुरु म्हणती सतिसी, 'गुरुवचनें जोडले नृपास हित. ॥ १३१
सुतपौत्रीं मग नांदुनि राज्य करुनि सार्वभौम अवनीचें, ।
अंतीं गेला शिवपदिं, वर्णि नृपा त्या जगत्रिभुवनीचें. ॥ १३२
रुद्राक्ष रुद्रमहिमा यापरि धारण जपा करी जो तो, ।
जिंकोनि काळ मृत्या संहारी जाण भवकरी[15] [16]जो [16]तो.' ॥ १३३
शिष्यातें सिद्ध म्हणे, सांगति गुरुराज जाण ही महिमा, ।
श्रवणें ज्ञानार्कउदय नाशी [17]अज्ञानदुःखहीमहिमा. ॥ १३४

---

१. दशसहस्रवर्षें. २. असतां+आयु (आयुष्य). ३. पाश ४. शीघ्र. ५. पिंगलाच्या अनुजाला =शनीच्या भावाला=यमाला. ६. दूत. ७. पहा. ८. (पापपुण्याचा) हिशेब. ९. यमाला आश्चर्य वाटुनि तो गेला—असा अन्वय. १०. होवो. ११. शिव तोषुनि यमवहिस ते आयुष्याची राशी (तें दीर्घ आयुष्य) जमा करि (वाढवी). १२. कर्ता 'नृपवर' अध्याहृत. १३. क्षिती, शंका. १४. द्रव्य. १५. संसाररूपी हत्ती. १६. प्रत्येकजण. १७. अज्ञान आणि दुःख हींच थंडी आणि रात्र यांस.

वर्णी गुरुप्रसादें गुरुचरित वदन[1] बचाजितनयाचें, ।
करि जो श्रवण पठण गुरु करिल कृपा त्यावरी, जतन[2] याचें. ॥ १३९

---

## अध्याय बाविसावा[3].

नामांकित जो शिष्या वाटुनि चित्तीं तया शिवं[4], दोनी ।
धरुनी पद सिद्धाचे प्रश्न करितसे तयाशि वंदोनी. ॥ १

'रुद्राक्ष रुद्रमहिमा सांगति गुरु पुढिलिया चरित्रास, ।
सांग कथा मजलागीं गोड बहुत दूर जें करि त्रास.' ॥ २

सिद्ध म्हणे, 'श्रीगुरु तो करुणाकर जेंवि चातकास चरू[5], ।
भक्ता रक्षि कृपे, जसि माता घालोनि बाळकास चरू[6]. ॥ ३

तीच सती मग विनवी धरुनी श्रीगुरुचिया पदाशि शिरीं, ।
हर्ष मनीं होय जसा बाला[7] परमासिं[8] पौर्णिमे शिशिरीं. ॥ ४

गुरुसी म्हणे, 'मज तुझें व्हावें विस्मरण या कदा न मना ।
सांगे मंत्र मज असा' म्हणुनि करी पुनरपी पदा नमना. ॥ ५

'द्यावा स्त्रियां न मंत्र' श्रीगुरु आणोनि म्हणति हांस तिला, ।
'पतिपदभक्ति करावी सांगितला शास्त्रिं धर्म हा सतिला. ॥ ६

घडती दोष अति बहु स्त्रियांस उपदेशमंत्रकर्त्याला[9], ।
विघ्न घडे मंत्रासी होय असे पूर्वि शुक्र[10] जो त्याला.' ॥ ७

गुरुवच ऐकोनि म्हणे, 'स्त्रियांस उपदेश मंत्र कां नाहीं ? ।
विघ्न घडे कविस[10] कसें ऐकावें वाटतें जि कानांहीं.' ॥ ८

श्रीगुरु म्हणती, 'पूर्वी सागरमंथन सुरासुरीं करितां, ।
[11]सांपडतांऽमृत भांडति, वैर पडे उभयतां तयाकरितां. ॥ ९

अतिनिकरें मग कोपें [12]करित्यसुर युद्ध निर्जरांसंगें[13], ।
[14]मरति असुर जे मंत्रें शुक्र उठवि करुनि निर्जरां संगें. ॥ १०

---

१. मुख. २. हें 'करील' याचें कर्म. ३. यांत मुळांतील ३५ वा अध्याय–ओंव्या १–८६ यांतील कथाभाग आला आहे. ४. कल्याण. ५. मेघ. ६. भात. ७. मुलाला. ८. शिशिरीं (शिशिर ऋतूंतील) माघ व फाल्गुन या दोन महिन्यांतील परमासिं (दुसऱ्या अगर शेवटच्या महिन्यांत म्हणजे फाल्गुनांत) पौर्णिमेला. ९. स्त्रियांना मंत्र सांगणाऱ्याला. १०. दैत्यगुरु शुक्राचार्य. ११. सांपडतां+अमृत. १२. करिति+असुर. १३. देवांबरोबर. १४. जे असुर निर्जरां (देवांबरोबर) संगें (युद्धें) करुनि मरति (ते) शुक्र मंत्रें (संजीवनी मंत्राच्या योगानें) उठवी.

नित्य असुर हरि[1] वज्रें मारि, नखें जेंवि हरि[2] जपोनि करी[3], ।
जीवंत शुक्र तितुके संजीवनिमंत्र तो जपोनि करी. ॥ ११
श्रीगुरु कवि असुरांचा संजीवनिमंत्र तद्वदे वाचा, ।
जाणे न मंत्र गुरु तो बृहस्पती जाण जो कि देवांचा[4]. ॥ १२
येती[5] प्रत्यहिं युद्धा इंद्रासी धरुनि दैत्य बळतळ तो, ।
प्रत्यहिं रण करितां तें आला इंद्रासि फार तळतळ[6] तो. ॥ १३
ताडण करितांचि परें[7] सांगे मग बाळ कीं जसा बातें[8], ।
त्यापरि जाउनि मघवा सांगे तो शुक्रकृत्य सांबातें. ॥ १४
शुक्रवृतांता ऐकुनि नंदिस आज्ञापि सांब आनंदी, ।
'जा, शुक्र धरुनि आणीं.' गेला ते क्षणिंच करुनि 'आ' नंदी. ॥ १५
मुखिं धरुनि आणि शुक्रा जेंवी मार्जार मूखकाला[9] त्या, ।
फणसगरासा[10] शिव तो गीळी पसरोनि मूख काला[11] त्या. ॥ १६
हर्ष मनीं मग सुर ते पाडिति मारोनि दैत्य असुराशी[12], ।
देवांच्या मारभयें होई कल्पांत नित्य असुरांशीं. ॥ १७
[13]कांहीं दिन सांबाचें होता वसवूनि शुक्र जो उदर, ।
मूत्रद्वारिं निघोनी जाउनि दैत्यांस म्हणत 'जाउ दरें[14].' ॥ १८
शिवउदरिं उद्भवे तो, पावे म्हणवोनि नाम भार्गव तें, ।
पुनरपि मृत असुरशवें उठवी पर्जन्य जेंवि नव गवतें. ॥ १९
पुनरपि करिती युद्धा देवांसी पडुनि ते असुर डाया[15], ।
गुरुपासिं इंद्र तेव्हां लागेऽक्षें[16] पडुनि ते असु रडाया. ॥ २०
गुरुसि म्हणे, 'शुक्र पहा देतो दैत्यांसि जीवदाना कीं, ।
कांहिं उपाय करि' असें बोले वंदोनि तत्पदा नाकी[17]. ॥ २१
मग गुरु शक्रासि म्हणे, 'विघ्न करुनि दवडुं [18]मंत्रसत्वातें, ।
रक्षावें न च चित्तीं, त्यागावें काळजीविष त्वां तें. ॥ २२

---

१. इंद्र. २. सिंह. ३. हत्ती. ४. याचा संबंध 'गुरु'कडे. ५. तो बळतळ (सैन्याचा तळ)धरुनि (कायम ठेवून) दैत्य प्रत्यहिं (दररोज) इंद्रासी (इंद्राबरोबर) युद्धा येती. ६. त्रास. ७. दुसऱ्यानें. ८. बापाला. ९. मूषकाला, उंदराला. १०. फणसाच्या गऱ्याप्रमाणें. ११. अनेक देवांना मारण्याचें कारण झाल्यामुळें काळाप्रमाणें भासणारा त्याला. १२. शरीराच्या राशी. १३. जो शुक्र कांहीं दिन सांबाचें उदर वसवूनि होता (पोटांत राहिला होता) तो इ०. १४. भय. १५. वैरास. १६. अक्षें=नेत्रानें. असु (अश्रु) पडून. १७. इंद्र. १८. मंत्राच्या प्रभावाला.

मत्सुत **क**च दवडूं तो विद्याभ्यासास सुरगुरूपार्शी, ।
होईल वश **क**वीची कन्या पाहुनि **क**चस्वरूपाशीं. ॥ २३
जीवा तिचे पडेलचि त्याचे रूपाचि तेधवा [1]गंवि ती, ।
होईल विघ्न मंत्रा, तिळमात्रहि काळजी न वागवि ती. ॥ २४
बोलावुनि मग पुत्रा, आज्ञापी गुरु तयासि ते वेला, ।
संजीवनिमंत्र शिके जाउनि तूं करुनि **शु**क्रसेवेला. ॥ २५
सुरगुरु मी, मत्सुत तूं, घेइल मनिं संशयासि यास्तव तो, ।
त्यास्तव निंदुनि आम्हां तत्सेवा करि करोनियां स्तव तो. ॥ २६
संजीवनि [2]कवणेपरि मंत्र शिके पूर्ण कुमरका! सगुणा, ।
[3]मनपोळाऽवरि, लावुनि विवेक या कसुनि धीर! कास गुणा.' ॥ २७
वंदोनि तातपद मग पुसुनि सकळ निर्जरां **क**च निघे तो, ।
जाऊनि **शु**क्रदर्शन सन्मुख वंदोनि हर्ष मनिं घेतो. ॥ २८
**क**विसि म्हणे, 'त्वत्सेवक होइन, विद्या मला गुरो! शिकवी.' ।
'कोठिल कोणाचा तूं मदनासम?' मग पुसे तयासि **क**वी. ॥ २९
**क**विसि वदे **क**च ऐसें कीं मन घेई न [4]कल्पना त्याचें, ।
'सुरगुरुसुत मि' म्हणे 'परि त्या कारण मज नसेच नात्याचें. ॥ ३०
कैंचा तात म्हणावा ज्यापासुनि नित्य कष्ट होतात, ।
विद्या सांगुनि पाळी, म्हणणें त्यासीच सत्य हो! तात. ॥ ३१
शरणागतपालक तूं विद्यादाता सुकीर्ति मी असि ते, ।
ऐकुनि आलों सेवे, छेदीं अज्ञान, शिर जसें [5]असि [6]ते.' ॥ ३२
**शु**क्रासि म्हणे कन्या, 'आला मच्चित्तिं हा दिसोनि भला, ।
शिष्य करुनि विद्या या सांगें, सेवेसि जरि तुझे निभला.' ॥ ३३
**क**विदुहितेनें सुंदर **क**च तो पाहोनि [7]मीनकेतनसा, ।
शिष्य करविला **क**विचा व्हावा भर्तार चिंतुनी [8]मनसा. ॥ ३४
मैत्री धरि **क**विकन्या **क**चासवें **दे**वयानि नाम तिला, ।
वदतां **क**च, तद्भाषण लागे प्रिय अति तिचे मना मतिला. ॥ ३५

---

१. (सोनाराची) गावी, पकड. २. कोणत्या तरी उपायानें. ३. मनरूपी पोळाला आवरि. (हे) धीर (धैर्यवान् मुला! कास कसुनि (कास मारून=चांगली तयारी करून) या मनपोळा विवेक (ह्याच) गुणा (दोरी) लावुनि आवरि—असा अन्वय. ४. वाईट कल्पना, शंका. ५. तरवार. ६. ती. ७. मदनासारखा. ८. मनानें, मनांत.

कच शुक्राची सेवा करितां, दैत्यांसि तें दिसे कपट, ।
म्हणती, 'कच मारावा, नेत्रीं वोढों नये विवेकपट. ॥ ३६
मारावा न तरि करिल संजीवनिमंत्र हा सकळ हरण, ।
करितां देवांसी ये न च मग जय रात्रिंदिवस कलह रण.' ॥ ३७
एक दिवस कच जातां समिधा आणावयास असुरांनीं ।
मारुनि देती मग ते त्याचें टाकोनि दूर असु[1] रानीं. ॥ ३८
कविकन्या कविस म्हणे, 'पावे जरि पूर्ण मित्र[2] तो अस्ता, ।
आला आझुनि कां न च कच माझा पूर्ण मित्र तो असतां?' ॥ ३९
ध्यानीं कवि जों पाहे असुरांनीं मारिलें स्वशिष्यातें, ।
आणी उठवुनि मग तो जपोनि संजीवनी निमिष[3]यातें. ॥ ४०
होती उपासि दिवसां, हर्षे देखोनि मग कचसखा ती, ।
भोजन दे त्याला, मग आपण ती होय अन्नरस खाती. ॥ ४१
कांहीं दिवसीं आणिक असुरीं मारुनि कचासि तुकडे ते, ।
तच्छरिराचे करुनी देती भिरकावुनी चहुंकडे ते. ॥ ४२
तातासि देवयानी सायंकाळीं म्हणे, 'न ये कच' ती, ।
घे आळ, लाडकी अति कन्या शुक्रासि होति एकच ती. ॥ ४३
ममता बहु कन्येवरि आलें पाहूनि [4]चक्षुषीं असुं तें, ।
ध्यानीं पाहोनि म्हणे केलेंनी छिन्नभिन्न [5]कचअसु तें. ॥ ४४
जपतांचि मंत्र तुकडे शरिराचे मिळुनि एक जागा तो, ।
संजीव होउनि उठे जेंवी निद्रिस्थ मर्त्य जागा तो. ॥ ४५
धांवत पवनापरि मग कच गुरुतें नमित पावला गेहा, ।
'कन्ये! पाहिं' कवि म्हणे 'कच माझे नमित पावला गे! हा.' ॥ ४६
हर्षे कविकन्या कच पाहुनि जेंवी चकोर इंदूतें, ।
कीं स्वातीचें चातकमुखिं पडतां बिंदुमात्र [6]इंदू तें. ॥ ४७
नाना उपाय करुनी मारिति बहु वेळ सुरगुरुसुतातें, ।
तितकेहि वेळ उठवी प्रार्थुनि [7]तातास्यसुरगुरुसुता ते. ॥ ४८
'कांहीं केल्या न मरे' म्हणति असुर 'मैत्रि शुक्रदुहितेची ।
घडलि म्हणुनि उठवि कवी, दे[8]णार न कविसवें वदुंहि ते ची.' ॥ ४९

---

१. देह. २. सूर्य. ३. निमिषमात्र, क्षणभर. ४. डोळ्यांत. ५. कचाचें शरीर. ६. जल. ७. तातासि (बापाला) असुरगुरुसुता (देवयानी). ८. ते (देवयानी) कविसवें (शुक्राचार्याबरोबर) वदुंहि देणार नची (बोलूं सुद्धां देणार नाहीं).

म्हणती, 'आतां करुनी पाहूं राहे उपाय एकच तो, ।
कांहिंहि उपाय कविनें केल्या सहसाहि उठुं नये कच तो.' ॥ ९०
मग ते कचासि मारुनि त्याचे जाळोनि सर्व देहाला, ।
रक्षा, अस्थिहि कुटुनी मिश्रिति[1] पाहूनि सुरस ते हाला[2]. ॥ ९१
तेच सुरा[3] सकळहि मग आणुनि देती स्तुती करुनि गुरुची, ।
म्हणति असुर शुक्रासी, 'सुरा हि अति मिष्ट, काय सांगुं रुची?' ॥ ९२
प्राशविती शुक्रमुखें कचरक्षा मिळविली[4] समस्त सुरा[3], ।
असुरां हर्ष बहुत मग होय, बहुत दुःख तें समस्त सुरां. ॥ ९३
'निर्फळ झाली, केली' असुर म्हणति 'युक्ति[5] देवयांनीं[6] जी.' ।
कविस म्हणे सायान्हीं 'आणि कचालागिं' देवयानी जी. ॥ ९४
पाहे कवि जों ध्यानीं असुरकृती त्यास ती सकळ कळली, ।
न उठे कच म्हणउनि, मग दाखवि मनवृत्ति, [7]तीस [8]कळकळली. ॥ ९५
कवि कन्येसि म्हणे, 'कच मारुनि जाळुनि शरीर असुरें तें, ।
पाजविती मजला ते रक्षास्थी कुटुनि घालुनि सुरेतें. ॥ ९६
गेला मत्पोटीं कच त्याला जरि मी सजीव केला गे! ।
मरुनि मला यमसदनीं जावें ते क्षणिंच कन्यके! लागे.' ॥ ९७
कन्या म्हणे तयातें, 'देशीं तूं जीवदान सर्वांस, ।
आश्चर्य वाटतें मज मृत्याचें भय करि [9]त्वदुरिं वास.' ॥ ९८
शुक्र म्हणे, 'मजवांचुनि संजीवनिमंत्र कोणिहि न जाणे, ।
उठवील कोण? मज यमसदनीं लागेल मग मरुनि जाणें.' ॥ ९९
ती त्यासि म्हणे, 'उठविन तुज मी, मजलागिं मंत्र शिकवी तो.' ।
'दोष स्त्रियांसि देतां मंत्र' म्हणे देवयानिशि कवी तो. ॥ ६०
'देतां स्त्रियांसि मंत्रा हानी होईल मंत्रतेजातें. ।
काय करावें आतां?' बोले संकट पडोनि तें ज्यातें. ॥ ६१
कन्या म्हणे, 'अस सुखी मंत्र जपुनि, मी त्यजीन जीवाशी.' ।
[10]ऐकुनि कळवळला मनिं कन्येची 'त्यजिन जीव' जी वाशी. ॥ ६२
योजी युक्ति, 'करुं' म्हणे 'उदरीं संजीव [11]जीवपुत्रातें, ।

१. मिसळतात. २. मद्य. ३. मद्य. ४. मिळविलेली, राख मिसळलेली दारू. ५. युक्ति. ६. देवांनीं. ७. देवयानीला. ८. अत्यंत दुःखित. हें 'मनोवृत्ती'चें विशेषण. ९. तुझ्या पोटांत किंवा मनांत. १०. 'जीव त्यजिन' (अशी) जी कन्येची वाशी (वाणी, भाषण) (ती) ऐकुनि (तो) मनिं कळवळला. ११. बृहस्पतीच्या मुलाला, कचाला.

उठविल मज तो, त्याला देऊं संजीवनीसुमंत्रातें. ॥ ६३
कन्ये! कचाणिन[1]' म्हणे मग तो उदरांत करुनि संजीवी, ।
'वत्सा घे मंत्र' म्हणे; 'हूं' त्याला म्हणत पोटीं तो जीवी[2]. ॥ ६४
उपदेशुनि मंत्र म्हणे, 'ये बाहिर भेदुनी मदुदरास,' ।
परि मग ये दिक्कत[3] मनीं म्हणुनी चित्तीं धरी भृगु[4] दरास[5]. ॥ ६५
चिंति म्हणे, 'मद्वैरी सुरगुरु, तत्तनय हा किं हो! मातें ।
नुठवी[6] जरि, सहजचि मग मत्कायाही पडेल होमातें[7]. ॥ ६६
कन्येसीं सांगितला सबीज मग मंत्र सकळ कविराजें, ।
भेदुनि उदर मग निघे तेजस्वी मित्रसम कच विराजे. ॥ ६७
पडिला अचेतन कवी उठवि कळवळुनि मनीं कच तयास, ।
'उत्तीर्ण न मीं केल्या जरि स्वतनुपादुका' म्हणत 'यास.' ॥ ६८
पादिं शिर ठेवुनि मग तो कच करि कर जोडुनी गुरुस्तवना, ।
विनवी, 'निरोप दे मज वधिति असुर मिळुनि ते समस्त वना[9]. ॥ ६९
तुझिया कृपे करुन मी गुरुजी! विद्या अपार शिकलों कीं, ।
वोवाळुं गुरुत्वें तुजवरुनी बाराहि(?) जीं रसिक लोकीं.' ॥ ७०
स्तुति ऐकोनि मग तया हर्षें दिधला निरोप भार्गविं[10] त्या, ।
जातां पदरिं धरिं म्हणे 'वरि मज तूं' दिव्यरूप भार्गवि[11] त्या. ॥ ७१
'मजसम नसेच नारी तुजसम नाहींच पुरुष गांतूतें[12], ।
विद्याहि मजमुळें तुज, वांचविही मीच सत्य गा! तूतें.' ॥ ७२
तीस म्हणे कच, 'तूं मद्भगिनी होसी सखी[13] न सोपत्नी[14], ।
होइन कसें म्हणाया वाटे भय तव न मानसा पत्नी[15]. ॥ ७३
वांचविशि होशि जननी, परि भावंडेंच पूर्ण होउं निकीं, ।
कैसें वरीन म्हणसी कविकन्या ज्ञानि पूर्ण होउनि कीं.' ॥ ७४
भार्गवि म्हणे, 'मज कचा! न कळसि ऐसा तुं नष्ट असशील, ।
पुरविशि न च मम इच्छा तरि विद्या सकळही विसरशील. ॥ ७५

---

१. कचा+आणिन. २. कच. ३. शंका. ४. शुक्र. ५. भीतीला. ६. न उठवील. हा पररूपसंधि. ७. जळून जाईल, नष्ट होईल. ८. यास मीं जरी स्वतनुपादुका (आपल्या अंगाचे जोडे) केल्या (तरी) उत्तीर्ण (उपकारांच्या ऋणांतून मुक्त) न (होणार नाहीं) (असें) म्हणे. ९. रानांत. १०. शुक्रानें. ११. भृगुकन्या देवयानी. १२. पृथ्वीवर. १३. सख्खी. देवयानी-प्रमाणेंच कचही शुक्राच्या उदरांतून आला होता म्हणून तीं दोघें सख्खीं भावंडें झालीं. १४. सावत्र. १५. पत्नी होईन (असें) म्हणाया तव मानसा भय कसें न वाटे?

होणार नाहिं तुजला संजीवनिमंत्र तो सफळ कांहीं.' ।
**क**च बोले, 'शापाचीं वचनें वदसी वृथा विफळ कां हीं? ॥ ७६
व्यर्थ मला शापिसि तूं, माझाही घेइ शाप थोडकसा[1], ।
थोर कसा देउं तुला, रक्षिसि मज, करतळांत फोड कसा. ॥ ७७
सहसाही तुजलागीं कोणीही विप्र साच हो! न वरी, ।
एकादा नृप पाहुनि धार्मिक शूरहि तसाच हो नवरी. ॥ ७८
संजीवनिमंत्र पुढें न चले **क**वि शिकवि तुज म्हणुन तो कीं, ।
होइल विफळचि, जैसी[2] मृत वंध्या होय बहु विउन तोकीं.' ॥ ७९
शापोनि मंत्र, **क**च मग भेटे जाऊनि **शक्रजी**[3]वातें, ।
न[4] चलेच मंत्र पाही जों असुरांच्या ऽणु **शु**क्र जीवातें. ॥ ८०
उठती न दैत्य मग तो जाला आनंद निर्जरा **ह**रिस, ।
असुरां सुरभय वाटे जैसें देखोनि कुंजरा हरिस.' ॥ ८१
**गु**रु म्हणती, '**सा**वित्री! दे कन्ये मंत्र तो जसा **शु**क्र ।
होई निस्तेज कसा, पडतां अंगार[5] तो जसा शुक्र[6]. ॥ ८२
यास्तव मंत्र स्त्रीसी वर्ज्य असे, व्रत उपास मात्र असे ।
योग्य कराया' **गु**रुचे मग ती ऐकोनि विनवि बोल असे. ॥ ८३
शिष्यासी सिद्ध असें सांगे आणीकही पुढें कथिल, ।
वर्णील **रा**मसुतसुत कर्णीं (?) तिसरे धरोनि ते शील. ॥ ८४

---

## अध्याय तेविसावा.[7]

शिष्य वदे सिद्धासी, बोले, 'प्रागमीं[8] करीं बहुतपा जी! ।
म्हणउनि भेटसि मज तूं तृषिता **गु**रुचरित जें अमृत पाजी. ॥ १
**सा**वित्री श्री**गु**रुसी पुढती करि काय सांग विनती गा!' ।
सिद्ध म्हणे, 'चरितसुधा त्वत्रय(?)कर्णांत सांठविन ती गा.' ॥ २
श्री**गु**रुस म्हणे सति ती, 'विस्मरण तुझें पडे केंदीं[9] न मना, ।

---

१. थोडकासा, लहानसा. २. मृततोकीं (मुलें मेल्यामुळें) बहु विउन (पुष्कळ मुलें होऊनही) [स्त्री] वंध्या होय. ३. इंद्र आणि बृहस्पति यांस. ४. शुक्र जों असुरांच्या जीवातें पाही (तों) मंत्र अणु (थोडासा) (ही) न चलेच. ५. कोळसे. ६. अग्नि. अंगार=मंगळ, शुक्र=एक ग्रह, असा अर्थ घेऊन ही ज्योतिषसंबंधी उपमा होते कीं काय? ७. यांत मुळांतील अध्याय ३५ ओंवी ८७ पासून अखेरपर्यंत कथाभाग आहे. ८. प्राक्+मी=पूर्वीं+मी. ९. कधीं.

ऐसें व्रत कांहिं **गुरो**! सांग मला' म्हणुनि करि पदीं नमना. ॥ ३
**गुरु** म्हणति, 'सोमवार श्रेष्ठ व्रत जेंवि धातुगणिं [1]चंद्र, ।
सुखदायक तेजस्वी यापरि नभमंडळीं [2]भगणिं चंद्र. ॥ ४
सौ[3]भाग्यदायकाणी मनिंचें इच्छीत [4]सर्वदातें जें, ।
व्रत करि तूं जन्मवरी, अंतर पडतां न, सर्वदा [5]तेजें. ॥ ५
म्हणसी कोणीं केलें पूर्वीं व्रत? नृपति **चि**त्रवर्मासी ।
तन्नामकीर्ति, जाणे सकळाच्या तो विचित्र वर्मासी. ॥ ६
धार्मीक, शूर मोठा, आनंदें करित वास [6]वसुधेतें, ।
नांदे **अ**मरावतिसी जैसा प्राशोनि [7]**वा**सव सुधेतें. ॥ ७
मोठ्या नवसें कन्या त्याचे उदरास एक आली ते, ।
वर्तवि जातक विप्रां [8]गणकां बसवोनि एक [9]आलीते. ॥ ८
जातक वर्तवुनी ते ज्योतिषि सांगति, 'सुलक्षणी दुहिता, ।
करिल हिता आनंदा, मानिं जसा कामधेनुसी [10]दुहिता. ॥ ९
**सी**मंतिनि नाम इचें लावण्यतिरूप कांति इंदुसरी, ।
**द**मयंती उपमेसी, आणिक उपमे सरी नसे दुसरी. ॥ १०
राज्य करिल सुतपौत्रीं अयुताब्दें सार्वभौमपतिसहित, ।
मोठी पतिव्रता ही होइल, जोडे इचेनि पतिस हित.' ॥ ११
ऐकुनि तृप्त नृपानें केलें गणकद्विजांसि धनदानें, ।
याचकमनिं तोष जसा देतांचि [11]निधी द्विजांसि [12]धनदानें. ॥ १२
तों एक विप्र बोले, 'ऐक नृपा! गणक हे न सांगति तें, ।
येइल वैधव्य, घडे चवदावे वर्षिं रे! अशा गतितें.' ॥ १३
त्या विप्रवचनअनळें नृपतीचा होय [13]हर्षकोंब हुत, ।
द्विजगण म्हणती, 'विप्रा! दुर्वचनें असिं [14]भंकों नको बहुत.' ॥ १४
विप्रवचन दुःखाग्नी नृपतीच्या पेटवी अगाध मनीं, ।
[15]मुखवातसंगि शि[16]ष्या! जशि अग्नी पेटवी अगा! [17]धमनी. ॥ १५
द्विजगण समस्त मग ते बोध करिति, ऐकुनी निवे कानें. ।

---

१. सोनें. २. नक्षत्रसमुदायांत. ३. सौभाग्यदायक+आणि. ४. सर्व देणारें. ५. उत्साहानें. ६. पृथ्वीवर. ७. इंद्र. ८. ज्योतिष्यांना. ९. ओळीला. १०. दूध काढणारा. ११. द्रव्याचें भांडार. १२. कुबेरानें. १३. हर्षांचा अंकुर. हुत=दग्ध. १४. विचार न करितां बोलूं नको. १५. तोंडाच्या वाऱ्याच्या साहाय्यानें फुंकून. १६. नामधारका. १७. फुंकणी.

'होणार होउ म्हणउनि नृप शांतवि दुःख तें विवेकानें. ॥ १६
सप्तमवर्षी कन्या ऐके वैधव्यवर्ष चवदावें, ।
होतां प्राप्त मग म्हणे, 'हें कोणाजवळि दुःख मि वदावें.' ॥ १७
ऐसी चिंता करि जों आली घरिं याज्ञवल्किची रमणी[1], ।
ब्रह्मज्ञ, श्रेष्ठ, सती, नवरत्नीं श्रेष्ठ जेंवि हीरमणी[2]. ॥ १८
नृपजायाऽसन देउनि पूजी, देऊनि सर्व मानातें; ।
सांगे मग ऋषिजाये[3] कन्येच्याद्यंत[4] वर्तमानातें. ॥ १९
कन्या मग नमुनि म्हणे, 'मत्करुणा तूज येउ' पायांतें[5] ।
'सौभाग्यवर्धमाना[6] पावे ऐशा वदे उपायातें.' ॥ २०
सीमंतिनीस मग ती मैत्रेयी याज्ञवल्किची कांता ।
सांगे व्रत, 'शशिवारीं[7] रात्रीं शिव पूजि बसुनि एकांता. ॥ २१
सौभाग्यदायकव्रत मोठें हें गे! दयाळु तो कवची[8], ।
पूजीं करोनि मन दृढ, कच्छाचे[9] पाठिची जसी कवची. ॥ २२
सर्वोपचारि पूजुनि अकरा दंपत्य रात्रि भोजन तें ।
घालुनि तयांसि देणें वस्त्रालंकार बहुत भोजन[10] तें. ॥ २३
सद्भावें करिं ऐसें व्रत, तव रक्षील सांब सौभाग्य, ।
टाकिं न सहसा हें व्रत, पावे तव वर्धमान बहु भाग्य. ॥ २४
करितां उमामहेश्वरपूजन नाशी समस्तही दुरितें, ।
दूर करी विघ्न.' महद्व्रत ऐकुनि राजकन्यका धरि तें. ॥ २५
भाव धरुनि करि नेमें सांगे मैत्रेयि जें तथापरिस[11], ।
अकराशें दंपत्यें पूजि, पुढें वर्तली कथा परिस. ॥ २६
कन्या उपवर जाली परि नृप भी लग्न तो करायासी, ।
व्रत करि देखुनि मग तो जाला मनिं बहुत तोष रायासी. ॥ २७
चित्तिं विचारी नृप मग असेल जें प्राक्तनीं घडो, परि तें ।
लग्न करावें, म्हणउनि वरशोधन भूस[12] करवि तदुपरि[13] तें. ॥ २८
येति सचिव वर पाहुनि नैषधपति इंद्रसेन नृपकुमर, ।
पावति सरि न जयाचे रूपा शक्रादि सर्वही अमर. ॥ २९

---

१. स्त्री—मैत्रेयी. २. हिरा. ३. ऋषिपत्नीला. ४. आद्यंत=आरंभापासून अखेरपर्यंत. ५. हें 'नमुनि' याचें कर्म. ६. सौभाग्य वाढविणाऱ्या. हें 'उपायातें' याचें विशेषण. ७. सोमवारीं. ८. मंत्रांचा स्वामी, शंकर. ९. कासवाच्या. १०. द्रव्य. ११. त्याप्रमाणें. १२. पृथ्वीवर. १३. त्यानंतर.

षोडषकळासहितशशिकांतीतेजस्विता तयापरि ते, ।
चंद्रांगद नाम म्हणुनि सांगति मंत्री नृपास यापरि ते. ॥ ३०
वानिति मंत्री वर तो कानें ऐकोनि नृपवरानें त्या, ।
मग सपरिवारि लग्ना गर्जत बहु वाद्य नृप वरा ने त्या. ॥ ३१
धाडुनि पत्रें मग ऋषि राजे क्षितिवरिल सर्व बोलावी, ।
आले मग सकळहि ते, तन्नामें कितिक म्हणुनि बोलावीं. ॥ ३२
केलें लग्नोल्हासें, सोहाळा होय चार दिन पूर्ण, ।
धन विप्रां वांटितसे, मेघींही वर्षिलें कधिं न पूर्ण. ॥ ३३
वर्णावा जरि [१]संभ्रम तो तरि कीं ग्रंथसिंधु पसरेल, ।
विसरेल गुरुस्मरणा मति, आयुष्याचि मग लिपि[२] सरेल. ॥ ३४
यास्तव संभ्रमिं लग्ना करि नृप इतुकेंचि गुरुनि बोलविलें, ।
आंदण बहु दे नृप, तें देखुनि शक्रेंहि मौळ[३] डोलविलें. ॥ ३५
अर्पुनि [४]अंयांवरें मग वराडिया बहु करोनि गौरव ते, ।
बोळविले मग सकळहि वाद्याचा बहु करोनि [५]गौ[६]रव तो. ॥ ३६
बोळवुनी सन्मानें सखी त्या इंद्रसेनरावास ।
विनवी नृप 'जामाता! कांहीं दिन मद्गृहीं करा वास.' ॥ ३७
श्वशुराचे चंद्रांगद राहे देऊन विनवणिस मान, ।
'सीमंतिनिसंगिं' म्हणे 'ये मद्भाग्यासि न कवणि समान.' ॥ ३८
श्वशुरगृहीं असतां तो एक दिवस जाइ, करि शिकारि वनीं, ।
श्रम पावे मग घालवि नौकाक्रीडार्थ र[७]विकुमारिवनीं. ॥ ३९
उत्साहें क्रीडा करि बैसुनि नावेंत सहित परिवारा, ।
आनंद करित सर्वहि त्या वेळे करित; [८]अहित परि वारा. ॥ ४०
[९]पवनें मध्यें नौका बुडे जळीं मग करोनि डळमळ ती, ।
सेवकजनादि होते तटाकिं जे दुःखचित्ति तळमळती. ॥ ४१
कांहीं नर येति [१०]कडे, नृपतीचा जांवई परि बुडाला. ।
गुप्तचि जाला, न दिसे; जाई पाषाण ज्यापरि बुडाला[११]. ॥ ४२
धांवत येवोनि नृपा निवेदिला मग वृतांत [१२]हेरीं तो, ।
दुःखें कालिंदितटीं येउनि नृप मग जळांत [१३]हेरीतो. ॥ ४३

१. समारंभ. २. लेखनमर्यादा. ३. मस्तक. ४. सोनें आणि वस्त्रें. ५. पृथ्वीवर. ६. नाद. ७. यमुनाजलांत. ८. प्रतिकूल. ९. वाऱ्यानें. १०. तीराला. ११. तळाला. १२. दूतांनीं. १३. पाहतो.

राज्ञी कन्येसह बहु दुःखें ये [1]भानुजातटाकीं ती, ।
शोक करुनि बहु दुःखें कन्या धरणीस देह टाकीती. ॥ ४४
नृप चित्रवर्म उदकीं शोध करवि घालवुनि बहु [2]तेरा ज्या, ।
परि सांपडे न जांवइ, मग दुःखें शोक बहुत करि राजा. ॥ ४५
सीमंतिनि करि शोका करुणास्वरें आठवुनि उमापतिला, ।
वदवेना माझेनें घडला बहु शोक जो [3]उमाप तिला. ॥ ४६
जाउनि वृतांत मग तो [4]चर सांगति इंद्रसेन भूपासी, ।
दुःखें सस्त्री मग तो ये [5]आर्यात्रतिच्या प्रभूपासीं. ॥ ४७
पाहुनि [6]नृप तो [7]नृप तो शोक करी धरुनि तो तयास गळीं, ।
नर नारि सुहृद दुःखें रडती वेष्टोनियां तया सगळीं. ॥ ४८
दुःखें आक्रोशिं निर्ढळ वक्षःस्थळ ताडिती महा हातीं, ।
करिती कोल्हाळ सकळ रडुनि करुनि एक [9]याम [10]हांहा तीं. ॥ ४९
मंत्री आचार्य तयां सांगुनि म्हणती विवेकबोधातें, ।
'दुःख करुनि काय करा? होणारें चुकत नाहीं [11]विबुधांतें.' ॥ ५०
कन्या मनिं मैत्रेयी स्मरुनि म्हणे, 'सांगसी [12]सुशंकर तें, ।
व्रत जें निर्फळ दिसतें सकळ करवि विनवुनी तुं शंकर तें.' ॥ ५१
आचार्य मंत्रि यांनीं सांगुनि सर्वांसि बहु विवेकाला ।
भूपादि सर्व गेहीं शांतवुनी दुःख नेति ते [13]काला. ॥ ५२
गेला स्वदेशिं नृपती [14]नळसुत परि पुत्रशोक विसरेना, ।
दाहक दुःख [15]महत्तें अहर्निशीं बहुत [16]शोकवि; सरेना. ॥ ५३
राज्य करावें ऐसें वाटेना चित्तिं इंद्रसेनातें, ।
दायाद राज्य हरिती सकळहि मिळवुनि अपार सेना तें. ॥ ५४
कारागृहांत ठेविति पत्नीसह इंद्रसेनभूपाला, ।
जाळी दुःखाग्नि तया, पडलाग्नी जेंवि [17]शुष्क [18]भू पाला. ॥ ५५
सीमंतिनि दुःख करी आठवुनी पतिगुण स्वरूपाही, ।
वैधव्य निंद्य म्हणुनी जीवाचा घात ती करूं पाही. ॥ ५६

---

१. यमुनेच्या तीरीं. २. होड्या. ३. अत्यंत. ४. हेर. ५. चित्रवर्म राजाजवळ. ६. इंद्रसेन. ७. चित्रवर्मा. ८. कपाळ. ९. प्रहर. १०. हाय हाय. ११. देवांनाही. १२. कल्याणकारक. १३. त्या वेळीं. १४. इंद्रसेन. १५. महत्+तें=तें मोठें (दुःख). १६. दुःख देई. १७. हें 'पाला' याचें विशेषण. १८. जमिनीवर.

संबोखुनि तात तिला, 'जीवा सहसा न दे' वदे तो कीं, ।
'सुतसम पाळिन तुजला, तुजविण आणिकि न देव देतो कीं'. ॥ ५७
वेष्टी दुःख हृदाब्जा जैसें त्या वेष्टिलें नभा वातें, ।
परि सोडी न व्रत तें, भक्तीनें करि धरोनि भावा तें. ॥ ५८
इकडे चंद्रांगद जों बुडे तया स्थानिं नागराजसुता ।
आल्या, तों त्या सुंदर पाहुनि पाताळिं नेति राजसुता. ॥ ५९
शिंपोनि अमृत, सावध करोनि, नेती तया सभास्थानीं; ।
राजकुमर देखुनि करि आश्चर्या सकळ सर्प आस्थानीं. ॥ ६०
पाहे तक्षक बसला मध्यें सिंहासनीं भुजंगम तो; ।
सप्तशतें फणि शोभति वरि, करि मणि रविसमान झगमग तो. ॥ ६१
सन्मुख साष्टांग नमन करि मग नृपपुत्र तक्षकाला त्या, ।
नृपकुमरा अवलोकी तक्षक लावोनि अक्ष काला त्या. ॥ ६२
तक्षक कन्यांस म्हणे, 'कोठिल हा कोण सांगणें मातें.' ।
त्या म्हणती, 'यमुनेतें व्हावत आला, न जाणुं नामातें.' ॥ ६३
नृपसुत म्हणे, 'जयाचें नाम स्मरतांचि सर्व पापमला ।
जाळित, तया नळाचा होतो सुत इंद्रसेन बाप मला. ॥ ६४
चंद्रांगद मज म्हणती, होतों भार्येसह श्वशुरभुवनीं, ।
प्रारब्धेंकरुनि बुडें मी यमुनेचे, बुडोनि तैर, भुंवनीं. ॥ ६५
देखोनि नागकन्या घेउनि आल्या मला तुझे जवळी, ।
फळलें मद्दैव, तुझें दर्शन मज होय.' म्हणुनि पद कवळी. ॥ ६६
तोषुनि नागेश म्हणे, 'तुम्ही असां भक्त कोण देवाचे?' ।
ऐकुनि वच चंद्रांगद जें ऐका हर्षमानें वदे वाचे. ॥ ६७
'ऐक' म्हणे, 'नागेशा! आहे व्यापोनि सर्व विश्वास, ।
जो विश्वंभर शिव तद्भक्ति सदा करुं धरोनि विश्वास. ॥ ६८
मायेपासुनि ज्याचे त्रिगुणा उत्पत्ति होय ज्या होती, ।
देवत्रय विधि हरि हर त्रिगुणापासाव ऐक ज्या हो ती. ॥ ६९
जाला रजोगुणें विधि, सत्वगुणें हरि, तमोगुणें हर तो, ।
करितों त्या शंभूची भक्ति सदा 'दुःख' जो म्हणे 'हरतों.' ॥ ७०
ज्याची बहुगुणकीर्ती वर्णन करितां सहस्रवदनें ती, ।

१. सभेंत. २. डोळयाला, नजर. ३. वाहात. ४. नौका. ५. पाण्यांत.

शेष थके, वेदहि ते थकले, मग म्हणति धरुन पद '[1]नेती.' ॥ ७१
ज्यातें कर, चरण, शिरें सहस्र; जो उग्र [2]भीम लक्षाया, ।
तो पंचवदन, दशभुज, रूप धरी सगुण भक्त रक्षाया. ॥ ७२
कर्पूरगौर भूषित सर्वांगीं चर्चिलें चिताभस्म, ।
ज्याचा तृतीय लोचन जाळी जो [3]सकळसौख्यकुंभ [4]स्म. ॥ ७३
नररुंडमाळ कंठीं शोभे, जो सार्वकाळ आनंदी, ।
नंदी वाहन ज्याचें, ज्याचे वामांगिं शक्ति [5]आनंदी. ॥ ७४
ज्याचे जटेमधोनी वाहतसे [6]शुक्ल [7]आयुधानी ते, ।
ऐके शोभति कैसे कर ज्याचे दशहि आयुधानीं ते. ॥ ७५
खड्ग, त्रिशूल, डमरू, परशांकुश, अजिन, चाप, शर,[8]नभज, ।
मर्त्यकपाल दहावें; दर्शन अघ उडवि जेंवि तृण [9]नभज. ॥ ७६
[10]चर्मार्द्र अंबर जया मौळीं गंगाणि अत्रिज गजाचें, ।
सर्वेहि भूषण [11]उरगचि, ध्यान असे ध्यातसे त्रिजग ज्याचें.' ॥ ७७
यापरि ऐकुनि तक्षक तोषवि चंद्रांगदा धरुनि करिं तो, ।
बसवी स्वसन्निधीं मग चित्तीं आनंद फार बहु करितो. ॥ ७८
'राहिं' म्हणे 'सुख भोगित तेथें पावसि कधीं न असुखास, ।
प्राशुनि अमृत सदा तव होइल [12]चिरंजीव जाण [13]असु खास. ॥ ७९
येथिल सुखासम नसे स्वर्गीं सुख वासवादि देवास; ।
मल्लोकिं सुखेंकरुनी राहिं' म्हणुनि नाग तो वदे [14]वास. ॥ ८०
माझे लोकीं रत्नें अमोल्य, [15]धामेंहि रत्नहेमाचीं, ।
राहिं सुखें, पाहिं अमृतसरोवरें भरलिं जेंवि [16]हेमाचीं.' ॥ ८१
विनवी नृपसुत मग तो यापरि ऐकोनि तक्षकवचाला, ।
'सकळ' म्हणे 'मी पावें यांतच मज देशि अभयकवचाला. ॥ ८२
नागेंद्रा! ऐक' म्हणे 'एकचि गा! आइबास ज्या सुत मी, ।

---

१. न+इति. 'हें नव्हे हें नव्हे असें; परमेश्वर कसा आहे हें आम्हांला माहीत नाहीं असें. २. उग्र, भयंकर. ३. सकल सौख्याचा घडा अथवा स्थान. ४. काम, मदन. हा अर्थ मूळपोथींत बाजूस दिला आहे. ५. पार्वती. आनंद=शिव. ६. शुभ्र. ७. आयु (मत्स्य वगैरे अनेक प्राणी) यांचें धान (निवासस्थान) जी गंगा नदी. ८. कमल. ९. वायू. १०. जया (ज्या शंकरास) गजाचें आर्द्र (ओलें, ताजें) चर्म अंबर (वस्त्र) (आणि) मौळीं (मस्तकावर) गंगाणि (गंगा+आणि) अत्रिज (चंद्र). ११. सर्प. १२. पुष्कळ वर्षें राहणारें. १३. शरीर. १४. वाणि, शब्द. १५. गृहें. १६. पाण्याचीं.

कालिंदींत बुडे हें ऐकुनि पडतील पुत्रशोकतमीं[1]. ॥ ८३
चवदा वर्षांची मीं नूतन वरिली असे सुरामा[2] जी, ।
तेथें चित्त असे, तसि कोणाची स्त्री नसे सुरांमाजी. ॥ ८४
मानोनि मृत्य मजला लागेलचि जीव देउं दारा ती, ।
नरलोकिं पोंचवुनि मज भेटवि करुणानिधे! उदारा! ती. ॥ ८५
जननिजनकचरणांच्या भेटीची वाढ चित्तिं पाहेंची, ।
भेटविं तच्चरणा, दे दान मला करुनि तूं कृपा हेंची. ॥ ८६
पुण्य घडेल तुला तें कीं त्याची मी करीन सेवा जी.' ।
ऐकुनि तक्षक तोषुनि पवनजवी[3] त्यास देतसे वाजी[4]. ॥ ८७
नाना वस्तू देउनि बहु मग तो पाजवी तयास सुधा, ।
उरगेक[5] देइ संगें 'मार्ग' म्हणे 'दाखवीं तयास सुधा[6].' ॥ ८८
नृपसुत म्हणे मग तया नमुनि, 'असो वृद्धि तव कृपावेल[7].' ।
नागेंद्र म्हणे, 'संकटिं स्मर मज तव कार्य सिद्धि पावेल. ॥ ८९
बारा सहस्र करिबळ येऊ' वरदान तक्षकानें त्या ।
दिल्हें ते क्षणिंच, तसें आलें बळ ऐकतांच कानें त्या. ॥ ९०
घेइ निरोप, निघे मग अश्वावरि बैसुनी सवें उरग, ।
दाखवि मार्ग जया स्थळिं बुडे तया स्थानिं तो निघे तुरग. ॥ ९१
तेथें सीमंतिनि ये स्नाना जाणोनि इंदुवासर तो, ।
चंद्रांगद यमुनेचें आला भेदोनि तेधवां सर[8] तो. ॥ ९२
पाहुनि सीमंतिनि तो मानी चित्तांत फार आश्चर्या, ।
पाहे अवलोकुनि मग पदरांतुनि[9] मंद मंद तच्चर्या[10]. ॥ ९३
सखिस म्हणे, 'उदकांतुनि ये हा नर भव्य सौम्य बाहेरी, ।
वहन तुरग, उरग सवें, तेजस्वी जेंवि सौम्य[11] बा[12] हेरी.' ॥ ९४
नृपकुमर पाहुनि तिला 'माझे स्त्रीसमचि हे' म्हणे 'दिसती, ।
परि गळसरि कंठिं नसे, रूपें तरि दिव्य, जेंवि आदिसती[13]. ॥ ९५
'कोणाची कोण असे', चंद्रांगद मनिं म्हणे 'विचारुं इला, ।
सांगेल वर्तमाना मद्वचनें आलिया तिच्या रुईला[14]. ॥ ९६

---

१. तमीं=दुःखांत. २. सुंदर स्त्री. ३. वायुवेगाचा. ४. घोडा. ५. उरग=सर्प. ६. सरळ. ७. कृपेचा वेळ. ८. पाणी. ९. वस्त्रामधून. १०. त्याचें रूप. ११. चंद्राप्रमाणें. १२. हें संबोधन पुरुषास लावावयाचें असून चुकून सखीला लाविलें आहे. १३. पार्वती. १४. पसंतीला.

कोणाचि कोण?' म्हणुनी सन्निध मग जाउनी पुसे तिजला, ।
ऐकुनि, पति आठवुनी, [1]दुःखेंऽक्षा आणुनी पुसे ति जला. ॥ ९७
मग तो म्हणे, 'श्रमि नको होउं, तुझें वर्तमान सांग मला.' ।
अवलोकितां मुख तिला स्वपती ऐसाच मानसा गमला. ॥ ९८
खालीं पाहे मग, हो ती स्वमुखें वृत्त [2]सांगया लाजे, ।
सखिस म्हणे मग 'अस्मत् साद्यंतहि वृत्त सांग याला जें.' ॥ ९९
सखि सांगे, '**चं**द्रांगदजाया **सी**मंतिनी सुनामी हे, ।
नृप**चि**त्रवर्मकन्या, पती इचा बुडत [3]सौरिनामीं हे. ॥ १००
लावण्यरत्नखाणी परि विधि वैधव्य लिहि कपालीं तें, ।
व्रत सोमवार करिते, भावें पूजीतसे [4]**कें**पालीतें. ॥ १०१
करितां सुतशोकें बहु अति दुःख [5]सैंभाज सासरा ईचा, ।
वैरि व्यापी एकाएकीं घन भा जसा [6]सैंराईचा. ॥ १०२
राज्यश्री हरुनि नृपा रक्षी बंधांत तो करुनि [7]आँजी, ।
यास्तव [8]करींदुवारव्रत जें, [9]स्नानास ये म्हणुन आजी.' ॥ १०३
ऐकुनि **चं**द्रांगद तो सर्वहि हें वर्तमान सखिवदनीं, ।
खेद क्षणैक करुनी स्वाश्रु धुई होउनी असुखि सदनीं. ॥ १०४
**सी**मंतिनीस मग तो सांगे एकांतिं गुज धरोनि करीं, ।
'त्वत्पति तिसरे दिवसीं भेटे तुज तिळहि काळजी न करीं. ॥ १०५
करिसी व्रत या पुण्यें होइल तव सर्व कामना सिद्ध, ।
बोलें सत्यवचन हें; [10]मी आहें आणि कां मना सिद्ध.' ॥ १०६
न असत्य वदें' म्हणउनि तिजपासीं **शं**भुची वदे शपथ, ।
अश्वावरि बैसुनि मग निघे त्वरित धरुनि तो स्वदेशपथ. ॥ १०७
मग ते **सी**मंतिनि 'हा मत्पति होईल' हें मनिं विचारी, ।
'मृदु वच, मृदुकर, गौरहि, मंद, हसें लक्षणें असति चारी. ॥ १०८
चतुर बहुत पति माझा [11]द्वात्रिंशल्लक्षणी असत साच, ।
न कळे ईश्वरकरणी, दिसे सकळलक्षणीं मज तसाच. ॥ १०९
नसता जरि पति माझा धरिता मजलागिं केंवि हो! हातें? ।

---

१. ति (ती सीमंतिनी) दुःखें अक्षा (डोळ्यांना) जला आणुनी पुसे. २. सांगावयास. ३. सूर्य-कन्या कालिंदी तींत. ४. शंकरास. ५. स्त्रीसह. ६. हंगामाच्या वेळचा, ग्रीष्मऋतूंतील. ७. युद्ध. ८. करी+इंदुवारव्रत. ९. पाण्यानें. १०. मी सिद्ध (पुरुष) आहें [हें] मना आणि कां. ११. दोन आणि तीस म्हणजे बत्तीस.

तन्नयनिं अश्रु आले, तन्मन पावोनि पूर्ण मोहातें. ॥ ११०
भासे साच पति मना, मग चिंतानळ शमे, घरा ये ती, ।
होई थंड जसी क्षिति करितां वर्षाव मेघरायें ती. ॥ १११
आला स्वपुरीजवळी चंद्रांगद मग दटावुनी तुरंगा[1], ।
शिष्टाईस पुरीतें शत्रुजवळि पाठवी पुढें उरगा[2]. ॥ ११२
जाउनि चंद्रांगदरिपुसन्मुख मग वचन तो महानाग ।
बोले गर्जुन, जैसा केसरि देखोनि तो महा नाग[3]. ॥ ११३
'एक' म्हणे 'रे मूर्खा! होसी तूं मत्त, तुज दिसे ना तें ।
जाळें[4] पुढील न कसें? ठेविसि बंदांत इंद्रसेनातें. ॥ ११४
जातां[5] तक्षक अहिचें चंद्रांगद सख्य तें करायासी, ।
तत्तातराज्य हरुनी त्या बंदीं रक्षिलेंस रायासी. ॥ ११५
आला चंद्रांगद तो नगरीबाहेर उपवनामाजी, ।
जरि आस्ता प्राणाची, तरि उक्ती आणिजे मनामाजी. ॥ ११६
बसवीं सत्वर आतां सिंहासनिं नृपति चंद्रसेना कीं, ।
मागोनि जीवदाना घासीं तत्पाद नमुनि ते नाकीं[6]. ॥ ११७
द्वादशसहस्रकरिंचें बळ दे चंद्रांगदा असा मित्र ।
तक्षक जोडे, त्वत्कुळ करील निर्मूळ, तम जसा मित्र. ॥ ११८
नाइकसि जरी डंखुनी[7] दाविन आतांचि गा! तुज नरा ख[8], ।
राख प्राणा, मरशिल, करितिल जाळोनि गोतुजन[9] राख'. ॥ ११९
चित्तिं विचारी मग तो, 'केली म्यां हीनबुद्धि हे कपटी, ।
न मरावें व्यर्थ' म्हणुनि बसवी मग इंद्रसेन राज्यपटीं. ॥ १२०
शरण रिघे त्याला मग 'रक्षि' म्हणे 'मज' धरोनियां चरण, ।
'अपराध थोर घडला केली म्यां हीनबुद्धिआचरण. ॥ १२१
काळिजिचा[10] पेटुनि हृदिं होय सुखाची पुरी रखा परसा, ।
आतां क्षमा करावी जालों मी तेजहीन खापरसा.' ॥ १२२
दे नृपें[11] अभय तया, मग चंद्रांगदवर्तमान तें सर्व ।
आद्यंत नाग सांगे, ऐकुनि ये नृपतिनेत्रिं तें[12] सर्व. ॥ १२३

---

१. घोड्याला. २. नागाला. ३. मोठा हत्ती. ४. संकट. ५. चंद्रांगद तें तक्षक अहिचें सख्य करायासी जातां (गेला असतां) इ०. ६. नाकानें. ७. दंश करून. ८. आकाश, स्वर्ग, मृत्यु. ९. पृथ्वीवरील लोक. १०. काळजीचा परसा (विस्तव पेटविण्याची जागा, अग्नि) हृदिं पेटुनि सुखाची पुरी रखा (राख) होय. ११. इंद्रसेन. १२. पाणी.

नाग म्हणे, 'सुत आला आतां काढा जि! नयनिं केंवि सेरा? । [1]
भेटिसि चलाचि आतां, पूर्वींचें दुःख भय निकें विसरा.' ॥ १२४
शृंगारुनि मग नगरी सस्त्रीपरिवारि नृपति भेटाया ।
गेला जेथें होता चंद्रांगद उपवनांत ते ठाया. ॥ १२५
तातंबा देखुनि सुत धरित तयांचीं पदांबुजें तीं तो, ।
आलिंगिति ह्वार्दे नयनीं काढोनि प्रेम अंबु जें तीं तो. ॥ १२६
पाताळींच्या वस्तू अर्पुनि पितयासि वर्तमानातें ।
सांगे, 'तक्षक मजवरि करि बहु उपकार, देत मानातें.' ॥ १२७
भेटुनि मग सकळांसी नगरीं ये करित वाद्यनादास, ।
मिळती पहावया बहु दूर करिति मार्गिं ते जना दास. [2] ॥ १२८
धामप्रवेश करुनी वांटी धन बहुत याचकांला तें, ।
नृपति म्हणे, 'व्याह्यासी कळवावें वृत्त याच काला तें.' ॥ १२९
धाडी सांगायार्यावर्तींच्या त्या नृपोत्तमा चार, [3] ।
ते सांगति चंद्रांगद आल्याचाद्यंत तो समाचार. ॥ १३०
ऐकुनि आनंद बहुत जाला सकळांचिया मना हो! तो, ।
सांपडतां धन जैसा तोष बहुत निर्धना जना होतो. ॥ १३१
हेरा गौरवि, नगरीं मग वांटी क्षिप्र भूप साकर ती, ।
ध्याया हर्षरसा त्या मोठे मोठे प्रभू पैसा [4] करती. ॥ १३२
परिवार सकळ घेउनि स्त्रीसुतसह इंद्रसेन मग बरवा, ।
भेटाया व्याह्यासी आला बहु करित थोर वाद्यरवा. [5] ॥ १३३
गेले हेर पुढें मग आला नृप चित्रवर्म सामोरा, ।
जाला आनंद बहुत नवजलदा देखुनी जसा मोरा. ॥ १३४
चंद्रांगद नमि पायां दे नृप मग, कवळुनी अंसु [6] क्षेमें; ।
भेटे नृप तो व्याह्यानंदाचें नेत्रिं येत सुक्षेम. [7] ॥ १३५
मिरवत आणुनि नगरीं जानवसा गेह देत मरुताचें, [8] ।
शृंगारुनी पुरी ध्वज उभवी तत्तेज जेंवि मरुताचें. [9][10] ॥ १३६
चंद्रांगद सीमंतिनि ऐक्य करुनि लग्न लावि उभयांतें, ।
भांडारें फोडुनि धन न्याया विप्रांसि देत अभयातें. ॥ १३७

---

१. पाण्याला. २. सेवक. ३. दूत. ४. ओंजळ. ५. वाद्यघोष. ६. शरीर. ७. आशीर्वाद. जल. ९. सुवर्णाचें. १०. अग्नीचें.

द्विजभोजनादि मोठ्या उत्साहें नृप करी वराडा हो ! ।
सकळ निवे दुःखाग्नी[1] **सी**मंतिनि देखतां बरा डाहो. ॥ १३८
पाताळींच्या वस्तू **चं**द्रांगद दे वधूसि एकांतीं, ।
लेतां तीं आभरणें तेजस्वी दिव्य दिसतसे कांती. ॥ १३९
मग **इं**द्रसेन आज्ञा जायासी मागतां स्वदेशाला, ।
नृप **चि**त्रवर्म गौरवि रत्नाभरणें बरें, सु[2] दे शाला. ॥ १४०
बोले, '[3]बीजेपासुनि वाढति जैशा निशाकरास[4] कळा, ।
तैसा लोभ करा जी !' विनवी नृप जोडुनी करा सकळां. ॥ १४१
सस्त्री **चं**द्रांगद मग सासुश्वशुरांस करितसे नमना, ।
पुत्रसुनेसी पाहुनि अतिबहु आनंद **इं**द्रसेनमना. ॥ १४२
मिरवत निघे स्वपुरिसी पुत्रसुनेसहित सकळ दळभारें, ।
गज अश्व चालतां रथ, दांपतसे[5] **शे**षशिरकमळ भारें. ॥ १४३
ये स्वपुरीं, स्थापी मग राज्यासनिं नृप उदार तनुजातें, ।
विषय त्यागुनि व्हावें वाटे मनिं **शि**वपदा रत सु[6] ज्यातें. ॥ १४४
जाउनि तपोवना मग बहुतप करुनी प्रसन्न **भ**व[7] करि तो, ।
नेई शिव **कै**लासा त्याला, हांकोनि दूर भवकरि[8] तो. ॥ १४५
**चं**द्रांगद **सी**मंतिनि राज्य करिति दशसहस्र वर्षें तीं, ।
इच्छित पुरवी **शि**व तो, नांदति सुतपौत्रि बहुत हर्षें तीं. ॥ १४६
ऐसें **श**शिवारव्रत दातें सौभाग्य अखिल संपतितें, ।
करिं तूं **सा**वित्रि ! सदा वर्धेलायुष्य[9] गे ! तुझ्या पतितें.' ॥ १४७
**सा**वित्री **गु**रुसि म्हणे, 'त्वद्वचनें व्रत गुरो ! करिन हें मी, ।
ठेविन चित्त तव पदीं, लोभि सदा जेंवि ठेवि मन [10]हेमीं. ॥ १४८
त्वत्पद तारक भक्ता उपमा द्याया नसेच सरें[11] ज्यातें, ।
राहोत सदा माझ्या हे श्री**गु**रुराय ! हृदयसरजातें[12]. ॥ १४९
अभिषिंचिन पदपद्में प्रेमाचे शुद्ध जीवनें[13] मी तीं, ।
पूजिन भक्तिसुगंधें मनसुमनें हृदयधामिं नेमीं[14] तीं.' ॥ १५०
ब्राह्मणभोजन घाली करुनि **गु**रुस्तवन, करुनि पूजा ती, ।

---

१. दुःखाग्नी[चा] डाहो (दाह). २. सु (चांगली) शाला (वाडा किंवा शाल) दे. ३. द्वितीयेपासून. ४. चंद्राला. ५. लवत असे. ६. शीघ्र. ७. शंकर. ८. संसाररूपी गज. ९. वर्धेल (वाढेल)+आयुष्य. १०. सोन्यावर. ११. बरोबरीचा पदार्थ. १२. सरज=कमल. १३. जलानें. १४. नेमानें.

घेउनि गुरुची आज्ञा स्वग्रामा सपति जाहली जाती. ॥ १९१
भेटे पतिसह जाउनि सासुश्वशुरांस मातृपितयांला, ।
न समाये गगनीं तो जाला आनंद जो मनिं तयांला. ॥ १९२
प्रतिवर्षी मग हर्षी येउनि गुरुदर्शनास यात्रा तीं ।
करिती, ऐशीं शिष्या जालीं गुरुचीं पदें तयां त्रातीं.' ॥ १९३
रामात्मजपुत्र म्हणे मनिं जरि अज्ञान हेंचि अभ[1] जावें, ।
प्रगटावा ज्ञानरवी तरि सद्गुरुचे पदा सैदि[2] भजावें. ॥ १९४

---

## अध्याय चोविसावा.[3]

नामांकित सिद्धाचे ठेवुनि भावें वदे स्वशिर पांवां[4], ।
चरितकथा शिरिपावा[5] द्या मज, गुरु करुं नका उशिर, पांवा[6]. ॥ १
सिद्धमुनी! गुरुराया उदार तूं बहुत सर्वदाता[7] जी, ।
पाजिसि मज चरितसुधा नित्य मधुर बहुत सैर्वदा ताजी. ॥ २
सिद्धमुनी शिष्याची ऐसी ऐकोन मधुर[8] गंभीरा, ।
आनंदुनि ऐक म्हणे, 'हे शिष्या! सुगुण, चतुर, गंभीरा! ॥ ३
श्रीगुरुपदिं भजतां तो स्वपदीं दे ठाव वासुदेव सुधा[9]; ।
देवसुधा न गणी तो, त्याचेनी धन्य मी वदे वसुंधा[10]. ॥ ४
पूर्ण ब्रह्म श्रीगुरु साक्षातचि वासुदेव अवतारी, ।
तत्पद भजे तया तो करुनि तयाचें सदैव अव तारी. ॥ ५
त्या श्रीगुरुचें तुजला चरितामृत कितिक मधुर सांगावें! ।
न दुजें साम्य तयातें, श्रवण मनन करुनि मानसा गावें. ॥ ६
श्रीगुरुचरितसुधेसम मधुर नसे इक्षुरसहि मधुरस रे! ।
काय वदावें! जेथें नयेचि निर्जरसुधाहि मधुर[11] सरे. ॥ ७
आतां हो रे! सादर भवगजदरदुःख[12] चरित जें हरितें, ।
करिं तें श्रवणाच पळे, पळती करि देखतां जसें[13] हरितें. ॥ ८
द्विज एक शुद्ध होता स्वकर्मरत गाणगापुरामाजी, ।
तो सात्विक परि होती क्रोधवती बहु तयास रामा[14] जी. ॥ ९

---

१. अभ्र, काळोख. २. सदैव. ३. या अध्यायांत मुळांतील अ० ३६ व ३७ यांतील कथाभाग आहे. ४. पावावर. पाव=पाय. ५. शिरपेंच. ६. प्रसन्न व्हा. ७. सर्व देणाऱ्या. ८. वाणी. ९. चांगला. १०. पृथ्वीवर. ११. तुलनेला. १२. संसाररूप हत्तीपासून होणाऱ्या भीतीचें दुःख. १३. सिंहाला. १४. स्त्री.

दुष्टप्रतिग्रह[1] न घे, न घे परान्नास शुक्लवृत्ती[2] तो, ।
करुनी अतिथीपूजन जठराची[3] करितसे निवृत्ती तो. ॥ १०
तेथें धनवंतैक द्विज दंपत्यां सहस्रभोजन तें ।
मिष्टान्न घालुनी, दे वस्त्रें बहु, दक्षिणेस भोर्जन[4] तें. ॥ ११
त्या ग्रामीं द्विजनारी प्रत्यहिं पतिसहित भोजना जाती, ।
पाहुनि दुःख बहु करी क्रोधवती[5]सत्व विप्रभाजा[6] ती. ॥ १२
'काय' म्हणे 'म्यां केलें प्राग्जन्मीं पाप, हीन दैवाचा ।
पति मज कसा मिळाला? परान्न ने घे' असें वदे वाचा. ॥ १३
'काय सुकृत या केलें नारींनीं नित्य मिष्ट भोजन कीं ।
करिती परगेहिं, कसा मज पति हतदैव पाहिला जनकीं[7]. ॥ १४
तों येउनि तो सांगे आमंत्रण द्रव्यवंतहि दमातें[8], ।
पतिस म्हणे, 'चल जाऊं; नातरि तूं जा असेंचि वद मातें. ॥ १५
धन वस्त्रें मिळति' म्हणे 'अनमान कदा करूं नको' पतिला. ।
कांत म्हणे, 'घें नच मी परान्न, तूं जा' करून कोप तिला. ॥ १६
धनवंतासि म्हणे मग, 'येइन मी भोजनासि एकटि कीं.' ।
'पतिविण नको' म्हणे तो, तें वच लागे तिला जसी कुंटकी[9]. ॥ १७
पुनरपि धनवंत म्हणे, 'ये घेउनि भोजना स्ववल्लभ गे! ।
दंपत्यें सांगें मी, येउं नको पतिविणें बरें सुभगे!' ॥ १८
ऐसें सांगुनि गेला तो, मग चित्तीं विवंचना करि ती, ।
'काय' म्हणे 'करुं? पति हा ऐकेना हीनदैव लोकरिती[10].' ॥ १९
श्री**गुरु**पासीं मग ती येउनियां धरुनियां तया चरणा, ।
तिष्ठुनि सन्मुख सांगे पतिच्या आद्यंत सर्व आचरणा. ॥ २०
'श्री**गुरु**राज दयानिधि! वचन तुझें मान्य सर्व विश्वांस, ।
होइल मत्कार्य म्हणुनि आल्यें स्वामी! धरोनि विश्वास. ॥ २१
ये आमंत्रण बरवें, न जाइ मत्कांत भोजना, त्याला ।
दवडा जी! मज कन्या म्हणुनि धरुनि याच आज नात्याला. ॥ २२
श्री**गुरु**! चित्तीं मजला जेवावें मिष्ट वाटतें अन्न, ।
ऐकेना पति माझें वचन' म्हणुनि आणि चक्षुतें अं[11]न्न. ॥ २३

१. दुष्ट माणसानें दिलेलें दान. २. ब्राह्मणाकडेच भिक्षा मागून तीवर उदरनिर्वाह करणारा. ३. पोटाची. ४. द्रव्य. ५. रागावणाऱ्या स्वभावाची. ६. विप्रस्त्री. ७. आईबापांनीं. ८. दंम=नर. ९. एक कडू पदार्थ. १०. जगाला. ११. पाणी.

'न सुवासिनि सांगे द्विज, दंपत्यें सांगतो हटि असा कीं, ।
मत्पति न जाइ, तुमचीं सर्वेंहि जन मानितात हो साकीं[1]. ॥ २४
त्याला जाया द्विजगृहिं मत्संगें भोजनासि सांगावें, ।
धीटपणें बोलें मी म्हणउनि मजवरि गुरो! न रागावें.' ॥ २५
हास्य करुनि गुरु म्हणती मग बोलावुनि तिच्या वराला हो! ।
'जा जेवाया स्त्रीच्या करितां, संतोष अंतरा लाहो. ॥ २६
मिष्टान्नेच्छि, नसावें स्त्रीचें दुश्चित सदैव अंतर तें, ।
कां तर तें ऐक बरें, त्या विघ्नें नित्यकर्म अंतरतें.' ॥ २७
'केलें वर्ज परान्ना' विप्र म्हणे गुरुचिया पदा नमुनी ।
'नेम असे, परि जातों त्वद्वचना मोडिं मी कदा न मुनी! ॥ २८
केवळ अधम म्हणावें गुरुचें जे वचन मोडिते नर कीं ।
पूर्वजसहित सदा ते पचति सकळ रौरवादि ते नरकीं.' ॥ २९
बोलुनि ऐसें जाई स्त्रीतें द्विज धरुनि भोजनाशु[2] करें, ।
भोजन करितां स्त्रीतें दिसती पात्रांत खाति शुनशुकरें[3]. ॥ ३०
तत्काळ अन्न टाकुनि उठली, ये तिस परान्नकंटाळा, ।
जेविति जे त्यांस वदे, 'शुनशुकरुष्टें परान्नकं[4] टाळा.' ॥ ३१
पतिसि म्हणे, 'द्विज जेविति उच्छिष्टीं, मन कसें रमे यांचें?' ।
स्त्रीस म्हणे तो, 'जेवीं तुझें न उच्छिष्ट सारमेयाचें[5].' ॥ ३२
बोलत ऐसीं दोघें येउनि गुरुचीं नमोनि पदजलजें ।
धूती भाव धरुनियां, वर्षुनियां प्रेमअश्रुचें जल जें. ॥ ३३
श्रीगुरु म्हणती तिजला, 'निंदिसि तूं सर्वदा वराला जे, ।
इच्छा तव पुरली कीं?' अशा ति ऐकोनि उत्तरा लाजे. ॥ ३४
नमुनि गुरुसि मग बोले नम्र करुनि होउनी लीन[6] शुची[7], ।
'अघ पतिस घडविलें जी! क्षमा करा मी कुशील हीनशाची[8].' ॥ ३५
विप्र म्हणे, 'गुरुराया! काय करूं? घडविलें अघा सतिनें, ।
मन्नेम मात्र बुडवी, न घेतले पूर्ण दोन घास तिनें.' ॥ ३६
गुरु म्हणती, 'गुरुवच जो पाळि तया स्पर्शि पाप मा[9] जर, जें ।
न जळे काय प्रळयानाळें उडि घेतें अपाप मांजर जें? ॥ ३७

१. वचनें. २. आशु=लवकर. ३. कुत्रीं व डुकरें. ४. कं=सुख. ५. कुत्र्याचें. ६. लीन. ७. वाणी, भाषण. ८. हीनबुद्धीची. ९. मग.

गुरुवचन पाळिती जे धन्य सुकृतवंत हो! अवनिं तेची, ।
दोष तुला कांहिं नसे, जाली इच्छाहि पूर्ण वनितेची. ॥ ३८
हट्ट न करि तव जाया आतां, त्वद्वचनिं साच वर्तेल, ।
पाप तव समूळिं जळे, जैसें पडतांचि अग्निवरि तेल. ॥ ३९
दासी, गो, वृष, महिषी, हय, कुंजर दान घे तयापरिस ।
दोष परान्नीं बहु तो, तसाच परदाररत तया, पैरिस[1]. ॥ ४०
परि जेथें कर्म अडे तेथें धरि भोजना नियम जाची[2], ।
त्याला बहु दोष घडे अंतीं मारुन घैनांनिं[3] यम जाची.' ॥ ४१

गुरुसि म्हणे द्विज, 'भोजन केल्या कँवणा[4] घरीं न दोषा जी! ।
सांगें ज्ञानार्का! करिं दूर मदज्ञान हेंचि दोषा[5] जी.' ॥ ४२
गुरु म्हणती, 'तातंबास्वसहोदरसद्गुरुश्वशुरसदनीं ।
जेवावें; दोष नसे, जेंवि क्षितिवरिल वाहते सँदनीं[6]. ॥ ४३
तैसेंच मित्रधामीं, कर्म अडे तद्वराहि जेवावें, ।
दँशगोजपिं[7] अघ राहि न, तें जेंवि अभ न राहि जें वावें[8].' ॥ ४४

पुनरपि गुरुसि म्हणे द्विज, 'कवण कवण घरिं न घेइंजे नेमा[9], ।
सांगा गुरु! मजलागीं.' गुरु म्हणती त्यास 'ऐकिजे नेमा[10]. ॥ ४५
वर्ज्यघरें बहु असती, वदतां सरती न एक कंविकल्प[11], ।
स्वल्पचि सारांश वदें, बहु वदतां ये मना विट, विकल्प. ॥ ४६
मातृपिता सद्गुरुसी द्वेषी जो, साधुसंतसद्विप्रा, ।
नमन न करि, तद्गेहीं जेवुं नये वाढितो जरि क्षिप्रा. ॥ ४७
निर्दोषस्त्री त्यागी, घेतो नीच प्रतिग्रहाला जो, ।
तो द्विज बहिष्कृत असे, त्वन्मन जाण्यास तद्गृहा लाजो. ॥ ४८
घेवोनि वेगळा स्त्री त्यागुनि जो गेह मातृपितयाचें ।
राहे, जो मत्त द्विज, न जेवि ऊर्ज्जुदकही[12] नं[13] पि[13] तयाचें. ॥ ४९
होउनि परिचारक जो प्रत्यहिं करि सूँपशास्त्रकर्मातें[14], ।
धर्मातें जो न करी, लोभी त्याचे न जाइं शॅर्मातें[15]. ॥ ५०

---

१. ऐक. २. जा=जो. हा प्रयोग कोंकणी आहे. ३. घणांनीं. ४. कोणाच्या. ५. रात्र. ६. पाण्यांत. ७. दहा गायत्रीजप केल्यावर. ८. वाऱ्यानें. ९. अन्नास. १०. ब्रह्मदेवाचा दिवस. हा आपल्या त्रेचाळिसकोटि वीसलक्ष वर्षांचा असतो. ११. खीर. १२. ऊर्जा (अन्न)+उदक. १३. पिऊं नको. १४. सैंपाक. १५. घराला.

जेवाया कन्येच्या सदनीं सुत होय तों न जावेंची, ।
जाउं नये त्या सदनीं असुनि बहुद्रव्य तो न जौं[1] वेंची. ॥ ५१

वर्णुनि परान्न घरिंचें निंदि सदा अन्न जो, तया भुवना[2] ।
जेवुं नये, दोष असे जैसा हो! चर्मपात्रिंच्या भुवना; ॥ ५२

त्याचे घरिं जेवुं नये असेल जो विप्र कामिनीजित[3] कीं, ।
सांगितलीं वर्ज्यघरें वर्जावीं धरुनि हीं मनीं जितकीं. ॥ ५३

ऐकें सारांशाऽतां त्यागुनि जे कां स्वकर्म दुसऱ्याचीं ।
कर्मे करिती त्यांचीं वर्ज्य घरें, भाजनें जसिं सैऱ्याचीं[4]. ॥ ५४

त्यजितां द्विज स्वकर्मा पीडी दारिद्र ऐक कानिं बरें, ।
मूळूर्ध्वं[5] तुळसितरु जरि लावियल्या कर्पटे[6] न कां निंबेरें[7]? ॥ ५५

विप्र स्वकर्मरत जे न तयां दारिद्र पाहि ढुंकोनी, ।
ये जरि अकर्मकारकसंगें[8] तद्धामि[9] पाहि दडुं 'कोनीं[10].' ॥ ५६

विप्र म्हणे, 'गुरुराया दयानिधे! ऐक विनति साचार, ।
आचारशुद्ध विप्रा कैसा सांगा जि! वदति सौ[11] चार.' ॥ ५७

विप्रविनंती ऐकुनि पावे संतोष **गुरु** दयानिधि तो, ।
आचार सकळ सांगे बैसवुनी भूसुर स्वसन्निधि तो. ॥ ५८

[12]आचारार्कग्रंथीं जैसा आचार बोलिला हो! तो, ।
तैसा द्विज आचरतां तेणें आनंद हेलिलौ[13] होतो. ॥ ५९

करितां आचार तसा मुक्ती मग त्यास मोकळी लाभे, ।
स्पर्शाया मग त्यासी वाटे चित्तांत ते **क**ळीला भें[14]. ॥ ६०

प्रातःकाळापासुनि कर्म सकळ होय दीड याम हिमां[15] ।
तों करणें तें सांगति वर्णुनि तत्सर्व ज्या तया महिमा. ॥ ६१

विप्राचार सकळही सांगुनि **गुरु** देति मग तयास वरा, ।
म्हणती, 'संततिसंपतिवृद्धि तुझी होय ऐक विप्रवरा! ॥ ६२

आतां न जाइं भिक्षे, करोनि आचार हा स्वक्ुद (?) रातें[16], ।
राहिं सुखें, मुक्त्यंतीं[17] होईल तुज न घरीं भवदरातें.' ॥ ६३

---

१. जो. २. पाण्याला. ३. स्त्रीलंपट. ४. सरा=माडी वगैरे दारू. ५. मूळ वर करून. ६. वाळून जातो. ७. उन्हानें. ८. कुकर्म्यांच्या संगानें. ९. त्याच्या (कर्मनिष्ठाच्या) घरीं. १०. कोंपऱ्यांत. ११. सहा शास्त्रें आणि चार वेद. १२. येथें हवाला देऊन मूळांतील बराच भाग गाळला आहे. १३. सूर्याला. १४. भीति. १५. रात्र? १६. रहा. १७. अंतीं मुक्ति होईल.

पावुनि आनंद मनीं श्रीगुरुचीं द्विज धरोनि पद[1]नभजें ।
बोले, 'ज्ञानार्कें त्वां प्रकाशिलें मत्समस्त हृद[2]नभ जें.' ॥ ६४
श्रीगुरुचे पद नमुनी गेला द्विज आचरुनि मग तसाच, ।
होतां सकळैश्वर्य प्राप्त तया, होय दैन्य गत साच. ॥ ६५
सिद्ध म्हणे, 'गा! ऐसी केली गुरुंनीं अनेक लीला जे ।
श्रवण करी त्या मनुजा स्पर्शाया भय मनें कली लाजे. ॥ ६६
बोलविती गुरु जैसे बोलतसे परशुरामवाचा कीं, ।
निर्मे मृद्घट[3] माती कुलाल घालील जेधवां चाकीं. ॥ ६७

---

## अध्याय [4]पंचविसावा.

ठेवुनि मस्तक पायीं नामांकित शिष्य विनवि सिद्धासी, ।
'क्षुधित असें मी केवळ दाता तूं देइं गुरुचरिद्घासी[5].' ॥ १
सिद्ध म्हणे, 'जरि असली क्षुधित श्रीगुरुचरित्र हें घॆश[6] गा! ।
घे; यश गाति जयाचें सुभक्त जन जे तसेंच तूं यश गॅा[7]. ॥ २
भवरोगनाशनासी भेषज रे! पूर्ण होय हें ईक्षु, ।
उपमे न पवेचि कदा; रुचिर मधुरतेसि तोकिं हें ईक्षु[8]. ॥ ३
गुरुचरित अन्न माझें चित्तीं जें गोड काय सांगुं रुचे? ।
ऐकें गाणगपुरितें येती बहु भक्त दर्शना गुरुचे. ॥ ४
ते श्रीगुरुचें पूजन करुनी एकेक भक्त भक्तीनें, ।
ब्राह्मणभोजन करिती प्रतिदिवसीं ते यॆथा[11] न शक्तीनें. ॥ ५
तों ये द्विजैक दुर्बळ भिक्षा अर्पीन गुरुसि आपण ती, ।
म्हणउनि इच्छा धरि परि सामोग्री आणि आइका पण ती. ॥ ६
तंदूलगोधुमादिक मिळुनि असति तीन शेर तत्पदरीं, ।
बंधन केल्या गांठी दृढ रक्षी धरुनि सर्वदा उदरीं. ॥ ७
भास्कर नाम तयाचें शुद्ध तया कश्यपचि असे गोत्र, ।
नमन करुनि अवलोकी गुरुमुख चातक नभीं जसे गोत्र[12]. ॥ ८
भक्ताराधन करिती उठविति विप्रास भोजनाला ते, ।

---

१. पदकमलें. २. हृदयरूप आकाश. ३. मातीची घागर. ४. या अध्यायांत मुळांतील ३८ व्या अध्यायांतील कथाभाग आला आहे. ५. घासि=अन्न. ६. अन्न. ७. वर्णन कर. ८. अन्न. ९. मुलाला. १०. ऊंस. ११. यथा शक्तीनें न=शक्तीबाहेर ! १२. मेघ.

भोजन करोनि सांगे मनइच्छा सर्व भो! जनाला ते. ॥ ९
नित्य घडे त्यास असें, भक्त समाराधनेस तेवी तो, ।
गांठोड्या रक्षि हृदीं लोभी जन [1]वैरव [2]हेमें जेंवी तो. ॥ १०
[3]भिक्षा करावयासी न सांपडे संधि **गुरु**सि अर्पण ती, ।
स्वात्मप्रकाश पाडिल कैसा जी [4]धातुसमयिवर [5]पणती. ॥ ११
दीपप्रकाश तरि सम उभयांचा समचि आवडे देवा, ।
परि कोणीहि न म्हणती, 'धातुसमयि सांडुनी पणति देवा.' ॥ १२
भिक्षार्पण तैसी त्या समर्थ भक्तांपुढें करायाची ।
संधी न सांपडे. कसि होइल दीनासि भेट रायाची ? ॥ १३
निंदा करिती द्विजगण म्हणति, '[6]समाराधना द्विज पहा जी! ।
करिन म्हणोनि करितसे जों दिन ये याम हा द्वि जप हा जी. ॥ १४
येतां प्रहरद्वय दिन अन्य समाराधनेस जेवितसे, ।
लाजे न, बोल बोले.' वटवट ते करिति भाट जेंवि तसे. ॥ १५
'साहित्यहि तीन अडिच शेर पुरे तेंहि नाहिं बहु धान्य, ।
**गुरु**शिष्य फार असती मिळति अगांतुकहि विप्र [7]बहुधान्य. ॥ १६
नाना विनोदि [8]हेळिति मिळुनि द्विज ते द्विजोत्तमास असे, ।
पाही संधी तो द्विज सोसुनि निंदेसि तीन मास असे. ॥ १७
तीव्र असे रविवन्हीहुनि निंदा, विप्रदेह जी [9]सुकवी, ।
ती वर्णन बहु कैसी चित्तापासुनि करील जी! [10]सुकवी. ॥ १८
एक दिनिं द्विज बोलति विप्राची जों करोनि मस्करि त्या, ।
तों ऐकुनि **गुरु** तेथें आला, जो विप्र तो नमस्करि त्या. ॥ १९
**गुरु** म्हणती, 'विप्रा! तूं भिक्षा अम्हासि अर्पि ते आजी.' ।
ऐकुनि **गुरु**वच [11]भीये पसरुनि निंदाकुसर्पि ते आ जी. ॥ २०
ऐकुनि [12]**गु**र्वाश्रयवच, द्विज तो डोले करोनि आनंद, ।

---

१. ज्यास्त, शिल्लक. २. सोनें. ३. ती (पदरांत बांधलेली) भिक्षा गुरुसि अर्पण करायासी संधि न सांपडे. ४. धातूच्या समईवर. ५. मातीचा दिवा. ६. जों दिन (दिवस) द्वि याम (दोन प्रहर) ये [तों] हा द्विज समाराधना करिन म्हणोनि जप करितसे (वारंवार म्हणत असतो). ७. बहुधा+अन्य. ८. उपहास करिती. ९. वाळवी. १०. चांगला कवी. ११. ते गुरुवच ऐकुनि जी ती (घाबरून) आ पसरुनि भीये (भीती) झाली—असा अन्वय. त्या गरीब ब्राह्मणाची निंदा करणारे लोक घाबरले—असा भाव. १२. गुरु+आश्रय+वच=गुरूचे आश्वासनपर शब्द.

जैसा शालिग्रामा दाखवितां हरि करोनि आ नंद.[1] ॥ २१
कीं सून भीमकीच्या[2] लाभें आनंद यदुपआइ[3] तिला, ।
तैसा द्विजासि; मग गहु दळवी करि आणि तदुप आइतिला.[4] ॥ २२
साहित्य सर्व मिळवी, आणी द्वय शेर गुड नवनिता जी, ।
भाजी शाक सुकोमल आणि, सुकलि शिंपिली न वनिं,[5] ताजी. ॥ २३
साहित्य ठेवुनि मठीं स्नान करायास विप्र गेला जों, ।
द्विजगण म्हणती गुरुसी, 'बोलाया हृदय धगधगे,[6] लाजों.[7]' ॥ २४
श्रीगुरु म्हणती, 'बोला, शंका मनिं लाजही धरुं नका च.' ।
द्विजगण म्हणती, 'रत्नें त्यागुनि फळ काय करिं धरुन काच. ॥ २५
भक्त समाराधनिं हो! जेवितसों नित्य मिष्ट नेमांस,[8] ।
बुडवाया त्या ये हा द्विज दारिद्री निकृष्ट नेमास. ॥ २६
आम्हीं आज स्वगृहीं भक्षावी यावनाकभाकर[9] कीं, ।
निद्रा करणें प्राप्तचि ये, जाताऽस्ताचि तो प्रभाकर कीं. ॥ २७
चित्त भ्रमण करि मृदा[10] जे जसि कुंभार घालि पैं चाकीं, ।
मिष्टान्न आमुचें हा द्विज ये वर्जावयास कैंचा कीं.' ॥ २८
गुरु म्हणति, 'आज जेवा येथेंचि सकळ घरा न जा, जावा,[11] ।
स्नान करुनि चित्तजवा[12] ऐसे या, अंतरा[13] न जाजावा.[14] ॥ २९
कांहिं हि धरा न संशय, जेवा प्रतिवासरासम,[15] न न्यून. ।
कोप न धरा द्विजावरि, धरि जसि गो वासरास मन्यू[16] न.' ॥ ३०
ऐकुनि गुरुवच गेले ते स्नाना विप्र संगमा सर्व, ।
भक्तां न उपेक्षि कदा तो पडतां दुःप्रसंग मां[17] सर्व.[18] ॥ ३१
द्विज म्हणती, 'आमंत्रण दे गुरु, परि वाटणी समान सितें, ।
येती न दोन दोनहि' ऐसें चिंतोनि वदति मानसि तें. ॥ ३२
एक म्हणति 'सामोग्री आहे बहु ती मठांत, करवितिल ।
पाक अतां, हो! चिंता मात्रहि[19] किमपि न मनीं करावि तिळें.[19]' ॥ ३३

---

१. हरि (कृष्ण) आ करोनि शालिग्रामा दाखवितां जैसा नंद डोले इ०. २. रुक्मिणीच्या. ३. कृष्णाची आई. ४. आणि तदुप (तत्+उप=त्यानंतर) आइतिला (इतर सामानाला) करि. आयतें सुयतें=भांडीकुंडीं, इतर सामान. ५. पाण्यानें. ६. मागें पुढें होतें. ७. (आम्हीं) लाजतों. ८. अन्नास. ९. यावनाक=धान्यविशेष. १०. माती. ११. जा. १२. मनोवेगानें, अतिशय लवकर. १३. मनाला. १४. त्रास देऊं नका. १५. रोजच्या प्रमाणें. १६. राग. १७. मग. १८. संकर. १९. तिळमात्र.

स्नान करुनि तो द्विज मठिं ये, त्या **गुरु** म्हणति, 'ऐक मद्धमनी[1], ।
सांगितले विप्र बहुत पाक करीं त्वरित तूं विशुद्धमनीं.' ॥ ३४
ऐकुनि **गुरु**वचन असें विस्मय मानी परी मनीं न भि तो, ।
'अवतारी पुरुष' म्हणे 'हा तेजें जेव्यरुणधनी[2] नभि तो.' ॥ ३५
चित्तिं म्हणे, 'अवतरसी तूं हरि[3]! विप्रासि आणिला जीव[4], ।
पुरवि मदिच्छा; संशय तूं हरिं, विप्रासि आणि लाजीव. ॥ ३६
द्विजदैन्य हरिसि, देसी **सु**रगुरुसम विप्रसूनुस मतीस, ।
वंध्या कासरि[5] करिसी दुभवुनियां कामधेनुसम तीस. ॥ ३७
आइकिलें मी गातां तुझें असे सुकवि शील हें यश जें, ।
त्र्यशेराचें कां मग न समस्तां पुरविशील हें यशजें.' ॥ ३८
चिंतन करोनि ऐसें द्विज तो करि पाक पाक[8] करुनि मन, ।
सांगे **गुरु**सी 'जाला पाक' म्हणुनि करुनि विप्रवर नमन. ॥ ३९
जोडोनि कर **गुरु**पुढें **ग**रुड श्री**ह**रिपुढें कसा राही, ।
'आणुनि आम्हांजवळी ठेवी' **गुरु** म्हणति 'पाक सारा ही.' ॥ ४०
तत्काळ **गुरु**पुढें तो ठेवुनियां जोडि विप्रवर पाणी[9], ।
देऊनि स्वपट **गुरू** प्रोक्षित तो झाकवूनि वर पाणी. ॥ ४१
गुरुसि म्हणे द्विज, 'आज्ञा स्वामी ! आतां जि ! कोण बोलावी ?' ।
**गुरु** म्हणति, 'संगमीं जा, असती जे विप्र कोण बोलावी.' ॥ ४२
**गु**र्वाज्ञेनें संगमिं येउनियां तो नमूनि विप्रगणा, ।
'बोलविलें **गुरु**नीं' म्हणे बोले तो करुनि नम्र विप्र गणा[10]. ॥ ४३
विप्र म्हणति विप्रासी, 'सकळांचा पाक व्हावयास रजा[11] ।
होइल, जा, करि भिक्षार्पण **गुरु**सी पूजुनी चरणसरजा[12]. ॥ ४४
**गुरु**सी तरि पोटभरी वाढी, दिन राहिला असे प्रहर.' ।
नानापरि निंदाशर सोडुनि करुं लागले असे प्रहर[13]. ॥ ४५
द्विज येउनि **गुरु**सि म्हणे, 'द्विज येति न, काय मी वदों. निशितें[14] ।
'जेवुं' म्हणति, 'वाटणिसी येती पाकाचि[15] न तव दोन शितें.' ॥ ४६
**गुरु** म्हणति, 'ऐक विप्रा! ब्राह्मणपंक्तीस भोजनाचा हो ! ।

---

१. मत्+धमनी=माझी वाणी. २. जेवि+अरुणधनी (सूर्य). ३. देवा. ४. विप्रासि जीव आणिला=मला धीर दिलास. ५. नाहींसा कर. ६. म्हैस. ७. अन्न. ८. स्वच्छ, संशयरहित. ९. हात. १०. वाणी. ११. रात्र. १२. चरणकमल. १३. प्रहार. १४. रात्रीं. १५. सैंपाकाचीं.

नेम असे, नच जेवूं करितां त्या लोप भो जनाचा हो.' ॥ ४७
वाटे द्विजांतरीं निंदा हरि घाली नखां बहिर्मुसलें, ।
घाय बसति गुरुवचनें; द्विज करि मुख, [1]धरुन खांब, हिर्मुसलें. ॥ ४८
श्रीगुरुपद मग धरुनी विप्र वदे करुनियां म[2]नोदास, ।
'दास तुझा मी, करिती मद्वचनें विप्र ते विनोदास.' ॥ ४९
मग गुरु शिष्या धाडिति, तो धांवे शीघ्र [3]खग कसा चपळ, ।
आणी द्विज बोलावुनि, लागूं दे पथिं न एक साच पळ. ॥ ५०
श्रीगुरु म्हणती विप्रा, 'पत्रावळि तुम्हि चतुःसहस्र करा. ।
लावा न वेळ, अस्तचि होतां होइल निशी सहस्रकरा.' ॥ ५१
त्या विप्रा गुरु म्हणती, 'असि विनती तूं द्विजांस कर जा ती, ।
करित समाराधन मी, जेवा सकुटुंब गो[4]अमरजाती'. ॥ ५२
गुरुवचनें विप्रांसी नमुनि उभा कर जुळोनि राहे तो, ।
सांगितलें गुरुंनीं तसें विनवि म्हणे, '[5]पूर्ण मत्करा हेतो.' ॥ ५३
द्विज म्हणति, 'म्हणसि जेवा; परि वाटणि ये न एकही शीत, ।
तृप्त तृषित होय कसा मिळे जरी एक बिं[6]दूही [7]शीत.' ॥ ५४
नानापरि निंदेतें प्रवर्तले द्विज करावयाला ते, ।
'[8]'हो, हो, हो' म्हणुनि वचन सज्जन नर बोलती तयांला ते. ॥ ५५
'निंदा न करा सहसा' सज्जन म्हणती विनोद करित्यातें, ।
'बोले तैसें तो द्विज आज्ञा गुरुराज जेंवि करि त्यातें. ॥ ५६
का न उगि रहा, निंदा करितां भाटासमान वटवट जे, ।
काय न करि गुरु? [9]सर्षपवद्बीं होती महान [10]वटं वट जे.' ॥ ५७
'हो कां बरवें' म्हणती, लाविति पत्रावळी सकळ विप्र, ।
सर्वोपचारिं गुरुची करि पूजा क्षिप्र विप्र तो विप्र[11]. ॥ ५८
उजळोनि मंगळारति वोवाळी प्रेमभरित सुमनें तो, ।
नमनें तो साष्टांगीं करुनि बहुत अर्पि [12]मंत्रसुमनें तो. ॥ ५९
आनंद पावुनि गुरू म्हणति, 'तवेच्छीत होवु, [13]ठायास ।
मांडी' इतरहि विप्रां म्हणती, 'व्हा साह्य हो! उठा यास.' ॥ ६०

---

१. खांबाशीं स्तब्ध उभा राहून. २. मन+उदास. ३. पक्षी. ४. गो+अमर+जाती=भू+देववर्ग=ब्राह्मणमंडळी. ५. मत् हेतो (माझा हेतु) पूर्ण करा. ६. बिंदु+अहि (पाणी). ७. थंड. ८. थांबा, असें करूं नका. ९. सर्षपवत्=(मोहरीप्रमाणें)+बीं (बियामध्यें). १०. वडाचें झाड. ११. बुद्धिमान्. १२. मंत्रपुष्पें. १३. पानें.

म्हणती, 'अन्न न उघडा, वाढा काढोनि इतर भाजनिं[1] त्या.' ।
तैसेंच करिति, वाढिति; विलोकिली बहु यशप्रभा जेंनिं[2] त्या. ॥ ६१
जैसें मेघ उदधिचें वोढुनियां नेति बहुत परि पूर्ण ।
न सरे, तैसें यश[3] तें, वाढिति जरि तरि असेचि परिपूर्ण. ॥ ६२
ओतूनि नेति सध्या घृत भरुनी इतर वाढपास घट[4], ।
आग्रह करोनि वाढिति थिजलेंही आवडे जयास घट[5]. ॥ ६३
वाढुनि येउनि पाहति तों पूर्णासे[6] जसें तसें यश तें, ।
वाढे सत्पात्रिं कसें देतां दानासि बहु जसें यश तें. ॥ ६४
आश्चर्य मानिती द्विज, जाला आनंद थोर सकळां तो, ।
भास्कर हर्षे पाहुनि; चकोर जैसा शशांक सकळा[7] तो. ॥ ६५
जोडोनि प्रार्थि म्हणे, 'द्विज हो! ध्या तूपपायसा[8]' कर[9] तो, ।
'जेवा स्वस्थमनें जी! स्वकरें वाढीत तूप साकर तो. ॥ ६६
जाला अति काळ असे, श्रमलेति तुम्ही समस्त बहु भागां[10], ।
मागा रुचेल तेंचि' प्रार्थितसे विप्र राहुनि उभा गा! ॥ ६७
'तृप्ती वर्षी[11] क्षितिची करिती वर्षोनि जेंवि चरु[12] तृप्ती' ।
विप्र म्हणति, 'तसि जाली, आतां आणूं नकाच चरु[13], तृप्ती[14]. ॥ ६८
कंठभरि जेविलों गा! कांहीं राही रिती[15] न मनि[16] तिळ[17], ।
गुरुभक्त धन्य तूं, तुज विधि, हरि, हर देव तीन मानतिल.' ॥ ६९
सकळ द्विजांसहित ही गुरु भोजन करुनि उठति मग हो! ते, ।
उष्टीं काढुनि, मागुनि जेविति वाढीत विप्र जे होते. ॥ ७०
श्रीगुरु म्हणती विप्रां, 'वनितासुतकन्यकादि बोलावा, ।
जा जेऊं द्या, तृप्ती होऊं द्या तन्न[18] उशिर तो लावा. ॥ ७१
आलें विप्रकुळ सकळ जेवुनि तें तृप्त जाहलें, जेंवी ।
पांडवघरिं ऋषिमंडळ; शूद्रादि ग्रामलोक मग जेवी ॥ ७२
चांडाळादिक जाले होते जे तृप्त जन नगरवासी, ।
प्राणीमात्रहि कोणी त्या ग्रामीं राहिला न उपवासी. ॥ ७३
विप्रादि तद्दिनीं जन जेविति साहस्र चार ते गणती ।

---

१. भांड्यांत. २. लोकांनीं. ३. अन्न. ४. घागरी. ५. घट्ट. ६. पूर्ण+असे. ७. कलायुक्त. ८. तूप आणि दूध. ९. हात. हें 'जोडोनि' याचें विशेषण. १०. भागलां, दमलां. ११. वर्षाकालीं. १२. मेघ. १३. भात. १४. हा 'जाली' याचा कर्ता. १५. रिकामी. १६. कंठ, गळा. १७. तिळभर. १८. तत् (त्यांची)+न.

जाली, मग विप्रासी त्या श्री**गुरु**राज 'जेव जा' म्हणती. ॥ ७४
**गु**र्वाज्ञेनें जेवुनि उघडुनि जों अन्न विप्र पाहतसे, ।
आपण जितके केले पदार्थ जे असति ते जसेचि तसे. ॥ ७५
सांगे **गुरु**सि, **गुरु** म्हणे, 'गंगाजळिं टाकि, [1]मीन गा [2]अर्क ।
खाऊनि तृप्त होतिल; जा गेला पश्चिमा नगा [3]अर्क.' ॥ ७६
मीनास अन्न घालुनि, येउनि शिर ठेवि **गुरु**पदावर तो, ।
श्री**गुरु** 'ईप्सित होऊ' असा तया देति हो! तदा वर तो. ॥ ७७
द्विज म्हणति, 'धन्य धन्य द्विजवर **गुरु**भक्त हा असा मान्य, ।
जैसे **पाँडु**[4]सुत ते श्री**ह**रिचे भक्त हो! असामान्य. ॥ ७८
**कृ**ष्णकृपेनें घालिति जेवुं सऋषि [5]अत्रिजास [6]शर्वरींत, ।
जालें तसें **गुरु**कृपें आजहि असतांहि अन्न [7]उर्वरित. ॥ ७९
भक्तजना तारितसे श्री**गुरु** हा, **कृ**ष्ण तोचि अवतरुनी, ।
पादस्पर्शें जाती इच्छित पावोनि भक्त भव तरुनी. ॥ ८०
वि[8]श्वप्सू(?) यतिसि जसें श्री**ह**रि **पा**र्थासि करुनि अव(?) दावी, ।
याची यशगुणकीर्ती कैसी हो! एक आननिं वदावी. ॥ ८१
याचें यश गुणवर्णन जालें न [9]अशेष [10]**शे**षें निगमांतें, ।
मग आम्हांतें कैचें वर्णवतें? परि पडे मनिं गमातें.' ॥ ८२
शिष्या **गुरु**स्तव असा केला बहु विप्रभक्त आर्यांनीं, ।
श्री**गुर्वा**ज्ञें वर्णी **ब**च्याजिसुत **प**रशुराम आर्यांनीं. ॥ ८३

---

## अध्याय [11]संविसावा.

करुनि प्रणिपात वदे शिष्य गुरुसि, 'पुढिल वद चरित्रास, ।
श्रवणें त्रिताप शमती पळती पावोनि [12]षट् अरि त्रास.' ॥ १
**सि**द्ध म्हणे भर्त्यासह **गा**णगपुरिं वांझ एक नांदे ती, ।
संपूर्ण साठ वर्षें होतां सत्पुत्र **गुरु** तिला देती. ॥ २
सुपतिव्रता सती ती नाम तिच्या **सो**मनाथ भर्त्याचें, ।
शाखापस्तंब असे गोत्रहि जें **शौ**नकचि असे त्याचें. ॥ ३
**गं**गा नाम तियेचें, सेवा करि नित्य भक्तिनें **गुरु**ची, ।

---

१. मासे. २. अन्न. ३. सूर्य. ४. पांडव. ५. दुर्वासास. ६. रात्रीं. ७. शिल्लक. ८. 'विश्वस्वरूप जैसें श्रीहरि पार्थासि करुनि आ दावी।' असा येथें पाठ असावा. ९. पूर्ण. १०. शेषणि वेद यांना. ११. यांत मुळांतील ३९ व्या अध्यायांतील कथाभाग आहे. १२. सहा.

पंचारति वोवाळुनि सेवुनि गुरुपादतीर्थ घेत रुची. ॥ ४
नित्य अशि श्रीगुरुची सेवा करि कष्टुनी वपु सती ते, ।
तिजला श्रीगुरु इच्छित मनिंचा जाणोनि भाव पुसती ते. ॥ ५
गुरु म्हणती, 'प्रत्यहिं कां आणिसि पंचारती निरांजन ? मी ।
जालों प्रसन्न मागें इच्छित' ऐकोनि ती पदाब्ज नमी. ॥ ६
गुरुसि म्हणे, 'सुत पोटीं नसतां पितृलोकवास नाहीं कीं, ।
पुरवी न कोण तुजविण, कृपाक्षि अवलोक; वासना ही कीं. ॥ ७
गंगास्नाना प्रत्यहिं कडिये घेवोनि शिशु सकळ योषा, ।
येती तसें नसे मत्कपाळिं, मी काय आचरें दोषा ?' ॥ ८
श्रीगुरु म्हणति तिला मग, 'तुज कन्या सुत सुलक्षणी होती,' ।
ऐकोन शकुनगांठी बांधुनि नमि गुरुसि ते क्षणीं हो! ती. ॥ ९
श्रीगुरुसि म्हणे, 'बहु मी करीं व्रतें पुत्र इच्छुन मनातें, ।
पुरलि न इच्छा कांहीं' म्हणुनि करीं पुनरपीहि नमनातें. ॥ १०
'सांगति बुधजन मज करिं अश्वत्थव्रत विधान सेवा तें ।
गेलें, केलें दैवें व्यर्थचि, घनडंबरा[1] जसें वातें. ॥ ११
करित्यें व्रत आझुनि मी पुत्रेच्छुनि मानसीं पुढिल जननीं[2], ।
या जनानें करिन म्हणसी पुत्राची, वाटतें नवल, जननी[3]. ॥ १२
कां नवल न वाटे तें ? वर्षें देहासि होति या साठीं[4], ।
होत न विटाळशी; वर देशि नवल वाटतेंचि यासाठीं. ॥ १३
व्हावें न अन्यथा त्वद्वचन शकुनगांठ केलि बंधन ही; ।
धरिलें त्वद्वच दृढ मी, मनीं धरी कृपणही असे धन ही. ॥ १४
सर्वेहि कर्ता प्रभु तूं परि धरिती मूर्ख धव न विश्वास, ।
श्वास न निघे तवाज्ञेवांचुनि गा! तूंचि अवन[6] विश्वास[5]. ॥ १५
तुझिया इच्छेवांचुनि नेत्राचें नाहिं हलत पातेंही, ।
भजतां न तुला व्यर्थचि करितां तीर्थव्रतां तपातें ही. ॥ १६
अश्वत्थव्रत करित्यें व्यर्थचि मी, ये प्रतीति सत्य मला, ।
कर्मपडळ गुरु उडवी, वस्त्राच्या उडवि जेंवि सैत्य[7] मला.' ॥ १७
गुरु म्हणती, 'अश्वत्थद्रुमसेवा थोर सुकृत जी ईषणा[8] ।
मनिं ती अखिलहि पुरवी; निंदुं नको वृक्ष ऐक मद्धिषणा[9]. ॥ १८

---

१. मेघसमूहास. २. जन्मीं. ३. मुलाची आई. ४. साठ. ५. मनुष्य. ६. रक्षण. ७. पाणी. ८. इच्छा. ९. धिषणा=वाणी.

ज्यापासीं सकळहि ते देव वसति वृक्ष तो असा मान्य, ।
सामान्य नाहिं आइक तरुराजा [1]लेक्ष तो असामान्य. ॥ १९
अश्वत्थव्रतमहिमा सांगे आद्यंत **ना**रदास **वि**धी ।
**ब्र**ह्मांडपुराणीं, व्रत करितां दे इच्छिलें तदा सविधी.' ॥ २०
**गं**गा श्री**गु**रुसि म्हणे, 'करिसी स्वामी बहु द्रुमस्तव तो, ।
सर्व त्वन्मुखिं महिमा ऐकावा वाटतोचि यास्तव तो.' ॥ २१
**गु**रु म्हणती, '**ना**रद ये जेथें होते मुनी समस्त वनीं, ।
पूजुनि तयास मुनि तत् जाले रत भूधरासम स्तवनीं. ॥ २२
स्तव बहु ऐकुनि **ना**रद ऋषिस म्हणे चित्त बहुत मम हर्षे, ।
धन्य तुम्ही भवनाशक नाश करवि जेंवि बहु तम महर्षे !' ॥ २३
ऋषि म्हणति **ना**रदासी, 'कैसें अश्वत्थवृक्षमहिमान, ।
देवर्षे! सांगा जी देति जया सुजन दक्ष महि मान. ॥ २४
सांगुनि महिमान सकळ सांगचि देवर्षि! तें व्रतविधान ।
तेणें चित्तीं अम्हां मुनि! मग वाटेल गा! समाधान. ॥ २५
सांगे विधी [2]**अ**थर्वण, कथिलें एक प्रकार परि **सू**तें, ।
**ब्र**ह्मांडपुराणीं तें यथाविधि त्वन्मुखेंचि परिसूं तें.' ॥ २६
**ना**रद म्हणे ऋषिगणा, 'सादर आतां समस्त परिसा जी, ।
**ब्र**ह्मांडपुराणें कथा आहे मीही वदेन परि [3]साजी. ॥ २७
साजी म्हणाल कैसी तरि आज श्रवण **स**त्यलोकातें ।
केली, सेवा करितां होइ फळ प्राप्त सत्य लोकातें. ॥ २८
[4]**द्रु**हिण म्हणे, 'मी, **ह**रि **ह**र [5]सदिं वसतोंऽश्वत्थपादपापासीं, ।
नाशुनि इच्छितदाता द्रुम तो, गुरुपाद जेंवि, पापासीं. ॥ २९
मी मूळीं, मध्यें **ह**रि, अग्रीं **शि**व **वा**सवादि तेतिस ही ।
कोटिसुर, प्राक्शाखा जी वेष्टुनि वसति सर्व ते तिस ही. ॥ ३०
बीजें ॐकारादिक, तीर्थेंही सकळ देवतामात्र, ।
वसती अखिलहि शाखा वेष्टुनि [6]वपुरोमिं जेंवि [7]धामात्र. ॥ ३१
ऐसा अश्वत्थद्रुम न पडे मानिं इच्छिलें कमी सर्व, ।
काय नवल वसतोंऽम्ही [8]ज्याचा **ग**णप लेंक, [9]मी, [10]सर्व. ॥ ३२

१. पद्दा. २. ऋषिविशेष. ३. साची, चांगली. ४. ब्रह्मदेव. ५. सदा. ६. शरीरावरील केसावर. ७. धाम+अन्न (जल). ८. ज्याचा लेंक गणप (तो—शिव). ९. ब्रह्मदेव. १०. विष्णु.

आषाढपौषचैत्रीं असतां गुरु शुक्र अस्तगत साच, ।
आरंभावें न व्रत असतां क्षयदिन कुयोगहि तसाच. ॥　　३३
पाहुनि शुभदिन शशिबळ करणें हो! दृढमनें व्रतारंभा, ।
व्हावें न मानस तसें चंचळ जशि वात लागतां रं[1]भा. ॥　　३४
प्रातःकाळिं उठावें उठला जों नाहिं कोणिही जन तो, ।
सुस्नात होउनी मग करणें द्रु[2]मपार जो समार्जन तो. ॥　　३५
घालोनि रंगमाळा घेउनि शिवपुत्रनाम अ[3]करावें. ।
त्याचें पूजन करुनी मग तें पुण्याहवाचन करावें. ॥　　३६
मग अश्वत्थद्रुम तो मानुनियां विष्णु, सातदा पूर्ण ।
स्न[4]पन करावें त्यासी आणुनि घटिं भरुनि सातदां पू[5]र्ण. ॥　　३७
स्नान करायासि पुन्हा, त्या घालुनि सातदां वपू, जावें, ।
इष्टार्थ उच्चरुनि मग संकल्पुनि धरुन भाव पूजावें. ॥　　३८
अश्वत्थवृक्षिं विष्णू ध्यावा ध्यानांत अष्टभुज गा! तो, ।
भुजगा जो अरि त्या[6]वरि बैसे जो तारक प्रभु जगा तो. ॥　　३९
धरि करिं धनु, शर, खेट[7]क, खड्[8]ग, वरद हस्त, अ[9]रि, गदा, कं[10]बु, ।
नवजलदवर्ण जैसा हरितनुचा वर्ण तो तदाकार. ॥　　४०
तेथें वसे उमा शिव, सश्री ज्या स्थानिं [11]सवंगा व[12]सती, ।
मीहि वसें, होय सदां स[13]हरि सुरां स्थानिं सर्व गा! व[14]सती. ॥　　४१
ऐसें ध्यानावाहन करोनि मग वृक्षराजपूजन गा! ।
करणें, त्याच्या पुण्याचा गिरि लाजवि हि[15]रण्यशैलनगा. ॥　　४२
वस्त्रें वा सूतें द्रुम वेष्टावा, तो नये असो निपट, ।
उघडा; सामर्थ्यसतां सूतें वेष्टों नये असोनि प[16]ट. ॥　　४३
मग करणें वृक्षासी प्रदक्षिणा त्या सहस्र नामानें, ।
अथवा मौनेंचि बरें करणें ज्याच्या असें मना मानें. ॥　　४४
करणें प्रदक्षिणा, जसि चाले ग[17]रवार शांत कुंभातें, ।
घेउनि जल, हरिपादें असु मन वसतें जेंवि [18]शांतकुंभातें. ॥　　४५

---

केळ. २. वृक्षाचा (अश्वत्थाचा) पार. ३. अकरावें नाम=गणपति? ४. स्नान, पाणी घा-
. जल. ६. गरुडावर. ७. ढाल. ८. तरवार. ९. सुदर्शन चक्र. १०. शंख. ११. वि-
१२. राहतात. १३. इंद्रासह. १४. राहण्याचें ठिकाण. १५. मेरुपर्वतास. १६. वस्त्र.
मार स्त्री. १८. सुवर्णावर.

[1]वाडवहत्या नाशी प्रदक्षिणा दोन लक्ष करितां तें, ।
सुकृत म्हणुनि सांगितलें, धरोनि मजला समक्ष करिं ता[2]तें ॥ ४६
कोटिप्रदक्षिणें परिहारचि कोटि सकळ ऋण होतें, ।
अघ उरुं नदेचि जैसें सरोवरीं पद्म जाळिं [3]करिण हो! तें. ॥ ४७
अश्वत्थाची सेवा करितां भवरोगदुःख तें वारी, ।
कुंभोद्भव आश्रय ज्या, [4]त्यांसोदधिचें न बुडवितें [5]वारी. ॥ ४८
ग्रह भूत न बाधेची प्रदक्षिणा हो! सहस्र करित्यातें, ।
काय करिल सांगा पां [6]हरिचा ज्या पूर्ण [7]आश्र, [8]करि त्यातें? ॥ ४९
मृत्युंजयजप करितां स्पर्शुन अश्वत्थवृक्ष शनिवारीं, ।
न घडे अपमृत्यु कदां तद्भवभय, देउनी यश, निवारी. ॥ ५०
शनिवारीं अश्वत्था स्पर्शुनि कर्त्या जना शनिजपातें, ।
पीडी न [9]सौरि, न करी उघडुनि तत्काजनाश निज [10]पातें. ॥ ५१
नर एकादा क्षितिवरि भावें अश्वत्थवृक्ष जो स्थापी, ।
स्वर्गी पितरांसह तो अमृत सदा, पुरुनि सर्व आस्था, पी. ॥ ५२
छेदी अश्वत्थद्रुम त्याला घालुनि [11]कृतांतचर कास, ।
नरकासि नेति रगडिति लावुनि तल्लिंगदेह चरकास. ॥ ५३
अश्वत्थपादपाची सकाळिं ज्या [12]नीरिं बा! पडे छाया, ।
तेथें स्नान करिति, [13]तत्पाहति न [11]यमचर बापडे [13]छाया. ॥ ५४
अश्वत्थ सांवलि जळीं तेथें जो प्रक्षळून वपु न्हातो, ।
नाशी ब्राह्मणहत्या, तनु न धरी तुज कळो [14]नवें पुन्हा तो. ॥ ५५
अश्वत्थातळिं भोजन घाली जो ब्राह्मणास एकाला, ।
कोटिब्राह्मणभोजन पुण्य तया प्राप्त होय ते काला. ॥ ५६
यज्ञाचें पुण्य तयां करिती अश्वत्थतळिं सुहोमातें, ।
सुतकामनाहि पुरती त्वरित वदे [15]पद्मजन्म हो! मातें.' ॥ ५७
'अश्वत्थव्रतमहिमा' ऋषिस म्हणे ब्रह्मसुत 'असेचि असा, ।
व्रत आचरोनि इच्छित पावुनि विधिलोकिं मग सुखेंचि असा. ॥ ५८
ऐसें व्रत आचरुनी उद्यापन मग बरें करावेंच, ।

---

१. विप्रहत्या. २. पित्यानें, ब्रह्मदेवानें. ३. हत्तीण. ४. त्यास+उदधिचें (समुद्राचें). ५. पाणी. ६. सिंहाचा. ७. आश्रय. ८. हत्ती. ९. शनि. १०. दृष्टीनें. ११. यमदूत. १२. पाण्यांत. १३. तत् छाया=त्याचें घर. १४. हें 'तनू'चें विशेषण. १५. ब्रह्मदेव.

शक्ति जसि जया, देउनि विप्रां धन अंबरें करा वेंचं[1]. ॥ ५९
केल्या प्रदक्षिणांचे दशांश तें हवन तद्दशांश करा, ।
ब्राह्मणभोजन इच्छित पावुनियां येत सर्व येशे[2] करा. ॥ ६०
द्यावा यथानुशक्ती करोनि अश्वत्थवृक्ष कैंशनाचा[3], ।
धनहीन सुविप्रा अघ जाळि तृणा स्पर्श जेंवि कृशनाचा[4]. ॥ ६१
वृक्षातळिं तिळराशी करोनि झांकोनि[5] शुभ्रपट वर तो; ।
द्यावी ती दान, बरा पाहुनि धनहीन भूमिसुरवर तो.' ॥ ६२
गुरु म्हणती वांझेतें, 'ऐसें व्रत करिति भूमिदेव मुनी, ।
इच्छित सर्वहि पावति, तूंहि करुनि दुःख सर्व दे वमुनी. ॥ ६३
अश्वत्थ कल्पपादप भीमामरजा सुसंगिं आहे तो, ।
मत्स्थानहि तेंचि असे, तो आराधीं पुरे तुझा हेतो. ॥ ६४
कन्यापुत्र सुलक्षणि होति तदश्वत्थअर्चनेंकरुनी, ।
चिंता न करिं करीं व्रत, जा निश्चय पूर्ण हा मनीं धरुनी'. ॥ ६५
ती नमुनी गुरुसि म्हणे, 'कैंचा मज सुत? न कांय[6] हा तरुण; ।
जें खैदिरांगाराचें[7] शीतळ होईल काय हांतरुण[8]? ॥ ६६
नाहीं अश्वत्थाचें कारण मज साठ वर्ष वांजेतें, ।
त्वद्वचन मुख्य म्हणउनि करिन व्रत वदसि येधवां जे तें. ॥ ६७
त्यजिती जे गुरुवचना अधिकारी तेचि होति नरकाचे, ।
गुरुवचन नावडे ज्या राहति ते बुद्धिहीन नर काचे[9].' ॥ ६८
'होइल सुत' गुरु म्हणती 'न धरीं तूं संशया मनामाजी, ।
सांगितलें व्रत जैसें तैसें करिं ऐकणें स्वनामाजी[10]'. ॥ ६९
प्रीति गुरुवचनिं लागे जैसी स्त्रीलंपटासि सुरतरुची, ।
भावें मग ती सेवा त्या करि संगमिंचियाचि सुरतरुची. ॥ ७०
त्रय दिन सेवा केली पूर्वी जसि त्या 'महीसुरजनीं[11] ती, ।
जाला सुस्वप्न तिला येतां हो! तृतिय दिवसरजनी ती. ॥ ७१
स्वप्नीं विप्रैक म्हणे, 'जालें तव काम्य ऐक मद्वारा[12], ।
सप्त प्रदक्षिणा करिं जा नमुनी श्रीगुरू दिनोद्धारा. ॥ ७२
जें देइल तें भक्षीं' ऐसि तयाची वदे सरस्वति[13]; तें ।

---

१. खर्चं. २. यश. ३. सोन्याचा. ४. अग्नीचा. ५. ओकून टाक. ६. शरीर. ७. खैराच्या निखाऱ्याचें. ८. आंथरुण. ९. कचे. १०. वाणीनें. ११. ब्राह्मणांनीं. १२. माझी वाणी १३. वाणी.

ऐकुनि जागी होउनि येउनि नमि नरहरीसरस्वतितें. ॥ ७३

सद्भावें मग सात प्रदक्षिणा करुनियां महासति ते, ।
तिष्ठे सन्मुख **गुरु** तिस दोन फळें देति आणि हांसति ते. ॥ ७४

**गुरु** मग म्हणती, 'जालें कार्य तुझें पारणेंहि कर, जा, हो ।
पुत्रवती' म्हणुनि शिरीं ठेविति तिचिया [1]कृपास्वकरजा हो ! ॥ ७५

'करिं पारणें, मग फळा भक्षीं येइल' म्हणे **गुरु** 'प्रतिती, ।
होइल कन्या सुत तुज.' जाइ नमुनि मग गृहा **गुरु**प्रति ती. ॥ ७६

संपूर्ण व्रत करुनी दानें होमादि विप्रभोजन तें, ।
करि मग देउनि बहुतचि, करिते संतुष्ट विप्र, [2]भोजन तें. ॥ ७७

मग पारणें करुनि तीं भक्षि फळेंऽ[3]हस्तदस्तमानीं ती, ।
जाली रजस्वला मग [4]दुर्धीं जळलीं समस्त मानी ती. ॥ ७८

भक्षोनि [5]हविष्यान्ना, मौनेंचि क्रमुनि तीन रजनी ती, ।
सुस्नात होय असि जी धन्य म्हणति यूवती नर जनीं ती. ॥ ७९

जाउनि करि मग **गुरु**सी आरति, पदिं लववुनी स्वकंधर ती, ।
पतिसंग पंच निशितें करितां गर्भासि जाहली धरिती. ॥ ८०

त्रयमासापासोनी द्विज करि, वेंचुनि हिरण्य गर्भाचे ।
संस्कार, गर्भ शोभे तेजें, भू जसि [6]हिरण्यगर्भाचे. ॥ ८१

प्रीती **गुरु**हि विनोदीं म्हणती, 'ग्रामांत वायनें वांटा.' ।
**गुर्वाज्ञे**नें वांटिति तें पाहति वैसुनी जन [7]चँवाटा. ॥ ८२

म्हणति, 'पहा हो ! नवला, कैसा वांझेस गर्भ सांठवला ? ।
नसतां काळ, अकाळीं एकाकीं जेंवि होय [8]सांठ [9]वेला. ॥ ८३

म्हातारी, सितकेशी, होति बसुनि, पडुनियां [10]रदं, [11]खवाटे, ।
सोहाळा करिति बहुत वाणेंही द्यावया [12]हरिख वाटे. ॥ ८४

अत्यानंदें वाणें देति, पहा थोर होय गडबड ती.' ।
ऐसे नानारितिनें करोनि जन बहु विनोद बडबडती. ॥ ८५

वाणें देउनि पतिसह येउनि **गुरु**पद धरोनि ते हातें, ।
ठेवुनि शिर मग येती **गुर्वाज्ञा** घेउनी निज गृहातें. ॥ ८६

---

१. कृपाहस्तांगुली. २. द्रव्य. ३. अहः+तत्+अस्तमानीं=त्या दिवशीं सायंकाळीं. ४. दुरितें, दुष्कर्में. ५. पवित्र अन्न. ६. सूर्याचे. ७. प्रसिद्ध ठिकाणीं. ८. सांठा, सांठवण, जमणें. ९. मेघाला. १०. दांत. ११. खवाटे पडणें=खांकेंतील हाडें निघणें. १२. हर्ष.

होतां नवमास पुरे कन्यारत्नासि जाहली प्रसुत, ।
जाला न[1], पंच निशितें दे भोग स्त्रीस म्हणुनि विप्र, सुत. ॥ ८७
जातक वर्तवुनी शुभ सांगितलें सकळ विप्रगणकांनीं, ।
ऐकोनि, तात करि तो तृप्त धनें सकळ विप्रगण, कानीं. ॥ ८८
न्हाउनि एकादशदिनिं कन्या घेऊनि सपति गंगा ती, ।
येउनि गुरुपदिं घालुनि नमुनि गुरुसि कीर्ति बहुमुखें गाती. ॥ ८९
'करुणाजलद! दयाब्धे! निजजन तारावयासि अवतारा ।
धरुनि, त्रयमूर्ति तुम्ही कृपानयानें करुनि भक्त अव[2] तारा. ॥ ९०
केलें लोह परिससम मज गुरु न[3]रकेसरीसरस्वति हे, ।
परि होय न सुत उदरीं, आलि इस तुके[4] सरी सरस्वति हे. ॥ ९१
व्हावा सुत मजला जी!' श्रीगुरुसी म्हणत तेधवां विप्र, ।
गुरु म्हणती, 'मूर्ख हवा, किंवा तुज सांग रे! हवा विप्रं[5]? ॥ ९२
त्रिंश[6]द्वर्षायु जरी होइल विद्वत्सुजाण परि साच, ।
मानेल जरि शंतायु[7] मतिमंद दृढासु (?) जाण परिसा च'. ॥ ९३
श्रीगुरुसि म्हणे गंगा, 'व्हावा सत्पुत्र पूर्ण मजला हो! ।
व्हावे पांच सुत तया ऐसा त्वद्वरदपुत्र मज लाहो[8].' ॥ ९४
गुरु दे तसाचि तिजला वारुनियां सकळ संकटा वर तो, ।
कन्यालक्षण सांगे मग घेउनि कन्यके कटावर[9] तो. ॥ ९५
'होइल पतिव्रता हे, शतायु होतील पुत्र आठ इला, ।
ज्ञानी मिळेल पति, तच्चारी[10] साही वदेल पाठ इला. ॥ ९६
सुकृतहरि[11] देखुन इचा इतर जनाचेहि अघकरी[12] लपती, ।
येईल दर्शना नृप, इचा महद्यश मग करील पती. ॥ ९७
पाहेल सुखें नांदुनि अहेवपणिं[13] पुत्र पौत्र नयनांहीं, ।
निघणार अष्टपुत्रा, तिल एकहि मूर्ख तो तनय नाहीं. ॥ ९८
यापरि लक्षण सुत जो आतां होइल न वावगा तूतें, ।
तत्कीर्ति भरे दशाही आशा[14] होइल न वाव गांतूतें[15].' ॥ ९९
शिष्या तसेंच जालें जसि वदली गुरुचि ऐक बा! धेनां[16], ।

---

१. मुलगा झाला नाहीं. २. रक्षण. ३. नृसिंहसरस्वति. ४. वजनानें, साम्यानें. ५. शहाणा. ६. तीस वर्षें जगणारा. ७. शंभर वर्षांचा. ८. मिळो. ९. कडेवर. १०. तत् इला (त्याची वाणी) चारी (चार वेद) साही (सहा शास्त्रें) वदेल. ११. पुण्यरूपी सिंह. १२. पापरूपी हत्ती १३. अविधवापणीं, सौभाग्यपणीं. १४. दिशा. १५. पृथ्वीवर. १६. वाणी.

भजती श्रीगुरुसी जे विघ्न तयां कांहिं एक बाधेना. ॥ १०

केली पुत्रवती सति संवत्सर साठ वांज होती ते, ।
जाला सुपुत्र सुगुणी त्यालाही पांच पुत्र होती ते. ॥ १०

छेदी अघा कथा ही नगमस्तकिं जेंवि घाव दे चि पवी[1], ।
चिपवी[2] कुतर्क अवघे सिद्धमुनीची असी वदेचि पवी[3]. ॥ १०

श्रीगुरु सांगति तिसरे कार्णें(?) परशुराम आयके कीं तें, ।
आनंदे घन देखुनि जैसा आनंद होय केकीतें[4]. ॥ १०

---

## अध्याय सत्ताविसावा[5].

श्रीसिद्धाचे चरणीं ठेवुनि शिर शिष्य तो वदे, 'वद गा! ।
प्राशिति जरि नित्य सुधा कल्पांतीं पावतीच देव दंगा[6]. ॥ १

जो श्रीगुरुचरितसुधा प्राशी, नलगेचि सुरसुधा त्याला, ।
व्यर्थचि स्वर्गसुधा[7] ती रक्षी प्रळयीं न सांसु[8] धात्याला[9]. ॥ २

श्रीगुरुचरितसुधेची कैसें पावेल अमृत संमता[10] तें? ।
लाजे शास्त्रमतेतर[11] पाहुनि वेदांतशास्त्रसमता तें.' ॥ ३

यापरि शिष्यवचन गुरु सिद्धैकुनि चित्तिं बहुत मानवला, ।
ठेवुनि शिरिं हस्त म्हणे, 'ऐक पुढिल शिष्यसत्तमा! नवला. ॥ ४

व्याधी दुःख असलिया गुरुदर्शनिं दूर सर्व होत नुतें[12], ।
ऐसें विप्रैकैकुनि[13] ये, तत्सितें[14] कुष्ठ[15] सर्व हो! तनुतें. ॥ ५

नरहरि नाम तयाचें, शाखापस्तंब[16] ती, भृगव गोत्र, ।
नमुनि श्रीगुरुसि म्हणे, 'कुष्टमला[17] क्षाळि तूं सदय गोत्र[18].' ॥ ६

साष्टांगीं नमुनि पुढें गुरुस्तुती करित तो उभा राहे, ।
'भारा ह्या दुःखाच्या हरुनि' म्हणे 'कीर्तिगुढि[19] उभारा हे! ॥ ७

देवादि देवगुरु तूं शिवहरि अवतारसी दिनोद्धारा! ।
उद्धारा मजलागीं' ऐकुनि गुरु तोषती सुतद्धारा[20]. ॥ ८

---

१. वज्र. २. गप्प करी. ३. वाणी. ४. मोराला. ५. या अध्यायांत मुळांतील ४० व्या अध्यायांतील कथाभाग आहे. ६. नाश. ७. स्वर्गांचें अमृत. ८. जिवंत. ९. ब्रह्मदेवाला. १०. बरोबरी. ११. इतर शास्त्रमत. १२. शीघ्र. १३. विप्र+एक+ऐकुनि. १४. तत् तनुतें=त्याच्या अंगावर. १५. पांढरें कोड. १६. शाखा+आपस्तंब. १७. कुष्टरूपी मळाला. १८. घन. १९. यशाची ध्वजा. २०. त्याची चांगली वाणी.

श्रीगुरु म्हणति तया, 'तूं प्राग्जन्मीं करिसि बहुत अघराशी, ।
विश्वास मद्वचीं जरि, ऐकें तूं न तरि जा निज घराशी.' ॥　　९

विप्र म्हणे, 'गुरुराया! देवा! या तूंचि अवन विश्वास, ।
मूर्ख म्हणावे ते जे धरिती त्वद्वचनिं धैव न विश्वास.' ॥　　१०

इतक्यांत एक आला नर घेउनि शुष्क काष्ठ मस्तकिं तें, ।
त्रयवर्ष शुष्क जालें द्विजासि गुरु म्हणति घे स्वहस्तकिं तें. ॥　　११

रोवीं संगमिं, घालीं जल वारंवार, यास पल्लव रे! ।
येइल जे दिवसीं तव जाइल अघकुष्ट, काष्ट घे, लव रे!' ॥　　१२

गुरुवच ऐकुनि विप्र श्रीगुरुच्या नमुनि पादजलजातें, ।
नेऊनि काष्ठ रोवुनि संगमिं घट भरुनि घालि जल ज्यातें. ॥　　१३

वारंवार द्विज तो घाली काष्ठासि भरुनि घट पूर्ण, ।
उपवास सात जाले करि निश्चय चित्त करुनि घट पूर्ण. ॥　　१४

म्हणती शिष्यजन तया, 'करिशी कां कष्ट पापरूपा! हे? ।
त्वचहीन, शुष्क दारू, विचारि मनिं होय कैं तरू पाहे. ॥　　१५

श्रीगुरुराज दयानिधि, नाशे भवरोग तत्कृपापातें, ।
देती काष्ठ म्हणुनि तुज नसेल गा! या त्वदंत पापातें. ॥　　१६

न फुटति काष्ठा पल्लव विप्रा! तूं व्यर्थ करिसि कां कष्ट, ।
स्पष्टचि सांगतसों तुज, न जाइ अघ, कुष्ट होइना नष्ट. ॥　　१७

काष्ठासि घालुनी जल व्यर्थ श्रमसील, यांत फळ काय? ।
ऐकें हित गोष्ट तुला सांगतसों हा नव्हे अमळ काय. ॥　　१८

कांहीं अघ निर्मुक्तचि, सेवुनि अश्वत्थपादपाला, हो, ।
लाहो चित्तिं धरुं नको; न फुटे काष्ठासि सत्य पाला हो'. ॥　　१९

विप्र म्हणे, 'काष्ठासीं न कारण ब्रह्मवृंद! मजला हो! ।
मज लाहो गुरुवचनीं, घालिं म्हणुनि, धरुनि मनिं दम जला हो. ॥　　२०

गुरुवचन सत्य असतां, न होय तरु काष्ठ हें सुजन कां जी? ।
गुरुवचनामृत सांडुनि, मी तुमचें सेविना वचन कांजी. ॥　　२१

नाशेल पाप, जाइल कुष्टहि, होईल दारु पादप हा, ।

---

१. नर. २. नम्र हो. ३. पदकमलास. ४. घट्ट. हें 'चित्त' याचें विशेषण. ५. बिनसा-. ६. लांकूड. ७. कधीं तरी. ८. या त्वत् (तुझ्या) पापातें अंत नसेल. ९. स्वच्छ, निर्मल-हित. १०. शरीर. ११. नाहींसें होईल (असा). १२. आग्रह. १३. वृक्ष.

आहे विश्वास मनीं, गुरुचे मज तारितील पाद पहा.' ॥ २२
पाहुनि तन्निर्धारा आले वेगें [1]मनानिलापरिस. ।
श्रीगुरुसि नमुनि म्हणती, 'विस्मय चित्तांत वाटला परिस. ॥ २३
स्वामींनीं ज्या विप्रा सांगितली शुष्ककाष्ठसेवा जी, ।
भाव धरुनि घट भरुनी निशिदिन घालीत तो असे [2]वाजी. ॥ २४
पाडि न खळ उदकाचा, सहस्र खेपाहि होत दिवसांत, ।
जलही सेवित नाहीं, जाले उपवास हो! दिवस सात. ॥ २५
अम्हीं तया म्हणितलें न घालिं काष्ठा वृथाचि [3]पिप्पल गा! ।
हित कर गा हरिगुरुगुण, सेवा करुनी सुवृक्ष पिप्पलगा. ॥ २६
फुटतील पल्लव कसे? करिसी कां व्यर्थ काष्ठसेवा ही? ।
जाइ न अघकुष्ठ कदां; न उदक, यामाजि फळ नसे, वाही. ॥ २७
द्विज अम्हासि म्हणे तो न चाड मज काष्ठिं, गुरुवचन सत्य, ।
सत्य प्रमाण पल्लव फुटतीलचि घालिं मी म्हणुनि [4]सत्य. ॥ २८
श्रीगुरु म्हणती, 'निश्चय गुरुवचनीं ज्यास तोचि जोडि फळ, ।
नर तो टाकि सकळ अघ विवरुनि, जैसें समुद्र जो [5]डिंफळ. ॥ २९
सांगो सत्य असत्यहि, मानी गुरुवचन सत्य जो [6]यदव, ।
[7]तदघवना जाळाया तत्तेजें सुकृत तेंचि होय दव. ॥ ३०
कैसा तरी गुरु असो, मानी तद्वचन सत्य जो नर कीं, ।
इच्छित पावुनि उद्धरि तो पूर्वज असति कोण जे नरकीं. ॥ ३१
गुरुवचन सत्य होतें सांगो क्रोधेंहि वा विनोदें तो, ।
विश्वास सत्य ज्यासी स्वपदिं तया सांब ठाव तो देतो. ॥ ३२
सांगे यदर्थ सुकथा निमिषवनीं शिष्य कानिनाचा हो ।
मीहि वदेन तुम्हांसी हर्षें ऐकोनि कानिं नाचा हो! ॥ ३३
पांचाळदेशिं होता पवित्र नृप तो जसा [1]धनंजय हो, ।
जय हो कर जोडि तया; तत्सुत तन्नाम तें धनंजय हो! ॥ ३४
तो नृपसुत एक दिनीं गेला वनिं पारधी करायासी, ।
मृग गिरिकंदरिं पळतां, उठली ईर्षा अभीक रायासी. ॥ ३५
मृगपाठिं धांवतां तो मध्यान्हीं तप्त बहुत, हो ऊन ।
लागे, तेणें श्रमुनी जल शोधित तृषित बहुत होऊन. ॥ ३६

---

१. मनोवेगापेक्षां. २. पाणी. ३. पिंपळ. ४. पाणी. ५. ढेंकूळ. ६. मनुष्य. ७. त्याच्या पापरूपी वनास. ८. वणवा. ९. व्यास. १०. वायू.

तों शबर[1] एक आला उष्णें पावोनि तेधवां श्रम तो, ।
तो जीर्णाऽतिहि[2] तेथें दोघेही देखती शिवाश्रम तो. ॥ ३७
विश्रामस्थानीं त्या परस्परें म्हणति जों 'बसा,' पडलें ।
लिंगैक भिन्न होउनि, तें त्या शबरास तेथ सांपडलें. ॥ ३८
आनंदुनि बहु चित्तीं घेतां तें वाकुनी महीं[3] शबरें, ।
त्याला 'घेसि कशासी सांग' म्हणे पाहुनी महीश[4] 'बरें.' ॥ ३९
शबर म्हणे, 'गा नृपती! पूजावें इच्छि अंतर[5] भवातें[6], ।
तूं हो गुरु मज सांगुनि पूजनविधि, तारि दुस्तर भवातें.' ॥ ४०
नरपति हांसोनि म्हणे, 'लागे जरि बहु तृषाक्षुधा मातें, ।
सांगेन पूजनविधी, नेउनि हें लिंग पूजिं धामातें[7]. ॥ ४१
ध्यानावाहन आसन पाद्यार्घ्याचमन देउनी शबरा! ।
पंचामृतादि घालुनि पूजावा शैलनंदिनीश बरा. ॥ ४२
शुद्ध जलें अभिषेकुनि वस्त्रें उपवीत[8] अर्पिजे सुमनें, ।
चंदन सिताक्षतांहीं अर्पुनियां सितचि[9] अर्पिजे सुमनें[10]. ॥ ४३
बिल्वदलें बहु परिमळ अर्पोन्यर्पोनि धूपदीपाही, ।
नंतर नैवेद्यार्पी धरुनि मनीं भाव शिवपदीं पाहीं. ॥ ४४
परि गुह्यैक असे तें देउनियां चित्त ऐक आणि करीं, ।
नैवेद्यासी भस्म स्मशानिंचें आपुलेचि आणि करीं. ॥ ४५
भोजनपदार्थ केले नैवेद्या सकळ तेहि ओपावे, ।
ऐसें पूजन करि जो नर हर, देउनि तयास ओ, पावे. ॥ ४६
तांबूलादि समर्पुनि घेउनि पंचारती मग करी गा, ।
श्रीशिवगुण करि पुष्पांजलि प्रदक्षिण नमन मग करी गा.' ॥ ४७
पूजनविधि यापरि परि भस्मार्पण वर्म मुख्य त्यांत असे, ।
तें शबर दृढ मनीं धरि, बोले नृप जे विनोदबोल असे. ॥ ४८
घेऊनि लिंग मग तो येउनि गेहास दाविलें वनिते[11], ।
'लिंग निधान' म्हणे 'हें मजलागीं प्राप्त जाहलें वनिं तें.' ॥ ४९
सांगे गुरु तो जैसें प्रतिदिन पूजन तसें शबर करि तें, ।

---

१. जंगली मनुष्य. २. जीर्ण+अति. जीर्ण=जुनें. हें 'शिवाश्रमा'चें विशेषण. ३. जमिनीवर. ४. राजा. ५. मन. ६. शंकरातें. ७. घरीं. ८. यज्ञोपवीत, जानवें. ९. शुभ्र, पांढरीं. १०. पुष्पें. ११. स्त्रियेस.

शोधोनि भस्म आणी ताजें प्रतिदिवस आपले करिं तें. ॥ ९०
त्याच्या निश्चयभावा एकदिनीं पाहि तो [1]भवानिवर, ।
न चिताभस्म मिळे, तें शोधी जरि सात गांव [2]अवनिवर. ॥ ९१
शबर म्हणे स्त्रीस, 'चिताभस्म मिळे न स्मशान पाहातां, ।
आतां अष्टहि सप्तग्रामीं शोधोनि पावलों आतां.' ॥ ९२
सांगे गुरु तो जैसा तैसा नैवेद्य [3]अर्पितां ना तें, ।
पूजन केलें व्यर्थचि मोहाविण धरि जसा पिता नातें. ॥ ९३
चिंता शबर बहु करी, शबरीस म्हणे, 'कसें करावें गे!?' ।
शबरी म्हणे, 'गृहातें मज घालुनि दग्ध हो! करा वेगें. ॥ ९४
असतां मी स्त्री तुमची चिंता कां करितसां [4]स्वमनसा जी!?।
वैसा जी! पूजेसीं विभूति मत्तनुचि हे करुनि [5]सांजी.' ॥ ९५
स्त्रीवचन ऐकुनि असें मोहें आणोनि नयनिं वारी तो ।
बोले, 'जाळूं कसें तुज? [6]कैं शिव भवदुःख मग निवारीतो? ॥ ९६
[7]मन्मानसार्णवींची [8]हर्षलहरि तूं असोनि [9]गुणसरिते! ।
कैसें जाळूं तुजला? रूपासी योग्य जाण [10]रतिसरि ते. ॥ ९७
पाप घडेल मला कीं वधणें तुज हा न होत [11]नय, [12]तरणी ।
तूं, तुज नसेचि बाळच, मज तो पीडील हो [13]तनयतरणी.' ॥ ९८
शबरी म्हणे तयासी, 'पापें लटकीं तुम्हां सुचत कां हीं? ।
तुमचें अर्धांगचि मी, दहनें मजला न अघ दिसत कांहीं. ॥ ९९
बुद्बुद उठति जळातें, न स्थिर ते होति हो तसें [14]असु हें, ।
भाषण मोहगुणातें बंधन होऊनि होतसे, [15]असु हें. ॥ ६०
दहन करा मजलागीं' म्हणे 'तुम्हाला नव्हेऽघ' [16]रामा जी ।
बोलुनि ऐसें द्वारें जाउनि लावीतसे घरामाजी. ॥ ६१
भर्त्यास म्हणे, '[17]अग्नी, चिंता शिव चित्ति, आणिला वाहो; ।

१. शंकर. २. पृथ्वीवर. ३. ना अर्पितां=अर्पण न केल्यास. ४. आपल्या मनानें. ५. साची, चांगली. ६. केव्हां, कसें. ७. माझ्या मनरूपी समुद्राची. ८. आनंदाची लाट. ९. गुणाची नदी. १०. रतीची बरोबरी. ११. न्याय. १२. तरुण. १३. तरणीतनय=सूर्यपुत्र यम, किंवा तनय (पुत्र) हीच तरणी (नाव). पुत्र पित्यास नरकापासून वांचवितो–हें प्रसिद्ध आहे. १४. शरीर. १५. असो, असूं दे. १६. स्त्री. १७. चित्ति शिव चिंता, अग्नी आणिला [तो] वाहो (नेवो, जाळो).

येउनि विवेक[1]घन मळ मोहाचा चित्तिं आणिला वाहो.' ॥ ६२
त्यागुनि मोह दया मग शबर गृहा जाळि जेंवि [2]शंभ [3]स्म, ।
पूजन करि मग हर्षें घेउनि मानोनि चित्तिं [4]शं भस्म. ॥ ६३
आनंदें नैवेद्या अर्पीत नवे चिताविभूतीतें, ।
उठवी प्रसन्न होउनि शबरीस [5]नें वेचितां विभू तीतें. ॥ ६४
पूजा संपूर्ण करुनि, मग तो करिं घेउनी प्रसादातें, ।
विसरोनि स्वस्त्रीसीं [6]घाली तो, असुनि वि[7]प्रं, [6]सादातें. ॥ ६५
प्रतिदिवसीं स्त्रीस जसा घेउनि करिं तो प्रसाद बोलावी, ।
ते दिनिं तसेंचि वदतां, ते क्षणिं ये ती न उशिर तो लावी. ॥ ६६
देतां प्रसाद तिजला, पाहुनि दि[8]व्यासुअंत रामा जी, ।
विस्मय मानि, म्हणे, 'मी स्त्री जाळीं गे[9]हअंतरामाजी.' ॥ ६७
घरही तैसेंचि दिसे त्यां, तो मग पुसत शबर [10]जायेसी, ।
'कसि, घरसहित तुला मी जाळीं लावुनि [11]समीरजा, येशी?' ॥ ६८
शबरी म्हणे पतीतें, '[12]इतक्याठवण मज हो [13]तगे, हातें, ।
लावा अग्न तुम्ही जधिं तधिं मी निद्रिस्थ होत गे[14]हांतें. ॥ ६९
पाचारितांचि आल्यें तुमचा पडतां सुशब्द करणीं हे, ।
जाले प्रसन्न वाटे मजला होईल सांबकरणी हे.' ॥ ७०
बोलति ऐसें तों शिव साक्षांत प्रगट करित रूपासी, ।
जैसें कल्पित वदतां होतें तें प्राप्त सुरतरूपासीं. ॥ ७१
मणिमय शिवमंदिर तें जालें हो शबरधामहि तसेंची, ।
गुरुवचन मानिती जे पावति ते मनुज परम [15]हितसेंची. ॥ ७२
देउनि सर्वैश्वर्या, अंतीं स्वपदासि पशुपती शबरा ।
नेई, [16]दशभुज पंचानन [16]करुनी, स्थापि पार्वतीश बरा. ॥ ७३
ऐसें गुरुवचनें तो शबर पहा पावला अढळ पद कीं, ।
ऐसेंच पावती जे बसविति गुरुवचनरत्न हृत्पदकीं. ॥ ७४
धरणें गुरुवच हृदयीं दृढ, जैसी धरित [17]पादपा वेल, ।

---

१. विवेक हाच मेघ. २ शंभु. ३. काम. ४. कल्याण, सुख. ५. न खर्च होतां, जशीची तशीच. ६. सादातें घाली=हाक मारी. ७. शहाणा. ८. चांगल्या शरीराचा अंत झाला होता जीच्या अशी. ९. घराच्या अंतभागांत. १०. बायकोला. ११. अग्नीला. १२. इतकी+आठवण. १३. टिके, राहते. १४. घरांत. १५. हितकर. १६. आत्मस्वरूप देऊन. १७. वृक्षाला.

फळ, तो गुरुचे धरि जो भावें हृदयांत पाद, पावेल. ॥ ७५
मंत्रौषधि, तीर्थ, द्विज गुरुजवळी धरिति भाव जैसा जे, ।
पावति फळ तैसें ते क्षितिवरि तत्कीर्ति तसिच पैं साजे. ॥ ७६
द्विज करित कष्ट सेवा असला जरि भक्ति धरुनि भावें तो, ।
जाऊनि कुष्ठ, काष्ठहि तरु होउनि अंतिं भवि निभावे तो.' ॥ ७७
बोलुनि ऐसें श्रीगुरु जाउनियां संगमीं सुविप्रकृती, ।
पाहतसे तो जैसा रोग्याची वैद्य जो कवि[1] प्रकृती. ॥ ७८
स्वकमंडलुतिल जल गुरु काष्ठावरि घालितांचि पाल्हाही ।
काष्ठासि फुटुनि, दिव्यासु[2] द्विज होतांचि गुरुकृपा लाही. ॥ ७९
तात्काळचि कुष्ठ पळे जैसा देखोनि सिंह शरभास, ।
किंवा आला शिवसा होतां तो पळत पंचशर[3] भास. ॥ ८०
दाट मनुष्य पहाया मिळत, द्विज ठेवि गुरुपदा भाळ, ।
शोभे नदीतिर कसें, रात्रीं शशि उडुगणीं[4] तदाभाळ[5]. ॥ ८१
मग गुरुची स्तुति तिष्ठुनि, विप्र, करुनि शुद्ध मानसा, करि तो, ।
डोले आनंदभरें मस्तक, मद गाळितो जसा करि तो. ॥ ८२
'श्रीगुरुराज दयानिधि अवतरसी पूर्ण भक्त रक्षाया, ।
कोट्यर्कतेजरूपा! चर्मनयनिं तुज अशक्य लक्षाया. ॥ ८३
अवतरसी विधि हरि हर मूर्तित्रय एकरूप होऊन, ।
भक्ताज्ञाना उडविसि, पटमळ[6] उडवीत जेंवि हो ऊन. ॥ ८४
प्रत्यक्ष विष्णु होसी, जाणे तो भारतीच खुण गा! ती, ।
प्रेमें उठविसि, दुभविसि वांज महिषि, सर्व लोक गुण गाती. ॥ ८५
दिव्य करुनि मत्तनु तूं गुरु! केला पूर्ण हेत माझा कीं, ।
आतां ज्ञानार्कें मद्धृदयीं अज्ञान हे तमा[7] झाकीं.' ॥ ८६
स्तुति ऐकोनि श्रीगुरु कर तंडेवोनियां[8] शिरावरते, ।
वर ते देती, 'भोगीं सुख, भोगिति जेंवि कीं धरावर ते[9].' ॥ ८७
मंत्रोपदेशुनि तया म्हणती गुरु होउनीहि सदय 'न भीं' ।
ज्ञानार्क तत्क्षणीं तो त्याचे प्रकटीत पूर्ण हृदयनभीं. ॥ ८८
मग म्हणति, 'याच गांवीं नांदे आणुनि कलत्र पुत्रातें.' ।

---

१. शहाणा. २. दिव्य शरीर. ३. मदन. ४. नक्षत्रसमुदायांत. ५. तदा+आभाळ. ६. वस्त्राची घाण. ७. अंधाराला. ८. तत्+शिरावरते. ९. राजे.

शिष्या **गुरु**वचन असें होय करुनि दिव्य तद्वपु त्रातें. ॥ ८९
**गु**र्वाज्ञे द्विज आणुनि पुत्र स्त्री त्याच गांवि नांदे तो, ।
करिता **गुरु**पदभक्ती इच्छित, तप केलियाविना, देतो. ॥ ९०
**रा**मात्मजसुत म्हणुनी **गुरु**च्या प्रेमाश्रुसिंचित पदातें, ।
गुरुपदसेवेसम तें इच्छित मनिंचें नसेचि तप दातें. ॥ ९१

---

## अध्याय अठ्ठाविसावा.[1]

शिष्य नमुनि **सिद्ध** गुरुसि वदे त्यजुनि सकळ काळजी तो कीं, ।
'पुरविसि मेंदाळ,[2] जैसी जननि पुरवि ध्यावि आळ जी तोकीं.[3] ॥ १
करुणाब्धी तूं, उपमा मातेची योग्य धरिलियास तुला, ।
परि साम्यतेस न पुरति माता, गुण तेहि धरिलियास तुला.[4] ॥ २
तरि मत्पूर्वज सेवा श्री**गुरु**ची कैसि करिति सांग मसीं, ।
तोचि श्रीगुरु तूं मज ताराया येसि, मानसा[5] गमसी. ॥ ३
शिष्याची वचनोक्ती ऐकुनि असि डोलवीत गुरु मान, ।
बोले 'तूं धन्य' म्हणे 'होइल तुज सर्व लोकिं गुरु मान.[6] ॥ ४
सांगेन कथन सर्वहि जरि करुनी एकचित्त आइकसी, ।
म्हणउनि तत्पृष्ठीं तो कुरवाळी शिशुस जेंवि आइ कसी. ॥ ५
त्वत्पूर्वज जो होता **सा**यंदेवाऽभिधान तें ज्याला, ।
तो दर्शनास ये श्री**गुरु**च्या ऐकोनि कीर्तितेज्याला. ॥ ६
साष्टांग नमुनि ठेवी तो शिरपद्म **गुरु**पदअमृतजातें,[7] ।
आनंद होय जैसा स्वर्गीं मिळत गुरुपद अमृत ज्यातें. ॥ ७
श्री**गुरु**, जवळि तयातें बैसवुनी, पुसति सर्व सुक्षेम, ।
मग तो सांगे वृत तें प्रेमें आणोनि नेत्रिं सुक्षेम.[8] ॥ ८
'तुमच्या कृपेंकरुनि **गुरु**! असति सुखी सकळ पुत्र दाराही, ।
आतां पदसेवा द्या' म्हणुनि उभा जुळुनि करपदा राही. ॥ ९
श्री**गुरु**सेवा करितां तारक ती होय भवनिधीमाजी, ।
म्हणुनि[9] उदास अहर्निशि रहावया होय भवनिं धी माजी. ॥ १०

---

१. यांत मुळांतील अध्याय ४१ मधील कथाभाग आहे. २. माझा हट्ट. ३. मुलानें. ४. तराजू. ५. (माझ्या) मनाला वाटतें. ६. मोठा मान. ७. अमृतज=कमल. ८. पाणी. ९. म्हणुनि भवनिं (घरीं) रहावया माजी धी (बुद्धि) अहर्निशि उदास होय.

विटलों गृहदारसुता करितां संसार यातना ज्या मी, ।
भवसिंधुचें तराया, सेविन पद केलि योजना, ज्यामी.[1]' ॥ ११
श्रीगुरु म्हणती 'अस्मत्सेवा हो परम बहुत अवघड ती, ।
वसतों बहुतैक वनीं तेथें सेवा तुला कसी घडती ?' ॥ १२
विप्र म्हणे, 'मज देतें भवसिंधूचें अमोप देर[2] जामी[3], ।
सेवा करीन तुमची निर्भय सेवोनि हो पदरजा मी. ॥ १३
अमलकसी[4] गुरुसेवा गुरुजी! संसारसौख्य गाजरसें[5], ।
वेश्येचें मुखमंडण देखुनि भुलिजेत जेंवि मद्यरसें. ॥ १४
आधिं कडु मग गोडचि लागतसे गाइचें अजी मूत, ।
पावनहि करि तसी गुरुसेवा सरितांसि जेंवि जीमूत[6]. ॥ १५
संसारिं दुःख मोठें गर्भासी[7] जेंवि कामधामासी[8], ।
गुंडाळुनि दारसुतीं व्यर्थ मरे, जेंवि कां मधा मासी[9]. ॥ १६
आतां बहु काय वदों गुरुसेवेचा महा महीं[10] महिमा, ।
ज्ञानार्क प्रकटुनि ह्रदिं नाशी अज्ञान पाप हीमहिमा[11]. ॥ १७
निश्चय केला चित्तें तव चरणांची करीन सेवा हो, ।
गुरु! तव कृपाघनानें मद्देहीं दुरित जें असें वाहो.' ॥ १८
श्रीगुरु म्हणती, 'असला निश्चय तव चित्तिं रे! जरि तसाच, ।
तरि धरुनि भाव राहें मत्सेवा पूर्ण तूं करित साच.' ॥ १९
राहे मग गुरुपासी सेवा पूर्वज तुझा करुनि भावें, ।
चित्तिं म्हणे, 'निर्विघ्नें गुरुपद सेवे सदा मन निभावें.' ॥ २०
बहुदिन सेवा करितां त्याचें श्रीगुरु पहावयास मन, ।
सकळहि शिष्ये वारुनि, घेउनि तो करिति संगमीं गमन. ॥ २१
वसती अश्वत्थातळिं तों गेला मित्र अस्तअद्रीतें, ।
होय निशी तों उठविति अनिळ[12] बहुत आणि मस्त अद्रीतें[13]. ॥ २२
घन मुसळधारि वर्षे, विजा बहुत एकदांचि कडकडती, ।

१. संसारसमुद्राचें पाणी. २. भय. ३. पाणी. ४. आवळ्यासारखी. म्हणजे प्रथम तुरट पण मागून गोड. ५. गाजरासारखी. प्रथम गोड पण मागाहून कडवट. 'आवळा खाऊन पाणी पिऊन माहेरीं जावें आणि गाजर खाऊन पाणी पिऊन सासरीं जावें' ही म्हणही याच कारणामुळें पडली आहे. ६. मेघ. ७. गर्भवासांत. ८. गृहकृत्यांत. ९. माशी. १०. पृथ्वीवर. ११. थंडी आणि रात्र. १२. वारे. १३. मेघाला.

कडकड कडकड मोडुनि बहु वातें उन्मळोनि तरु पडती. ॥ २३
पर्जन्य वात सकळ स्वांगें सोसोनि तो सुविप्रवर, ।
श्रीगुरुसी आश्रय करि वस्त्र धरुनि तोचि शिष्य विप्रवर.[1]' ॥ २४
आश्रय जो त्रिजगासी, पट आश्रय करुनि ते दिनोद्धारा, ।
सेवा द्विज करि भावें, मग राहे थोर घन अन्नोद्धारा (?). ॥ २५
घन मंदमंद वर्षे, लागत मग शीत बहु भिजोनि पट, ।
न दिसे कांहीं नेत्रीं, पडिला तो अंधकार जो निपट. ॥ २६
गुरु म्हणती, 'शीतें बहु पावे मत्कंप घेतसे काया, ।
तूं जाऊनि ग्रामीं त्वरिताणी[2] सत्तहात[3] सेकाया.' ॥ २७
घेउनि ये त्वरिताग्नी, जा घरिं गा! अंतरीं नको पाहूं, ।
दक्षिणउत्तर पार्श्वीं सहसा मार्गांतरीं नको पाहूं.' ॥ २८
गुरुआज्ञा होतांचि द्विज तो आणावयास अग्न निघे, ।
न दिसेचि अंधकारीं तडित्प्रभेनेंचि धाव म्हणउनि घे. ॥ २९
विद्युत्प्रभावकाशीं[4] धांवत येऊनि विप्र वेशींत, ।
'द्या अग्नि' म्हणे द्वारीं दूत तया 'गुरुसि लागलें शीत.' ॥ ३०
ऐकुनि विप्रमुखींचा वृतांत देऊनि लक्ष कानीं तो, ।
घालोनि अग्नि भांजनिं[5] दिधला मग वेसरक्षकांनीं[6] तो. ॥ ३१
घेऊनि द्विज अग्नी सत्वर मग गुरुपदा नमुनि घे तो, ।
लखलख करि विद्युत्तत्प्रभावकाशीं पथ क्रमुं निघे तो. ॥ ३२
जातां पथीं म्हणे, 'गुरु म्हणे नको पाहु उभय पार्श्व मज, ।
परि मी न पाहिं जरि तरि त्याचा कैसा पडेल मज समज. ॥ ३३
म्हणउनि पाहे जों तों देखुनि पादोदरांसि पां दचके, ।
जातां पळत भियोनी क्षितिवरि टाकावयासि पाद चुके[11]. ॥ ३४
पार्श्वीं धांवत येती पंचफणांकीत सर्प ते उभय, ।
श्रीगुरुचें स्मरण करुनि विप्र म्हणे, 'चित्त मन्न[12] पाउ भय. ॥' ३५
चालत जातां मार्गीं दूरुनि पाहे गुरुस्वरूपासी, ।
लखलख दिसती दीप ज्योति सहस्रावधी गुरूपासी. ॥ ३६

१. फार बुद्धिमान्. २. त्वरित+आणी. ३. अग्नि. ४. उजेडाच्या अवकाशांत. ५. भांड्यांत. ६. गांवाच्या वेशीचें रक्षण करणारांनीं. ७. अग्नी. ८. बाजू. ९. सर्पांस. १०. पादपूरक अव्यय. ११. चुके, भूल पडे. १२. मत् (माझे)+न.

भूसुर असंख्य दिसती वेदध्वनि कानिं विप्र ऐकतसे, ।
धांवत ये जवळीं तों **गु**रु दिसती पूर्विं जेंवि एक तसे. ॥ ३७
तों घनमंडळ उडुनी प्रकटुनि शशि सकळही उडे तम तें, ।
कुमतें उडती, जैसीं सकळहि वेदांतशुद्ध शास्त्रमतें. ॥ ३८
ठेवी द्विज **गु**रुपदिं शिर तों **गु**रु पाहोनि कंप देहातें, ।
'कां भ्यालासि' म्हणे 'गा! न भीं म्हणुनि धरुनि अभय दे हातें. ॥ ३९
पथिं रक्षाया अम्हीं पाठविले दोन उरग[1] गा! तूतें, ।
चालति रक्षीते तुज तव दक्षिण वामभाग गातूतें[2]. ॥ ४०
तों येउनि श्री**गु**रुपद वंदुनियां जाति ते निघुनि भोगी[1], ।
**गु**रु म्हणती, 'मत्संगति बहुत कठिण कष्ट हे द्विज! न भोगीं. ॥ ४१
गुरुसेवा कठिण परम होय अधीरा नरा असोसवती[3], ।
सोसवती ज्याला गुरुभजनीं ज्याची मती असो सवती.' ॥ ४२
विप्र म्हणे, 'भवतारक! तव सेवा करिन मन्मनिं असोसी[4], ।
करिं तूं **गु**रो! समर्था तव चरणीं मन्मती दृढ असोसी[5].' ॥ ४३
**गु**रु म्हणती, 'तुज सांगिन इतिहास परंतु आदि सप्तकर[6] ।
शीत हराया सत्वर काष्ठें घालोनियां प्रदीप्त कर. ॥ ४४
केला प्रदीप्त वन्ही, मग म्हणती **गु**रु, 'मनीं असा दर[7] हो! ।
न धरीं, गुरुसेवेचें आइक कथन न मनीं असादर[8] हो. ॥ ४५
सांगेन उषःकालापर्यंत कथा, असे महद्दोषा[9], ।
नाशी श्रवणें सकळ ब्रह्मघ्नादिक असे महद्दोषा. ॥ ४६
**गि**रिजा प्रश्न करि **शि**वा, 'कैसें गुरुभक्तिचें जि महिमान, ।
म्हणती सद्गुरुभजनें पावति सच्छिष्य जें त्रिमहि[10] मान. ॥ ४७
ते सांग मज सुसेवा सद्गुरुची कोण करि पुराऽचरण[11]?' ।
म्हणउनि **गि**रिजा भावें वंदुनि विनवीत **शं**करा चरण. ॥ ४८
**गि**रिजेच्या प्रश्नासी यापरि ऐकोनि मित्र[12] वैश्रवण, ।
सांगेन म्हणे, 'सुकथा देउनि मन **शै**लजे[13]! करीं श्रवण. ॥ ४९
होता **वि**ध्यवतार **त्व**ष्ट्र **ब्र**ह्मा तयास सुकुमार[14] ।
जाला लावण्यें अति तेजस्वी दिव्यरूप सुकुमार[15]. ॥ ५०

१. सर्प. २. जमिनीवर. ३. न सोसण्यासारखी. ४. इच्छा. ५. राहील अशी. ६. अग्नि. ७. भय. ८. विमुख. ९. दोषा (रात्र) महत् (मोठी) असे. १० तीन्ही लोकांत. ११. पुरा (पूर्वी)+आचरण. १२. कुबेराचा मित्र, शंकर. १३. पार्वती. १४. नाजूक. १५. सुपुत्र.

अष्टम वर्षीं त्वष्टब्रह्मा बांधूनि मुंज तनयाची, ।
विद्याभ्यासा गुरुघरिं ठेवोनि म्हणे, 'करा जतन याची.' ॥ ९१

लागे श्रीगुरुची मग भावार्थें करुनि बाळक सुसेवा, ।
न श्रीगुरुवरि भक्षण मिळतां तो काय बाळक रुसे वा? ॥ ९२

असतां बहुदिन यापरि सेवा तो करित बाळ गुरुजवळ, ।
अद्भुत एके दिवसीं वर्षे तो बहुत माहराज [1]वेळ. ॥ ९३

तेणें धब धब गुरुची गळुनि चिखल होय पर्णशाला ती, ।
श्रीगुरु मग चित्तिं म्हणे, 'काय करूं युक्ति मी अशाला ती?' ॥ ९४

मग दृढ करावयासी गृह सांगे शिष्य बाळ जो त्यातें, ।
'घालुनि पाषाण' म्हणे 'घोटुनि आणीं [2]सुढाळ [3]जोत्यांतें. ॥ ९५

व्हावें जीर्ण न कधिंही भंगावें नच असें गृह करावें, ।
शीघ्र निघें साहित्या, घे शंकरपुत्रनाम [4]अँकरावें.' ॥ ९६

तों 'आण' म्हणे त्यातें '[5]कंचुकि मजला' गुरूचिही [6]रमणी, ।
'न शिविलि विणिलि असावी तेजस्वी दिव्य जेंवि [7]हीरमणी.' ॥ ९७

तों गुरुपुत्र म्हणे, 'गा! आणीं तूं दिव्य पादुका मजला, ।
[8]नेती तरुनि निधीच्या ऐशा त्या, लागल्यास काम, जला. ॥ ९८

जेथें चिंतीं तेथें नेती, लागों नये तयां मळही, ।
[9]पादप्रमाण ऐशा व्हाव्या न न्यून अधिक अंमळही. ॥ ९९

जैसे हरिभक्त पुरे साधू, [10]तद्बुद्धि मळविनाचि खल, ।
तैशा चिखलावरिही असणें त्या लागल्या विना चिखल.' ॥ ६०

तों गुरुकन्या बोले, 'मजला घरकूल एक रे! आणीं, ।
[11]सकणाइती असावी त्यामाजी, ऐक सांगत्यें आणी. ॥ ६१

हेमांकित रत्नजडित तेथें लखलखित जेंवि रविकीर्ण, ।
[12]एकस्तंभी ऐसें न तुटे, न फुटे, न होय कधिं जीर्ण. ॥ ६२

इच्छामात्रें व्हावें दीर्घ लघु त्वरित तें सुघरकूल, ।
कल्पिन तेथें यावें [13]मांजि असावेंहि सर्व अनुकूल. ॥ ६३

---

१. मेघ. २. सुंदर, चांगला आकार. ३. जोतें=पायावरील दगडांची मांडणी. ४. गणपति (?) ५. चोळी. ६. पत्नी. ७. हिरा. ८. काम लागल्यास, निधीच्या जला तरुनि नेती ऐशा त्या (पादुका). ९. पायाबरोबर. १० खल तद्बुद्धि मळविनाचि. ११. सकण+आइती (शिजविण्याचे पदार्थ). १२. एकसंधी, बिनजोडाचें. १३. आंत, घरकुलांत.

भांडीं आणीं ऐशीं केल्यासी पाक उष्ण वा शीत, ।
व्हावें न अन्न, लागों नयेचि भांड्यासि कृष्ण[1] वा शीत.[2]' ॥ ६४
यापरि गुरुदारासुतकन्या तीं त्यास सकळ काजा[3] गा ! ।
सांगुनि म्हणती, 'लावीं वेळ न, ये त्वरित बाळका ! जा गा !' ॥ ६५
अंगीकारुनि कार्या गुर्वाज्ञा शिष्य मग नमुनि घेची, ।
गुरुकार्यार्थ क्षोणी सागरवलयांकित भ्रमुं निघेची. ॥ ६६
मार्गीं जातां चिंता प्राप्त तया होय फार अपरमित, ।
'केंवि घडे कार्य' म्हणे गुरुनाम स्मरत तो पथ क्रमित. ॥ ६७
'काय करूं' चित्तिं म्हणे 'श्रीगुरुचें कार्य हें कसें घडतें, ।
बाळक मी काय कळे मज जें इंद्रादिकांसि अवघड तें. ॥ ६८
पत्रावळ न कराया ये मज हें काज केंवि येईल ? ।
ऐकेना जरि गुरुचें तरि तो मज दीर्घ शाप देईल.' ॥ ६९
झाँज[4] फुटोनि पडे नर जैशा त्या सिंधुच्या वनां[5] तशि रे ! ।
जाली गति शिष्या, मग गुरुनाम स्मरत तो वनांत शिरे. ॥ ७०
'वेचीन' म्हणे 'प्राणा गुरुच्या कार्यार्थ' शिष्य, यापरि तो, ।
चिंता करि बहु, जातां गुरुभजनध्यास मनिं तया परि तो. ॥ ७१
कोण मिळे ऐसा हा चिंतामळ मज करोनि अव[6] धूत[7], ।
जातां यापरि चिंती वनिं भेटे त्यास एक अवधूत. ॥ ७२
पाहुनि अवधूत, तया साष्टांगीं करित बाळ नमनातें, ।
आश्वासुनि मग तो त्या पुसत असे सर्व वर्तमानातें. ॥ ७३
'कोठील ? कोण ? कोठें जासि वनीं ? धरिसि चित्तिं न भया तूं, ।
हिंडति वनचर येथें व्याघ्र, करी, केसरी, शरभ, यातू[8]. ॥ ७४
ऐशा वनांत हिंडसि, इच्छा चित्तांत काय बोल असे ?' ।
सांगे मग बाळ तया स्ववृतांत तदैकतांचि[9] बोल असे. ॥ ७५
जें जें गुरुगुरुदारासुतकन्येनें समस्त मागितलें, ।
तें तें आद्यंत तया अवधूता वर्तमान सांगितलें. ॥ ७६
साष्टांगीं नमुनि पुन्हा 'येउ' म्हणे चित्तिं 'मत्कृपा यातें, ।
सांगा काय करुं ?' म्हणे 'अवधूत दयानिधे ! उपायातें. ॥ ७७
वाटे व्हाल श्रीगुरु तुम्हीच आलां धरूनि रूपा हे, ।

---

१. काळें, काजळ. २. अन्न. ३. कामाला, काम. ४. जहाज. ५. पाण्यांत. ६. रक्षण. ७. धुतलेला, स्वच्छ. ८. भूत, राक्षस. ९. तत् (त्या अवधूताचे)+ऐकतांचि.

केली कृपा मजवरी आतां कैसें करूं निरूपा हें?' ॥ ७८
अवधूत म्हणे त्यातें, 'चिंता कां करिसि तूं अशाला गा![१] ।
होय सकळ काज तुझें तुजला सांगेन मी अशा लागा. ॥ ७९
नवखंड क्षिति म्हणती परंतु काशी असे दशम खंड, ।
तेथें श्रीविश्वेश्वर आहे दाता अभेद शमखंड. ॥ ८०
जा घे तद्दर्शन तूं, क्षेत्रीं करिं मग समस्त यात्रा त्या, ।
मग कार्य करीं विनवुनि भावेंचि, म्हणुनि नमस्तया त्राया. ॥ ८१
आनंदकानन असें नाम असे क्षेत्रराज त्याला हें, ।
तेथें जाउनि यात्रा करुनि असें, सर्व काज त्या लाहे. ॥ ८२
सकळ क्षितितीर्थांची काशी करि विष्णुतनुज वा! खाणी, ।
तेथील पुण्यमहिमा एकमुखें कोण मनुज वाखाणी? ॥ ८३
होण्यासि कार्यसिद्धी नाहिं दुजा त्वष्टृनंदना! जागा, ।
आतां शीघ्र निघोनी बाळा! आनंदकानना जा गा!' ॥ ८४
बोले मग तो बाळक पुनरपि साष्टांग करुनि नमनासी, ।
'हे अवधूत! दयार्णव! आज्ञा करिं बोल आणुन मनासी. ॥ ८५
कोठें आहे काशी म्हणतां आनंदकानन जियेतें? ।
बाळक मी मज न कळे कैसें मत्कार्य घडुनि अजि येतें? ॥ ८६
न्या म्हणुं तुम्हासि जरि तरि निकड असेलचि तुम्हां स्वकाजाची, ।
कैसें करुं माझ्या हे चिंता मनिं योगिनायका! जाची. ॥ ८७
तूंचि श्रीगुरु माझा. कैशी मज बुद्धि याउपर देशी? ।
बाळक मी, तुज माझी या करुणा पूर्ण ये उपर देशीं.' ॥ ८८
बाळसुशब्दें लागे त्याचें आनंदडोल घेउं शिर, ।
मग तो बाळासि म्हणे, 'नेइन तुज; न करिं, चल निघें, उशिर. ॥ ८९
श्रीकाशिनाथ त्याचें तुझिया संगति घडो सुदर्शन तें, ।
जें कां छेदी अघनग दैत्यशिरा जेंवि हरिसुदर्शन तें. ॥ ९०
यापरता अम्हासी कांहिं दुजा लाभ नाहिं आणिक रे! ।
बाळासि मनोवेगें मग तो काशीस धरुनि आणि करें. ॥ ९१
श्रीविश्वनाथसन्मुख नेउनि तो बाळ गा! उभा केला, ।

१. सांगा. २. उपायास. ३. सुखाचा तुकडा. ४. नमः=नमस्कार. ५. प्राप्त होतें. ६. ब्रह्मदेव. ७. त्रास देते. ८. या परक्या स्थळीं. ९. त्याचें शिर आनंदडोल (आनंदानें हालणें) घेऊं लागे.

बाळ म्हणे, 'यात्रा मज करवाया योगि गाउ[1] भाकेला.' ॥ ९२
योगि म्हणे, 'यात्राऽतां करिं बाळा चित्तिं भाव[2] सद्धरुनी.' ।
बाळ म्हणे, 'न कळे मज सांगुनि नेणार तूंचि उद्धरुनी. ॥ ९३
केल्यासि अंगिकारा सागर वडवानळा न तो टाकी, ।
दाखवितां मज यात्रा हे गुरु होईल तव न तोटा कीं.' ॥ ९४
मग सकळ **का**शियात्रा अवधूत तया करोनि अव दावी, ।
बाळ करी सद्भावें पसरेल ग्रंथ ते जरि वदावी. ॥ ९५
करितांचि **का**शियात्रा **वि**श्वेश्वर देतसे तया वर तो, ।
ईश्वरवरदें करुनी सकळायिति[3] बाळ करित यावर तो. ॥ ९६
तेथेंचि गुप्त जाला मग तो अवधूत योगिराज मुनी, ।
आला मग गुरुदेशा तो बाळक **वि**श्वनाथपद नमुनी. ॥ ९७
घर, चोळि, पादुका, घरकूलादिक सकळवस्तु मिळवोनी, ।
अर्पोनि गुरुसि, गुरुचे पत्निसुताकन्यके नमि लवोनी. ॥ ९८
पाहोनि सकळ वस्तू बोलति आनंद होउनी सकळां, ।
'तोषविलें अम्हां त्वां जैंवि[4] चकोरेंदु उगवुनी सकळा.' ॥ ९९
वर दे गुरु, 'तव कीर्ती गाती जों भ्रमण गगनिं शशिसूर्या, ।
होशील चतुर **वि**धिवत् दीर्घायू' गुरुचि वदत अशि सूर्या[5]. ॥ १००
वर देउनि सद्गुरुनें विद्वज्जनिं शिष्य मान्य केला तो, ।
गेला मग नमुनि गुरुस गुरुदारापुत्रकन्यकेला तो. ॥ १०१
यापरि गुरुभक्तकथा **उ**मेसि सांगे अपूर्व **शं**कर जो, ।
त्वत्पूर्वजासि सांगे श्री**गुरु** भक्तासि सर्व शंकर[6] जो. ॥ १०२
त्वत्पूर्वज **गुरु**सि म्हणे, 'घडलें वाटे जि ! मन्मनास हित, ।
कथिली यात्रा जेव्हां होतों **का**शींत मी तुम्हांसहित. ॥ १०३
पडिला स्वप्नचि किंवा साच दिसे हा पडे न समज मला, ।
जालों भ्रांतचि हृदयीं शंकांधःकार तमचिसम जमला. ॥ १०४
देवाधिदेव **गुरु**जी ! दयाघना तूंचि भक्तभवना[7] गा ! ।
धरुनी **ह**रिरूप गुरो ! विदारिसी तूंचि भक्त भवनागा[8].' ॥ १०५
**गुरु** म्हणती त्यास, 'तुला दाखविली सत्य **का**शियात्रा ते.' ।

---

१. भाकेला गाउ=वचन देवो. २. सत् भाव धरुनी. ३. सकल+आयिति=सर्व सामान. ४. जैंवि सकळा (पूर्ण) इंदु उगवुनि चकोर (तोषवी). ५. वाणी. ६. कल्याणदायक. ७. भक्तभवन=भक्तांचें घर, आश्रयस्थान. ८. संसाररूप हत्तीस.

यापरि जाले श्रीगुरु तव पूर्वज भक्त जो तया त्राते. ॥ १०६
तव पूर्वजासि म्हणती, 'होसी तूं पूर्ण भक्त पैं साच, ।
पुत्र वडील तुझा जो तोही होईल भक्त ऐसाच. ॥ १०७
दीर्घायू तोचि असे, लक्ष्मी तद्गृहिं निशंक रावेल, ।
मोठा प्रियकर मज तो, आवडतो जेंवि शंकरा बेल. ॥ १०८
म्लेंच्छाचा [१]संगाऽतां सोडुनि दारा सुतासि घेऊनी, ।
येऊनि याच गांवीं नांदें हरिपायिं चित्त ठेऊनी. ॥ १०९
आणिक होतील तुला सत्पुत्र गुणी तुझ्या दुज्या जाये, ।
नांदें या ग्रामिं सुखें स्त्रीपुत्रां घेउनी द्विजा! जा ये.' ॥ ११०
गुर्वाज्ञे आणाया गेला तो विप्र सुतकलत्रास, ।
केला दूर जयाचा गुरुंनीं संसारिकहि सकल त्रास. ॥ १११
आनंदें भेटुनियां विप्र म्हणे तो स्वदारकुमरांसी, ।
अस्मच्छ्रीगुरु आहे गाणगपुरिं जोहि पूज्य अमरांसी. ॥ ११२
जावें अम्हीं त्याचे पदभेटीलागिं आजि सर्वांनीं, ।
वारंवार श्रीगुरुकीर्ती न पडे मनीं विसर वानी[२]. ॥ ११३
श्रीगुरुचरणीं घाली मग आणुनि सकल पूत[३] दारा ही, ।
साष्टांगीं नमुनि उभा सन्मुख जोडोनि कर तदा राही. ॥ ११४
आरंभिली स्तुती मग 'जयजय गुरुजी! दयासमुद्रा! हे ।
भाळीं हृदीं सदा मी गुरु तव वंदीन पादमुद्रा हे. ॥ ११५
त्वच्चरणदर्शनासी येती दारादि सर्व गा! पूत[४], ।
होती अघ जाउनि, तव दर्शनमात्रेंचि सर्वगा पूत[४]. ॥ ११६
कल्पद्रुम शशिगंगादर्शन दारिद्र, ताप, अघ नाशी, ।
त्रयही गुरु! तव दर्शन; उडवि जसा चंड मारुत घनाशी. ॥ ११७
श्रीगुरुजी! त्वद्दर्शन नाशि कसें दैन्यपापतापाला, ।
जैसा दावानळ तो जाळितसे शुष्क तापतां पाला. ॥ ११८
त्वत्पदसेवनिं सुकृतांकुर वाढति जेंवि वश्विनाथ (?) कला, !
गुणविह्रुभेदन[५] करितां शेषहि होतो यशस्वि नां[६] थकला. ॥ ११९
अवतरसी श्रीहरि! तूं जाणे खुण भारतीत्रिविक्रम तो, ।
ईशहि होसी, दाविसि वधोनि चोरासि नेत्रिं विक्रम[७] तो. ॥ १२०

---

१. संग+आतां. २. वर्णन कर. ३. पूत=पुत्र. ४. पवित्र. ५. गुणांच्या व्यूहाचें भेदन=सर्व गुणांचें वर्णन. ६. नाहीं. ७ प्रभाव.

ब्रह्मा तूंचि अमृतजलकमंडलु धरुनि हस्तक विराजे, ।
प्रोक्षण करितां उठती प्रेतें वर्णिति समस्त कविराजे. ॥ १२१

ऐसा त्रैमूर्ती तूं अवतरसी, त्वत्पदाब्ज जे धरुनी, ।
भजती, त्यांतें इच्छित इह देउनि अंतिं नेसि उद्धरुनी. ॥ १२२

जेंवि चकोरा इंदू करुणेचा सिंधु होतसे सित[1] सा, ।
श्रीगुरु दयाघना! तूं भक्तजनासी सदैव होसि तसा. ॥ १२३

प्रत्यक्ष देखिलें म्यां दवडिसि त्या विप्रउदरतिडिकेला, ।
[2]शांत यवन दुष्ट तया मनिंची दवडोनि सर्व तिडि[3] केला.[2]' ॥ १२४

संतोषोनि श्रीगुरु देती स्नानासि मग तयाऽज्ञा ती, ।
म्हणती, 'ये द्रुत[4] आजी, पूजिति मदनंत[5] सकल या ज्ञाती[6]. ॥ १२५

तूंही पूजन करिं रे! करिती जन थोर थोर हें जेंवी, ।
पंक्तीस मौंझियाजी ब्राह्मण घेउनि समग्र हे जेवीं.' ॥ १२६

संगमिं करुनि स्नान द्विज दारा पुत्र सहित मग येत, ।
पूजी गुरुपद जैसे पूजिति विष्णुपद उत्तम गयेंत. ॥ १२७

सिद्ध म्हणे, 'गा शिष्या! यापरि गुरुची अनेक लीला हे, ।
करिती जे श्रवणासी त्यां पाहुनि भीति बहुत कलिला हे.' ॥ १२८

रामात्मजपुत्रासी गुरुभजनावांचुनी क्षण गमेना, ।
मग मेना गुरुकीर्ती वार्णी धनाढ्या जसी भणग मेना. ॥ १२९

---

## अध्याय [8]एकोणतिसावा.

सिद्ध यतींद्रा नमुनी शिष्य म्हणे, 'गुरुचरित्र स[9]र्गसुधा ।
व[10]सुधामर मी मज तूं प्राशवुनी दाखविं ज्ञ[11]मार्ग सु[12]धा. ॥ १

प्राशन करितां अमृता जाली तृप्ति न कधींहि ते विबुधा, ।
गुरुचरितामृतपानें मजला तृप्तिहि कधीं न तेंवि बुधा.' ॥ २

सिद्ध म्हणे, 'संसारीं तप्त असे जो भवाग्नतापानें, ।
होई शीतळ नर तो शिष्य! [13]श्रीगुरुकथामृतापानें. ॥ ३

---

१. स्वच्छ, शुभ्र असा. २. शांत केला. ३. तीड, वांकडेपणा. ४. लवकर. ५. माझा अनंत, कां श्रीमदनंत? ६. लोक. ७. आजी, आज. ८. या अध्यायांत मुळांतील ४३ व्या अध्यायांतील कथाभाग आहे. ९. स्वर्गसुधा(?) १०. ब्राह्मण. ११. जाणत्यांचा मार्ग. १२. चांगला. १३. श्रीगुरूच्या कथामृताच्या प्राशनानें.

श्रीगुरुकथामृताहुनि सहसा शिष्या नसे सुधा मधुर, ।
स्वल्पहि भवाग्निचा दे लागुं न, दे[1] हरिपदीं सुधाम, धुर[2]. ॥ ४
अज्ञानांध जनासी ज्ञानांजन[3] गुरुकथा शलाका ही, ।
राहि न कधिंहि श्रवणें ज्ञानस्वी[4] अप्रकाशला कांहीं. ॥ ५
न दिसे गुरुचरिताविण पुरवाया ज्ञानहेतें[5] माहिं माते, ।
महिमा तो ज्ञानरवी उडवी अज्ञान[6] हे तम हिमा ते. ॥ ६
श्रवणें धनधान्य बहुत जन्मवरी संपती अगात्र[7] पुरे, ।
गांव पुरें नेच्छिति ते, श्रीहरिसम पावती अगा वपु[8] रे ! ॥ ७
जोडे यश तें निर्मळ, शुद्ध शशी मित्र तोकें[9] ! सादर हो, ।
दरं[10] हो न भवाचा तुज, श्रीगुरुचें चरित ऐक, सादर हो. ॥ ८
सायंदेव द्विज गुरुआज्ञे आणुनि कलत्रपुत्रासी, ।
श्रीगुरुचे पदिं घाली या पुढिले ऐक गा ! चरित्रासी. ॥ ९
ते दिवसीं भाद्रपदी शुक्लचतुर्दशि तिथीस माध्यान्हीं, ।
द्विजगण अनंतपूजा करिती लावूनि चित्त तद्ध्यानीं. ॥ १०
सायंदेवा श्रीगुरु म्हणती, 'पूजन अनंत तूंहि करीं, ।
भवकरि विदारितो हरि, भावें तूं आजि पूजिं गा ! स्वकरीं.' ॥ ११
विप्र म्हणे गुरुसी, 'श्रीमदनंताची किमर्थ पूजा मी ।
करणें? सांग सुधारस मिळतां प्यावें कशासि हो!' जामी[11] ? ॥ १२
देवादिदेव गुरु तूं, नाहीं तुझिया समान दाता कीं, ।
प्रतिदिवसीं पय पीतो, न धरी रुचि मर्त्य तो कदा ताकीं.' ॥ १३
श्रीगुरु म्हणति, 'अनंतव्रत हें सर्व व्रतांत थोर असे, ।
इच्छित मर्त्यमनींचें देणारें व्रत नसेच अन्य असें. ॥ १४
पावे राज्य युधिष्ठिर या मदनंतव्रतप्रभावानें.' ।
ऐकुनि पुसे गुरूसी तो सायंदेव विप्र भावानें. ॥ १५
'पंडुसुतांऽसंते[12] राज्य प्राप्ताणिक राज्य कोठिल तयांस ?' ।
श्रीगुरु म्हणती, 'जिंकिति कौरव ते द्यूतिं पंडुसुत यांस. ॥ १६
द्यूता खेळुनि, कौरव राज्यश्री हरुनि, पंडुपुत्रांस ।

---

१. हरिपदीं सुधाम (सुस्थळ) दे. २. हें 'लागुं न दे' याचें कर्म. ३. ज्ञानांजनशलाका=ज्ञान रूपी अंजन घालण्याची काडी. ४. ज्ञानेच्छू. ५. हेत=हेतू. ६. अज्ञान हें [च कोणी] तम (अंधार) [आणि] हिमा (थंडीला). ७. अगाऊ, अगोदर. ८. शरीर. ९. मुला ! १०. भीति. ११. उदक. १२. असत, होतें.

दवडुनि वनवासातें, नानापरि देति खल बहु त्रास. ॥ १७
भोगिति कष्ट बहु वनीं परिधानें वल्कलें अजिनवास[1], ।
बारा वर्षें यापरि भोगिति भार्येसहीत वनवास. ॥ १८
नानाव्रत तीर्थेंही करितां अतिकष्ट होत देहातें, ।
स्मरती श्रीकृष्णा, मग येउनि आश्वासनासि दे[2] हातें. ॥ १९
श्रीकृष्णासी पाहुनि जायेसह सर्व करिति नमनासी, ।
म्हणती, 'कृपानिधे! हे आणिसि कां भक्तकष्ट न मनासी?' ॥ २०
षोडश उपचारेंसी पूजुनि कृष्णासि हात जोडोनी, ।
बोलति पांचहि पांडव मग करुणावचनिं भीड सोडोनी. ॥ २१
म्हणती, 'हे करुणाघन! कां वळशि न भक्तचातकाला या, ।
त्वन्नामघोष घेतां देशि कसे कष्ट बहुत काला या? ॥ २२
भक्तांचा पालक तूं असतां भोगूं अरण्यवासा हे, ।
आतां कृपा करावी न दुःख वनवास माधवा! साहे. ॥ २३
जननि, जनक, इष्ट, सुहृद अम्हांसी सत्य तूंचि सर्व हरी! ।
सर्व हरीं दुःखास्मत्तृषितश्रम जेंवि शीत सर्व हरी. ॥ २४
येई स्वराज्य हाता कांहिं अशा सांग जी! उपायातें, ।
आतां न सोसवे हे कष्ट प्रभु! शीर्ष ठेवुं पायातें. ॥ २५
देवादिदेव तूं प्रभु तुजवांचुन कोण गा! अजा! तारी?' ।
ऐकुनि कृष्ण म्हणे, 'व्रत तुजला सांगेन गा! अ[3]जातारी! ॥ २६
नाम अनंतव्रत जें आचरतां नाशि कष्ट पापाही, ।
इच्छित मनिंचें पुरवुनि अनंत जो, करुनि तो कृपा, पाही. ॥ २७
करितां हें व्रत धर्मा! स्वराज्य पावूनि शत्रु पुं[4]सशील, ।
सांगेन ऐक जरि रे! अनंत तो कोण हेंच पुसशील. ॥ २८
मीच अनंत असें रे! जाला खलभार भूं[5] बहुत राया! ।
माराया त्या दुष्टां अवतरलों भूमिभार उतराया. ॥ २९
धर्मा! व्रत हें करिं तूं न पडे अ[6]ज्ञातिं शत्रुला उ[7]मग, ।
पावोनि राज्य शकसी देशधडी अखिल शत्रु ला[8]वुं मग! ॥ ३०
धर्म म्हणे, 'श्रीकृष्णा! कवण दिनीं मी करूं व्रताचरण, ।
पूर्वीं कोण करी हें सांग.' म्हणुनि धरि पुनः पुन्हा चरण. ॥ ३१

---

१. मृगचर्म हेंच वस्त्र. २. कर्ता 'तो कृष्ण' अध्याहृत. ३. धर्मा! ४. पुसून काढशील, नाहींसे करशील. ५. पृथ्वीवर. ६. अज्ञातवासांत. ७. ओळख. ८. लावुं शकसी.

कृष्ण म्हणे, 'धर्मा! व्रत करि पूर्वीं कोण पुससि गा तूतें, ।
तरि आद्यंतकथा ती विस्तर सांगेन ऐक गा! तूतें. ॥ ३२
होता पूर्वीं एक द्विज सत्ययुगीं सुमंत नामानें, ।
संपन्न वेदशास्त्रें ज्याचें वच सर्वही जना मानें. ॥ ३३
भृगुऋषिकन्या दीक्षा भार्या ती त्या सुमंतविप्राची, ।
पातिव्रत्यपणें गृह शोभवि उदयीं जशी रवि प्राची. ॥ ३४
कन्या एक बहुगुणी जाली निर्माण तत्कुशीला ते, ।
शीला नाम तियेतें करणीहि तशी नव्हे कुशीला ते. ॥ ३५
भार्याकन्यासह तो नांदत असतां स्वकर्म आचरुनी, ।
प्राक्कर्में तद्भार्या स्वर्गसदन पावली सती मरुनी. ॥ ३६
स्मार्तादिकर्म राहे आणि नसे नारि गेहकृत्यातें, ।
म्हणउनि पुनर्विवाहा करितां स्त्री निघत जेंवि कृत्या ते. ॥ ३७
कर्कशि नाम तियेचें समजेना सुकृत, हीत, पाप तिला; ।
चालुं न दे सत्कर्मा, करूं न दे सुकृतही तपा पतिला. ॥ ३८
भांडे कन्या पतिसी, विप्र म्हणे, 'कोण होति वैरी ही! ।
आली पापिण मद्गृहिं, काळमुखीं मजहि अंति वैरी ही. ॥ ३९
धड गेहकृत्य न करी, करी तिचें आवडे मनाला जें.' ।
खिन्नमनें सौमंत द्विज मुख दावावया जना लाजे. ॥ ४०
रंजवि पितृमन शीला स्वच्छ करुनि भिंति, सारवुनि कुंदर, ।
पंचसुरंगें रेखी हरिमूर्ति धृतगदांबुजारिदर. ॥ ४१
उपवर जाली कन्या, वरचिंता प्राप्त मनिं पित्याला ते, ।
एक दिनीं कौंडण्यद्विज गृहिं येतांचि अर्पि त्याला ते. ॥ ४२
कन्यादान यथाविधि करोनि जामात राहवी गेहा; ।
कन्येसि म्हणे, 'स्त्रीसी बोलुं नको नेम वागवीं गे! हा.' ॥ ४३
बोले न च जरि कन्या तरि कर्कशिनें उगेंच भांडावें, ।
ऐकुनि कौंडण्य विटे, चित्तिं म्हणे, 'श्वशुरगेह सांडावें.' ॥ ४४
कौंडण्य द्विज मग तो विनवी जोडोनि हस्त मामास, ।

१. पृथ्वीवर. २. पूर्वदिशा. ३. त्यांच्या पोटीं. ४. वाईट, दुष्ट. ५. दुसरी बायको. ६. अवदसा. ७. टाकी. ८. घर. ९. पांच सुंदर रंगांनीं. १०. धृत+गदा+अंबुज+अरि (चक्र—सुदर्शन) +दर (शंख). ११. सासऱ्यास.

'जाऊं आतां स्वगृहा जाले संपूर्ण दोन कीं मास.' ॥ ४५

ऐकुनि जामातवचन चित्तीं दुःखानळें तडपडे तो, ।
चिंतानळकुंडतटीं[1] असतां द्विज ढासळुन तॆड[2] पडे तो. ॥ ४६

बोले दुःखें, 'कन्या जातां उँद्वस[3] दिसेल हें शॆर्म[4], ।
पडली कपाळीं माझे स्त्री कर्कशि हे पुरारि! हे शॆर्म[5]. ॥ ४७

आतां माझी करुणा नाहिंच येणार कर्कशीला हे, ।
लाहेन दुःख पीडा कर्कशिपासोनि ऐक शीला! हे.' ॥ ४८

शांतविती तद्दुःखा शीला कौंडण्य, मग उभयतां तीं ।
म्हणती, 'या कर्कशिचें द्यावें चित्तीं न येउ भय तातीं[6]. ॥ ४९

जवळचि आहे आश्रम, वरिचेवरि घेउं हो! समाचार, ।
असतां एक घरीं द्वय गृहाश्रमी बुडत धर्म आचार.' ॥ ५०

त्यास सुमंत म्हणे तो, 'राहा आणीक दिवस बारा हो! ।
प्रस्थान तुम्हीं करणें त्रयोदशिस, आज गमन बा! राहो.' ॥ ५१

तातविनंती ऐकुनि विनवी भर्त्यास मग सुशीलाही, ।
'विनती ताताचि' म्हणे 'ऐकावी आज तूं सुशीला! ही.' ॥ ५२

कौंडण्य द्विज मग तो पाहुनियां श्वशुरमानसा हेतो, ।
राहे तो; मग कर्कशिदुर्वच पाहे न, मान साहे तो. ॥ ५३

दिन राहुनि मग बारा प्रस्थान करी त्रयोदशीला ते, ।
शीला स्त्री रथिं बसवुनि निघे दुजे दिनिं चतुर्दशीला ते. ॥ ५४

शीला कौंडण्य मुनी निघती जेव्हां सुमंतपद नमुनी, ।
जामातासि म्हणे तो, 'आतां कधिं दाविशील वदन मुनी! ॥ ५५

लोपामुद्रानुसुया तसि मद्दुहिता द्विजोत्तमा! मानीं.' ।
कौंडण्य म्हणे, 'काळजि करणें तिळमात्रही न मामांनीं.' ॥ ५६

सौमंत म्हणे स्त्रीसी, 'हे कन्या जातसे स्वँकृत्तीतें[7], ।
भोजनसामोग्री दे मार्गीं पुरेसी' वदे सॅकृत्तीतें[8]. ॥ ५७

पतिवच ऐकुनि कर्कशि अतिकोपें फिरवि गरगरा बुबळें, ।
'नेदीं मी कांहिं' म्हणे 'तुम्हीं जरी केलियाहि कंबु[9] बळें.' ॥ ५८

बोलुनि असें गृहातें जाउनि ती घट्ट लावित द्वारें, ।

---

१. चिंतारूप अग्निकुंडाच्या कांठाला. २. कांठ. ३. उदास. ४. घर. ५. शरम, लाज. ६. वडिलांनीं. ७. आपल्या घरीं. ८. सकृत्(पुनःपुनः)+तीतें. ९. शंख.

धर्मा! कन्या पतिसी बोले आंतूनि अद्वतद्वा[1] रे! ॥ ५९
विनवी सुमंत तिजला, 'न करिं असें, उघडिं तूं कपाटा[2] कीं, ।
ऐकें स्त्री गे! गुण[3] हे, मजवरि तूं करुनियां कृपा, टाकीं.' ॥ ६०
नुघडीच कांहिं केल्या द्वारा ती देत मात्र गालीला,[4] ।
सौमंत म्हणे, 'शिव! शिव! हे ऐशी तुझिच काय गा! लीला?'॥ ६१
बोले मग हो! कन्या, 'जाउं असिच' धरुनि तातहातातें, ।
'मूर्ख स्त्रीसीं ऐसा आग्रह करणें नकोच हा तातें.' ॥ ६२
तेव्हां सुमंतनामा नेत्रांतुनि गाळि टपटपा पूर्ण,[5] ।
होउनि मग खिन्न मनीं, शोधितसे पाकगेह संपूर्ण. ॥ ६३
गोधूम सपिठिचा तो कोंडा त्या पाकगेहिं सांपडला, ।
देउनि कन्येसि म्हणे, 'प्रसंग कर्कशिसिं हा कसा पडला! ॥ ६४
कैंतें[6] व्रतराजादिग्रंथ कवी वदति कर्कशी देती, ।
चित्रक वादिं भिंतीच्या[7] परि असि गुरुची उप द्विनवदेती (?)' ॥ ६५
श्वशुरनिरोपा घेउनि सस्त्री कौंडण्य मग रथीं बसला, ।
मार्गें जातां लोकां सरती जो शंबरारिसा[8] दिसला. ॥ ६६
पाहुनि निर्मळ सरिता मार्गिं म्हणे स्त्रीस, 'नद्यतीरा[9] हे ।
स्नान अनुष्ठान करिन तोंवरि तूं स्वस्थ या रथीं राहें.' ॥ ६७
स्नान करुनि मुनि बसला करित अनुष्ठान नद्यतीराशीं, ।
बैसे रथीं सुशीला सत्वगुणाचीच पूर्ण ती राशी. ॥ ६८
त्या काळीं नद्यतटीं दिव्य स्त्रीगण तिला दिसे दूर, ।
स्नान करुनि पीतांबर नेसति आरक्त जेंवि सेंदूर. ॥ ६९
मांडुनि कलश अनंता पूजित मग बैसती धरुनि ओंळी,[10] ।
त्यांजवळी हळुहळु मनिं धैर्या शीला सती धरुनि आली. ॥ ७०
'करितां हें काय तुम्ही?' नमुनि तयां म्हणत तेधवां शीला. ।
त्या म्हणती 'बैस' तिला, ऐकुनि मंजूळ नम्र वांशीला.[11] ॥ ७१
श्रीमदनंतव्रत हें आचरतां इच्छिलें मनां सर्व ।
पुरवुनि अंतीं स्वपदीं स्थापी तो तोषुनी मनीं सर्व.[12] ॥ ७२

---

१. अद्वातद्वा, वाटेल तसें. २. दार. ३. दुर्गुण. ४. शिव्या. ५. पाणी. ६. 'करिं ते' पाठांतर. ७. 'भीतीच्या' पाठांतर. ह्या पाठांतरांनींही ह्या गीतीचा अर्थ विशद होत नाहीं. ८. शंबरारि=मदन. ९. ह्या. १०. ओळ. ११.(शीलेच्या) वाणीला. १२. विष्णु.

म्हणशिल कवण दिनीं हें व्रत करणें ऐक भाद्रपदमासीं, ।
शुक्लचतुर्दशि तिथिसी अर्चावानंत धरुनि नियमासी. ॥ ७३
दृढ रक्तरेशिमाचा चतुर्दशग्रंथियुक्त दोरा तो ।
करुनी अनंतनामें पूजावा ऐक विधिहि सारा तो. ॥ ७४
रेशीम दोरक वदें[1], वाटे शंका जरी मनीं तरि ती, ।
ऐका श्रोतेजन हो! बोले कवि जे व्रतार्क त्यांतरिं[2] ती. ॥ ७५
दोरक दृढ सूत्राचा करोनि द्याव्या चतुर्दश ग्रंथी, ।
कुंकुमिं शोभित करणें, वदे कवि असें व्रतार्क त्या ग्रंथीं. ॥ ७६
माझ्या मनिं वाटे त्या कविनें केला नसेल शोध मनीं, ।
कैशावरुनि जरि म्हणा तरि न तशी गुरुचि कां वदे धमनी[3]? ॥ ७७
देवत्व रेशिमातें वर्षैकचि सूत्रिं चार मास असे, ।
म्हणवोनि रेशिमाचा दोरक गुरुराज सांगतीच असें. ॥ ७८
आतां ऐका सादर शीलेला विधि अनंत पूजाया ।
सन्निध बैसवुनी त्या प्रीतीनें सांगती ऋषीजाया. ॥ ७९
प्रातःकाळिं उठोनी, शौच करुनि, होउनी शुचिर्भूत, ।
पुष्पें मिळवुनि, करणें स्नाना मग पाहुनी शुचिर्भूतें. ॥ ८०
गंगा यमुना म्हणुनी आणावे भरुनि दोन कलशांला, ।
स्वच्छ असावी निर्मळ सारवुनी आपली सकळ शाला[5]. ॥ ८१
काढुनि सुरंगवेली[6], घालुनियां मध्यभागिं तंडुल ते, ।
वरि पद्म काढणें तें ज्यातें पाहोनि होति जन डुलते. ॥ ८२
ठेवावा त्या पद्मीं यमुनेच्या चिंत्ति कल्पिला घट जो, ।
स्मरुनि अनंता म्हणणें, 'ने उतरुनि मज भवाब्धि दुर्घट जो.' ॥ ८३
इच्छित संकल्प करुनि अनंतपूजार्थ गांग[7] कुंभास, ।
पूजुनि मग यमुनेसह ध्यावें चित्तांत पद्मनाभास. ॥ ८४
पिंगट नयन चतुर्भुज धृतदरअंबुजगदासुदर्शन तें ।
नभवर्णरूप ध्यावें जैसें प्रत्यक्ष होयि दर्शन तें. ॥ ८५
वैणव[8] पात्रीं तंडुल घालुनि रेखुनि सुरेख जलजातें[9], ।
घालुनि सुगंध शोभित करणें ते म्हणति अष्टदल ज्यातें. ॥ ८६

१. (मी) बोलें (म्हणून). २. त्या अंतरिं=व्रतार्क ग्रंथांत. ३. वाणी. ४. जल. ५. गृह. ६. रंगवेली=रांगोळी. ७. गंगेच्या पाण्यानें भरलेल्या. ८. वेणूचा, कळकाचा. ९. कमलाला.

षोडश उपचारेंसी पूजुनि यमुनेसि आम्रपत्रासी, ।
घालुनि ठेवावें वरि रेखित जें पद्म वेणुपात्रासी. ॥ ८७
दर्भअही[1] सप्तफणी पूजावा वेणुपात्रकमलातें, ।
प्रक्षाळावें उदकीं त्या मग मदनंतदोरकमलातें. ॥ ८८
पंचामृतादि घालुनि अभिषेकुनि पुसुनि फणिवरा, वर तो ।
ठेवुनि मग पूजावा नाना उपचारिं इंदिरावर[2] तो. ॥ ८९
सौगंधचंदनादि द्रव्यें परिमळ सुगंध जीं सुमनें[3], ।
अर्पोनि धूपदीपा सुअन्न नैवेद्य अर्पिजे सुमनें. ॥ ९०
तांबूल, दक्षिणा फल अर्पुनि पंचारती सुदीपातें, ।
मंत्रकुसुम[4] अर्पावें नेत्राचें लावुनी पदीं पातें. ॥ ९१
'जय शेषशायि!' म्हणउनि साष्टांगें मग करोनि नमनातें, ।
प्रार्थावें, मग ध्यावा दोरक संतोष होउन मनातें.॥ ९२
बांधावा दक्षिण करिं पुंसें[5], नारीस उक्त तो डावा, ।
सोडावा करिंचा मग दोरक जो जीर्ण तो, न तोडावा. ॥ ९३
पूजुनि यथाविधीनें द्विजां अपूपफलवायनाशीं[6] त्या ।
द्यावें; श्रीहरि मनिंचें पुरवुनिही भवभयास नाशी त्या. ॥ ९४
भोजन करणें मग हो ! सांगुनि दंपत्य भोजनाशी तें, ।
हरिकीर्तन ऐकावें पूजुनि हरिभक्त भोजनाशीतें[7]. ॥ ९५
यापरि चवदा वर्षें व्रत करणें धरुनि भावभक्तीतें, ।
अतिउल्हासें करणें उद्यापन मग यथानशक्तीतें[8]. ॥ ९६
श्रीमदनंतकथा तुज सांगितली गोड ही कशी लागे, ।
देऊं व्रत आजचि हें अम्ही म्हणउनि स्वतोक तुजला गे!' ॥ ९७
दोरक देउनि तिजला आणवुनी दोन घट वपू[9] जें तें, ।
पूजाद्रव्यें देउनि करविति मदनंतदेवपूजेतें. ॥ ९८
गोधूम कोंडियाचें दे वायन दोर बांधुनि स्वकरा, ।
ऋषिपत्न्यांसि मग म्हणे, 'येत्यें आतां जि! बाइ! लोभ करा.' ॥ ९९
ऋषिपत्न्यांसि नमोनी शीला आली रथाजवळि मग ती, ।

---

१. दर्भांचा केलेला सर्प. २. विष्णु. ३. पुष्पें. ४. मंत्रपुष्प. ५. पुरुषानें. ६. अपूप (घारगे, अनारसे वगैरे) (व) फल (यांच्या) वायनाशी (वाणाला). ७. भोजन आणि शीत (उदक) यांनीं. ८. ऐपतीप्रमाणें. ९. पाणी.

आला तों पति, मग तीं निघती बैसुनि रथांत शीघ्रगति. ॥ १००
येतां स्वपुरीजवळी पाहुनि अमरावतीसमान पुरी, ।
स्त्रीस म्हणे, 'स्वपुरीची वाट चुकें मज भुली पडोन [1]पुरी. ॥ १०१
आले सामोरे तों ग्रामींचे चारवर्णि जे प्रमुख, ।
पाहति मदनंतव्रतपुण्यें तेजस्वि, दिव्य [2]विप्रमुख. ॥ १०२
नमन करुनि मग म्हणती, 'तापसि न दुजा मुनी तुजसमान.' ।
नेती ग्रामिं तया मग वाद्यरवा करुनि बहुत सन्मान. ॥ १०३
तद्ग्रामींचा अधिपति करुनि तया मानिती तदाज्ञा ते, ।
पातिव्रत्यपणातें शीलेच्या वर्णिती तदा ज्ञाते. ॥ १०४
मिळुनि जमेदार सकळ आणुनि करभार बहु धना देती, ।
भोगित ऐश्वर्यसुखा हर्षे शीला समर्तृ नांदे ती. ॥ १०५
कांहीं दिन यापरि ते जातां एकांतिं नारिचे हाता ।
जाला कौंडण्यमुनी [3]लोहित मदनंतदोर पाहाता. ॥ १०६
'[4]वैश्यकरण करिसि करीं बांधुनि दोरक' म्हणे स्वनारीस, ।
'परि मी न होय लंपट [5]शंबरारी काय करि [6]वनारीस.' ॥ १०७
'मदनंत वश्य केला भावें' शीला सती म्हणे पतिला, ।
'बांधीं दोरक करिं मी म्हणोनियां भोगितां जि! संपतिला.' ॥ १०८
ज्ञानी परि तो कोपे, चावी कर कर, न [7]शांतवे, दांत. ।
दोरक हिरोनि घेउनि टाकी तत्काळ [8]जातवेदांत. ॥ १०९
स्त्रीस म्हणे मग, 'कैंचा अनंत? मी बहु तपा तपोनि करीं, ।
त्या पुण्यें ऐश्वर्या भोगी' कोपें असें वदे [9]निकरीं. ॥ ११०
शीला तत्क्षणिं काढी वन्हींतुनि दोर करुनि 'हा! हा! जी!' ।
पय शिंपुनि पतिस म्हणे, 'घडला अपराध कीं महा हा जी!' ॥ १११
त्या कौंडण्यमुनीनें दोरक तो घालितांचि [10]अनळातें ।
कोपे हरि मग, मुनिसी जाली कसि मग गती जसि नळातें. ॥ ११२
जाले अरि सर्वहि ते पूर्वीं जे थोर थोर [11]मानवते, ।
संपति नेति लुटोनि ग्रामींचे सर्व मिळुनि मानव ते. ॥ ११३
पश्चात्तापें मग म्हणे मुनि तो कीं, 'मी धरोनि [12]दुर्धीतें, ।

---

१. पूर्ण. २. कौंडण्य ब्राह्मणाचें मुख. ३. तांबडा. ४. वशीकरण, चेटुक. ५. मदन. ६. मारुतीस. ७. शांत होई. ८. अग्नींत. ९. रागाच्या आवेशानें. १०. अग्नींत. ११. मान्य. १२. वाईट बुद्धीस.

ऐश्वर्य बुडविलें तें जाळुनि दोरक करोनि दुर्धीतें[1]. ॥ ११४
भेटे **अ**नंत तोंवरि आतां सोडोनि अन्नभुवना[2]सी, ।
सेविन वनासि.' म्हणुनी निघेच सोडोनि[3] अन्न भुवनासी. ॥ ११५
'हे **मद्**नं**ता**नंता!' घोष करित मुनि महावनांत शिरे, ।
**सी**ताविरहें **रा**मा गति जसि जाली नृपा[4]! द्विजा तशि रे! ॥ ११६
पाहे पुष्पफलांकित मार्गातें आम्रपादपासी तो, ।
'पाहसि काय **अ**नंता?' म्हणुनि पुसे मुनि तयाच पासीं तो. ॥ ११७
वृक्ष म्हणे, 'नच जाणें **अ**नंत मी, भेटला तुला जरि हो! ।
सांगोनि नमन माझें मदवस्था त्यास सांगता तरि हो. ॥ ११८
म्हणशिल काय अवस्था, तरि ऐकें, मनुज वानर द्विज ही ।
मत्फल भक्षी कोणि न, **ह**रिस करी विनति तूं नर द्विज ही.' ॥ ११९
पाहे पुढें सुधेनू सवत्स ती, पुढति एक वृषभास, ।
तोंडा नये तृण तया पुसे, 'पहा काय **प**द्मनाभास?' ॥ १२०
तीं म्हणती मग त्याला, '**अ**नंत अम्ही द्विजा न बा! पाहूं, ।
तुज भेटे तरि अस्मद्गति सांगें त्यास, म्हणचि बापा! हूं.' ॥ १२१
पुढती जातां पाहे विकसितपद्मा सु दोन वापींतें, ।
मिश्रिति परस्परें जळ परि तत्कोणीहि हो! न वां[5] पी तें. ॥ १२२
पुसतां मुनी '**अ**नंता नच पाहूं' म्हणति वापि काला[6] त्या, ।
'भेटे तुज जरि सांगें अस्मद्गति **मा**[7]धवा पिकाला त्या (?). ॥ १२३
जातां पुढें मुनी तो पाहे अतिमत्त गाढवाणि[8] करी[9], ।
'देखा काय **ह**रि तुम्ही?' म्हणुनि तयां प्रश्न गांढ[10] वाणि[11] करी. ॥ १२४
ते नच बोलति मग तो बाहि **ह**रिस करुनि दीर्घ जी वांशी[12], ।
'**मद्**नंतासि' म्हणे 'बा! जरि येशि न तूं त्यजीन जीवाशी. ॥ १२५
देवा! क्षमा करावी, मूर्खें अपराध मीं महा केला.' ।
पडिला धरणीं मूर्छित दीर्घस्वरीं मारितांचि हाकेला. ॥ १२६
वृद्धद्विजरूपें तों येउनि **ह**रि 'उठिं उठीं' म्हणे मुनिला, ।
सावध तत्क्षणिं करि तो स्वकरें घालोनियां तया अनिला[13]. ॥ १२७
मुनिसि म्हणे, '**मद्**नंता पुससी चल दावितों तदाश्रम तो.' ।

---

१. दुष्कर्मातें. २. भुवन=उदक. ३. भुवनासी अन्न (पाणी) सोडोनि=घरावर पाणी सोडून. ४. धर्मा. ५. जल. ६. त्या वेळीं. ७. विष्णूला. ८. गाढव+आणि. ९. हत्ती. १०. गंभीर. ११. वाणीनें. १२. वाणी, शब्द. १३. वाऱ्याला.

म्हणुनि तया दक्षिणकरिं धरुनि हरी सकळही तदाश्रम तो. ॥ १२८
वैकुंठासम नगरी द्विज दावी नेउनी मुनि गुहेंत, ।
प्रकटुनि अनंतरूपा दर्शन देऊनि पूर्ण करि हेत. ॥ १२९
पाहुनि कौंडण्य मुनी नयनजळें क्षाळुनी पदरजातें, ।
मनसुमनें पूजी, स्तव करि, शिर ठेवोनि चरणसरजातें[1]. ॥ १३०
'हे केशव! नारायण! माधव! गोविंद! हे हरी! कृष्णा!।
हे वासुदेव! पुरविशि दर्शन देऊनि सर्व मम तृष्णा. ॥ १३१
हे श्रीधर! विश्वंभर! हे अच्युत! विष्णु! हे क्षमासर्व[2], ।
मी पापि घातकी करिं, माझे अपराध हे क्षमा सर्व'. ॥ १३२
स्तुति ऐकोनि श्रीवर प्रसन्न होऊनि मुनिशिरावर तो ।
कर तो दक्षिण ठेवुनि, तयासि मग तीन देतसे वर तो. ॥ १३३
'दारिद्रनाश आणी स्वधर्मसंग्रह, निवास मल्लोकीं ।
अक्षय अंतीं, वर हे घे आणी श्रेष्ठ हो सकळ लोकीं.' ॥ १३४
सांगे मग हरिला जीं भेटति आम्रादि सर्व वाटेतें, ।
सांगुनि तद्वृत्त म्हणे, 'अति मज आश्चर्य चित्तिं वाटे तें. ॥ १३५
किंकर्मास्तव गति तीं पावति तसि सांग माधवा! मातें.' ।
श्रीहरि म्हणे, 'मुनी! तत्सर्वांचे ऐक पूर्व कर्मातें. ॥ १३६
पाहसि तरु जो होता ब्राह्मण षट्शास्त्रि तो चतुर्वेदी ।
गर्विष्ठ महाखळ तो विद्या शिष्यांसि कांहिं न निवेदी. ॥ १३७
त्या पापास्तव तरु तो जाला. तूं धेनु पाहसी मग ती, ।
निर्फळभूमी दाना दे म्हणुनी होय ते तसीच गती. ॥ १३८
वृष तो धनवंत द्विज न करि कधीं धर्म एक पैसाही, ।
यास्तव तयास घडुनी उपोषणचि नित्य दुःख पैं साही. ॥ १३९
वापी त्या द्वय भगिनी, परस्परें देति घेति दानातें; ।
म्हणउनि वापी होउनि चालविती पूर्वींचें सदा नातें. ॥ १४०
खर जो क्रोध तुझा तो, मत्त बहुत तो तुझाच मद हस्ती, ।
होतां मन शुद्ध तुला धरि होउनि वृद्ध विप्र मी हस्तीं[3]. ॥ १४१
केलीं मुक्त सकळ तीं, भोगीं ऐश्वर्यसौख्य आतां तें, ।
भोगीं स्वर्गसुखांतीं होइल तव कीर्ति दशहि आंतां[4] तें.' ॥ १४२
मग तो मुनि मदनंतव्रत करुनी बांधि दोरकास करीं, ।

---

१. चरणसरोज=पदकमल. २. क्षमासर्वस्व. ३. हातांत. ४. दिशांना.

भोगुनि ऐश्वर्यांतीं स्वर्गीं जाउनि अखंड वास करी. ॥ १४३
नरनारि चारि वर्षें करणें व्रत धरुनि भक्ति नियमातें, ।
इच्छी पावुनि मनिंचें पावति वैकुंठिं जिंकुनि यमातें. ॥ १४४
व्रतराज व्रत हें तूं' कृष्ण म्हणे 'धर्मराज! आइक रे! ।
करिं, पावसि राज्य.' असें सांगुनि कुरवाळि जेंवि आइ करें. ॥ १४५
श्रीगुरु सायंदेवा म्हणती, 'व्रत करुनि धर्मराजानें ।
जिंकुनि रिपु राज्यपदीं बैसुनि मग जिंकिली धरा ज्यानें. ॥ १४६
करितां व्रत हें भावें होई, शोषोनि भव, वपुत्रातें ।
करिं तूं भावें विप्रा! दे आणिक नागनाथपुत्रातें.' ॥ १४७
सायंदेव म्हणे, 'गुरु! अनंत तूं तव पदासि पूजिन मी,' ।
बोलुनि ऐसें चित्तीं अनंत भावुनि गुरूसि पूजि नमी. ॥ १४८
ब्राह्मणभोजन करुनी घेई गुरुपंक्तिच्या प्रसादास, ।
शिष्या! अभीष्ट पावुनि होउनि मग सेवि गुरुपदा दास. ॥ १४९
सेवा करीत गुरुची द्विज तो तद्ग्रामिं मग सदी[1] नांदे, ।
करुणासागर गुरु तो इच्छित, पद सेवितांचि, दीना दे. ॥ १५०
सांगति तृतीय कर्णीं (?) श्रीगुरु नरकेसरीसरस्वति[2] जे, ।
रामात्मज पुत्राची वर्णि कथा त्यासरी[3] सरस्वति[4] जे. ॥ १५१

---

## अध्याय तिसावा.[5]

साष्टांग नमुनि विनवी नामांकित शिष्यराज सिद्धासी ।
आनंदे, कैसा ज्या दुष्काळीं मिळत अमृतवद्घासी[6]. ॥ १
'केले उपकार' म्हणे 'अपार तूं मजवरी प्रसिद्ध गुरु[7]! ।
उतराई होउं कसा केवळ मी दीन विप्र सिद्धगुरु! ॥ २
श्रीगुरुच्या उपकारा कैसा होईल शिष्य उतराई ? ।
कनकाचळाहि न घडे, निधिर्चा[8] फिरवील काय उत[9] राई[10]? ॥ ३
श्रीगुरुसी उतराई व्हाया नाहीं पदार्थ दिविं[11] लोकीं[12], ।
म्हणउनि साष्टांग नमुनि सदैव गुरुजी! तुझे पद विलोकी.' ॥ ४

---

१. सर्वदा. २. नृसिंहसरस्वति. ३. त्याप्रमाणें. ४. वाणी. ५. या अध्यायांत मुळांतील ४४ व्या अध्यायांतील कथाभाग आहे. ६. अमृतवत्+घासी (अन्न). ७. मोठे. ८. समुद्राचा. ९. उतूं येणें. १०. मोहरी. ११. स्वर्गांत. १२. इहलोकीं.

मधुरोक्ती शिष्याची ऐकुनि गुरु डोलवीत [1]कंधर हो! ।
मग [2]धरवर त्यासि म्हणे मधुर वचनिं बोलवीत [3]कंधर हो. ॥ ५
'आतां नवलाव कथा आइक तूं पापहंति कानें ती, ।
केली सेवा **गुरु**च्या भाव धरुनि पार्थि [4]तंतिकानें ती. ॥ ६
तंतिक म्हणजे साळी जातीचा, जाण पटविणकरी तो, ।
अन्यत्र देवपूजन न कदां श्री**गुरु**पदाविण करी तो. ॥ ७
**गुरु**पदसेवा करितां तो, येतां माघमासयात्रा, त्या ।
निघती श्री**शै**लासी पाह्या **म**ल्लिकार्जुना तया त्राल्या. ॥ ८
त्यासंगतीं निघालीं तंतिकमातापिताभगिनिभाऊ, ।
तंतिक 'न जा' म्हणे 'मच्छ्री**गुरु**चि तुम्हासि [5]भवभगिं नि[6]भाऊ. ॥ ९
प्रत्यक्ष श्री**गुरु** हा त्रैमूर्तीचा असे जि! अवतारी, ।
पाषाणदर्शनासी कां जावें, हा करोनि [7]अव तारी. ॥ १०
**म**ल्लिकार्जुन जो तो हा श्री**गुरु** माझा मनांत जाणावा, ।
श्री**गुरु**भवन [8]**श्री**नग भाव दुजा मनिं कदा न आणावा.' ॥ ११
मातृ पिता म्हणती, 'तूं केवळ वेडाचि मूर्ख होशि [9]खर, ।
नाहीं जन्म पुन्हा रे! **श्री**गिरिचें देखतांचि हो! शिखर.' ॥ १२
म्हणती, 'चल सत्वर रे! यात्रा ग्रामींचि सर्वहि निघाली.' ।
'जावें' म्हणे 'तुम्ही; मी नये' नमस्कार तो म्हणुनि घाली. ॥ १३
तीं म्हणती, 'हा वेडा जालासे जेंवि होय [10]मद्यपिता.' ।
निघतीं जालीं मग तीं त्यजुनि तया भाउ. भगिनि, मातृ, पिता. ॥ १४
मासेक चालति पथा; हर्षें जन डुल्लती, [11]भंवर जाती ।
जैसे, तैसे; आली **श्री**नग जों पावती भवरजा ती. ॥ १५
मागें तंतिक सेवा श्री**गुरु**ची करि धरोनि भाव मनीं, ।
विषयीं विटे कसा तो न राहि कोणी जसा उभा वमनीं. ॥ १६
[12]तें ये जे दिवसीं श्री**गुरु** म्हणती तंतिकासि भीममहिमा, ।
'गेलास कां न यात्रे? श्री**शै**लाचा अपार भू महिमा.' ॥ १७

---

१. मान. २. ब्राह्मण. ३. कं (सुख)+धर (धारण करणारा), सुखी. ४. साळ्यानें. ५. संसाररूपी खड्ड्यांत, खळग्यांत. ६. पार करो, संभाळो. ७. रक्षण. ८. श्रीशैलपर्वत. ९. गाढव. १०. मद्य पिणारा. ११. गजश्रेष्ठ (?). १२. ते भीममहिमा (शिवरात्र) जे दिवसीं ये (ते दिवसीं) श्रीगुरु तंतिकासि म्हणती.

'श्रीगुरु! तव पाद मला श्रीमल्लिकार्जुन असे' म्हणुन येरू[१] ।
बोले 'कापुस मिळतां वाती आणा असें म्हणुं नये रू[२]. ॥ १८

टाकोनि दुग्ध जावें, यत्नें मिळवावया कशा कांजी? ।
भृगु[३] अथवा जीव[४]दशा असतां, इच्छावि शनि[५]दशा कां जी!? ॥ १९

ज्याला आश्रय तुझिया आहे अक्षय्य कर[६]पदगडाचा, ।
जाइल कशासि करुं तो आश्रय हो! छेदकरप[७] दगडाचा? ॥ २०

ऐश्वर्य सुरुप, असतां कोणाची कुरुप दे वदे वाचा, ।
पाषाणदर्शन कशा? दवडिसि तूं ताप देवदेवाचा[८]. ॥ २१

संपन्न सुरूप पती त्यजुन न इच्छयान[९] जे महासति ते.' ।
श्रीगुरु ऐकुनियां त्या भक्ताचे बोल नेम हांसति ते. ॥ २२

मग म्हणति, 'आज आहे मठांतहि, करुन वास, उपवास.' ।
म्हणुनि स्नाना संगमिं जाती घेऊन वास[१०] उपवास[११]. ॥ २३

तंतिकही स्नानासी गुरुसंगें क्षिप्र संगमा ये तो, ।
जिंकी हरिच्या[१२] धरुनी श्रीगुरुपदपद्मसंग माये तो. ॥ २४

माध्यान्हस्नानादि श्रीगुरु आटपिति जों स्वकर्माला, ।
तंतिक सुस्नान करुनि जप करि गुरुनाम धरुन करमाला[१३]. ॥ २५

मन लावुनि गुरुवचनीं तिष्ठे बक जेंवि करुनि आ टपत, ।
तों प्रहरद्वय होतां गुरुचें माध्यान्हकर्म आटपत. ॥ २६

मग म्हणति तंतिकातें, 'करावया श्रीगिरींद्रयात्रा ती ।
जाशिल, तरि होइल तुजवरि भीमा[१४] करुनियां दया त्राती'. ॥ २७

मागुति म्हणती, 'कधिं तरिं श्रीनग तूं पाहिलास होता कीं?' ।
येरु म्हणे, 'मिळतांऽमृत लागेल रुची कशास हो! ताकीं? ॥ २८

श्रीनग मल्लिकार्जुन मज हेचि असति, बहुत काय वदुं? पाय. ।
कर्तें भव ताराया नहि देव गुरु! तव पायिवदुपाय[१५].' ॥ २९

गुरु म्हणती, 'ये श्रीनग दाविन तुज धरुनि नेम गप[१६], हातें ।
धरिं पादुकांसि, झांकीं नयन, कुतुक तेंचि जें मग पहा तें.' ॥ ३०

---

१. दुसरा, तो तंतिक. २. कापुस वाती मिळतां रू आणा असें म्हणुं नये. ३. शुक्र. ४. गुरूची दशा. ५. शनीची दशा किंवा पीडा. ६. कर आणि पद हाच गड (किल्ला). ७. छेद करणाऱ्या (दगडांत) श्रेष्ठ अशा मोठ्या दगडाचा (आश्रय). ८. महादेवाचा. ९. इच्छि+आन (दुसरा). १०. वस्त्र. ११. उपवस्त्र. १२. परमेश्वराच्या. याचा संबंध 'माये'कडे. १३. हातांतील माळ. १४. मोठी. १५. पायवत्+उपाय. १६. न बोलतां.

धरितांचि पादुकांसी नेती **गुरु** करुनि मग चलन वेगा, ।
[1]**पा**ताळगांगतीरा उघडि नयन तों दिसे स्थळ नवें गा ! ॥ ३१
अवलोकी वेड्यापरि तंतिक तो तेधवांऽष्टही [2]व्योमा, ।
भ्रमलें मन, बाळ जसें भ्रमतें तें पाहतां [3]महीव्योमा. ॥ ३२
श्री**गुरु** म्हणती, 'कां रे! अवलोकिसि पूर्ण अष्ट [4]आतांतें, ।
जा स्नान करुनि पूजन **शि**वलिंगाचें करीं [5]सुं आतां तें.' ॥ ३३
**गु**र्वाज्ञा होतां तो क्षौरादिस्नान मग सुसंपादी, ।
पूजेसि निघे घेउनि गंधाक्षत पुष्प बिल्व [6]आपादी. ॥ ३४
तों त्यालागीं भेटति मार्गातें बंधु, भगिनि, [7]जनकाई, ।
स्वग्रामस्थहि भेटति; ऐक तया पुसति तेचि जन [8]काई. ॥ ३५
'केव्हां आलासि ? न कां भेटसि आम्हासि ? कां लपुनि येणें ।
करिसी ? काय मिळे गा ! ? येत असे मूर्खपण दिसुनि [9]'येणें.' ॥ ३६
येरु म्हणे, '**गु**रुसंगें आलों, लागे पथींहि न च पळ तें. ।
न च पळतें मन तैसें **गु**रुवेगासम, म्हणोनि न चपळ तें.' ॥ ३७
ते म्हणति, 'असत्य वदे, ये [10]लपतांम्हांसि लक्षुनि सर्वेचि.' ।
गेला मग तो [11]देवागारीं, त्यांसी न बोलुनि, [12]सवेंची. ॥ ३८
देवालयांतरीं तो अवलोकी करुनि लोप दर तातें (?) ।
**शि**वलिंग तया न दिसे **गु**रुचि दिसे श्री**गु**रूपदरता तें. ॥ ३९
मातृपितादि सकळ जन पूजिति **गु**रुपाद[13]जन्मजा हो ! ते, ।
पाहति दूरोनि यवन जे अतिशूद्रादि जन [14]मजा हो ते. ॥ ४०
करुनाश्चर्या तंतिक **गु**रुच्या पूजीत पाद[15]कंजाला, ।
मूर्तचि **शि**व **गु**रु म्हणउनि होय बहुत चित्तिं हर्षक (?) ज्याला. ॥ ४१
प्रेमाश्रु गळत टपटप घर्मांगीं गळत थबथबा, [16]हेरी ।
श्री**गु**रुमुख, मग आला होते **गु**रुनाथ जेथ बाहेरी. ॥ ४२
विनवी साष्टांग नमुनि ठेवुनि [17]शिरघृतज [18]अंघ्रिघृतजातें, ।
'जावें घृतार्णवीं कां गेहीं मिळतां यथेष्ट घृत [19]जातें ? ॥ ४३

१. पाताळगंगेच्या तीराला. २. दिशा. ३. पृथ्वी आणि आकाश यांना. ४. दिशांना. ५. हें **'पूजना'**चें विशेषण. ६. आप=पाणी. ७. जनक+आई. ८. काय. ९. या कुलानें. १०. आम्हासि **लक्षुनि सर्वेचि** (बरोबर) लपत ये. ११. देवालयांत. १२. लवकर. १३. जन्मज=जलज=कमल. १४. गमत. १५. कंज=कमल. १६. पाहे. १७. शिरकमल. १८. पदकमलावर. १९. ज्याला.

प्रत्यक्ष **शिव** श्रीगुरु तूं व्यापक असति सर्व घटिकांणी,[1] ।
असतां सन्निध येती महिमाऽधिक काय जी ईहठिकाणीं.[2] ॥ ४४

येथेंच येऊनि तुला पूजिति नर सर्व सांग कां आजी ? ।
प्राशाया महिमामृत माझे करितिल न कान कां आ जी !?' ॥ ४५

श्री**गुरु** म्हणती, 'आइक चित्त श्रवणीं न दे चुकों बहुत, ।
महिमाश्रवणें सुकृताग्नि करि समूळाघवृक्षकोंब[3] हुत.[4] ॥ ४६

हे माघशिवघृताचिस[5] घडिल्या **म**लिकार्जुनीं सुदर्शन तें, ।
पशुपक्ष्यादिक जरि अघ, संहरि रिपु जेंवि **ह**रिसुदर्शन तें. ॥ ४७

सांगेन यदर्थ कथा आइक चित्तांत, मान[6] विश्वास, ।
होय प्राप्ताघ[7] नाशुनि नृपतीचें शरिर मानवि[8] श्वास.[9] ॥ ४८

**दु**र्मर्षणनृप होता धर्मात्मा धीर शूरहि उदार, ।
**शं**भुहि पूजी परि करि अभक्ष्य भक्षोनि गमन[10] परदार.[10] ॥ ४९

प्रतिदिवसीं **शि**वपूजा करि हर्षें आलिया **शिं**ववृताची, ।
रुद्राभिषेक विप्रां करवि करी, धार धरि वरि घृताची. ॥ ५०

वाद्यध्वनि करि नाना, उजळी बहु दीप दीपमालाही, ।
आनंद फार चित्तीं **शि**वपूजन करुनि निरुपमा[11] लाही.[12] ॥ ५१

ऐसा नृप, तद्भार्या पतिव्रता, **दि**ति सुनाम हो ! तीतें; ।
परदारगमन पति करि पाहुनि चिंता करीत हो ती तें. ॥ ५२

साध्वी पतिव्रता ती, चित्तीं किंचित् हि ये न कोप तिला; ।
एक दिनीं विनवि, म्हणे, 'मद्वचनीं कोप धरुं नको' पतिला. ॥ ५३

'ईश्वरभक्ति करितसां तुम्हांस हो ! प्रश्न करिन सांगा मी, ।
भक्षां[13] अभक्ष्य तितुकें, आणिक परदार कां असां गामी. ॥ ५४

जडली भक्ति तुम्हांसी कोणेपरि सत्य म्हणत यांवरि[14] हो ! ।
सांगा' म्हणे मग तिला प्रश्नोत्तर देत नृप तयावर हो ! ॥ ५५

भूप म्हणे, 'गे ! जालें त्वत्प्रश्नें स्मरण पूर्वजन्माचें, ।
होय मन थंड जैसें करितां प्राशन अपूर्व जन्माचें.[15] ॥ ५६

प्राग्जन्मीं मी होतों श्वान **श्री**पर्वतीं वसोन असें, ।

---

१. घटिकां (घागरींत, भांड्यांत)+आणि. २. ह्या ठिकाणीं. ३. समूळ+अघवृक्षकोंब (पापवृक्षाचा कोंब). ४. दग्ध. ५. माघी शिवरात्रीस. ६. धर. ७. प्राप्त+अघ. ८. मनुष्याचें. ९. कुत्र्याला. १०. परस्त्रीगमन. ११. हें 'आनंदा'चें विशेषण. १२. मिळवी. १३. खातां. १४. शिवावर. १५. जलाचें.

तों माघी शिवरात्री ये पर्वाणिक[1] दुजें असे न असें. ॥ ५७
सर्वहि लोक मिळोनी जाती शिवपूजनासि हर्षानें, ।
जातां तेथें मी, मज माराया धांवती निकर्षानें[2]. ॥ ५८
मारिति म्हणवोनि त्रय वेळ शिवगृहासभोंवता फिरलों, ।
मृत्युभयें अतिवेगें श्रीशिवअंतरगृहांत मग शिरलों. ॥ ५९
तेथेंही ते शिरती निर्दय नर धट्ट जे खळ उदंड, ।
हाणुनि[3] मारिति जीवें मज मद्दिधलें न शीर्ख लउं दंड. ॥ ६०
त्या काळीं मी श्रीशिवपूजा बहुदीप आणि अविलोकीं, ।
या त्या पुण्येंकरुनी जालों मी भूप आणि कवि[4] लोकीं. ॥ ६१
दीपावलोकनें हें प्राप्तहि लावण्य वपुस मजला गे! ।
भक्षी अभक्ष जारहि कर्मीं हा श्वानगुण समज लागे. ॥ ६२
दृष्टी पडेल जें तें हुंगी हे गुण कसे त्यजील शुन[5], ।
मृगपदकेशरलेपें दुर्गंधी त्यजि न सत्य जी लशुन[6]. ॥ ६३
भक्षीं अभक्ष गे! मी परयुवतीसी असे रमे याचा ।
गुण तो आझोनि असे मजला प्राग्जन्म सारमेयाचा[7].' ॥ ६४
ऐसें ऐकुनि पुनरपि लागे ती नृपतिला विनउं दारा, ।
'सांग' म्हणे 'पूर्वीं मी होत्यें कोणुशिर[8] लाविं न उदारा! ॥ ६५
श्रीशिवकृपेंकरोनी ज्ञान तुम्हा, भूत भविष कळतें हो! ।
तरि मत्प्राक्कर्म वदा, होत्यें मी कोण जी! सकळ तें हो.' ॥ ६६
आयकुनी प्रश्न असा 'ऐक' म्हणे नृपति पूर्ण हो! तीस, ।
'होतिस कपोति[9], हिंडत करावया उदरपूर्ति होतीस. ॥ ६७
तों मांसगोळ देखसि सहसा भूमीस तूं जसा पडला, ।
उचलोनि घेसि वदनें तों, गृध्री पाहि, तूज सांपडला. ॥ ६८
कवळ हरायासाठीं लागे पाठीस ते तुझ्या घारी, ।
पळतां अतित्वरेनें जेव्हां तूं पाहसी न माघारीं. ॥ ६९
धांवत धांवत येसी श्रीनगमलिकार्जुनालया जवळ, ।
फेरे प्रदक्षिणेपरि घेसी त्रय धरुनियां मुखीं कवळ. ॥ ७०
भ्रमतां भ्रमतां पावुनि तूं बसतां[10] घारि चावि शिखरा गे! ।

१. पर्व+आणिक. २. हट्टानें. ३. मत् (माझें) शीर्खं (मस्तक) लउं न दिधलें, दंड हाणुनि जीवें मारिति. ४. शहाणा. ५. कुत्रा. ६. लसूण. ७. कुत्र्याचा. ८. कोण+उशिर. ९. पारवी. १०. शिखरावर वसली असतांना.

हाणी चंचुपुट कसें जेंवि महावीर [1]खर [2]विशिख रागें. ॥　　७१
मांसकवळ हरि धारी, दुष्टचि ते पाहि तेधवां नय न. ।
मग तूं द्वारीं पडसी पाहसि उघडुनि उमाधवा नयन. ॥　　७२
प्राणोत्क्रमणासमयीं विलोकिसी तूं उमेश, मदनारी, ।
त्या पुण्यास्तव माझी होसी पावोनि राज्यपद नारी.' ॥　　७३
हर्षुनि पुन्हाहि विनवी, चरणीं ठेवुनि शिर, भ्रतारा ती, ।
'श्रीशिव पूजीन' म्हणे त्या नृपशशिला निरभ्र तारा ती. ॥　　७४
'वाटे तुमचे आज्ञे पूजुनि शिवचरित मानसा गावें, ।
परि सत्य भविष्योत्तर तुमचें माझें पुढील सांगावें.' ॥　　७५
राजा म्हणे, 'प्रिये गे! होइन मी भूपती [3]जनन साहा, ।
होशीलचि तूं मत्स्त्री शिवदर्शन योग जाण [4]मनसा हा. ॥　　७६
होईन सार्वभौमचि या जन्मा धरुनि सातव्या जन्मीं, ।
षडरि विवेकें निववित, लोहॉर निववी जसा [5]तव्या [6]जन्मीं. ॥　　७७
जिंकोनि सर्व भूपति आनंदें करिन शतदश [7]क्रतुला, ।
मत्पुण्याची धरिल प्रत्यन्हीं बुद्धिमंद शक्र तुला. ॥　　७८
मत्सुकृतनाशनार्थीं शक्र करिल बहु उपाय जे कपटी, ।
जातील फुकट मग मी स्थापीन ज्येष्ठपुत्र राज्य[8]पटीं. ॥　　७९
होईन सद्गुरूचा सुमंत्र घेउनि करोनि जप दास, ।
अंतीं श्रीशिवसन्निध तुजसह पावेन हो! निजपदास.' ॥　　८०
गुरु म्हणति तंतिकातें, 'श्रीगिरिच्या ऐकिलेंस या महिम्या, ।
न क्षेत्र देखिलें गा! यासम सर्वहि विलोकितां महि म्यां. ॥　　८१
पावे शिवपद होउनि नृप सप्तहि जन्म दर्शनें शुन कीं, ।
पुसली सूतासि कथा नैमिषरानीं असेचि हे शुनकीं. ॥　　८२
तूं पूजितां स्वगांवीं कल्हेश्वर संगमेश्वराला हो! ।
मल्लिकार्जुन पूजाफळ पावसि घेऊनि तद्वराला हो.' ॥　　८३
तंतिक म्हणे, 'गुरो! या चाळवण्या व्यर्थ कासयास मज ।
दाविसि, तूंचि शिव असा काय नसे सेवकास या समज? ॥　　८४
गेलों तव आज्ञे मी शिवपूजेलागिं [9]शंभ्वगारास, ।

---

१. तीक्ष्ण. २. बाण. ३. जन्म. ४. मनानें. ५. तव्याला, तापलेल्या लोखंडाला. ६. पाण्यानें. ७. यज्ञ. ८. पट=वस्त्र, गादी. ९. शिवालयास.

केली तेथें पाहे, न लिंग, तुज पाहि हो! मगाऽरास.[1] ॥ ८५

कल्हेश संगमेश्वरपूजन मज सांगतोस कुतुकानें, ।

सर्वव्यापक तूं कीं' ऐसें ऐकोनि हंसति गुरु कानें. ॥ ८६

मग त्याकरवीं धरवुनि, झांकवुनी नयन, पादुका येती, ।

भीमासुसंगमीं तत् घालुनियां भूल जीव काये ती. ॥ ८७

होते ग्रामीं शोधित गुरुस नदीसहि सुभक्त कोणिकडे, ।

न दिसति म्हणउनि म्हणती, 'गेले न कळनचि आज कोणिकडे.' ॥ ८८

कोणी म्हणती, 'होता नदीतिरा,' कोणि म्हणति 'ते ग्रामीं, ।

कीं येथचि गुप्त असे, न दिसे घननाद जेंवि संग्रामीं.' ॥ ८९

आले सुसंगमीं तों गेला आदित्य अस्तआशेतें,[2] ।

गुरुभेटिच्या धरुनि जन होते ग्रामीं समस्त आशेतें. ॥ ९०

कोडें पडिलें भक्तां मोठें आश्चर्य चित्तिं वाटे तें, ।

तों येती भीमातटिं लागे नच एक पळहि वाटेतें.[3] ॥ ९१

श्रीगुरुसि म्हणे तंतिक, 'आतां आज्ञा जि! काय बोलावी,' ।

गुरु म्हणति, 'जा मठातें समस्त शिष्यांस येथ बोलावी.' ॥ ९२

तंतिक अतिवेगानें जाय गुणाचा[4] जसा सुटुनि रोपं,[5] ।

'बोलविती गुरु' म्हणउनि सांगे शिष्यासि तो पटु[6] निरोप. ॥ ९३

ते त्यास म्हणति, 'करिसी कां क्षौरा? वर्तमान गा! काय?' ।

येरु म्हणे, 'अजि गेला होता हा श्रीगिरीनगा काय.'[7] ॥ ९४

ते म्हणति, 'सत्य वद' तों 'पहा' म्हणे 'हा प्रसाद दवना[8] कीं. ।

गेलों गुरुपद धरुनी गुरुसम अनिला[9] हि नाहिं जंव[10] नाकीं.[11] ॥ ९५

आले जि! संगमीं गुरु, रात्रीं तेथेंचि संगती राहूं, ।

वेळ न लावा शीघ्रचि चला निघाऽतांचि गांगतीरा, हूं.' ॥ ९६

कोणी म्हणति, 'असत्यचि.' कांहीं जण म्हणति, 'हें दिसत साच, ।

गुरुची अगम्य करणी, भक्तहि हा जेंवि दैत्यसुतसा[12] च. ॥ ९७

हा पूर्ण भक्त ऐसें कळवाया पूर्ण सर्वशिष्यांतें, ।

निमिषांत नेउनी श्रीनगयात्रे आणिती निमिष्यातें. ॥ ९८

साक्षात परब्रह्मचि गुरु याची यासमान लीला हे, ।

---

१. मग+आरास (हें 'पाहे' याचें कर्म). २. आशा=दिशा. ३. मार्गांत. ४. (धनुष्याच्या) दोरीपासून. ५. बाण. ६. हुशार. ७. देह. ८. दवणा. ९. वाऱ्याला. १०. वेग. ११. आकाशांत. १२. प्रल्हादाप्रमाणें.

अक्षय सुख तो, सेवा भाव धरुनि ज्यास मानली, लाहे.' ॥ ९९
ऐसें बोलुनि सकळहि देती **गु**रुदर्शनास हो! धूम, ।
कों[1]कणदेशस्थ जसे ब्राह्मण ऐकोनि अन्न गो[2]धूम. ॥ १००
यात्रेकरु मासानें आले त्यांणींहि तेंच वृत कथिलें, ।
चिंतामणिसंगानें लाजविलें म्हणति कीं [3]अमृत कथिलें.' ॥ १०१
**सि**द्ध म्हणे, 'गा शिष्या! ऐशी **गु**रुची अपार हो! लीला, ।
पापाच्या श्रवणें करि आणि भवाब्धीहि पार [4]होलीला.' ॥ १०२
तोष बहुत **गु**रुभजनीं **ब**च्याजिसुत विप्र **प**रशुरामातें, ।
**गु**रुचरणीं होई रत, जैसा नर विषयपर [5]शुरामातें. ॥ १०३

---

## अध्याय [6]एकतिसावा.

शिष्य म्हणे, '**सि**द्धगुरो! ये ज्ञान श्रवण सद्गुणें आणी, ।
श्री**गु**रुचरित कथाही अमृताचे मधुरते उणें आणी. ॥ १
जों न श्रवण कथा तों पावति [7]यमचरकरें [8]धव [9]दंगा ते, ।
ऐकवि पुढें जि! सुकथा जे [10]दांति सुकृत अगाध, वद गा! ते.' ॥ २
**सि**द्ध म्हणे, 'ऐक पुढें करणारा श्रवण तूं [11]पटु कथा रे! ।
या नवल कथेचें मनिं, रसिकाला ये न झोंप [12]टुक; [13]थारे. ॥ ३
होता **नं**दीनामा द्विज, [14]तत्सितकुष्टि जाहला काय. ।
सांगावें तद्दुःखा, भोगी अतिकष्टि जाहला, काय? ॥ ४
**तु**ळजापुरासि जाउनि [15]तोंऽबाराधन करी त्रि[16]वत्सर तें, ।
परि तद्दुःख न जालें दूर कदां किमपि, लोक[17]वत्सरते. ॥ ५
स्वप्नांत म्हणे **अं**बा, 'जा दर्शन **चं**दळा सुभगवतिचें ।
घे, नाशील अघातें आराधन करि धरोनि भाव तिचें.' ॥ ६
श्री**चं**दळार्चनासी होतां दृष्टांत तो तसा आला, ।
[18]पसरि [19]वरा पदर सदां द्विज, चातक [20]अंबुदा जसा आला. ॥ ७

---

१. कोकणप्रांतांतील. २. गहूं. ३. सोनें. ४. होळीला. ५. शुरामातें, सुंदर स्त्रीशीं. ६. या अध्यायांत मुळांतील ४५ व्या अध्यायांतील कथाभाग आहे. ७. यमदूतांच्या हातानें. ८. मनुष्य. ९. नुकसान, नाश. १०. देणारी. ११. चतुर. १२. अल्प, थोडी. १३. जागा राहतो. १४. तत् काय (शरीर) सितकुष्टि (पांढऱ्या कोडाचा) जाहला. १५. तो+अंबा+आराधन. १६. तीन वर्षें. १७. लोक हे कोणी वत्स त्यांजवर प्रेम करणारी जी अंबा तिजकडून. १८. तोंड पसरणें. १९. वराकरितां. २०. मेघाला.

श्रीदेव्याराधन करि पुरश्चरण सप्त मास नंतर तो, ।
मासत्रय उपवास द्विज करि कधिं पडुं न देचि अंतर तो. ॥ ८
दशमासीं ते स्वप्नीं देवि म्हणे ब्राह्मणास, 'हो जागा. ।
जा गा! गाणगनगराऽसे जाया कुष्ट तेथ हो! जागा. ॥ ९
तेथें नृहरिसरस्वति आहे अवतार दत्तदेवाचा, ।
तो दवडिल अवकुष्टा' स्वप्नीं असि देविची वदे वाचा. ॥ १०
जागा होऊनि म्हणे, 'अंबे! तव कृत्य धन्य देवपण, ।
मद्व्याधीनाशवरा द्याया बहु जाहलीस तूं कृपण. ॥ ११
तुळजाजगजननि तिचा निरोप होतांचि तुजजवळि आलों, ।
श्रम घेउनि, 'जा' म्हणसी या वचनें अंतरीं बहु निवालों. ॥ १२
तव हातीं कांहिं नसे, 'जा' म्हणसी मनुजदर्शना मातें, ।
लाज नये कैसी तुज? बट्टा लागेल सत्य नामातें. ॥ १३
आतां होउ वरें वा जाऊ हा प्राण, नेम गे! हाची ।
केला निसंग होउनि, आस्था मी त्यजुनि देहगेहाची. ॥ १४
देईन जीव तुजवरि सत्यचि संशय न मानसीं धरणें.' ।
बसला द्वारीं देउनि तो द्विज बोलुनि वचें असीं धरणें[1]. ॥ १५
रात्रीं दृष्टांत करी देवी स्वप्नांत पूर्ववदगा! ती, ।
'जाचि' म्हणे भक्तासी, होऊं देईल कां भवदगा[2] ती? ॥ १६
तेथील भोपियांसी[3] अंबा दृष्टांत ती करि तसाच, ।
ते त्यास म्हणति, 'बैस न आतां उपवास तूं करित साच. ॥ १७
दवडूं तुज धरुनि करीं, करिसी जरि तूं असाचि हा निकर, ।
या कर्में तुज कोपें देवी होईल साचि हानिकर. ॥ १८
अम्हासि देविआज्ञा आहे बाहेर कर धरुनि घाला.' ।
ऐकुनि ऐसें द्विज मग अंबा पूजोनि सत्वर निघाला. ॥ १९
येउनि गाणगगावीं मठरक्षक भक्त जे तयां पुसत, ।
'कोठें स्वामी?' ते मग सांगति, 'गुरु आज संगमीं वसत. ॥ २०
उपवास काल जाला, आतां येतील पारण्याला गा!' ।
पाहत होता मग तो ध्यानीं व्याधी निवारण्या लागा. ॥ २१
तों आले श्रीगुरु, मग सांगति, 'भक्तैक[6] विप्र आला हो! ।

---

१. अन्नपाणी वर्ज करून इच्छा पूर्ण होईपर्यंत दारांत बसणें. २. संसाररूपी संकट. ३. भोपे=देवीचे पुजारी. ४. हट्ट. ५. संधीला. ६. भक्त+एक.

आहे सितकुष्टि म्हणे **गु**रुदर्शन आज पूर्ण मज लाहो.' ॥ २२
**गु**रु म्हणति, 'जाणुं आम्ही, आला चित्तीं धरोनि संदेह, ।
बोलावा सन्मुख तो पाहूं सितकुष्टि केंवि तद्देह.' ॥ २३
तों तो आला, श्री**गु**रु म्हणती, 'संदेह धरुनि कां येसी? ।
नर काय करिल? देवी करि ती त्या स्वच्छ कां न कायेसी?' ॥ २४
तेंव्हां जोडुनि कर तो बोले साष्टांग करुनि नमनाला, ।
'बोले जरि दुःशब्दा बाळक तरि आइ आणि न मनाला. ॥ २५
कर्ता तूंचि असोनी तव हातीं सुकृतदुरित सर्व [1]तुला, ।
जाणें न मंदमति मी, अवतरसी **वि**धि, **म**हेश, **स**र्व [2]तुला. ॥ २६
अज्ञानी केवळ मी जालों पावोनि विप्रता, पशुची; ।
अशुची पापि परि करिल वाटे त्वद्दर्शनप्रताप [3]शुची. ॥ २७
आतां जाइल कीं ही व्याधी मज भरंवसा वदे हाची, ।
आला बहु कंटाळा, चाड नसे, त्यजिन जीव, देहाची.' ॥ २८
करुणाशब्दें **गु**रुचें तेंव्हां अति फार [4]मनस कळकळलें, ।
तेंव्हां द्विजास चित्तीं व्याधी होइल शमन सकळ कळलें. ॥ २९
**गु**रु म्हणति **सो**मनाथ द्विज जो त्याला, 'द्विजासि या ने रे! ।
स्नानासि संगमातें; केलें अति बहुत पाप यानें रे! ॥ ३०
करवीं सुस्नान जळीं सांगुनि संकल्प तूं बरा याला, ।
सांगें अश्वत्थाला प्रदक्षिणा तीन मग करायाला, ॥ ३१
देउनि वस्त्रें दुसरीं पहिलीं हीं दूर हो! बहुत टाकीं, ।
तेथें [5]क्षारमृदा ती होईलचि [6]लवण ही बहु [7]तटाकीं. ॥ ३२
जा, ने, त्वरितचि आणी, **शि**वरात्रीपारण्यास विप्रा या, ।
जाईल कुष्ट सकळहि वाटे होईल हा [8]कवि [9]प्राया.' ॥ ३३
द्विज**सो**मनाथविप्रें आज्ञा होतांचि तत्वता नेला, ।
धांवे सरित्तटासी ग्रीष्मीं दोंप्रहरिं जेंवि [10]तानेला. ॥ ३४
सुस्नान करउनी मग अश्वत्थातें प्रदक्षिणा करवी, ।
जाला दिव्यशरीरी तेजस्वी जेंवि हो! शशांकरवी. ॥ ३५
देउनि पट दुसरें मग [11]पहिल्या तत्त्यागवीत वासा रे! ।

---

१. ताजवा. २. हें 'न जाणें' ह्याचें कर्म. ३. शुद्ध. ४. मानस, मन. ५. खारटमाती. ६. मीठ. ७. (नदीच्या) तीरीं. ८. कविता करणारा. ९. प्रायः, बहुतकरून. १०. तान्हेलेला. ११. तत् (त्याच्या) पहिल्या वासा (वस्त्राला) त्यागवीत.

जाली क्षारमृदा तैं करिती आश्चर्य तेधवां सारे. ॥ ३६
**गुरु**दर्शनास मग ये द्विज करि साष्टांग **गुरु**पदा नमन, ।
तोषेच; तसें तोषे जाल्याहि प्राप्त संपदा न मन. ॥ ३७
कर जोडुनि **गुरु**सि म्हणे, 'करणारा तूंचि भक्त अत्र लोकीं.' ।
**गुरु** म्हणती, 'विप्रा! तूं आतां स्वतनू समस्त अवलोकीं.' ॥ ३८
अवलोकि द्विज जों तों सकळ स्वतनूसि लावुनी नदर, ।
तिलमात्र पाहि जंघे त्या मग वाटेल कां मनीं न दर? ॥ ३९
विप्र म्हणे, 'श्री**गुरु**! कां [1]जंघेसी तिळसमान गा! राही, ।
अक्षयसुखदाता तूं वाजे तव कीर्तिचा नगाराही.' ॥ ४०
**गुरु** म्हणति, 'येसि धरुनी संशय नर काय देइ यास्तव गा! ।
राहे खुण यास असे उपाय कविता करोनियां स्तव [2]गा. ॥ ४१
मत्स्तुति करितां भावें संशय नाशील चिंत्तिचा गा! [3]ती, ।
गा ती सद्भक्त जसे धरोनियां संग भक्तिचा गाती.' ॥ ४२
विप्र म्हणे, 'कशि येइल हे **गुरु**! कविता करावयास मज? ।
केवळ मतिमंदच मी, नाहीं वित्पत्तिचाहि त्या समज.' ॥ ४३
प्रोक्षिति भस्म श्री**गुरु** त्याचे मग काढवोनि जिभलीला, ।
ये ज्ञान तत्क्षणीं मग गाई करणारि **गुरु**चि शुभ लीला. ॥ ४४
'हे भक्तवत्सला **गुरु**! होउनि मी भ्रांत जेंवि [4]मैंद्यपिसा, ।
निंदी दयार्णवा! तुज नच जाणुनि होयि जेंवि निंद्य [5]पिसा. ॥ ४५
करुणावन **गुरु**राया! गर्भापासोनि दुःख हो! मातें ।
जालें, तडफड गर्भीं करि पशु जैसा सजीव होमातें. ॥ ४६
जाल्याहि जन्म, माता भक्षी बहु आम्लतेल, कटु, तिखटा, ।
तेणें नेत्रें दुखुनी, अंगीं होउनि खरूज पडति [6]खटा. ॥ ४७
त्या दुःखें रुदन करी, म्हणुनि जननि घालि [7]पाळखामाजी, ।
तेथें विंचू पृष्ठी टोची हाणोनि कंटका [8]माजी. ॥ ४८
वृश्चीकवेदनेनें आक्रोशें करुनि दीर्घ आ रडतां, ।
जननी म्हणे, 'क्षुधेस्तव वाटे बाळक न राहि आरडतां.' ॥ ४९
मग देई स्तनपाना परि दुःखें न धरिं मी स्तना [9]तुंडें, ।

---

१. मांडीवर. २. गायन कर. ३. स्तुती. ४. मद्यप्याप्रमाणें. ५. वेडा. ६. खवले. ७. पाळण्यांत. ८. माजी पृष्ठी=माझी पाठ. ९. तोंडानें.

मग आजि म्हणे, 'आजी अनर्थ केला किमर्थ नातुंडें?' ॥ ९०
पुनरपि घालुनि पालखिं गाइ परि न राहि वेदना गीतें, ।
वरिचेवरि वृश्चिक तो हणुनि करी पृष्ठिभेद नागीतें. ॥ ९१
वृश्चीकवेदनेनें मि विसर्जी पालखांत मूतमला, ।
लोळे, मुखीं भरे मळ, तेंव्हां त्वत्स्मरण केंवि होत मला? ॥ ९२
मग म्हणति, 'पोट दुखतें' म्हणउनि चावूनि घालिती ओव्या, ।
परि वेदना न जाणति हालविती पालखा म्हणुनि ओव्या. ॥ ९३
करितां एकादे दिनिं पोट दुखे म्हणुनि बहुत रोदन तें, ।
म्हणती, 'बाळ भुकेला' म्हणोनि कोंदिति बळेंचि ओदन तें. ॥ ९४
एकादे दिवसीं मी लागे बहुत क्षुधा म्हणोन रडें, ।
घालोनी बोट मुखीं औषध पाजोनि चोळिती नरडें. ॥ ९५
यापरि बाळपणीं मी भोगी बहु कष्ट परि न ये मरण, ।
कष्टें जालों थोरहि तरि गुरु! होईचना तुझें स्मरण. ॥ ९६
येतां तरुणदशेतें मन्मथ बहु फार मन्मनीं जमला, ।
परजायासीं इच्छी संग दिवसरात्र, ये न नीज मला. ॥ ९७
निंदीं उन्मत्तपणें देव, द्विज, गुरुसि, मातृपितरा गा! ।
सांगति बुद्धि तयांवरि भरें, बहुत होउनी कुपित, रागा. ॥ ९८
जालों उन्मत्त तधीं कैंचें त्वत्स्मरण गा! मला होतें, ।
आतां केलीस कृपा तरि निज सुख पूर्ण धाम लाहो तें. ॥ ९९
ऐसा उन्मत असतां भरतांचि श्वेत कुष्ट देहातें, ।
त्यागिति मग मातृपिता, भार्या स्पर्शूं तनू न दे हातें. ॥ ६०
मातृपिता त्यजिती, मग देइल कशि जवळि येउं भाजा ती? ।
'दावि न मुख' म्हणति, जवळ कोणिहि राहूं न दे उभा, जाती. ॥ ६१
जन म्हणति मज, 'सकाळीं दृष्टि पडुं नकोचि, दाउं गा! वदन,' ।
वदतां तयांसि कांहीं मज म्हणती 'राहिं रे! उगा, वद न.' ॥ ६२
जेंव्हां सर्वेहि जन ते लागति मज बहुत दांपु, रांगेलों; ।
वाटे बहु दुःख मनीं मग मी निघुन तुळजापुरा गेलों. ॥ ६३
उपवास बहुत केले, परि न करी मजवरी तुकाइ दया, ।
श्रीचंदळेकडे मज दवडि, करोनी कठोर ती हृदया. ॥ ६४

---

१. आज. २. अन्न. ३. दाबूं, चापूं, रागें भरूं. ४. रागावलों.

तेथेंहि चंदळा ती 'जाचि' म्हणे 'भेट तुज [1]दयाचरुतें,' ।
परि मीच मंदधी 'दे काय मनुज?' संशयांत याच रुतें. ॥ ६५
'उबगिति देवी मज, मग काय करिल मनुज? चिंतिं वाटेची, ।
जाणे न हीनधी मी दाविति जे सोय मोक्षवाटेची. ॥ ६६
दत्तात्रय अवतरसी मज समजेनाच बुद्धिमंदास, ।
परि कांहिं पुण्य होतें तें दाखवि या पदारविंदास. ॥ ६७
केलीं बहुपापें परदारागमनादि, हरि परस्वा मी. ।
तितुकीं त्वत्पददर्शन दवडी विलया परात्पर स्वामी! ॥ ६८
अनिवार बहुत माझा हा आणिसि तूं कहेत [4]मनवाजी, ।
[5]करिसी काय, ज्ञानें उडवुनि अज्ञान हें तम, नवा जी! ॥ ६९
श्रेष्ठ गुरु द्वादश जे असति गुरो! श्रेष्ठ तूं तयांपरिस, ।
ते कोण गुरु द्वादश वंदेन गुरुराज! करि दया, परिस. ॥ ७०
धातुर्वादी, चंदन, छायानिधि तीन होति, रवि चार, ।
नादनिधी, क्रौंच, कमठ, शशि, दर्पण, परिस,ऽनुग्रह, विचार. ॥ ७१
आतां लक्षण वर्णिन, त्यालों गुरुराज! तव कृपाकवच, ।
दिसु तुज ताता! शिशुचें दिसे जसें असुनि वक्र पाँक वच. ॥ ७२
धातुर्वादी गुरु जो शिष्या तीर्थाटणा सकळ [8]भूस ।
फिरवी, तेणें ज्ञानी होत, [9]उडव्यघ जसें [10]अनिळ [11]भूस. ॥ ७३
चंदन मळयाद्रीतें लावी स्वगुणास सर्व तरुंलाही, ।
परि [12]हिंगणाणि [13]वेणू त्यापासुनि नच सुवास गुण लाही. ॥ ७४
तैसा गुरु तो सज्जन उपदेशुनि, त्यागितोचि कुजनाशीं, ।
देत जसा सुस्थानीं फळ, कुस्थानींच तोचि [14]कुजें [15]नाशी. ॥ ७५
छायानिधि पक्ष्याची छाया ज्याचे पडे शिरावर तो, ।
नर होतो छत्रधर, श्रेष्ठ नृपति [16]सार्वभौमिळावर तो. ॥ ७६
तैसा छायानिधिगुरु असला जरि दूर तत्कृपापातें, ।
उघडे जयाकडे तो सुज्ञानी करुनि जाळि पापातें. ॥ ७७
जो सूर्यकांत मध्यें असतां कार्पास जाळि जेंवि रवी, ।

---

१. दयामेघास. २. परधनाला. ३. कह्यांत, ताब्यांत. ४. मनरूपी घोडा. ५. [नाझा] काय (शरीर) नवा (कुष्टरहित) करिसी. ६. ऐक. ७. सरळ, चांगलें. ८. पृथ्वीवर. ९. उडवि+अघ. १०. वायु. ११. कोंडा. १२. हिंगण (मिठ्याचें झाड)+आणि. १३. वेळू. १४. मंगळ. १५. नाश करी. १६. सार्वभौम+इलावर (पृथ्वीपति).

तैसा साधूसंगें रविगुरु अज्ञान सकळ जें विरवी[1]. ॥ ७८
नादनिधीमणियातें कोणैके धातुची ध्वनी, मॆरुत[2] ।
संघट्टवितांचि[3] करी बावन्नकसीच[4] धातु ती मॆरुत. ॥ ७९
गुरु तैसा नादनिधी, कानीं कारुण्य मेळि यदॆवाची[5] ।
पडतां, अज्ञान करी भस्म, तृणा ज्वाळ[6] जसि वॅनदवाची[7]. ॥ ८०
आतां क्रौंच विहंगम त्याचि असे सकळ भूवरी जात, ।
तितुकीहि अन्य देशा स्वपिलीं ठेवोनि सागरीं जात. ॥ ८१
षण्मासहि तिकडे ते क्रमिती मार्गे पिलीं कशीं जगती? ।
ऊर्ध्वमुखें करुनि तयां बाहति, तो स्नेह येत वीॅजगती[8]. ॥ ८२
तेणेंच वाढती तीं तैसें तो क्रौंच गुरु जयास मनीं, ।
चिंती तज्ज्ञानाग्नी पेटवि तेथेंचि गुरुकृपाधॆमनी[9]. ॥ ८३
जो जो कॅमठगुरु[10] तया दृष्टीचा कवच नित्य अपि त्याला, ।
तज्ज्ञाना वाढ चढे स्व कूर्मिणी पाहतां जसि पिल्याला. ॥ ८४
पाझरवि सोमकांता असतां चंद्रा द्विलक्ष अंतर तें, ।
तैसें शिष्याचें करि शशिगुरु दूरोनि शुद्ध अंतर तें. ॥ ८५
एक्या गुरुचें दर्शन होतां दे ज्ञान, हरुनि ने त्रास, ।
दर्पण विलोकितां स्वस्वरूप दिसतेंचि जेंवि नेत्रास. ॥ ८६
परिसगुरु ज्ञानि करी शिष्याच्या स्पर्शितां शिरीं कर तो, ।
परिस जसें लोहाचें स्पर्शें दिव्य सुॅहिरण्य[11] तो करतो. ॥ ८७
एक अनुग्रह गुरु जो करोनि उपदेश शिष्यभव नाशी, ।
ज्ञानी होउनि पावे अंतीं स्वानंदसौख्यभवनाशी. ॥ ८८
सारासारनिरूपण विचार गुरु करि सदा तयानें तो, ।
शिष्या ज्ञानी होतो श्रीहरि मग निजपदा तया नेतो. ॥ ८९
ऐसे द्वादश गुरु हे यांचा तूं श्रेष्ठ गुरु म्हणोनि धनी, ।
स्मरतांचि तुला भावें देशी सायुज्य मुक्ति ते निॅधनीं[12]. ॥ ९०
करुणाकर **गुरु**राया! नाहीं त्रिजगांत या तुजसमान, ।
करुनि स्तव बहु लवुनी ठेवी मग **गुरु**पदीं शिॅरॅस[13] मान. ॥ ९१
ऐका हो जन! **गुरु** हा ब्रह्मचि केवळ, सकळ भजा यासी, ।

---

१. नष्ट करवी. २. वारा. किंवा मरुबक नांवाची वेल? ३. लावतांच. ४. सोनें. ५. ज्याचें भाषण? ६. ज्वाला. ७. वणव्याची. ८. विजेच्या गतीनें, त्वरित. ९. धमनी=फुंकणी. १०. कांसव. ११. चांगलें सोनें. १२. मेल्यावर. १३. मस्तक.

याचें पद नौकेसम आन नसे भव तरोन जायासी. ॥ ९२
श्रीगुरु अक्षय सुख दे, दुसरा कोणी नसेचि देव असा, ।
अक्षय सुख इच्छा जरि, याचे पद सेवुनी सदैव असा.' ॥ ९३
ऐशा स्तवासि ऐकुनि गुरुचें आनंदडोल मन घेत, ।
तत्काळ निघुनि गेलें होतें जें कोड शेष जंघेंत. ॥ ९४
गुरु म्हणति जना, 'द्विज हा योग्य कवीश्वर असें म्हणायाला ।
जाला, ठेवितसें मीं नाम कवीश्वर; असें म्हणा याला.' ॥ ९५
वर देउनि पूर्ण करी होता जो विप्रअंतरा[1] हेतो[2], ।
सेवे वर्णुन कीर्ती मग होउनि कविमहंत राहे तो. ॥ ९६
सिद्ध म्हणे, 'गा शिष्या! श्रीगुरुची ऐकतांचि हे लीला, ।
अघ जातें जैसें तम उदयनगीं देखतांचि हेलीला[3]. ॥ ९७
छेदी भवरोगशिरा सुरस कथा दिव्य हे असीवाणी[4], ।
रामात्मजपुत्राची गुरुप्रसादें वदे असी वाणी. ॥ ९८

---

## अध्याय बत्तिसावा.[5]

नमुनि पदा शिष्य म्हणे, 'हे गुरु! कारुण्यनीरदा! विमला! ।
लागे मधुर सुधेहुनि कथा पुढिल ऐकवीं, वदावि मला.' ॥ १
सिद्ध म्हणे, 'अत्यद्भुत पुढिल चरित आयकावया हो! तें, ।
राहे गुरुजवळि दुजा कवि नृहरी नाम हें तया होतें. ॥ २
होता कवि गुरुजवळी प्रासादिक नाम हो जया नंदी, ।
तो गुरुकीर्ती वर्णी प्रतिदिवशीं बहुत पुरुष आनंदी. ॥ ३
ऐशी गुरुकीर्ती तो चहुं राष्ट्रीं वर्णुनी कळवि झाली, ।
बहुभक्त होति मग तांचिंताग्नीज्वाळ विस्कळ विझाली. ॥ ४
भक्तैक एक दिवसीं गुरुसी नेई पुरी हिपरगीतें, ।
संतोषवि उत्साहें करोनि भक्ती पुरीहि पर गीतें. ॥ ५
त्या ग्रामीं कल्हेश्वर नामें प्रत्यक्ष शिव वसे, त्याचें ।
लागे ध्यान नृहरिकवि जो त्यातें, सेतिं[6] जेंवि सेत्याचें. ॥ ६
पूजी नित्य शिवा तँद्धरि[7] सोडुनि तो कवि प्रपंच पँदें[8], ।

---

१. विप्राच्या मनांत. २. हेतु. ३. सूर्याला. ४. तरवारीप्रमाणें. ५. या अध्यायांत मुळांतील ४६,४७ आणि ४८ या अध्यायांतील कथाभाग आहे. ६. शेतकऱ्याचें. ७. तत् (त्याचीं—संबंध 'पदें' याकडे)+धरि. ८. पाय.

कवन करि नित्य वर्णुनि शिवलीला तो सुविप्र [1]पंच [2]पदें. ॥ ७
सर्वहि जन म्हणति तया, 'तुझें मधुरतेस दे मनीं कवन; ।
नव हि रसें शोभे बहु इंद्राचें जेंवि [3]नंदनीक वन. ॥ ८
कवनप्रीती गुरुसी, गुरुकीर्ती शुद्ध करुनि वर्णन गा! ।
शोभे त्वत्कवन, कसें पडतां रविकीर्ण जें [4]सुवर्णनगा.' ॥ ९
तो कवि म्हणे तयांसी, 'अर्पण कल्लेश्वरास [5]रसना मी ।
केली, तोचि गुरु मला दाता कविता पदा सरस नामी. ॥ १०
इंद्रादिकां न वर्णी, करि मग नर वर्णुनी कवन कोण ।
इंद्रसभेस बसे जो तो बसवीनाचि लघु [6]भवनकोण.' ॥ ११
ऐसें बोले कवि तो बसली जेथें सभा [7]सुधवआली, ।
गेला मग पूजाया कल्लेशा त्यास नीज तव आली. ॥ १२
पूजा करितां निद्रा आली त्या नरहरीकविस जेव्हां, ।
मग निद्रा करि तेथें स्वप्नीं आश्चर्य पाहि तो तेव्हां. ॥ १३
न दिसेचि लिंग लिंगस्थानीं, श्रीगुरुचि ते तया दिसती, ।
तत्पद पूजी भावें, पूजी पतिपाय जेंवि [8]आदिसती. ॥ १४
मानसपूजा स्तोत्रें करि नाना रीति [9]गुरुवरुनि कविते, ।
तोषुनि हांसुनि म्हणती गुरु 'मनुजा स्तविसि कां?' तया कवि ते. ॥ १५
'नेम तुझा कल्लेशावांचुनि न स्तविन आन देवाशी, ।
ते आज तुझी कसि गा! मनुजस्तुतिलागिं हे वदे [10]वांशी?' ॥ १६
मग कवि गुरुस म्हणे, 'तूं अवतरसी शिवचि धरुन रूपा या, ।
उडवायाऽहंकारा, प्रकटसि सद्बुद्धि मज निरूपाया.' ॥ १७
ऐसें बोलुनि कवि शिर ठेवुनि गुरुचे तदा [11]पदांऽलिंगी, ।
तों तो जागा होउनि पाहे शिर तों असे तदा लिंगीं. ॥ १८
ऐसें स्वप्नीं देखे जाला मग हर्ष जो पहा कविला, ।
होतों[12]ऽहंकारकरी चित्तीं जो धरुनि [13]जोम हाकविला. ॥ १९
ये मग गुरुपासिं करी नमोनि शेषाहिचेसम स्तवन, ।
'आटविलेंस' म्हणे 'तूं गुरु! मद्भवडोहिंचें समस्त [14]वन. ॥ २०

---

१. पांच. २. पद्यें. ३. नंदनवन. ४. सोन्याच्या दागिन्यावर. ५. जीभ, वाणी. ६. घराचा कोंपरा. ७. चांगल्या माणसांची ओळ. ८. पार्वती. ९. गुरुसंबंधीं. १०. वाणी. ११. पदा+आलिंगी. १२. अहंकाररूप वृत्ती. १३. जोर. १४. पाणी.

हे कारुण्यसमुद्रा! दीनदयाळा! गुरो! तव पदास, ।
सेवुन राहेन सुखें, करिं मज तूं होउनी सकृप दास.' ॥ २१

श्रीगुरु म्हणती, 'अस्मत्स्वमुखें प्रतिदिवस तूं करिसि निंदा, ।
आजचि कोठुनि भक्ती उपजे तुज धरिसि चरणअरविंदा.' ॥ २२

मग तो कवि साष्टांगीं नमोनि गुरुचीं धरी चरणनभजें, ।
'खळ मी म्हणें तुला, तव कीर्ति मुखें करिं न उच्चरण, न भजें. ॥ २३

निंदि परब्रह्मा तुज केवळ मंदांध मी, पशु खराची, ।
लागे सुजनहृदीं मद्दुःशब्दिक हेचि टाप शुकराची. ॥ २४

अवतरसी ताराया भक्ता कैलासनाथ शंकर तूं, ।
स्वप्नीं दर्शन देउनि करिसी मजला सनाथ शंकर तूं. ॥ २५

पापी निंदक मी, परि केलें कल्लेशअर्चन सदा हो! ।
त्या पुण्यें त्वत्पद हे पाहुनि माझा निवे मनसदाहो. ॥ २६

कल्लेशार्चन केलें जन्मवरी सफळ तें करायासी, ।
आलेति गुरुस्वामी! आतां सच्छिष्य हो करा यासी. ॥ २७

षड्वैर्‍यांसि जिणाया दावी कल्लेश हा लगा मातें, ।
मनअश्व आंवराया धरीन तव पाय या लगामातें. ॥ २८

नाना कविता स्तोत्रें वर्णी त्या सुकविची अगा! धमनी, ।
ठेवी शिरिं गुरु कर, मग होय तया हर्ष बहु अगाध मनीं. ॥ २९

श्रीगुरु देउनि वस्त्रें भेटवि मग भक्तजनगण तयाला, ।
आज्ञापी सकळांसी क्षिप्र 'कवेश्वरचि जा म्हणत याला.' ॥ ३०

श्रीगुरु मग म्हणति तया आतां कल्लेश्वराऽर्चुन सदा गा ।
तत्कीर्ति; तोचि तुजला अंतीं नेईल हो निजपदा गा!' ॥ ३१

तो कवि मग गुरुस म्हणे, 'कल्लेश्वर तोचि तूं अवतरोनी ।
येसी प्रत्यक्ष, तुझे पद सेविन जावया भव तरोनी.' ॥ ३२

ऐसें बोलुनि गुरुचे संगें गाणगपुरा मग निघे तो, ।
सेवुनि पादसरोजा आमोद गुरुकीर्तिला स्तवुनि घे तो. ॥ ३३

गुरुकीर्ति नित्य वर्णुनि राहे कवि तो जगद्गुरूपासीं, ।
त्यावरि नवलाव कथा वर्ते, गुरु धरिति अष्ट रूपासी.' ॥ ३४

---

१. चरणकमलें. नभ=पाणी. २. म्हटलें. ३. भजलों नाहीं. ४. मंद+अंध. ५. डुकराची. ६. कल्याणकारक. ७. मनाचा ताप. ८. साधनास. ९. वाणी. १०. परिमल.

शिष्य म्हणे, 'हे **गुरु**जी! हेचि कथा नवल यावरि वदे गा! ।
मी याचक दान मला हें गुरु! करुणालया वरिव[3] दे गा!' ॥ ३५

**सिद्ध** म्हणे, 'एक दिनीं आले **गुरु**भक्त शिष्य सात कसे, ।
विनविति नमोनि **गुरु**सी वदनाब्ज पहाति मेघ चातकसे. ॥ ३६

पूजोनि **गुरु**पदाब्जा वोवाळिति जातरूपदीपातें, ।
सप्रेमें मग लाविति नेत्राचें श्री**गुरु**पदीं पातें. ॥ ३७

कर जोडुनि मग विनविति तिष्ठुनि **गुरु**चे पुढें धरुनि आली[3], ।
म्हणती, 'हे **गुरु**राया! नर्क चतुर्दशि तिथी जवळि आली. ॥ ३८

मांगल्यस्नानासी यावें भिक्षेस आमुचे सदनीं.' ।
'येतों जा सदना' **गुरु** प्रत्युत्तर देति ते असें वदनीं. ॥ ३९

ऐकुनि **गुरु**वचनासी पुनरपि ते विनविती पदा नमुनी, ।
म्हणती, 'विश्वास न ये देतां सकळांस भाकदान[4] मुनी! ॥ ४०

येतों म्हणुनि समस्तां वदतां धरणें जि! कोणि विश्वास?' ।
नेणति **गुरु**महिमा ते असतां व्यापोनि सर्व विश्वास. ॥ ४१

**गुरु** म्हणती, 'अज्ञानें नेणति हे विश्वपालकास मज, ।
पाड्ं समजी यांची पांड्यंबा[5] जेंवि बालका समज.' ॥ ४२

मग एकैका कानीं सांगति, 'येऊं तुझ्याच गेहातें; ।
जा गेहा, सांगु नको कोणातें' म्हणति भाक घे हातें. ॥ ४३

एकैक श्री**गुरु**ंनीं यापरि सांगूनि धाडिले कानीं, ।
तों ग्रामजनीं **गुरु**सी वेष्टियलें जेंवि बास[6] लेकांनीं. ॥ ४४

म्हणती, 'त्यागिसि अम्हा नसतां अपराध जाहले कांहीं, ।
यद्यपि केले असतां तातें त्यागूं नयेच लेकांहीं. ॥ ४५

हे **गुरु**राज! दयाब्धे! कां आजी त्याग आमचा करिसी? ।
मानूं वचन तव सदा, काय चुकों सांग काम चाकरिसी? ॥ ४६

चुकलें लेंकरुं यद्यपि तरि मातेनें कदा न कोपावें, ।
आतां श्री**गुरु**राया! त्याग करूं आमुचा नको पावें.' ॥ ४७

श्री**गुरु** म्हणती, 'माझें सत्य वचन आइकाच कानांहीं, ।

---

१. धन. २. सुवर्णदीप. ३. ओळ. ४. वचनदान. ५. पाडी+अंबा (आई). ६. बापाला.

पैरगावासी अम्ही जात, तुम्हां बसत आच कां? नाहीं.’ ॥ ४८
जाऊन असा निश्चय, सर्वहि बसवोनिया सभा, केला; ।
हातावरि हातासी देउनि मग दे तयांस भाकेला. ॥ ४९
‘राहूं सत्यचि अम्ही दुसरें कांहीं मनीं न योजावें, ।
सत्य वचन मानावें स्वस्थमनें स्वालयास हो! जावें.’ ॥ ५०
श्रीगुरु सांगुनि ऐसें समजाविति भक्त अष्टदशजाती, ।
गुर्वाज्ञेनें मग ते सर्व गृहालागिं गात यश जाती. ॥ ५१
अष्टहि रूपें धरुनी श्रीगुरु मग जात सात गांवा ही, ।
तेथेंहि वसे, चिंता सर्वांची सम समान गा! वाही. ॥ ५२
सप्तस्थानीं जाले गुरु, धरुनी अष्टही वपू, जाते, ।
त्या दीपवाळिदिवसीं अष्टस्थानींहि घेति पूजा ते. ॥ ५३
गुप्तचि रूपें गुरुंनीं केलें अभिनव चरित्र यापरि तें ।
करिती भक्तोत्साहा चरित्र नच जाणवे तयां पैरि तें. ॥ ५४
करि दीपवाळि ऐसी, पुरवी जो भक्तअंतरा हेतो, ।
मग एक रूप धरुनी श्रीगुरु गाणगपुरांत राहे तो. ॥ ५५
येती दीपोत्साहा भक्त सकळ कार्तिके सुपुनवेतें, ।
आनंदति गुरु देखुनि पक्षी चातक जसे घैरु नवे ते. ॥ ५६
साष्टांग नमुनि गुरुसी बोलति ते भक्त सर्व ते काला, ।
‘श्रीगुरु आले होते अस्मद्वरिं’ म्हणती एकमेकांला. ॥ ५७
एक म्हणे, ‘गुरु माझे घरिं येउनि पुरविती मंदाशेला, ।
दिन चार दीपवाळी केलि पहा हा दिला तदा शेला.’ ॥ ५८
दुसराहि म्हणे, ‘माझे घरिं येउनि मीच पांघुरविला जो, ।
शुद्ध पहा सितें शेला दुतारि हा, तत्प्रभेस रवि लाजो.’ ॥ ५९
तिसरा म्हणे, ‘जि! गुरु ये माझे घरिं मीच पीत पट हा कीं, ।

---

१. आम्ही परगावासी जात नाहीं, [मग] तुम्हा आच (संकट) कां बसते?—असा अन्वय. ‘परगावासी’ असें म्हणण्याचें कारण वरील सात शिष्य सारे निरनिराळ्या गांवचे होते. २. आपापले घरीं. ३. गाणगापुरीं. ४. याचा कर्ता ‘श्रीगुरु.’ ५. परंतु. ६. भक्तांच्या मनांतील. ७. हेतु. ८. मेघ. ९. त्या कालीं. १०. माझ्या इच्छेला. ११. पांढरा. १२. दुहेरी दोऱ्याच्या विणकरीचा.

देइं पहा गुरुहरिचे[1] बळें भवकरीस मी निपट हाकीं.' ॥ ६०
चवथा बोले, 'गुरु ये मंदमीं[2]! मी देइं धोत्रजोडा हा, ।
पूजीं गुरुपाद, निवे माझा त्रयताप मात्र जो डाहा.' ॥ ६१
तों पांचवा म्हणे, 'मद्गेहीं गुरुराज साच होतेची, ।
दिधली मी छाटि पहा सध्यां नेसुनि असेच हो! ते ची.' ॥ ६२
तों बोले, 'पामरि[3] मी दिधली गुरुलागिं' भक्त कवि सावा[4], ।
'गुरुसंगतिनें गांवे[5] संसारीं चारदिन मज विसावा.' ॥ ६३
सप्तम भक्त म्हणे, 'मद्गेहीं गुरु ये चतुर्दिन, विशाल ।
उत्साह करीं बहु मी, पहा दिली गुरुस हेचि नवि शाल.' ॥ ६४
तों त्यां सकळां तेव्हां भक्त वदति गाणगानगरवासी, ।
'होते गुरु येथेंची व्यर्थ वदा कां? करा न गर्वा[6]सी. ॥ ६५
येथेंचि दीपवाळी श्रीगुरुंनीं हो! चतुर्दिनहि केली, ।
उत्साहकेलि[7] केली, कधिंहि असि न करि कपर्दिनहि केली[8].' ॥ ६६
ऐसें परस्परें ते भांडुनि दाविति खुणा दिले पट त्या, ।
देखति गुरुपासीं मग सर्वांच्या चित्तिं जाहल्या पटल्या[9]. ॥ ६७
मग म्हणती, 'श्रीगुरु हा अवतरलाऽनंतरूपधर सर्व.' ।
करिती स्तुति मग गुरुची पदकमलीं लावुनी नदर[10] सर्व. ॥ ६८
'जय जय महराज गुरो! धरोनि अवतार भक्तरक्षण गा! ।
करिसी, धरिसी रूपें भक्तास्तव बहु न लागतां क्षण गा! ॥ ६९
दीनोद्धारा श्रीगुरु! ठेवीं आतां समीप दासा रे! ।
होउनि भृंग पदाब्जीं राहूं त्यागोनि आपदा सारे.' ॥ ७०
ऐसें अनेक रीती करुनि स्तुति पूजिती गुरुपदातें, ।
शिष्या भक्त असे बहु होति तयां इच्छिलेंचि गुरु दाते. ॥ ७१
आतां शूद्रैक करी भक्ती त्याचे कथेस सादरता ।
दे; दरता[11] हो न, जसा होई केसरिपथें ससा दरता[12]. ॥ ७२
केसरि असे गुरुकथा, आइक तूं भिउं नको भवकरीस, ।

---

१. गुरुहरिचे (दत्तात्रयरूपी सिंहाच्या) बळें भवकरीस (संसाररूपी हत्तीस) मी निपट हाकीं. २. मत्+अमीं=माझ्या घरीं. ३. अंगवस्त्रासारखें एक रेशमी वस्त्र. ४. सहावा. ५. सांपडे, मिळे. याचा कर्ता 'विसावा.' ६. गर्वाला. ७. उत्साहक्रीडा. ८. कपर्दिन केली= शिवाची लीला किंवा क्रीडा. ९. पटल्या. १०. लक्ष. ११. भीति. १२. भिणारा.

सिंह सखा होय जया त्याचा न धरी कदा डँवक [2]रीस. ॥ ७३
शूद्र करी गुरुभक्ती, मानी **गुरु**सी **शि**वासमान, मन ।
लावी **गुरु**चे ध्यानीं, साष्टांगीं करित [3]गुरुतमा नमन. ॥ ७४
नित्य स्नाना श्री**गुरु** जातां [4]कृषिमधुनि शूद्र पाहे तो, ।
धावुनि साष्टांग नमी, मनीं धरुनि पूर्ण **गुरु**कृपाहेतो. ॥ ७५
येतां मठा दुपारीं नमावया घेत धांव पुनरपि तो; ।
हर्षें मनीं जसा तो [5]स्वर्गीं पावुनि सुधा वपु नर पितो. ॥ ७६
नित्य द्वय वेळ असें नमितां बोले न **गुरु** उभाचि असे, ।
एके दिनीं पुसे **गुरु** त्यास दिवस बहुत लोटतांचि असें. ॥ ७७
**गुरु** म्हणती शूद्रासी, 'कां श्रमसी करिसि नित्य नमनातें ? ।
सांग, पुरेल तवेच्छा, विकल्प धरिं किमपि सत्य न मनातें.' ॥ ७८
शूद्र म्हणे, '**गुरु**राया ! व्हावें पिक बहुत माझिया कृषितें, ।
म्यां निववावें हें तुज काय निधि[6]सि लाज दे असें, तृषितें. ॥ ७९
श्री**गुरु**जी ! त्वद्दर्शन मज संतोषवि जसा **व**संत पि[7]कं, ।
नित्य तुम्हा नमितां मी अधिकाधिक बहु दिसे पसंत पि[8]कं. ॥ ८०
आले पोठरिसी ये अमृतनयनिं सेत सर्व अवलोकीं, ।
शूद्र म्हणुनि न उपेक्षीं या दीना तूंचि अससि अत्र लोकीं.' ॥ ८१
**गुरु** म्हणति, 'काय पेरिसि ?' शूद्र म्हणे, 'सकळ शाळु [9]यावनळ, ।
पोसे तुझे कृपेनें सबळ जसा काननांत देवनळ.' ॥ ८२
श्री**गुरु** जाउनि पाहुनि म्हणती, 'सांगेन तेंचि आइकसी ।
विश्वासें, तरि सांगूं; सांगे स्वमुलांस जेंवि आइ कसी.' ॥ ८३
शूद्र म्हणे, '**गुरु**वचना न मानिं मी काय ? जन्मलों पशुची, ।
[10]न तपाऽचरती जरि ते जे **गुरु**चे करिति वचनलोप शुची.' ॥ ८४
गुरु म्हणती, 'स्नानासी जातों परतोनि येइं तों सकळ, ।
कापी शेत बरें रे ! तिळमात्रहि मन करूं नको विकळ.' ॥ ८५
गेल्या स्नानासी **गुरु** शूद्र मनीं बुद्धि योजितो मग ती, ।

---

१. डौंक, द्वेष, रागानें पाहणें. २. आस्वल. ३. गुरुश्रेष्ठाला. ४. शेतांतून. ५. स्वर्गीं वपु (शरीर) पाउनी नर सुधा पितो. ६. समुद्राला. ७. कोकिल. ८. धान्य. ९. जोंधळा. १०. जे गुरुचे वचनलोप (आज्ञा न पाळणें) करिति ते जरि तपा आचरती तरी शुची न.

ग्रामाधिकारि याचा घेण्यासी कौल[1] जात शीघ्रगती. ॥ ८६
विनवी अधिकाऱ्यासी, 'द्या खंडुनि शेत आज माझें तें, ।
देईन धान्य जितुकें असेल गतवत्सरीं जमा तें तें.' ॥ ८७
अधिकारि म्हणे त्यासी, 'नेदूं तुज कौल, पीक बहुसाल[2] ।
आलें आहे, यंदा दिसे पिकाचेंच फार बहु साल[3].' ॥ ८८
शूद्र म्हणे मग त्यासी, 'तुम्हांसि मी धान्य सांगुं दस्ताचें? ।
देइन आत्मसुखानें द्विगुणी जितुकें असे गुदस्ताचें.' ॥ ८९
प्रभु तो त्यासि मग म्हणे, 'दे वदसी जेंवि तेंवि कैतबा[5] रे!' ।
जन मग म्हणती, 'ठेवीं घेउनि तूं धान्य तें विकत बा रे!' ॥ ९०
गतवर्षाचें द्विगुणी देई कतब्यासि शूद्र तो, आणी ।
ग्रामाधिकारि याचा तयाप्रमाणेंच कौल तो आणी. ॥ ९१
कृषि कापाया मग तो लागे मिळवोनि मजुरदारातें, ।
वर्जावया तयासी तों येई बंधु कुमर दारा ते. ॥ ९२
वर्जावयासि येती बंधु कुमर आणि मुख्य रामा जी, ।
त्यांस म्हणे, 'चिंता कां करां, रहा स्वस्थ जा घरामाजी. ॥ ९३
हानि नव्हे तुमची जा' म्हणोनि तो देत पदज[5] गालीला[6], ।
'गाती त्याची जे त्या **गुरु** दे अक्षय्यपद जगा लीला. ॥ ९४
कसलेंच भय नसे त्या श्री**गुरु**चे आश्रिले सुपद ज्यानें' ।
केला बोध जरि असा, ठसला त्यांच्या मनीं न, पदजानें. ॥ ९५
'कापूं नको' म्हणोनी जाउनि तीं आडवीं निधड पडती, ।
परि नायके पदज तो मारी, चित्तीं म्हणोनि धडपडती. ॥ ९६
प्रभुसी[7] जाउनि मग तें सांगुनियां वृत्त म्हणत तोक, 'पिसा[8] ।
जाला मम तात कसा, पडुनि क्षत वृद्ध होय तो कपिसा[9].' ॥ ९७
मुळमुळ रडोनि सांगे, 'यतिच्या बोलेंच कापि सेतातें, ।
खुळखुळ केलीं हाडें मारुनि मज, लागुनी पिसें, तातें.' ॥ ९८
वर्जावया तयासी धाडी मग सेवकास अधिकारी, ।
शूद्र तयासि म्हणे 'तो अधिकारी भ्याड' म्हणुनि धिःकारी[10]. ॥ ९९
'अधिकारी भी जरि तो देइन आतांच सांग जा कण[11] गा! ।

---

१. शेतकऱ्याशीं करावयाचा करार. २. पुष्कळ. ३. वर्ष. ४. दस्त, कागद. ५. शूद्र. ६. शिव्या. ७. ग्रामाधिकाऱ्यास. ८. वेडा. ९. माकडासारखा. १०. धिक्कार करी. ११. धान्य.

भरलें पेव असे तें, आणिक भरला असे गृहीं [1]कणगा. ॥ १००
इतक्यानें भर नोहे तरि सांग विकोन सर्वहि गुरांस, ।
[2]घालीन एकदम मी, चित्तीं कोपूं नकोचि फुगुं, रास. ॥ १०१
कतबा दिला असे मी तुमची मग ते कशास बळजोरी? ।
देइन गतवर्षाचे दुप्पट मी वारुनी सकळ [3]जोरी.' ॥ १०२
तैसेंच जाउनी हो! सांगितलें प्रभुस सेवकानें तें, ।
ऐकुनि आश्चर्य करी अधिकारी वृत्त सर्व कानें तें. ॥ १०३
मग अधिकारि म्हणे, 'तो देईलचि नच घडेल [4]बहुधाऽन्य, ।
चिंता नसेचि कांहीं, आहे पेवीं गृहींहि बहु धान्य.' ॥ १०४
करुनि त्वरेसि बहुतचि सेत पदज कापवून इकडे तो ।
लावी ध्यान श्रीगुरुपदीं उभा राहुनी [5]नैइकडे तो. ॥ १०५
तों आले श्रीगुरु मग शूद्र नमी पडुनि तो गुरुसमोर, ।
गुरुमुख देखुनि हर्षे देखुनियां जेंवि नव [6]चैरुस मोर. ॥ १०६
मग बोले, 'कापविलें शेत सकळ' शूद्र जोडुनि कराला, ।
गुरु म्हणति, 'विनोदें मी सांगें तूं करिसि कैंवि निकराला? ॥ १०७
केला विनोद मी तूं कैसें चित्तीं दिलें न येउं भय, ।
हा! व्यर्थ कापिलें!' मग बोले तो जोडुनी करा उभय. ॥ १०८
तरती भवसागरिं ते घेती तव दृढ मनें [7]मैनव नाव, ।
मी कां बुडेन गुरुजी! धरितां त्वद्वचन नेम नव [8]नाव. ॥ १०९
त्वद्वचन कामधेनू इच्छेहुनि मज असे अधिक [9]दाती, ।
आहे निश्चय चित्तीं न उपेक्षी मज दयानिधि! कदा ती. ॥ ११०
न कळत एकादा जरि बैसे छायेसि मनुज सुरतरुचे, ।
तरि होय प्राप्त तया मनांत जरि युवतिभोग सुरत रुचे. ॥ १११
वाक्य तुझें कल्पतरू आहे इच्छीत सर्व [10]देतें ची, ।
निश्चय आहे चित्तीं बळकट मी धरिन सर्वदा तेंची.' ॥ ११२
गुरु म्हणती निश्चय तरि होइल बरवी फळश्रुति [10]चेंखोट, ।
चिंता न करीं कांहीं, न पडे ऐसें वदे श्रुति च [11]'खोट.' ॥ ११३

---

१. मोठी कणिंग. २. (धान्याची) रास घालीन. ३. ज्वारी. ४. अन्य=दुसरें, उलट. ५. नदीकडे. ६. मेघास. ७. मानव, मनुष्य. ८. नौका. ९. देणारें. १०. चांगली. ११. खोट न पडे=तूट न पडे.

सांगुनि जात गुरु असें शूद्रहि मग नमुनि तो स्वधामातें, ।
जाई स्त्रीस म्हणे, 'तूं मानि जसी अग्नितें स्वधा मातें. ॥ ११४
स्त्रीपुत्रांसि म्हणे मग, 'हानी तुमची नसेच समजावी, ।
जावी भीति मनींची.' म्हणुनि तयां बहुत रीति समजावी. ॥ ११५
ताराया भक्ता गुरु अवतरला वैर भवानि शंकर तो, ।
तुमचें तया पदीं मन, तरावयासी भवा, निशंक रतो. ॥ ११६
तारक तो भवनिधिसी भक्तीं सोडों नये तदपि कास, ।
कारण असेल कांहीं म्हणोनि तो कापवी गुरु पिकास. ॥ ११७
कारण नसतें जरि तरि करिता कापावया निकड कां तो?' ।
ऐसें समजावी तों पडिला सेतावरोनि कडका तो. ॥ ११८
कडका पडोनि थंडी सीतें सेतें समस्त करपटती, ।
शूद्रस्त्रीसुतचित्तीं तेव्हां खुण होय सौख्यकर पटती. ॥ ११९
ग्रीष्मीं दवाग्नि जैसा जाळी देवोनि फार ताप वन, ।
तैसीं सकळहि सेतें थंडीनें जळति लागतां पवन. ॥ १२०
नक्षत्र मूळ तेव्हां पिप्पलवर्षाव अन्नदांनीं तो ।
केला; धांत क्षिति कसि, धांत जसा विप्र अन्नदानीं तो. ॥ १२१
त्या शूद्राचे शेतीं शतगुण अद्भूत पीक आलें तें, ।
बुडख्यास कोंब फुटती, खातावरि फुटत जेंवि आलें तें. ॥ १२२
पाहोनि सेत शूद्रें जातां तो नित्यनेम नमनासी, ।
पुसति गुरू त्याला मग सांगे तो नमुनि वर्तमानासी. ॥ १२३
पाहुनि सेता, हर्षुनि शूद्राचे धरुनि ते हि पद नारी ।
बोले, 'धन्य गुरु खरा अवतरला तो उमेश मदनारी. ॥ १२४
क्रोधें दुर्वच बोलें तुम्हासि पति! मी करा क्षमेला हो! ।
आतां क्रोध गुरुकृपे न राहि हृदिं तो सपक्ष मेला हो!' ॥ १२५
सेतींच्या देवासी मग सर्वहि जाति करुनि पूजा ती, ।
गुरुभेटिस मग जाली शूद्रसवें त्यजुनि षड्रिपू जाती. ॥ १२६

---

१. स्वधा (अग्नीची स्त्री) जशी अग्नितें मानि [तशी] तूं मला [मान]. २. भवानीचा वर. ३. संसारास. ४. थंडीचा कडका. ५. जलाचा वर्षाव. ६. मेघांनीं. ७. तृप्त होई. ८. खाताच्या ढिगावर ज्याप्रमाणें आल्याला पुष्कळ कोंब फुटतात. ९. नेमानें. १०. जातीं झालीं, गेलीं.

घालुनि दंडवतें तीं म्हणती, 'जय जय गुरो! दयांबुसदा,[1] ।
आतां त्वत्सेवेसी त्वद्वारीं दिवसरात्र राहुं सदा.' ॥ १२७

गुरु म्हणति, 'बुद्धि ऐसी होय तरि सुखेंचि कां न नांदा हो! ।
हरिनामस्मरण तुम्हां देउनि सौख्याघकानना[2] दाहो. ॥ १२८

हरिभजनानें अंतीं हरिच्या, संशय नको, पदा पावा, ।
साधूसद्भक्तासी भजोनियां, लोभ कोप दापावा. ॥ १२९

मनिंचा दवडोनि भ्रम सदाहि वदनीं वदोनियां राम, ।
मग बोलति सार निगम तें चिंतुनि पाविजे मनिं अराम.' ॥ १३०

म्हणती मग गुरुसी त्वत्पदसेवा इच्छुं, संपदा न मुनी!' ।
बोलुनि ऐसें जाती गेहा मग सर्व गुरुपदा नमुनी. ॥ १३१

कडब्यासहित बुडालीं ग्रामींचीं सकळही अगदिं सेतें, ।
त्या शूद्राचे सेतीं वर्षाहुनि शतगुणी पिक दिसे तें. ॥ १३२

पिकलें सेत सकळ मग कापाया मजुर शूद्र तो लावी, ।
बोलावी अधिकाऱ्या, शूद्रमती जीवमतिस[3] तोलावी. ॥ १३३

प्रभुस[4] म्हणे, 'हटकाया कण इतरां शेतियां नको, ठार[5] ।
बुडती सेतें सर्वहि, मीच तुझे सर्व भरिन कोठार. ॥ १३४

शतगुण पिकेल धान्य, न द्यावें मी कां मगऽर्ध भागातें? ।
लावीन कोठिला कण भरोनि मी वृषभ गर्धभा गा! तें. ॥ १३५

गतवर्षाचे द्विगुणीं कतबा जरि, शतगुणेंहि बहुवस तें ।
कण होईल नसो तव कोठि रिती हें मनांत बहु वसतें.' ॥ १३६

मग अधिकारि म्हणे तो, 'तुज दिधलासेचि कौल गा! लिहुनी, ।
करुं केंवि अधर्म? मला निंदिति जन सकळ अधिक गांलिहुनी.[6] ॥ १३७

गुरुपायीं तव भक्ती म्हणउनि बहु धान्य गुरु कृपेनें तें ।
पिकलें, आनंदें तूं नांद, गृहा धान्य आपुलें ने तें.' ॥ १३८

मग तो ग्रामिं घरोघर वांटी कण बहु तयाच कालातें, ।
इतर ग्रामींच्याही वांटी कण बहुत याचकांला तें. ॥ १३९

देऊनि राजभागा शेष भरुनि ठेवि अमित पेंवांस, ।

---

१. दया हेंच अंबुस (पाणी) देणारा. २. सौख्य (हें 'देउनि' याचें कर्म)+अघकानना दाहो (जाळो). ३. बृहस्पतीच्या बुद्धीशीं. ४. ग्रामाधिकाऱ्यास. ५. इतरां शेतियां (शेतकऱ्यांना) कण (धान्य) हटकाया (मागावयास) नको. ६. शिवीपेक्षां?

असि करितां गुरुभक्ती करणें न लगेचि वनीं तपें वास. ॥ १४०

धनधान्य गोधनानें सुतपौत्रीं करित शूद्र आनंद, ।
नांदे सुखें कसा तो व्रजवासी त्यांत तो जसा नंद. ॥ १४१

सिद्ध म्हणे, 'गा शिष्या! ऐसी गुरुची अनेक लीला जे, ।
श्रवण करी जो त्याला देखुनियां भयमनें कली लाजे.' ॥ १४२

श्रीगुरुचे पद तारक बळकट ते धरिति परशुरामकर, ।
चरितामृतार्णवीं मग देत बुडी जेंवि सागरा मकर. ॥ १४३

---

## अध्याय तेतिसावा.[1]

ठेवुनि सिद्धपदावरि शिष्या, उघडोनि कान आ, भाळ, ।
श्रवणीं मानस निर्मळ पैरार्ध[2] शैरदांत[3] जेंवि आभाळ. ॥ १

सिद्धासि म्हणे, 'गुरुजी! श्रीगुरुचें तूं चरित्र गातां तें ।
तोषे मन, श्रवण मजसि बाळा तूं करवणेंचि गा! तातें.' ॥ २

सिद्ध म्हणे, 'ऐकाऽतां श्रीगुरुचें चरित गाणगाभुवनीं, ।
तीर्थें प्रकट करी गुरु भीमेच्या असति जी स्वयंभ वैनीं[3]. ॥ ३

आश्विन वद्य चतुर्दशि मिळति सकळ शिष्य गुरुजवळ तैंदहीं[4], ।
पूजिति गुरुपद भावें घालुनि मधु शर्करा पय घृत दहीं. ॥ ४

श्रीगुरु म्हणति समस्तां, 'आज असे बहुत थोर गा! पर्व, ।
काशी गया प्रयागा सकुटुंबेंसी चला निघा सर्व.' ॥ ५

ते म्हणती, 'आज्ञा परि सामोग्री नाहिं आज गुरुराया!' ।
गुरु म्हणति, 'चला नेतों मी, न लगे कांहिं आयति[5] कराया.' ॥ ६

श्रीगुरुची असि आज्ञा जाली सकळां तयांस माने ती, ।
सर्वेहि निघति, मग तयां गुरु भीमेच्या सुसंगमा नेती. ॥ ७

गुरु म्हणती, 'स्नान करा भीमामरजा असे सुसंगम हा, ।
उत्तर वाहे म्हणउनि स्नानें काशीहिहूनि पुण्य महा.' ॥ ८

स्नान करुनि सर्वेहि ते म्हणती, 'उत्पन्न अमरजा गंगा, ।
हे सांगा कसि जाली? आली भीमाइच्या कसी संगा?' ॥ ९

---

१. या अध्यायांत मुळांतील अध्याय ४९ मधील कथाभाग आहे. २. शरदृतूच्या दुसऱ्या अर्धांत म्हणजे कार्तिकांत. ३. उदकांत. ४. त्या दिवशीं. ५. सामुग्री, तयारी.

श्रीगुरु म्हणती, 'होता जालंधर पुण्यवान तो असुर, ।
जिंकी त्रैलोक्य सकळ पळवी इंद्रादि ते समस्त सुर. ॥ १०
मग मिळुनि देव सकळहि जाउनि वैकुंठिं ते स्तुती हरिची ।
करुनी, तिष्ठुनि सन्मुख म्हणति नमुनि, 'दुष्टदैत्यभय हरि[1] ची.' ॥ ११
हरि सकळ सुरां घेउनि गेला तो शंभुपासिं शिवलोकीं, ।
सांगुनि वृत्त म्हणे, 'हे करुनि कृपादृष्टि देव! अवलोकीं. ॥ १२
सुर दैत्यासी वधितां पडती क्षिति रक्तबिंदु ते जितके, ।
उठती महा प्रचंडासुर मग युद्धासि येति ते तितके.' ॥ १३
ऐकोनि वृत्त सर्वहि उमापती तो मनांत कळवळला, ।
शंकर दयाघनचि तो पाहुनियां देव चातका वळला. ॥ १४
प्रज्वळला बहुचित्तीं धरिता मग होय रौद्र[2] रूपाला, ।
सकळहि दैत्यां जाळी जेंवि अनळ वाळला तरूपाला[3]. ॥ १५
विनवि भवा मग मवता जोडुनि कर तो धरोनि पायाला, ।
'दैत्यांनीं सुर वधिले सजीव होण्या करी उपायाला.' ॥ १६
संतोषुनि शिव मग तो अमृतवचन उच्चरण करीत सुरां, ।
दे घट भरुनी शक्रा, शिंपुनि संजीव तो करीत सुरां. ॥ १७
उरलें संजीवनि जें नेतां स्वस्थानिं इंद्र घट जळ तें, ।
क्षितिवरि उचंबळोनी कुंभामाजील जाहलें गळतें. ॥ १८
चाले प्रवाह भूवरि संजीवनि हो नदी अमरजा ही, ।
अघनाशक अमर करी, लाजे इस विष्णुची पेंदरजाही. ॥ १९
उठवी अमर म्हणोनी होय अमरजा असेंच नांव इला, ।
शिणे[5] पावे स्नान सुकृत बहु करितां चित्र लेखना वइला. ॥ २०
भीमा[6] भवशिरसंभव ये म्हणुनीच्छोनि[7] [8]संगमरजेचा, ।
जाला सुसंगम बरा जैसा यमुनाणि हरि[9]पदरजेचा. ॥ २१
कार्तिकमाघमासीं अथवा पर्वणिदिनींहि हो यंदवें[10], ।
केल्या स्नानाघ सकळ भस्म जसें शुष्क गवत होय दवें. ॥ २२

१. हरण कर. २. भयंकर. ३. झाडाचा पाला. ४. पायांची धूलि. ५. स्नान करितां बहु सुकृत (स्नानाचें पुण्य) वइला (वहीवर) लिहितां चित्र (चित्रगुप्त) शिण पावे. ६. शंकराच्या मस्तकापासून उत्पन्न झालेली. ७. म्हणुनि+इच्छोनि. ८. संग+अमरजेचा. ९. गंगेचा. १०. जिच्या पाण्यानें ?

प्रतिदिवसीं स्नानासीं करि जो इंद्रासनीं बसे नर कीं, ।
उद्धरती तत्पूर्वज असले जरि पतन जाहले नरकीं. ॥ २३
ऐसा संगममहिमा जाणा हा [1]दक्षिणप्रयाग असे.' ।
आनंदति जन सकळहि ऐकुनि गुरुराजबोल [2]चांग असे. ॥ २४
'अश्वत्थद्रुमसन्निध तीर्थ असे गुप्त जें मनोहर तें, ।
स्नानें [3]चिंतितें पावुनि मुक्त्यंतीं होय सर्व [4]अघहरतें. ॥ २५
अश्वत्थ तोचि कल्पद्रुम जाणा दक्षिणप्रयागवट, ।
दर्शनमात्रें मुक्ती पितरांसह दे करोनि [5]ऐकवट. ॥ २६
जे जन सेवा करिती त्यांच्या मनकामना सकळ पुरवी, ।
तज्जन्ममरण नाशी सीत [6]असिक्नी जसा तमरिपु रवी. ॥ २७
पूजुनि अश्वत्थद्रुम ध्यावें मग संगमेशदर्शन तें, ।
सकळहि अघ संहारी दैत्यांसी जेंवि हरिसुदर्शन तें. ॥ २८
जैसा श्रीमल्लिकार्जुन अथवा श्रीकाशिनाथ जैसा कीं, ।
तैसा हा [7]संगमशिव जाणा, [8]हीं सत्य असति [9]पैं साकीं. ॥ २९
पूजुनि साष्टांग नमुनि घालावी हो! प्रदक्षिणा मग ती, ।
ऐका सांगेन कसी घालाया त्यास पूर्ण नेम गती. ॥ ३०
नंदी नमोनि, चंडा नमुनि, नमुनि [10]वृष पुन्हा, पुढें गमन, ।
करुनि [11]नमुनि [11]शशिसूत्रा, परतुनि येउनि वृषा करा नमन. ॥ ३१
नमुनि पुन्हा चंड, पुढें करुनि गमन, नमन सोमसूत्रास, ।
परतुनि नमोनि चंडा नमा वृष कधिं न पवे [12]असू त्रास. ॥ ३२
ऐशा प्रदक्षिणात्रय करुनि धरुनि वृषभवृषण सव्यकरा, ।
दक्षिण तर्जन्यंगुठ शिंगीं ठेवुनि [13]विलोकन [13]शिव करा. ॥ ३३
ऐसा शिव अवलोकी पावुनियां शक्रपद सुमानव तो, ।
जाई मग शिवलोका, तेथेंहि तयासि शंभु मानवतो. ॥ ३४
तीर्थ पुढें वाराणशि परमित जाणा [14]सहस्रहस्ताचें, ।
ऐकायासि कथा ते व्हावें स्थिर चित्त हो! समस्तांचें. ॥ ३५
केवळ कथा नव्हे ही. होता द्विज शुद्ध एक शिवभक्त, ।

---

१. दक्षिणेंतील प्रयाग. २. चांगलें. ३. इच्छित. ४. पापनाश करणारें. ५. एकत्र. ६. रात्री. ७. संगमेश्वर. ८. हीं तीर्थें. ९. चांगल्या योग्यतेचीं. १०. नंदी. ११. सोमसूत्री प्रदक्षिणा करून. १२. जीव. १३. शिवाचें विलोकन. १४. एक हजार हाताच्या घेराचें.

भारद्वाजसुगोत्री संसारीं तो सदैवहि विरक्त. ॥ ३६
शर्वध्यानीं रत तो द्विज कोणासी कदापि न वदेही, ।
दृष्टिपुढें सांब दिसे द्विज तो देहीं असोनिहि विदेही. ॥ ३७
ब्रह्मज्ञानी द्विज तो तन्निंदा करुनि म्हणति लोक पिसा[१], ।
परि तो शिवभक्त कसा दाशरथीभक्त शुद्ध तो केपिसा[२]. ॥ ३८
नेणुनि शिवभक्तासी म्हणति 'पिसा मूढ साच' बांधव ते, ।
होते त्या विप्रासी सोदर आणीक दोन बांधव ते. ॥ ३९
काशीस जावयासी बंधु निघुनि म्हणति ने 'चल' पिशाला, ।
तो द्विज बंधूसि म्हणे, 'जातां काशीस हो! तुम्हि कशाला? ॥ ४०
श्रीकाशीविश्वेश्वर मजजवळि असे तुम्हांसि दाविन हो!' ।
'दाखविं' म्हणती बंधू असत्य मंद्रा[३] कदा वदावि न हो! ॥ ४१
द्विज मग तो स्नान करुनि बैसे ध्यानस्थ तों तयाजवळ, ।
प्रकटे पंचवदन तो करुणेचा[४] सांब माहराज वेळ. ॥ ४२
मग तो द्विज सांबासी नमन करुनि जोडुनी करा विनवी, ।
'अम्हांस दुजी येथें काशी मनकर्णिका करावि नवी. ॥ ४३
श्रीविश्वेश्वरदर्शन येथेंचि घडो करीं असें देवा! ।
अस्मद्वंशोवंशीं दिवसनिशीं तव घडो सदा सेवा.' ॥ ४४
त्याचे विनतीस्तव शिव सुकुंड मनकर्णिका करी सेर्व[५], ।
वाहे आंतुनि, चिन्हें निर्मी काशीस असति जीं सर्व. ॥ ४५
कुंडांतुनि विश्वेश्वरमूर्ती तेव्हां स्वयंभचि निघाली, ।
पाहुनि हर्षुनि चित्तीं लोटांगण विप्र तो नमुनि घाली. ॥ ४६
ऐशी प्रकटे काशी, मग तो बंधूसि म्हणतसे द्विज, 'गा! ।
यात्रा बरी कराऽतां दाती[६] हे मुक्तिची सुपदवि जगा. ॥ ४७
प्रतिवर्षी दोघांनीं यात्रे पंढरपुरास गा! जावें, ।
आराध्यनाम ऐसें म्हणति तुम्हां तेंच भूमि[७] गाजावें[८]. ॥ ४८
विठ्ठलदर्शन घेउनि येथें येऊनि काशियात्रा ती ।
करणें प्रतिवर्षीं हो! हेचि जनास्मत्सुवंशियां[९] त्राती. ॥ ४९
अस्मद्वंशोवंशीं उत्तरकाशीस कोणिच न जाणें, ।

१. वेडा. २. मारुतीप्रमाणें. ३. एक प्रकारचा ध्वनी. येथें भाषण, वाणी. ४. दयेचा मेघ. ५. जल. ६. देणारी. ७. पृथ्वीवर. ८. प्रसिद्ध व्हावें. ९. आमच्या वंशजांस.

आचरणें हे काशी, तरेल तो हेंचि मद्वचन जाणें. ॥ ५०
भ्रांत म्हणति मज जन परि गोस्वामी याचि नामनेमातें, ।
श्रीविश्वेश्वर करितो आजपासुनि बोलिजे जनें मातें.' ॥ ५१
बंधु तिघे ते काशी हेचि प्रतिवर्षि होति आचरते, ।
अंतीं शिवलोकीं ते विमानिं घालोनि नेति शिवचर ते.' ॥ ५२
गुरु म्हणती, 'ऐसी हे करि काशी विप्र तो कवि प्रकट, ।
आचरती मग भावें करोनियां सकळ लोक विप्र कट.' ॥ ५३
पुढती गुरु म्हणती, 'हें पापविनाशन सुतीर्थ अवलोका, ।
करितां स्नान सुमुक्ती अघ नाशुनि देत करुनि अव लोका. ॥ ५४
रत्नाबाई गुरुची पूर्वाश्रमबहिण जे, गुरु तिला हो! ।
बोलति, 'तव अघ नाशो स्नानें मुक्ती तुला' म्हणति 'लाहो. ॥ ५५
सांगें तुज मी पापें पूर्वीं जीं करिसि तूं अगाध मनीं, ।
आठवती कीं मग तीं?' म्हणे 'वदो तीं तुझी अगा! [1]धमनी.' ॥ ५६
'अज्ञानी मी मजला सर्व कसी राहि आठवण गुरु! ते, ।
[2]रुपलेंऽघकर्दमीं मी जेंवि चिखलकर्दमांत पंगु रुते.' ॥ ५७
गुरु म्हणति, 'धेनु ताडिसि लातेनें हें कसें वदों? [3]घात, ।
[4]पंचोतूंचा करिसी, भर्तास्त्री विघड करिसि दोघांत.' ॥ ५८
ऐशा रत्नाबाई करितांचि श्रवण ती स्वपापातें, ।
कुष्ठ भरे सर्वांगा 'तारि' म्हणे गुरुसि मग 'कृपापातें.' ॥ ५९
श्रीगुरु म्हणती पुढिले जन्मीं या भोगिसी जरि अघाला, ।
जाईल कुष्ठ आतां परि अंतींचा चुके न यमघाला.' ॥ ६०
रत्नाबाइ म्हणे, 'मज नको पुढें जन्म, गर्भवासाचें ।
दुःख कठिण, अघ भोगिन जन्मीं मी याच [5]भीं [6]भवा साचें. ॥ ६१
त्वत्पदसेवा करुनी भोगिन भोक्तृत्व याच जन्मांत, ।
श्रीगुरु! मज लोटुं नको भवाब्धिच्या खोल साच [7]जन्मांत. ॥ ६२
दुःख बहुत यमलोकीं न पहावति नर्क भीम नेत्रांहीं, ।
आतां श्रीगुरुराया! मी त्या दुःखास भीं मनें, त्राहीं.' ॥ ६३
गुरु म्हणति, 'पापनाशनतीर्थि करीं स्नान एकदां जा ची, ।

---

१. वाणी. २. रुपलें+अघकर्दमीं. ३. नाश. ४. पंच+ओतूंचा=पांच मांजरांचा (घात). ५. भीतें. ६. संसाराला. ७. उदकांत.

जाईल कुष्ठ अघ तें सर्वहि मग नच तुला कदां [1]जाची. ॥ ६४
कुष्ठ हरे स्नानासी करितां ती तेथ धरुनि भावास, ।
वास करी मग तेथें पाहुनि तीर्थाचिया प्रभावास. ॥ ६५
सकळाश्चर्या करुनी म्हणती, 'अघहरण नांव तीर्थासी ।
योग्य, पहा रत्नेच्या चुकवी हें केवढ्या अनर्थासी.' ॥ ६६
मग गुरु म्हणति, 'पहावें आतां हें कोटितीर्थ सुजनांहीं, ।
करितांचि स्नान कदां तिळमात्रहि पाप हो! उरत नाहीं. ॥ ६७
[2]कोणेकदान करितां घडे सुकृत कोटिदानफळ वदति, ।
म्हणवोनि नाम कोटीतीर्थ असें [3]विबुध जे सकळ वदति. ॥ ६८
क्षितिवरि समस्ततीर्थें तितक्यांचें देत सुफळ यास्तव ते ।
ठेविति [4]कोटिसुनावा तीर्थाचा करिति सकळ हो! स्तव ते. ॥ ६९
येथें स्नान करी जो पुण्यतिथीसी समस्त पर्वातें, ।
त्याचें सर्वाऽघ उडे, जाय जसें तृण [5]उडोन्युपर्वातें. ॥ ७०
आतां तें तीर्थ पहा पुढें असे रुद्रपाद या नांवें, ।
तीर्थ गयासमचि असे महत्व तें किति म्हणोनि वानावें. ॥ ७१
जो जो आचार गये तोचि करा येथ, कोट [6]जननीचें ।
नाशी अघ, जन्म पुढें न घडे वसवोनि पोट जननीचें. ॥ ७२
स्नान करा सकळ, पुढें पहा बरें चक्रतीर्थ हें सत्य, ।
द्वारावतीहुनि करी चक्रांकित अस्थि हें सु, हें [7]सत्य. ॥ ७३
स्नानें ज्ञानि पतीतहि होत असे, देव केशव [8]जवळसे, ।
चुकति जननमरणाचे दर्शनमात्रेंचि ते सहज वळसे. ॥ ७४
मन्मथतीर्थ पुढें हें स्नानें करि दिव्य हो! वपू, जावें, ।
स्नान करुनि, मग भावें त्या श्रीकल्हेश्वरास पूजावें. ॥ ७५
इच्छित मनिंचें सर्वहि दातें सौख्यासि पुत्रपौत्रातें, ।
गोकर्ण क्षेत्रासम तीर्थ असे शुद्ध हें जना त्रातें. ॥ ७६
श्रावणमासीं येथें भावें करणें[9]ऽभिषिंचन शिवा या, ।
दीपोत्साहा कार्तिक, दुःख नरा ये कधींच न शिवाया.' ॥ ७७

---

१. त्रास देई. २. कोण (कोणी)+एक+दान (एका जिनसाचें दान). ३. ज्ञाते. ४. कोटि या चांगल्या नांवाला. ५. उडोनि+उपर (वर)+वातें (वाऱ्यानें). ६. जन्मींचें. ७. जल. ८. जवळ+असे. ९. अभिषिंचन=अभिषेक.

हा अष्टतीर्थमहिमा ऐकुनि करिती समस्त आचरण, ।
वदती श्रीगुरुसी मग भावें त्यांचे धरोनियां चरण. ॥　　७८
म्हणती, 'पवित्र तीर्थें हीं नेणों कोणि जवळ असतांही, ।
अघनाशक, भवतारक जीं करणारीं पवित्र [1]असतां हीं. ॥　　७९
केलें पुनीत अम्हां घालुनि तूं लोचनीं कृपांजन कीं, ।
ऐसी कृपा न करि ती माता, केली नसेचि पां जनकीं.' ॥　　८०
आनंदानें डोले भक्तांची मंडळी बहुत हो! ती, ।
गुरु येति मठा मग ते दिनीं समाराधना बहुत होती.' ॥　　८१
सिद्ध म्हणे शिष्यासी, 'क्षेत्र असे थोर गाणगापुर तें, ।
आचरतां यात्रेसी मनिंचें इच्छीत जाण गा! पुरतें.' ॥　　८२
रामात्मजपुत्राची सांगे सकळां वदोनि बा! [2]धेना, ।
गुरुभक्ति करी बरवी त्यासि जनन मरण दोनि बाधेना. ॥　　८३

---

## अध्याय [3]चवतिसावा.

जोडुनि शिष्य करांबुज सिद्धास म्हणे धरोनि पदकमल, ।
'झाडिसि मल मन्मानिंचा झाडि [4]पैटाचा [5]जैसाऽर्क उदक मल. ॥　　१
संसारसौख्य आतां नकोचि गा! हे कथा प्रियं गुरुची, ।
दिव्यान्न नित्य भक्षी त्याला लागेल कां [6]प्रियंगुरुची. ॥　　२
प्रतिदिवसाचे ठायीं प्राशी जो सर्वदाहि अमृता कीं, ।
न [7]नृं ताकीं तो प्रीती धरि गा! मी हें वदे न अनृता कीं. ॥　　३
आतां दयाघना! तूं सांग सुरस मजपुढें गुरु कथा रे! ।
श्रवणीं मन माझें हें सादर, दर जाउनी, अचुक थारे.' ॥　　४
सिद्ध म्हणे, 'गा शिष्या! वाटे चित्तीं [8]भवापदर जातें, ।
त्याणें गुरुचरणींचें सेवावें [9]अंभ वा [10]पदरजातें. ॥　　५
ऐकावी श्रीगुरुची सुकथा, सेवोनि चरणरज, कानें. ।
ऐकें पूर्वीं केली सेवा, धरुनि गुरुचरण [11]रंजकानें. ॥　　६
उपजे हेतु तयाला कीं सर्वहि राज्यभोग भोगावे. ।

---

१. पापी लोकांनाही २. वाणी. ३. या अध्यायांत मुळांतील अध्याय ५० मधील कथाभाग आहे. ४. वस्त्राचा. ५. जसा अर्क (सूर्य) [व] उदक पटाचा मल झाडी. ६. लांब मिऱ्यांची रुची. ७. मनुष्य. ८. संसाररूपी पाण्याचें भय. ९. जल, तीर्थ. १०. पायधूळ. ११. परटानें.

कां मग मिळती न तया सर्वहि? दाता जया प्रभो[1] गावे[2]. ॥ ७
श्रीगुरु म्हणती, 'हेतू पुरवावा भक्त महदशायाचा[3].' ।
म्हणउनि देति तयासी यवनकुळीं जन्म पादशायाचा. ॥ ८
विदुरानगरीचें[4] त्या राज्य तया दे गुरु प्रभोगा तें, ।
नांदे सुतपौत्रीं तो हर्षें भोगोनि राज्यभोगातें. ॥ ९
देवद्विजां भजे तो न दे चि हि कदा समस्त पीडा गा! ।
यवन म्हणति, 'लाविसि या कर्मे स्वकुळासि सौक्षपीं डागा. ॥ १०
गुरुभक्त प्राग्जन्मीं विप्रांवरि म्हणुनि भक्ति ते बहुत, ।
त्याच्या दुर्बुद्धीचा समूळ होऊनि जाय कोंब हुत. ॥ ११
राजपुरोहित[6] म्हणती, 'ऐकें अम्ही नृपा! यवनजाती, ।
कोणीही द्विजदेवा नमन कराया यवनधव[7] न जाती. ॥ १२
मंदमती द्विजयाती, देव म्हणति सूर्य, चंद्र, धेनु, मही, ।
जळवाताग्नी, सरिता[8], तुलसी, न्यग्रोध[9], पिप्पल द्रुम ही. ॥ १३
पाषाण मृत्तिकेच्या मूर्तीसी म्हणति देव मूढ असे, ।
द्विज ते तयांसि भजतां यवनांहीं दोष थोर गाढ असे.' ॥ १४
भूप म्हणे, 'द्विजनिंदा करुनि असी हे तुम्हांसि फळ काय? ।
'कोणेक[10] भक्तिनें हो! मनुजें करणेंचि हा सफळ काय. ॥ १५
स्थिर नोहे मन चंचळ, भक्ति असे नेमिली तया सगुण, ।
जैसा आवरणें वृष नाकीं घालोनियां तयास गुण[11]. ॥ १६
करितांचि सगुण भक्ती सहजचि हातास ये निराकार, ।
सर्वहि वर्ण समजतां जैसा मग समजतोचि ओंकार. ॥ १७
निर्गुण दुर्ग चढाया भक्ति सगुण हें असोन सोपान[12], ।
कां न चढावें? याहुनि सुमार्ग मज ये दिसोन सोपा न. ॥ १८
पायरिनें पायरिसी चढतां, त्याला सुमार्ग सांपडतो; ।
पडतोचि आडवाटे अथवा त्याला बहु वेळसा[13] पडतो?' ॥ १९
कुंठित करि नृप सकळां तो सांगुनियां बहु प्रकार असे, ।
'ऐका' म्हणे तयांसी, 'मी वदलों हेंचि सौख्यकार असे.' ॥ २०
नांदे आनंदानें सुतपौत्रीं कधिं शिवे न पापा ही, ।

---

१. प्रभु, (श्रीगुरूसारखा) समर्थ. २. सांपडे. ३. महत् (मोठा)=अशायाचा (अशाचा). ४. विदुरा=बेदर ?. ५. सहज, उगीच. ६. काजी. ७. यवन लोक. ८. नदी. ९. वड. १०. कोणत्या तरी एका. ११. दोरी, वेसण. १२. जिना. १३. फेरा.

स्वशिशूसम प्रजेसी पाळुनि तो करुनियां कृपा पाही. ॥ २१
ऐसें असतां त्याचे मांडीवरि फोड उद्भवेचि कसा? ।
वर्णा[1] ऐसा आंतुनि वाहे पू शुभ्र अर्किचा चिकसा[2]. ॥ २२
बहु वैद्य येति ज्यांची धन्वंतरिसमचि बुद्धि तोलावी, ।
करिति चिकित्सा धन बहु औषध खर्चास भूप तो लावी. ॥ २३
सांगे नृप प्रधाना 'मागति जें वैद्य तें' म्हणे 'द्याची,' ।
करिती वैद्य चिकित्सा परि न चले युक्ति कांहिं वैद्यांची. ॥ २४
लाविति वैद्य चिकित्सा करुनि, करुनि नित्य औषध नवेंची, ।
धर्महि अपार करि तो, द्विजदेवाकारणास धन वेंची. ॥ २५
व्याधी न जाय परि ते वर्ण कसा रक्त[3] जेंवि सेंदूर, ।
मग नृप विप्रां नमुनी 'होइ' म्हणे 'दुःख हें कसें दूर?' ॥ २६
द्विज म्हणति, 'पूर्वदोषें व्याधी उत्पन्न होय देहातें, ।
तरिं अघनाशनतीर्थीं स्नान करीं थोर दान दे हातें. ॥ २७
अथवा सत्पुरुषाची होय कृपादृष्टि अघ तरिंच जातें, ।
आतां पापविनाशनतीर्थीं सुस्नान तूं करिं च जा तें.' ॥ २८
द्विजवचन ऐकुनी नृप जाई घेऊनि सैन्यभारा ही, ।
स्नान करी तों तेथें एक यती येउनी उभा राही. ॥ २९
नृपती वर्ण तयाला दावी साष्टांग तत्पदा नमुनी, ।
'सांगे' म्हणे 'उपाया करावया कांहिं थोर दान मुनी!' ॥ ३०
मग यति म्हणे 'नृपा! जरि सत्पुरुषाचें घडेल दर्शन गा! ।
तरि परिहारी व्याधी, छेदी संचीत[4] सर्व दोषनगा[5].' ॥ ३१
मग भूप म्हणे यतिसी पुनरपि साष्टांग करुनि नमनातें, ।
'आणी संशय कांहीं मी नीच यवन म्हणोनि न मनातें. ॥ ३२
मी नृपहि असें जरि परि दास असें साच भूमिदेवांचा[6], ।
कांहीं पापास्तव मी होइं यवन सत्य हें वदे वाचा. ॥ ३३
सत्पुरुषदर्शन हरी कोणाचा रोग सद्यतीराया[7]! ।
सांग कथा ती मज तूं बैसें क्षण एक नद्यतीरा या.' ॥ ३४
श्रीपाद म्हणे, 'नृपती ऐकें एकाग्रमन करुनि भावें, ।
श्रवणीं सादर मानस कदापि चंचळ नको करुं, निभावें. ॥ ३५

---

१. वर्ण=व्रण. २. रुईच्या झाडाच्या चिकाप्रमाणें. ३. लाल. ४. सांठलेल्या. ५. दोषरूप पर्वतांना. ६. विप्रांचा. ७. सत् (चांगल्या)+यतिराया.

द्विज एक अवंतीतें होता व्यभिचारि मदननामानें, ।
माता, पिता सुबुद्धी सांगति तीं तें न तन्मना माने. ॥ ३६
माता पिता त्यजोनी वारस्त्री[1] पिंगला तियेशिं रत ।
होऊनि, धर्मपत्नी त्यागुनि दुष्कर्म दुष्पथीं शिरत. ॥ ३७
संध्यास्नान त्यजुनी वेश्येसी त्या दिवारजा[2] रमत, ।
जेवीहि तिचे करिंचें, त्यास प्रिय फार बहुत जारमत[3]. ॥ ३८
यापरि असतां सदनीं एकदिनीं येत वृषभनांव मुनी, ।
ज्याणें पंचविषयसह कामक्रोधादि सांडिलें वमुनी. ॥ ३९
रुद्राक्ष भूषणांगीं विभूतिचर्चित जसा सदाशिव ती, ।
योगी पाहुनि धावुनि मदनाणी पिंगला पदा शिवती, ॥ ४०
घालिति मिठी पदांसीं, साष्टांगीं करिति तीं तया प्रणती, ।
घालुनि दिव्यासन मग वरतें त्या योगिया 'बसा' म्हणती. ॥ ४१
दिव्यासनीं बसवुनी प्रक्षाळुनि तत्पदास सुमनें तीं, ।
पूजुनि सुगंधचंदन चर्चुन अर्पुन सुगंध सुमनें तीं. ॥ ४२
मग धूपदीप अर्पुनि, घालिति मिष्टान्न भोजन तयाला, ।
शय्या घालुनि देउनि मग म्हणती शयन वरि करि दयाला. ॥ ४३
त्या शय्येवरि योगी हर्षमनें मग सुखें करी शयन, ।
सेवा करिती दोघें कांहीं आणिति मनांत संशय न. ॥ ४४
वारा घालि मदन तो, तळहातीं चरणपुंडरीकें[4] ती, ।
भावें सेवा केली स्वपित्याची जेंवि [5]पुंडरीकें ती. ॥ ४५
ऐसी सेवा करुनी तोषविती मानसीं अमुप योगी, ।
म्हणती हे सत्सेवा अंतीं अम्हां पडेल उपयोगी. ॥ ४६
सत्सेवेनें न करिति अंतीं [6]दंडधरचार ते प्रहर[7], ।
ऐसें जाणुनि सेवा करिती तीं वस्वि[8] चार ते प्रहर. ॥ ४७
ते रात्रीं न तयांचें कांहीं इच्छी रतिप्रसंग मन, ।
प्रातःकाळीं योगी स्वेच्छे करि आणिके स्थळीं गमन. ॥ ४८
वृद्धापकाळ येतां मदनाणी पिंगळाहि दोघें तीं, ।
पावोनि मृत्यु जाली नृपतिकुळीं जन्म जाण हो! घेतीं. ॥ ४९
नळनातू चंद्रांगद तत्स्त्री सीमंतिनी सुशीला ती, ।

---

१. वेश्या. २. दिवसारात्रीं. ३. व्यभिचाराचें मत. ४. चरणकमलें. ५. एक प्रसिद्ध विठ्ठलभक्त. ६. यमदूत. ७. प्रहार. ८. रात्रीं.

सत्सेवेच्या योगें वेश्या जन्मे तिचे कुशीला ती. ॥ ९०
देश दशार्णव भूपति नामें जो वज्रबाहु तो सुमती, ।
त्याची श्रेष्ठ स्त्री जे नाम जियेलागि सत्य हो! सुमती. ॥ ९१
त्या सुमतीच्या गर्भी राहे तो मदन विप्र जाऊन, ।
संतापे दुसरी स्त्री सुमती सवतीस गर्भ राहून. ॥ ९२
सुमती आवडति नृपा होइल म्हणवोनियां मेहद्विषती[1], ।
करुनी मग सुमतीसी घाली अन्नांतुनी मेहद्विष[2] ती. ॥ ९३
विष भेदलें शरीरीं क्षीण बहुत फार होय देह तिचा, ।
पाहुनि मग नृपती तो जाइल हा गर्भ कीं वदे हैतिचा[3]. ॥ ९४
औषध उपाय नाना करि त्यायोगें न ये तिला मरण, ।
वर्ण फुटति आंगावरि वैद्यांच्यानीं[4] न होय आवरण[5]. ॥ ९५
नाना उपाय बहुतचि पुत्रार्थे करित भूमिपालक तो, ।
कष्टें प्रसूत जाली उपजे यत्नें करोनि बालक तो. ॥ ९६
घाली विष सुमतीसी द्वेषानें दुष्ट सवत ते असती[6], ।
त्यायोगें बाळाच्या फोड वपुस उपजतांचि ते असती. ॥ ९७
नृप मग पहावयासी हर्षे जों जाय पुत्रवदनातें, ।
पाहुनि वर्णोत्साहा[7] न करी, तो खिन्न होउन मनातें. ॥ ९८
मातापुत्राअंगीं फुटोनि व्रण वरवपू[8] बहू चिंगळे[9], ।
रडती, वेग उठति बहु, पडोनि अंगीं रवरव पूचि गळे. ॥ ९९
नाना देशींचे नृप आणुनि वैद्यौषधीउपायास ।
करुनि, म्हणे चित्तातें, 'देवा! आरोग्य होउ पां यांस.' ॥ ६०
नाना दानेंहि करी घाली बहुतहि द्विजोत्तम जपासी, ।
'जें जें लागेल' म्हणे 'तें जा मागोन घेत मजपासीं.' ॥ ६१
बव्होपायें नृपाचें इच्छितसे व्याधिचा विनाश मन[10], ।
परि कैसी होय कृपा भगवंतें केलियाविना शमन. ॥ ६२
कांहीं उपाय न चले न होय आरोग्य पुत्रदारा ही, ।
'होणार होउचि' म्हणे उगाचि मग नृपति तो तदा राही. ॥ ६३
थब थब वाहे पु, उठे माशांची बसुनि चुंब घोंघाण, ।

---

१. मोठा द्वेष करणारी? २. जालीम विष. ३. हातचा. ४. वैद्यांकडून. ५. झांकणें, बंद करणें. ६. दुष्ट स्त्री. ७. वर्ण+उत्साहा. वर्ण हें 'पाहुनि' याचें कर्म. ८. सुंदर शरीर. ९. चिघळे. १०. नृपाचें मन.

कंटाळति बहु दासी न शकति कोणीहि ते बघों घाण. ॥ ६४
मग नृपति म्हणे, 'यांहीं केलेल्या पार पातका नाहीं, ।
दुःख न आयकवे हें या हो! देहांतपात कां नाहीं? ॥ ६५
आतां यांचा मी नच पाहूं हा रोग थोर भीम शकें, ।
घोंघति देहीं उठती मोहाचीं जेंवि तीं नभीं मशकें.' ॥ ६६
पडती कीटक वर्णीं तिडके घेतांचि[1] अंबर वर वपू, ।
कंटाळति दासी मग धूत असे वर्ण अंब[2] रवरव पू. ॥ ६७
'लागेल वर्ण अम्हा' नृपति म्हणे 'पाहतांचि नयनांहीं, ।
त्यागावीं आतां हीं ठेवुनि फळ कामिनीतनय नाहीं.' ॥ ६८
मग घालवुनि रथीं तीं सोडवि नेउनि वनांतरामाजी, ।
दुसरी[3] तेणें पावे आनंदा बहु मनांत रामा जी. ॥ ६९
माता सुत कष्टति बहु रानीं कैचें मिळेल नाम[4] वेन, ।
घेउनि कडे सुमति सुत हिंडे ती घेत शंभुनाम वन. ॥ ७०
सुकुमार नृपतिजाया रुपोनि चरणीं खडे, पडे, खरडे, ।
अंग तिचें, वर्णहि बहु तिडकति, होऊनि फार दुःख रडे. ॥ ७१
हळु हळु उठोनि चाले लागे वर्णास तप्त हो! ऊन, ।
तेणें क्षितिवरि घडि घडि पडत व्याकूळ फार होऊन. ॥ ७२
पीडी तृषा बहु तिला न मिळे त्या काननीं सुके[5], न रडें ।
बाहेर फुटे, पडुनी कोरड तिस आननीं, सुके नरडें. ॥ ७३
व्याघ्रादि वनचरें बहु पाहुनि राहति पुढें उभीं तिजला, ।
विक्राळ उरग देखे, शोधी[6], वाटे मनांत भीति, जला. ॥ ७४
चित्तीं भय वाटे परि म्हणे, 'मला व्याघ्र हा निका मारी, ।
तरि हें दुःख चुके. गा! होऊं दे प्राणहानि कामारी! ॥ ७५
दुष्ट सवत विष घाली व्हावा म्हणवोनि पतन काय जिणें, ।
केला विघड पतीसी आतां माझें असोन काय जिणें[7]? ॥ ७६
ऐसी दुःखें रानीं चमके नृपराणि जैसि ते चपला, ।
हळु हळु जाय पुढें जों पाहे गोरक्षकासि[8] तेंच[9] पैला. ॥ ७७
गोरक्षकासि विनवुनि मागतसे प्राशनासि [10]अंभ वनीं, ।
ते म्हणती, 'त्या ग्रामीं मिळेल जा अन्न उदकही भवनीं[11]. ॥ ७८

---

१. वपूवर अंबर (वस्त्र) घेतांचि. २. आई. ३. दुसरी स्त्री. ४. नावाला तरी पाणी. ५. चांगलें पाणी. ६. जला शोधी. ७. जीवंत राहणें. ८. गुराखी. ९. तेक्षणीं. १०. पाणी. ११. घरीं.

पुण्यात्मा त्या नगरीं आहे धार्मीक वैश्य राजा हो ! ।
प्रतिपाळील तुला तो त्याचे श्रमरहित मंदिरा जा हो ! ॥ ७९
हळु हळु जाई माते!' म्हणती दावुनि लावुनी वाटे, ।
गेली त्या नगरीं जों पाहुनि जन हर्ष तीस मनिं वाटे. ॥ ८०
संतोषमान सर्वहि त्या नगरीच्या प्रजा तिला दिसती, ।
पुसती तिस 'कोण' म्हणुनि सर्वस्व वृतांत मग निवेदि सती. ॥ ८१
मग हो! सुजनास सती पुसे, 'असे येथ कोण राजा?' ती, ।
ते म्हणती, 'पद्माकर वैश्य नृपति, होय तद्वरा जाती. ॥ ८२
तुज तो दयाळु देउनि अन्नाणी चीर[1], मा[2] निरेक्षील, ।
तुजवरि कृपा करुनि बहु सदैव, त्या चीर[3] मानि[4], रक्षील.' ॥ ८३
मग जों हळु हळु राजद्वाराचे जवळि येत सुमती ती, ।
तों बाह्य येत दासी महा चतुर धूर्त होति सुमती[5] ती. ॥ ८४
ते दासी वृत[6] पुसुनी सांगे जाऊनि तें नृपतिजाये, ।
तें[7] जाणवी पतीसी मग तो 'घेउनि' म्हणे नृपति 'जा ये.' ॥ ८५
मग पद्माकरराणी संगें घेऊनि ये अमुप दासी, ।
मानेंकरोनि सुमती गेहीं मग नेत वंदुनि पदासी. ॥ ८६
सुस्थळ देउनि तिजला प्रतिपाळी नृपति तो समाचार, ।
घडि घडि जाउनि पाहुनि येउनि कळविति नृपोत्तमा चार[8]. ॥ ८७
वैद्यौषधी उपाया आंगें येऊनि भूप आपण तो ।
करि, जरि बहुप्रकारें, न शम कदां रोग जाहला पण तो. ॥ ८८
रोगें माता सुत तीं कष्टति बहु पावुनी वपु त्रास, ।
ऐसें असतां आला मृत्यु तिचे एक दिवस पुत्रास. ॥ ८९
तेव्हां शोक बहु करी सुमती, टाकुनि शरीर भू, विलपे; ।
आठवि सर्वहि दुःखा, त्या शोकभरें करोनि भूविलपे. ॥ ९०
'हा पुत्रा! हा पुत्रा! हा पुत्रा!' म्हणुनि होय आरडती, ।
'त्यागिसि मज कां?' म्हणउनि होई पसरोनि थोर आ रडती. ॥ ९१
'त्यागी' म्हणे 'मज पती रानीं' म्हणवोनि टाकि सुसकारे, ।
'होता तुझा भरंवसा जासी सोडोनि तूं असुस[10] कां रे! ॥ ९२

---

१. वस्त्र. २. लक्ष्मीप्रमाणे समजेल. ३. सदैव. ४. मान दे. ५. बुद्धिवान्. ६. वृत्त. ७. ती (नृपजाया). ८. दूत. ९. ? १०. प्राणास.

चित्तीं तुझा भरंवसा होता जरि टाकिलें मला पतिनें, ।
कोणाऽतां रक्षि मला?' बहुतचि केला असा विलाप तिनें. ॥ ९३
लोळे क्षितिवरि गडबड बहु आक्रोशें पिटी स्वकंधर[1] ती, ।
पद्माकरनृपजाया सांवरुनी तेधवां तिला धरती. ॥ ९४
म्हणती, 'शोक करुं नको कोणासहि वो! न जिंकवे काला, ।
शोक करोनि फळ नसे चित्तीं आतां करीं विवेकाला.' ॥ ९५
पद्माकर नृप येउनि करि जरि तो शांतवन बहुत रीती, ।
शोक करी, नयनांतुनि घळ घळ सोडीत वैन[2] बहुत रीतीं. ॥ ९६
'हा! हा!' म्हणे 'सुपुत्रा! मावळसी आज राजकुळपूषा[3]! ।
दोषां[4] कुळीं[5] पडे कीं, वोस दिसे तुजविणें सकळ पूषा[6].' ॥ ९७
ऐसा शोक करी जों तों कैसा वृषभयोगि तो आला, ।
जैसा ये घन चातक पसरुनियां बैसतांचि तो आला. ॥ ९८
आनंद होय सकळां जेंवि चकोरांस पाहतां चंद्र, ।
किंवा लोभि दरिद्या जेंवि बहुत चढलिया हँतां[7] चंद्र[8]. ॥ ९९
साष्टांग नमुनि नृपती, आसन देऊनि योगियाला हो! ।
बसवि, म्हणे, 'त्वद्दर्शनिं प्राणाचा बाळ लाभ या लाहो.' ॥ १००
योगि म्हणे, 'कोणाची नारी बहु शोक करित कां हो! ती?' ।
सांगुनि वृत्त नृप म्हणे, 'येथें घेऊनि बाळका होती. ॥ १०१
पावे मृत्यु सुत तिचा तिकडे करुनी कृपाक्ष अवलोक, ।
भूलोकवास शिव तूं गाती प्रत्यक्ष कीर्ति तव लोक.' ॥ १०२
योगी म्हणे मग तिला, 'शोक करिसि कां गुतोनि मोहा? हा ।
कोठील कोण सुत वो!? कोठें गत सांग तो, निमो[9] हाँ[10] हा. ॥ १०३
प्राग्जन्मींचे तव सुत बांधव पति कोण सांगिजे हो! ते? ।
पशुपक्षी कीं मानव? कोण वदेचि मजलागिं जे होते. ॥ १०४
ते कोठें असती वो!? मेले कीं सांग [11]जीत आहेत? ।
धरुनि सुताचा व्यर्थचि, मूर्खत्वें करुनि रडसि आ, हेत[12]. ॥ १०५
कुंभमठीं[13] सानबृहत्[14] दिसे परी स्वस्थळीं यथाभ्र[15] महा[16], ।

१. आपला गळा. २. पाणी. ३. राजकुळसूर्या! ४. अंधार, रात्र. ५. कुलामध्यें. ६. पृथ्वी. ७. हाताकर. ८. सोनें. ९. निवो. १०. दुःख. ११. जीवंत. १२. हेतु. १३. घागर आणि घर यांत. १४. लहान व थोर. १५. यथा (जसें)+अभ्र (आकाश). १६. मोठें.

सर्वात्मा तेंव्येकचि[1]; पुत्र, पिता, बंधु अन्यथा भ्रम हा. ॥ १०६
क्षणभंगुर नरतनु हे कीं न स्थिर जेंवि बुद्बुदे[2] वातें[3], ।
आयु:कल्पवरि जरी मोहें बुडवी भवांबु[4] देवातें. ॥ १०७
देवांतेंहि चुकेना मृत्यू मग पाड काय मनुजाचा? ।
दोषें[5] असे जेंवि तसा दंड करुनि दे धका यम नु जाचा. ॥ १०८
जैसें कर्म जयाचें तैसें फळ त्यास देव देतोची.' ।
ब्रह्मज्ञान सुगोष्टी योगी तिस बहुत हो! वदे तोची. ॥ १०९
सुमती त्यास म्हणे मग, 'करितां तूं बहुत हो! तपा, जळुनी ।
गेला त्वन्मोह म्हणुनि दाविसि हा ज्ञानपोत[6] पाजळुनी. ॥ ११०
केला प्रदीप्त बहु जरि न देखती जेंवि अंध जन दीप, ।
तैसें फळ काय असे ज्ञानाचा देउनी मज नदीप[7]. ॥ १११
रोगिष्टासी देउनि फळ काय असे सुधेचि सम धासी[8], ।
प्रेतासी प्राशवितां तें कैसें जाणिल रुचिस मधासी. ॥ ११२
पीडी रोग बहु मला त्यांत वनीं त्यागितोच धव[9] साच, ।
होता या पुत्राचा रक्षिल म्हणवोनि गा! भरंवसाच. ॥ ११३
त्याची गति हे, आतां सांगसि तूं ज्ञान काय हो! मातें? ।
आतां पुत्रासंगें हा मी जाळीन काय होमातें.' ॥ ११४
ऐकुनि ऐसें योगी कळवळला फार हृदयकमळातें, ।
स्वकृपाकटाक्षनीरीं क्षाळी तत्सर्व पातकमळातें. ॥ ११५
पूर्वोपकार चित्तीं स्मरुनि तिचा पुत्र दिव्यदेही तो, ।
करुनि संजीवाशीर्वच[10] 'दीर्घायू हो' असे वदे ही तो. ॥ ११६
माता पुत्र उभयतां केलीं तीं भस्म शिंपुन विरोगी, ।
योगी म्हणे, 'सदाशिवभजनीं तुमची कदा हि न विरो[11] गी[12]. ॥ ११७
भद्रायूनामसुता सांगुनि शिवकवच मंत्र तो ठेवी, ।
ठेवी हृदयसरोजीं म्हणे जतन लोभि जेंवि तो ठेवी.' ॥ ११८
आणिकहि भस्मधारण मंत्र षडक्षरहि तरणभव[13] दे तो, ।
खर्गेक[14] एक कंबु[15] हि योगी देउनि तया मग वदे तो. ॥ ११९

१. तेंवि+एकचि. २. बुडबुडे. ३. पाण्यावर. ४. संसाररूप पाणी. ५. ज्याचा जेंवि दोष असे तसा दंड करुनि यम धका दे. ६. ज्ञानाची दिवटी. ७. समुद्र. ८. अन्न. ९. पति. १०. सजीव+आशीर्वच. ११. थांबो. १२. वाणी. १३. संसारांतून तारणारे. १४. खर्ग (खड्ग)+एक. १५. शंख.

‘दरनादें[1] दर पावुनि संग्रामीं क्षीण होय परबळ[2] तें, ।
पळतें, जळतें होइल, दाखवितां नग्नखर्ग परबळ[3] तें.’ ॥ १२०
मातासुत मग ठेविति चरणीं, स्तव करुनि आननें, शिर तीं, ।
योगीकृपाप्रसादें जालीं आनंदकाननीं शिरतीं. ॥ १२१
योगी ‘पावाल’ म्हणे ‘स्वराज्य अरिचाहि ठाव तो पुसुनी.’ ।
ऐसें बोलुनि गेला पद्माकर नृपतिलाहि तो पुसुनी. ॥ १२२
होई भद्रायूसी ज्या काळीं प्राप्त वर्ष अकरावें, ।
पद्माकर नृपति म्हणे, ‘आतां या मुंजिबंधन करावें.’ ॥ १२३
व्रतबंध करुनि केला मोठा उत्साह, विप्र धनदानें[4] ।
केले तृप्त, असे कधिं नसतिल मागेंहि विप्र धनदानें[5]. ॥ १२४
करि निपुण धनुर्वेदीं पद्माकर आपुल्या सुतासंगें, ।
भद्रायूसिं नसेचि त्रैलोकीं कोणि जिंकिता संगें[6]. ॥ १२५
इकडे भद्रायुपिता, त्यावरि ये शत्रु शातकुंभरथ[7], ।
मग वज्रबाहु युद्धा निघे करुनि सज्ज सैन्य सइभरथ[8]. ॥ १२६
पावे पराजयचि तो करितां बहु वज्रबाहु संग्राम, ।
बांधोनि चालवीला शत्रूनें त्या लुटोनि तद्ग्राम. ॥ १२७
ऐकोनि वर्तमाना भद्रायू, जननिसीं म्हणे, ‘तात ।
माझा शत्रू येउनि लुटोनियां नगर धरुनि नेतात. ॥ १२८
जननी! तुझ्या कृपेनें शत्रू जिंकोनि सोडविन पितया, ।
ये साह्य अरिस तो जरि शक्रहि, जिंकीन मी तथापि तया.’ ॥ १२९
पद्माकरसुत सुनयन तो त्यातें धरित बंधुसम नातें, ।
त्याला संगें घेउनि धांवे मातेसि करुनि नमनातें. ॥ १३०
दोघेहि आडवे ते येती अरिला गजासि केसरिसे, ।
वळिले अरिभार जसे व्याघ्रीं अजभार[9] ते हंकेसरिसे[10]. ॥ १३१
देती समस्त वीरां दोघेही वाजवून दरें[11] दरें[12] ते, ।
दरनादें वीरासी ताप भरुनि मुतति ऊन दरदर[13] ते. ॥ १३२
केलें युद्धात्युभयीं[14] वाल्मीकवनीं जसें कुशलवांनीं ।

---

१. शंखाच्या नादानें. २. शत्रूची शक्ति. ३. शत्रूचें सैन्य. ४. द्रव्य देऊन. ५. कुबेरानें. ६. युद्धांत. ७. हेमरथ नांवाचा. ८. हत्ती आणि रथ यांसह. ९. शेळ्यांचा समुदाय. १०. हाक मारतांच डुरकावणीबरोबर. ११. शंख. १२. भीति. १३. फळफळ, पुष्कळ? १४. युद्ध+अति+उभयीं.

पाहोनि वज्रबाहू सुगुण, तयां चिंतुनी कुशल, वानी[1]. ॥ १३३
हेमरथ म्हणे वीरां, 'भीतां कां? बाळ मारुं, धीर नें द्यो[2].' ।
भद्रायूशरघातें वाहति तेव्हां महारुधीरनद्या. ॥ १३४
भद्रायु म्हणे वैश्या[3], 'तातासी कष्ट फार होतात; ।
आतां उशिर न लावूं, मुक्त करूं त्वरित सत्य हो! तात.' ॥ १३५
तेव्हां मग गवसणिंतुनि काढी, करि नग्न शीघ्र खर्गातें, ।
स्वर्गातेंहि[4] सुर[5] भिती, तेज तयाचें बहु प्रखर गा! तें. ॥ १३६
तत्तेजें अरिसेना जळे, पळे, कांहिं शेष राहे ती, ।
त्या खर्गासी देखुनि लाजे शक्राचिया करा[6] हेती[7]. ॥ १३७
सोडोनि वज्रबाहू पळे कनकरथहि तोहि होरपळे, ।
धरपडत पळे, देखुनि जैसें कीं बागुलासि पोर पळे. ॥ १३८
भद्रायु जवळ होती ताताची जाहली जमा सेना, ।
तीस म्हणे भद्रायू, 'तुम्हासि पळतोचि तो अरि दिसेना. ॥ १३९
बहु पक्षि मिळुनि जैसें धावूनि आकळिति पक्षिसेनाते[8], ।
तैसा धरि हेमरथा धावुनियां तातपक्षिसेना[9] ते. ॥ १४०
तात म्हणे चित्तीं, 'हे कोण असति बाळ जेंवि शशितरणी[10]? ।
मजलागिं सोडवाया कीं हे हरिहरचि काय येत रणीं?' ॥ १४१
म्हणवोनि वज्रबाहू धांवे जों नमन तो करायासी, ।
पाहुनि वरिचेवरि तो आलिंगी धरुनि तो करा यासी. ॥ १४२
राव पुसे, 'कोण तुम्ही दिसत असां राम भार्गवासम जे?' ।
पुत्र म्हणे, 'येउं पुन्हा कोणाऽम्ही सर्व तेधवां समजे.' ॥ १४३
नृपआज्ञा मग घेउनि येउनि ते भेट घेति मातेची, ।
नृप गुण वर्णोनि म्हणे, 'त्या दोघां हरिशिवोपमा तेची.' ॥ १४४
स्वपुरीं प्रवेशुनी मग हेमरथा[11] करुनि रक्षि बंधन तो, ।
हर्ष न माये चित्तीं वांटी विप्रां अपार मग धन तो. ॥ १४५
इकडे जननि नमुनि ते पद्माकर भेट जाहले घेते, ।
नमुनि तया मग सांगति, जालें जें वृत्त सकळ दोघे ते. ॥ १४६

---

१. वर्णन करी. याचें कर्म 'सुगुण'. २. सोडून देऊं नका. ३. वैश्यराजपुत्र सुनयन त्याला. ४. स्वर्गांतही. ५. देव. ६. हातांत. ७. शस्त्र, वज्र. ८. गरुडास. ९. बापाच्या बाजूची सेना. १०. चंद्रसूर्यांप्रमाणें वज्रबाहू. ११. हेमरथा बंधन करुनि रक्षि.

आनंदें पद्माकर ओवाळुनि हेम याचकाला तें ।
देउनि, अपार विप्रां वांटितसे धन तयाच कालातें. ॥ १४७
यावरि नैषधदेशप चंद्रांगद जो तयास ऋषभमुनी, ।
भेटुनि म्हणे नृपासी, 'आलों मी सर्वही क्षिति भ्रमुनी. ॥ १४८
कीर्तीमालिनि तुझि गा! कन्या हे गुणवती, वर हिला जो ।
पाहें, तद्गुणरूपा देखुनियां शशि [1]रतीवरहि लाजो. ॥ १४९
जो वज्रबाहु नृपती त्यागी स्त्री गुणवती वनीं सुमती, ।
पुत्र तिचा भद्रायू वैश्यपुरीं तो असे महा सुमती.' ॥ १५०
त्याचें मग सर्व कथन कथुनि म्हणे, 'दे सुता तयाला ही.' ।
लाही आनंदा नृप, ऐकुनि करि लग्ननिश्चयालाही. ॥ १५१
नमुनि पदा नृपति म्हणे 'जा आणी' ऋषभयोगिया 'वर तो.' ।
जमवी क्षितिवरिचे नृप लग्नसमारंभ करित यावर तो. ॥ १५२
जाउनि मुनि वृत्त सकळ सांगे पद्माकरास तें, आणी ।
वरजननीसह वैश्या सहपरिवारें वराड तें आणी. ॥ १५३
तों वज्रबाहु नृपती आला होताचि सैंवराला त्या, ।
परमानंद मनीं त्या नेत्रीं पाहोनि तैं वराला त्या. ॥ १५४
'अम्हीं वैश्यपुरींचा कोठिल तो कोण हो! म्हणों नवरा? ।
तों हा मत्कैवारी. जाइ नमायास त्या म्हणोन वरा. ॥ १५५
तो भद्रायू तेव्हां वंदी धांवोनि तो पद पित्याचे, ।
हा पुत्र वंदि ऐसें न बिंबलें अंतरा तदपि त्याचे. ॥ १५६
[2]संशयआवर्ति पडुनि म्हणे, 'कळे कोण हा न कैवारी, ।
वारी नमितां आतां सोडविलें तेधवां हि पैं [3]वैरी. ॥ १५७
मग चंद्रांगदनृपती त्याला घेऊन जाय एकांता, ।
सांगुनि वृतांत अवघा भेटविली त्यासि सुमति ते कांता. ॥ १५८
स्फुंदस्फुंदुनि सुमती नमन करी तेधवां मग पतीतें, ।
नृपती तैं म्हणत, 'वनीं म्यां दुष्टें त्यागिलें तुज [4]पैतीतें.' ॥ १५९
बोलुनि नानारीती स्त्रीची करि वज्रबाहु समजी ती, ।
न धरी विकल्प मनिं हो! धरिल कसी अनसुयेचि सम जी ती. ॥ १६०
सोहाळा बहु करि मग सुतलग्नाचा करोनि आरंभ, ।
वाढेल वर्णितां कीं ग्रंथप्रस्तार तो समारंभ. ॥ १६१

---

१. मदन. २. संशयरूप भोवऱ्यांत. ३. नमस्कार करूं दिला नाहीं. ४. पतितें, पाप्यानें.

मोठ्या उत्साहें करि पुत्राचे तेधवां विवाहातें, ।
भद्रायू दिवस चतुः श्वशुरगृहीं पूजि [1]आविवाहातें. ॥　　१६२
आंदण दे चंद्रांगद रथ, गज, तुरंग, [2]परिचारिका, द्रव्य, ।
आणी पाताळींहुनि जें जोडुनि बहुत [3]सख्य कांद्रव्य. ॥　　१६३
मग वज्रबाहुजाया सुतस्नुषा घेउनी स्वनगराशी ।
मिरवत येउनि, विप्रां द्रव्याच्या वांटि जेंवि नग राशी. ॥　　१६४
मग भद्रायू बोधुनि सुबुद्धि कांचनरथासि मुक्त करी, ।
जाला दीन जसा जो [4]गर्तेमाजी पडे अशक्त [5]करी. ॥　　१६५
करि राज्य वज्रबाहू बहुदिन तो कामिनीसुतासहित, ।
मग साधि, तपाऽचरुनी स्थापुनि राज्यासनीं सुतास, हित. ॥　　१६६
राज्य करी भद्रायू, करि कीर्तीमालिनीसवें [6]केली, ।
कीर्ती क्षितिवरि करि जे स्वमुखें वर्णनहि वासवें केली.' ॥　　१६७
श्रीपाद म्हणे, 'राजा! सत्पुरुषाचा असा मही महिमा, ।
अज्ञान दुःखरोगा नाशि जसा भास्कर [7]तमहीमहिमा. ॥　　१६८
म्लेंच्छाधिपति म्हणे मग, 'ज्याचे गुण बहुत वर्णितां जि! असे, ।
कोणे स्थानीं ऐसा सांगा सत्पुरुष साच आजि असे.' ॥　　१६९
मग यति म्हणे नृपासी, 'वसवुनि सत्पुरुष गाणगाभुवन, ।
आहे, ज्याचे चरणस्पर्शानें बुडवि जाण गा भव [8]न. ॥　　१७०
दर्शनमात्रेंचि बरा फोड करिल गाणगापुरा जा, तो' ।
ऐसें ऐकुनि गेला शिबिकायानीं बसोनि राजा तो. ॥　　१७१
विप्रांसि म्हणे, 'येथें कोठें संन्यासि संत राहे तो?' ।
द्विज म्हणती, '[9]गुरुसि पुसे नृप; न कळे काय अंतरा हेतो.' ॥　　१७२
प्रत्युत्तर कोणि न दे; राव म्हणे मग, 'मनीं धरा न दर, ।
तद्दर्शनास ये मी, त्याची मजवरि पडो कृपानदर.' ॥　　१७३
'गुरु संगमींच असती' सांगितलें नृपबुधा मग तयांनीं, ।
शिबिकेच्या बैसुनि मग धांवे नृप [10]अंबुधामगत यानीं. ॥　　१७४
दूरोनि श्रीगुरुसी पाहुनि उतरोनियां क्षितीवर तो, ।

---

१. आवि (मेंढा) आहे वाहन ज्याचें त्या अग्नीस. २. दासी. ३. सर्पांशीं (वासुकीशीं) [...]त्री. ४. खड्ड्यांत. ५. हत्ती. ६. क्रीडा. ७. तम (अंधार)+हीम (थंडी)+हिमा (रात्र) [...]ांना. ८. न बुडवि. याचा कर्ता 'भव' (संसार). ९. राजा गुरूंची चौकशी करीत आहे. १०. मग नृप शिबिकेच्या यानीं (पालखींत) बैसुनि अंबुधामगत (जहाजाप्रमाणें) धावे.

साष्टांग नमित गुरुसीं मुक्तपदीं जातसे क्षितीवर तो. ॥ १७५
येतां गुरुजवळि तया म्हणती गुरु, 'जासि रे! कुठें रजका! ।
भेटसि बहुतां दिवसीं कोठें होतासि मच्चरणभजका.' ॥ १७६
ऐकुनि गुरुबोल असे जालें प्राग्जन्मिचें तया स्मरण, ।
मग सन्मुख तिष्ठुनियां स्तुति करि साष्टांग नमुनियां चरण. ॥ १७७
'जय जय महराज गुरो! अवतरसी शिवचि तूं दयाघन गा! ।
सद्भक्तचातकासी तृप्त करिसि जाळिसी तैया[1]ऽघनगा. ॥ १७८
लोटिसि मजलागीं कां पाहुनि तूं राज्यअंधगाभारीं[2]? ।
दर्शन कदां न देशी राज्यमदें होय अंध गा! भारी. ॥ १७९
राज्यमदें मातुन मी त्वत्पदकारुण्य जन्मदा! विसरें, ।
कां हें भवदुःख गुरो! येउनि मज यवनजन्म दाविस रे! ॥ १८०
हे गुरुराया! पीडी वैर्ण[3] धरुनि जो महा अपार मला, ।
ऊरूठाव[4] न सोडी जैसा झष जो मैहाअपा[5] रमला.' ॥ १८१
सांगे यैति[7] लाग[8] म्हणुनि तुझिया भेटीस धांवलों, कावें[9] ।
जीवासहि, आतां तूं उघडुनि दृष्टीसुधा विलोकावें.' ॥ १८२
गुरु म्हणति, 'वर्ण कोठें सांगसि जो तो मला दिसे न कसा? ।
दाखविं उडवीन जसा उडवी उरगा अैलादि[10] सैनर्कसा[11].' ॥ १८३
जों पाहे नृप उघडुनि ऊरू तो त्या दिसेचि वर्ण न तो, ।
आनंदातें पावुनि मग गुरुचें करितसेचि वर्णन तो. ॥ १८४
'जय सद्गुरुनाथ! तुम्ही प्रत्यक्षचि शिव धरोनि अवतारा, ।
क्षितिवरि येउनि करुनी कीर्ती, भक्तां करोनि अव तारा. ॥ १८५
रक्षाया भक्तांसीं धरितां अवतार आजि हो! कळलें, ।
केली त्वत्पदसेवा प्राग्जन्मीं सुकृत आजि तें फळलें. ॥ १८६
त्वत्पदसेवा सुख दे यज्ञाहि करुनि असें न वासव दे, ।
आतां त्वत्पदसेवे तुजजवळि करुनि असेन वांस[12]' वदे. ॥ १८७
परि एक असे विनती माझी आतां पदासि गुरुवर्या! ।
'अवलोकीं येउनि मद्दारापुत्रादि सर्व ऐश्वर्या.' ॥ १८८
गुरु म्हणती, 'येउं नये तव नगरीं करिति यवन अधम हत्या, ।

---

१. तया(त्याच्या)+अघनगा (पापपर्वताला). २. राज्यरूप अंधारकोठडींत. ३. व्रण. ४. मांडीची जागा. ५. मासा. ६. मोठ्या जलसंचयास. ७. पूर्वी भेटलेला यति. ८. संधी. ९. त्रासलों. १०. अचानक. ११. ससाणा, श्येन. १२. राहणें.

नच पाहाव्या आम्ही त्या, जो पाहे घडे अघ [1]महत्त्यां.' ॥ १८९
राव म्हणे, 'धांडोरा पिटोनि हिंसाचि सर्व वर्जिन मी, ।
परि यावें जी स्वामी!' म्हणोनि ऐसी करोनि आर्जि नमी. ॥ १९०
मग मान्य करुनि 'येतों' म्हणती गुरु [2]भक्तनृपवराशीला, ।
मग म्हणति सर्व शिष्यां, 'आलासे जीवें[3] सिंहराशीला. ॥ १९१
गोदावरियात्रेसी जाउं चला नृपतिच्या पुरावरुनी.' ।
तत्काळ उठति तेव्हां कमंडलू, दंड, वस्त्र सांवरुनी. ॥ १९२
सिबिकायानीं गुरुसी तेव्हां बसवोनि यवनरायानें, ।
शिष्यांसि दे बसाया वाजी, हस्ती, [4]रहंवरा, [5]यानें. ॥ १९३
आपण चरणीं चाले गुरु म्हणति तया नृपा, 'क्षमावर तूं ।
होसी, हसतील तुला यवन, तुझे बस तुरंगमावर तूं.' ॥ १९४
नृपति म्हणे, 'जी! कैंचा राजा मी? रजक होय तव दास, ।
लीलेंकरोनि मजला देशी कीं तूंचि या नृपपदास.' ॥ १९५
गुरु म्हणती, 'मोडुं नको आज्ञा माजी नृपा! बस [6]हयातें,' ।
चित्तीं म्हणती आतां त्यजुनि पुढें जाउं शिष्यसह यातें. ॥ १९६
राव बसे तुरगीं मग गुरु म्हणती, 'ऐक माझि [7]गंभीरा, ।
पापविनाशनतीर्थीं जातों स्नानासि [8]भूप गंभीरा!' ॥ १९७
बोलुनि ऐसें श्रीगुरु शिष्यांसह गुप्त होउनी तेथें, ।
गेले मनोजवें मग पापविनाशन सुतीर्थ तें जेथें. ॥ १९८
तैं सायंदेवकुमर ये भेटिस नागनाथ नाम जया, ।
तो गुरुस नमुनि विनवी, 'करावया पावन सदना मज या.' ॥ १९९
नेउनि गुरुसी भोजन दे, करि सर्वोपचार पूजा ती, ।
करि उत्साहाराधन, श्रीगुरु मग पापविनशनीं जाती. ॥ २००
इकडे नृप गुरुसी जों पाहे दिसती न [9]वाहिनीमाजी, ।
चित्तीं म्हणे, 'उपेक्षा केली श्रीगुरुंनिं कां मनीं माजी? ॥ २०१
ये मग पापविनाशीं नृप तुरगा देत तो बहु चपेटे, ।
पवनासम हय धांवे मागें दळ टाकि तो[10] बहुच [11]पेटे. ॥ २०२
पाहुनि दूरोनि गुरुस साष्टांगीं नमि त्यजोनि [12]अश्वातें, ।

---

१. महत्‌+त्यां. २. भक्त जो राजा त्याच्या हेतूला. ३. गुरु. ४. रथ. ५. वाहनें. ६. घोड्यावर. ७. वाणी. ८. राजश्रेष्ठा. ९. सैन्यामध्यें. १०. घोडा. ११. तापला. १२. अश्वातें.

श्रीगुरुस पदरं पसरी, चातक मेघास जेंवि अत्यातें. ॥ २०३
गुरुसि म्हणे, 'दास तुझा मी त्यागुनि येसि तूं कसा यास? ।
भेट तुझी व्हायासी जाले मज गा! अनेक सायास. ॥ २०४
सांपडलासि मला तूं व्यासा सांपडत जेंवि वेद लेंगा.' ।
विनवि असें जों मागुनि ये, पाहुनि गुरुपदा निवे दैल गा!॥ २०५
मग गुरुसि म्हणे राजा, 'आतां चल माझिया पुरा सद्मा'. ।
जोडुनि करासि विनवी साष्टांगीं नमि धरोनि पदपद्मा. ॥ २०६
'बस, चल शिबिकायानीं लक्षुनि दारासुतासि ताराया.' ।
जाला आनंद मनीं शिबिके गुरुराज बैसतां राया. ॥ २०७
मग यवनराव तेंव्हां संनिध पाचारुनी अमात्यासी, ।
सांगे, म्हणे, 'पुढें जा शृंगाराया पुरी अमा' त्यासी. ॥ २०८
मिरवत आणी गुरुसी स्वपुरींतुनि करित वाद्य मोप रवा, ।
उडवी कांचनकुसुमें गुरुवरुनि, मनीं नृपा नसे परवा. ॥ २०९
पायघड्यांसी मार्गीं पवित्र जे अस्तरी अनेक पट, ।
पाहुनि दुष्ट यवन जे वदति कुवच धरुनि तन्मनें कपट. ॥ २१०
म्हणती, 'दुष्ट नृपति हा, ज्याचें मुख न यवनीं पहावेंची, ।
त्यासी पूजी हर्षें, व्यर्थ द्रव्य अवनीप हा वेंची.' ॥ २११
निंदिति यवन नृपाऽसे, द्विज नृपगुण वर्णितीच बहु गा! ते, ।
कल्याण चिंतुनि तया श्रीगुरुची कीर्ति होति बहु गाते. ॥ २१२
शृंगारि सभेमध्यें सिंहासन रत्नखचित चंद्राचें, ।
तेज जयाचें झळके सुचांदणें जेंवि पूर्णचंद्राचें. ॥ २१३
सिंहासनावरी त्या नृप नेउनि गुरुसि होय बैसविता, ।
पडत प्रकाश गुरुचा उदयनगीं उगवतां जसा सविता. ॥ २१४
मग नृपति पुत्रदारा आणवि गुरुदर्शनासि बोलवुनी, ।
आलीं तीं सर्वेहि शिर ठेविति गुरुअंघ्रिनीरजीं लवुनी. ॥ २१५
श्रीगुरुस आपली नृप मग सर्वेहि संपती वैरिव दावी, ।
गुरु म्हणति, 'भोग इच्छा असे मनीं काय यांवरि वदावी.' ॥ २१६
'पावे तृप्ती भोगुनि भोग' नृप म्हणे, 'जि! संतराव मन, ।
आतां राहिन सेवे विषया मानीन अंतरा वमन.' ॥ २१७

---

१. अति+'आ' तें. २. निधान. ३. सैन्य. ४. गृहास. ५. राजा. ६. खर्च करी. ७. सोन्याचें. ८. गुरूच्या पदकमलीं. ९. द्रव्य. १०. यानंतर.

श्रीगुरु म्हणती, 'माझे भेटिस ये श्रीनगीं नरवरा! हे, ।
येव्हां स्त्रीपुत्रासी प्रतिपाळुनि तृप्ति तूं करव, राहे.' ॥ २१८
राव म्हणे, 'स्मरण मला त्वच्चरणांचें असो गुरुस्वामी! ।
लवकरि देईं भेटी नातरि तुजवरि करीन रुस्वा मी.' ॥ २१९
गुरु म्हणती, 'तुज अंतीं देइन भेटी स्मृतीहि राहेची, ।
बहुधान्यवत्सरीं ये श्रीगिरिसी ऐक मत्स्वरा हेची.' ॥ २२०
सिद्ध म्हणे, 'गा शिष्या! होय गुरुपदीं असा धेराप रत; ।
मग गुरु गोदास्नाना जाउनि ये गाणगापुरा परत.' ॥ २२१
रामात्मजपुत्र म्हणे देखुनि गुरुभक्तमंडळाऽनंद ।
पावे जैसा देखुनि हरि व्रजासहित गोकुला नंद. ॥ २२२

---

## अध्याय पस्तिसावा.[3]

नृप चित्रकेतु विषयीं जेंवि रमे करुनि कोटि रमणी[4] तो, ।
तेंवि रमे गुरुचरितीं नामांकित शिष्यकोटिरमणी[5] तो. ॥ १
श्रवणीं मन लावि कसा नीरीं देखुनि झषांतरा[6] बकसा, ।
रस सेवि जसा सुंगळ शिरोनियां भाजनांत[7] राब[8] कसा. ॥ २
विनवी सिद्धासि जसा याचक बहुदीनवाणि जो धनिका, ।
त्या तो तोषवि तैसा श्रीसिद्ध करुनि तयासि बोध निका. ॥ ३
सिद्धासि म्हणे नमुनी, 'लाजविलें त्वांचि सर्व दात्यांला, ।
तोषविसि भक्तचातक जे, तूं कारुण्य सर्वदात्यांला[9]. ॥ ४
भोजन देशि मला तूं श्रीगुरुचें चरितनाम पंचसुधा[10]; ।
लागे रुचि अधिकाधिक जेंवि जया असलिया प्रपंच सुधा[11].' ॥ ५
सिद्ध म्हणे, 'मज भेटसि तूं भोक्ता अतिथि आजि रे! सत्य, ।
ऐकसि परि मननें फळ; पीतां[12] जेंव्यन्न बा! जिरे सत्य. ॥ ६
गुरुचरित षड्रसान्ना होसी कीं तृप्त जेवितां बोल? ।
आतां ऐक सुभोजन जाल्यांतीं घेति जेंवि तांबोल[13]. ॥ ७

---

१. माझ्या भाषणाला. २. राजा. ३. या अध्यायांत मुळांतील ५१ व ५२ आणि ५३ या अध्यायांतील कथाभाग सांगितला आहे. ४. स्त्रिया. ५. शिष्यश्रेष्ठ. ६. झष (मासा)+अंतरा (आंत). ७. भांड्यांत. ८. काकवी. ९. जल देणाऱ्यांना, मेघांना. १०. पंचामृत. ११. सरळ, चांगला. १२. बा! जेंवि सत्य (पाणी) पीतां अन्न जिरे—असा अन्वय. १३. विडा.

गुरु गाणगापुरासी आल्यावरि करिति आणिक विचार, ।
भक्त सकळ बोलाविति आणिक जे मुख्य शिष्य कवि चार. ॥ ८
म्हणती, 'गुप्तचि आतां राहुं मठीं; प्रकट बोल लोकांतें ।
जाऊं श्रीशैलासी. ऐका हें वाक्य बोललों कां तें. ॥ ९
म्लेंच्छाधिप भेटिस ये, जाता घेऊनि जाहला गेहा, ।
येतील यवन यास्तव ठेवावा गुप्त देह लागे हा. ॥ १०
श्रीपर्वतासि आतां जातों मलिकार्जुनीं मिळायास, ।
आतां येथें असतां येतिल यवन द्विजां छळायास.' ॥ ११
सकळहि म्हणती, 'कां गा! गुरुराया! त्याग आमचा करिसी? ।
पावों इच्छित अम्ही करितां तव अष्ट याम[1] चाकरिसी. ॥ १२
असतां रक्षक आम्हां तूं करणें काय सांग यवनांहीं? ।
न भिऊं आम्ही, भी न स्त्री भर्तृबळें जसी अयवनाही[2]. ॥ १३
रक्षक सोडवि जैसा व्याघ्रानें धरिलियाहि गाय वनीं, ।
असतां तैसा तूं मग करणें अम्हांस काय गा! यवनीं? ॥ १४
चुकतां बाळासि जसे कष्ट बहुत काननांत होतात. ।
तैशा तुझ्या वियोगें अम्हांला बहु मनांत हो! तात.' ॥ १५
श्रीगुरु म्हणति, 'करुं नका चिंता, मी धरुनि गुप्तरूपासी ।
राहें मठीं निरंतर, तसाच संगमिंचिया तरूपाशीं. ॥ १६
प्रातःस्नान सुकृष्णापंचनदीसंगमीं उदुंबरिं तें, ।
करिं माध्यान्हीं येथें सुसंगमीं स्थान हें पडे न रितें. ॥ १७
सद्भक्तासि दिसेन प्रत्यक्षचि सर्वदां मठामाजी, ।
न दिसेचि मात्र तनु[3] हे दुष्ट कुभक्ता नरा शठा मांजी. ॥ १८
ठेवीन पादुका या भावें, सर्वोपचारिं पूजाच, ।
नर्तन गायन करणें, नाहीं होणार षड्रिपूजाच. ॥ १९
इच्छित पावति मनिंचें पूजिति जे भक्त पादुका या हो! ।
व्याधिष्ठाची होइल सुंदर आरोग्य शुद्ध काया हो! ॥ २०
अश्वत्थ, संगमीं जो, पूजावा नित्य; अष्ट तीर्थासीं ।
आचरणें पर्वातें; आल्यासी चुकविती अनर्थासी. ॥ २१
ग्रामीं गणेशपूजा करोनि येऊनि, पादुका माझ्या ।
पूजा, इच्छित होइल सर्वहि चिंता[4] मनांत कामा[5] ज्या. ॥ २२

१. आठ प्रहर. २. अयौवना=लहान. ३. माझी तनु. ४. चिंताल, मनांत आणाल. ५. इच्छेला.

वर्तति ऐसे नर जे क्षणभरहि तयांसमोर नोंऽघ टिके.' ।
सांगुनि ऐसें श्री**गुरु** निघती **श्री**पर्वतासि ते घटिके. ॥ २३
बोळविती श्री**गुरु**सी तेव्हां सद्भक्त अष्टदश जाती, ।
वारंवार श्री**गुरु**पद भावें नमित गात यश जाती. ॥ २४
**गुरु** म्हणति तयां, 'दिसतों जातों लक्षोनि सर्व नगराजा; ।
परि गुप्त वसें स्वमठीं, पहा तुम्ही भक्त सर्व नगरा जा.' ॥ २५
भक्त सकळ परतोनी आले जों तों मठांत **गुरु** गा! ते ।
पाहुनि **गुरु**ची कीर्ती जाले आश्चर्य करुनि गुरु गाते. ॥ २६
म्हणती, 'त्रैमूर्ति खरा **गुरु** हा, याची अगम्य हे लीला; ।
कीर्तीगुणप्रकाशें लाजविलें शुक्रसोमहेलीला. ॥ २७
तों **गुरु** दिसति न कोणा, प्रेमळ भक्तांस मात्र ते दिसती, ।
यापरि धरोनि गुप्त स्वरूप **गुरु**राज ते मठीं वसती. ॥ २८
इकडे **श्री**नगमार्गें जाती श्री**गुरु** मनोजवानें ते, ।
पाताळ **गां**ग तीरा होति चतुःशिष्य तेथवां नेते. ॥ २९
मग म्हणती शिष्यांसी, 'आतां आणोनि रे! सुकुसुमाला, ।
गुंफुनि आसन करणें, सुमनें देऊं नये सुकुं, सुमाला. ॥ ३०
परतीरासी जाणें आहे **म**लिकार्जुनीं मिळायासी, ।
स्वस्थान पावतां खुण येतिल सुमनें तुम्हां कळायासी.' ॥ ३१
आणिति शिष्य सुकुसुमें जाती, सेवंति, माळती, जलजें, ।
वेष्टोनि कर्दळीचे पर्णें वरि शुद्ध शिंपिती जल जें. ॥ ३२
आसन विचित्र केलें घालिति **गं**गेचियांबुसावर तें, ।
वरते श्री**गुरु** बसती गुर्वाज्ञे होय अंबु सांवरतें. ॥ ३३
शिष्यांसि म्हणति, 'येतों प्रसाद धाडिन पवित्र गा! सुमनें. ।
ध्या वांटुनि मद्भक्ती करुनि असा, मच्चरित्र गा सुमनें. ॥ ३४
लिहिती, पढती, गाती ऐकति जे मच्चरित्र हो! यदेव, ।
तदघा जाळिन जैसें शुष्क विपिन जाळिताचि होय दंव. ॥ ३५
ते नांदति सुतपौत्रीं, जें इच्छिति मी तयांसि दे, वसत ।

---

१. न+अघ. २. श्रीपर्वतास. ३. मोठ्यानें. ४. शुक्र, चंद्र आणि सूर्य यांना. ५. सुकुं (वाळूं) देऊं नये. ६. चांगली माळ. हें 'करणें' (करा) याचें कर्म. ७. जाई. ८. कमलें. ९. अंबुसावर=पाण्यावर. १०. (पुष्पासन) उचलून धरणारें. ११. चांगल्या मनानें. १२. मनुष्य. १३. वणवा.

त्यांचे घरीं सदा मी, सदैव[1] मानिति तयांसि देव संत.' ॥ ३६
श्रीगुरु सांगुनि ऐसें परतीरा जाति न लगतां पल तें, ।
श्रीगुरुवियोगदुःखें ढाळिति नयनीं सुशिष्य पिप्पल[2] तें. ॥ ३७
भेटाते परतीरासी कैवर्तक[3] गुरु तयासि 'सांगावें' ।
म्हणती 'शिष्यांसी मच्चरित धरुनि भाव मानसां गावें. ॥ ३८
न करा चिंता म्हणणें, राहें वसवोनि गाणगानगर, ।
मद्भक्तांसि भवाचें[4] बाधि कदा मच्चरित्र गा! न गैर. ॥ ३९
सुमनें प्रसाद घेउनि, जिंकुनियां कोप, पंचरोप[5] असां.' ।
जाती श्रीगुरु सांगुनि नावाड्यापासि ते निरोप असा. ॥ ४०
नावाडी शिष्यांसी ऐलतटीं[6] गुरुनिरोप सर्व जसा ।
सांगुनि, म्हणती, 'पाहूं गुरु अम्ही जेंवि शर्व[7] सर्व[8] तसा ॥ ४१
दंडकमंडलु हातीं पदकमळीं पादुका सुमरुताच्या[9], ।
सांगुनि निरोप गेला, मागें टाकुनि जवां[10] सुमरुताच्या.' ॥ ४२
शिष्ये प्रसाद लक्षित होते गंगातटीं धरुनि आली[11,12], ।
तों चारपुष्पपंक्ती वाहत गंगाजलावरुनि आली. ॥ ४३
काढोनि मुख्य शिष्ये घेती तेव्हां प्रसाद कुसुमांतें. ।
शिष्य म्हणे सिद्धासी, 'ये शंका ही मनीं नवें सु मातें. ॥ ४४
कोण वदा मजलागीं श्रीगुरुचे मुख्यशिष्य अवघे ते ।
घेते प्रसाद जाले, त्यांतुनि जे मुख्य शिष्य चवघे ते.' ॥ ४५
सिद्ध म्हणे, 'तीर्था जे गेले चातुर्थ आश्रमीं होते; ।
ज्यांचा गृहस्थ आश्रम गेले गा! आपुल्याऽश्रमीं[13] हो! ते. ॥ ४६
येति तिघे श्रीगुरुच्या सांगातें मीहि येत चवथा रे! ।
नामें नंदि नृहरि कवि ज्याच्या कवितारसा सुचव[14] धारे[15]. ॥ ४७
सायंदेव द्विज जो, तिसरा तो कीं तुझाच पूर्वज गा! ।
चवथा मी; सुमनें तीं घेऊं[16] मग दाखवूं अपूर्व जगा. ॥ ४८
संवत्सर बहुधान्योत्तरायण शिशिर, तमारि[17] कुंभास[18], ।

---

१. सत (चांगले लोक) तयांसि सदैव (सदोदित) देव मानिति. २. अश्रु? ३. नावाडी, कोळी. ४. भवाचें गर=संसाररूपी विष. ५. काम. ६. अलीकडील तीरीं. ७. शंकर. ८. विष्णु. ९. सोन्याच्या. १०. मोठ्या वाऱ्याच्या वेगाला. ११. रांग. १२. नवी. १३. आपुल्या+आश्रमीं (घरीं). १४. माधुर्य. १५. राही. १६. कर्ता 'आम्ही चौघे' अध्याहृत. १७. सूर्य. १८. कुंभराशीस.

असतां श्रीगुरु राहे गुप्त असा दाविला जना भास. ॥ ४९
माघांत कृष्णपक्षीं पुण्यतिथी प्रतिपदेस भृगुवारीं, ।
मल्लिकार्जुनें मिळुनि गुरू भक्ताचे भवभया [1]सदि निवारी. ॥ ५०
तों आले तीर्था जे गेले होते सुशिष्य ते सर्व, ।
गुरु गुप्त होति ऐकुनि गाळिति नयनीं समस्त ते [2]सर्व. ॥ ५१
तों गुरुवाक्य स्मरुनी आला तो यवनराव गुरुभक्त, ।
गुरुसेवार्थें त्यजुनी दासासुतराज्य होउनि विरक्त. ॥ ५२
मग ते सच्छिष्य सकळ श्रीशैलीं मल्लिकार्जुन शिवाचे, ।
राहुनि समोर गुरुच्या प्रेमें उच्चारिती स्तुतिशि वाचे. ॥ ५३
'जय जय गुरो! दयाब्धे! श्रीवल्लभ! नरहरीसरस्वति! हे! ।
वर्णाया तव कीर्ती शक्त नसे आमची [3]सरस्वति हे. ॥ ५४
तारावयासि भक्तां अवतरसी साच [4]मित्रवैश्रवण, ।
केलें गाणगनगरीं चरित्र अम्हांसि जाहलें श्रवण. ॥ ५५
आज्ञा देसी तीर्था सांगुनि अम्हां करोनि [5]अव [6]नीती, ।
आलों तव आज्ञेनें हिंडुनि तीर्थें करोनि [7]अवनी तीं. ॥ ५६
चालूं तव आज्ञे कीं, न धरूं सहसाहि मार्ग [8]बहुधान्य, ।
या श्रीनगासि म्हणसी भेटिस येतांचि वर्ष बहुधान्य. ॥ ५७
आज्ञेप्रमाण आलों, दे दर्शन, पायिं होउं रत साच.' ।
हृदयीं चिंतुनि गुरुचें ध्यान विनवि यवन नरवर तसाच. ॥ ५८
श्रीगुरु मग तत्काळ प्रकटे रवि जेंवि उदयअद्रीतें, ।
ठेवुनि मग शिवचरणीं, त्या नमिती सर्व [9]सदय अद्रीतें. ॥ ५९
श्रीगुरु मग म्हणति तयां, 'आतां जा, गाणगानगरवास ।
करुनि असा; गा माझें चरित्र चित्तीं, धरा न गर्वास. ॥ ६०
जेथें जेथें माझीं स्थानें तेथें सदां अभंग वसें, ।
गवसें न अभक्तांसीं, प्रेमळ सद्भक्त जे तयां गवसें.' ॥ ६१
तों म्लेंछाधिप गुरुमुख अवलोकी जेंवि कीं [10]चंरस मोर, ।
त्यागी तत्काल यवन देहा तेथेंचि तो गुरुसमोर. ॥ ६२
तों ये शिवलोकाहुनि विमान दैदीप्य जेंवि ते [11]चपला, ।

१. सदा. २. उदक, अश्रु. ३. वाणी. ४. वैश्रवणाचा (कुबेराचा) मित्र, शंकर. ५. रक्षण. ६. नीतीनें. ७. पृथ्वीवरील. ८. बहुधा+अन्य. ९. दयेच्या पर्वतास. १०. मेघास. ११. वीज.

पावोनि दिव्य देहा **शि**वलोकीं जाय भूप ते[1] च पंला[2]. ॥ ६३
**सि**द्ध म्हणे, 'शिष्यापरि ऐसी देऊनि मुक्ति भूपातें, ।
नेत्राचें न लवे जों अदृश्य होती **गु**रु प्रभू पातें. ॥ ६४
मग सकळ शिष्य मिळुनी आले **गा**णगपुरास खिन्नमन, ।
तों **गु**रु मठांत देखों आनंदें मग करूं पदीं नमन. ॥ ६५
पाहूं सर्वेचि तों **गु**रु न दिसे, ध्यानांत चिंतु जंव दावी ।
प्रकट वपु[3] श्री**गु**रु तो, तल्लीला किति म्हणुनि तुज वदावी. ॥ ६६
गुप्त वपु[3] धरुनि ऐसा सर्व स्वस्थानीं संत राहे तो, ।
भजतां अरिष्ट नाशुनि पुरवी जो भक्तअंतरा हेतो. ॥ ६७
लीला चरित अपारचि त्यांतिल सांगीतलेंचि सार तुला, ।
वदवे न सर्व कोणा, करवेना जेंवि सिंधुनीरतुला[4].' ॥ ६८
ऐसें हें **गु**रुचरित श्रवण पठण करित नित्य मानव तो, ।
इच्छित पावोनि तया स्वपदीं नेवोनि सत्य मानवतो. ॥ ६९
एकावर्तन[5] करितां पोटीं सत्पुत्र भक्त होतोची, ।
त्रैपाठें कारागृह[6] **गु**रु येउनि करित मुक्त हो! तोची. ॥ ७०
नित्यावर्तन करि जो त्या गोष्पदजल[7] तसाच भव सर्व. ।
भवसर्वलोकवासा[8] दे त्या इच्छित **गु**रु प्रभव सर्व. ॥ ७१
सप्तदिनीं जो वाची देतो सत्पुत्र **गु**र्वपि[9] तयाला. ।
**रा**मात्मजपुत्र म्हणे, ये अनुभव माझियाच पितयाला. ॥ ७२
श्री**गु**रुचरणीं म्हणउनि भक्ती मजलागीं सर्वदा साची, ।
संगति घडो मज सदा श्री**गु**रुच्या पूर्ण सर्व दासांची. ॥ ७३
बैसोनि हृत्सरोजीं वदवी हा ग्रंथ **गु**रु दयावंत, ।
श्री**गु**रुवरप्रसादें राव्हो‌ऽक्षय[10] सूर्यचंद्र यावंत[11]. ॥ ७४
अध्याय सप्तपंचक[12] हे मुनिदिन[13] भक्ति जो वदे, वाची, ।
तो सर्वेच्छित पावे सुकृपा होऊनि देवदेवाची. ॥ ७५
श्री**गु**रुवरप्रसादें निर्मे सुग्रंथ कल्पपादप हा, ।

---

१. ते क्षणीं. २. नेत्राचें पातें. ३. रूप. ४. समुद्राच्या पाण्याचें वजन. ५. एकदां वाचल्यानें. ६. बंदिखान्यापासून मुक्त. ७. त्या सर्व भव (संसार) गोष्पदजल तसाच (गाईच्या पावलाच्या खळग्यांतील पाण्याप्रमाणें—तरून जाण्यास सोपा). ८. शंकर आणि विष्णु यांच्या लोकीं वास. ९. गुरु+अपि. १०. राव्हो+अक्षय. ११. जोंपर्यंत. १२. पसतीस. १३. मुनि-(सात)+दिन(दिवस).

जप हाचि नित्य करितां श्रीगुरुचे निर्विकल्प पाद पहा. ॥ ७६
भावें येत प्रतिती, अभाविकांचे मनांत शंका ये, ।
मग कैंचें फळ? कैंचें शिरतां कंटकवनांत[१] शं[२] काये? ॥ ७७
वर्णीत परशुराम श्रीगुरुची अशि अनेक लीला ही, ।
लाही आनंदसुखा सुकथा पळवीतसे कलीला ही. ॥ ७८
आर्यासमस्तहि त्रैय[३] सैहस्र, वैर[४] सेप्त[५], अशीं[६] वर[७] त्या, ।
अर्पण केल्या गुरुसी श्रवणपठणिं सर्व दुःख आवरल्या. ॥ ७९

---

## गुरुचरित्रसारमनोरमा.

श्लोक (कामदा).

वंदितों गुरो! पादकल्हरा, भक्त जी! तुम्ही हा करा धरा ।
ज्ञानवर्णना द्या बरें तरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ १
नाशिसी सदा भक्तविघ्न रे! दर्शनें तुझ्या पापि जो तरे ।
प्रार्थितों तुला जोडिल्या करीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ २
तारिले बहू त्वां अघाचळ, लागलें नसे एकही पळ ।
ख्याति हे उरे हाचि कांऽतरीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ३
भक्त जो तुझा नामकर्णि तो, कष्ट पावतां, नाम कर्णि तो ।
ऐकुनी तुझें ध्यान अंतरीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ४
दर्शना निघे ध्यात हृन्नभीं, नेत्र वाहती प्रेमिच्या नभीं[८] ।
चालतां पथीं स्तोत्र[९] तो करी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ५
भेटला पथीं त्यास सिद्ध तो, शिष्य जो तुझा कीं प्रसिद्ध तो ।
ठेवितो शिरा तत्पदावरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ६
सिद्ध तो करा त्याचिया शिरीं, ठेवुनी कृपा त्यावरी करी ।
त्वत्कथा वदे त्यास वैखरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ७
श्रीगुरूपदा सेवि दीपक, आदि ते कथी पापलोपक ।
अंबरीष आख्यान त्यावरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ८
त्यावरीहि दत्तावतारसी, भक्त जे महा त्यांस तारिसी ।

---

१. कल्याण, सुख. २. शरीराला. ३. तीन हजार. ४. आणीक. ५. सातशें. ६. ऐशीं. ७. त्यावर. एकून ३७८०. ८. जलानें, अश्रूंनीं. ९. स्तव, स्तुति.

ते कथा वदे सिद्ध त्यावरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ९
तोचि दत्त तूं त्या पिठापुरी, पूजितां तुला विप्रअंतुरी।
पुत्र होसि श्रीपाद तद्धरीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ १०
हिंडुनी सुतीर्थें महाधरा, दर्शनेंचि जे भक्त उद्धरा।
पातलां जि गोकर्ण नागरीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ११
तेथिचे महात्माचि जे कथा, सिद्ध ते वदे वर्तली यथा।
येशि तेथुनी कूरवापुरीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ १२
सांगसी व्रता विप्रे[1]कामिनी, जें त्रयोदशी मंदे[3]यामिनी।
देशि तत्सुता ज्ञान अंतरीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ १३
भक्त मग तुझा जो परीट त्या, देशि राज्य कीं सौख्य नीट त्या।
अंतिं तारिसी बा! कृपा करीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ १४
भक्त मारितां पंथिं तस्करीं, सिंचुनी विभूती तयावरी।
जीववूनि तो, मारिसी अरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ १५
आचरे व्रता विप्रसुंदरी, ध्या[4]वतार जी! तच्छु[5]भोदरीं।
भक्तरक्षणा त्वत्कृपा बरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ १६
निंदिती जनीं वेद[6] आश्रमा, साधुभक्त तैं पावती श्रमा।
ध्या म्हणोनि त्या आश्रमा हरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ १७
स्थापुनी असा आश्रमा तया, भक्त जे तयांऽनुग्रहीत या।
हारिली व्यथा जे द्विजोदरीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ १८
भक्त जो प्रिय म्लेंछ गांजितां, दंडुनी तया होसी रक्षिता।
देशि त्या वरा तोष अंतरीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ १९
तीर्थ आचरायासि शिष्य ते, धाडितां क्षिती जाति तुं[7]ष्यते।
तीर्थ सांगसी त्यांस वैखरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ २०
बोधुनी यती सांगुनी कथा, दाविसी तया सद्गुरूपथा।
धाडिसी गुरूपासिं नंतरीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ २१
गुप्त राहुनी त्या उदुंबरीं, विप्रबाळका ज्ञान अंतरीं।
देशि येशि या कूरवापुरीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ २२
कृष्णिसंगमीं राहुनी वना, विप्रमंदिरीं जासि भोजना।

---

१. विप्रस्त्री. २. विप्रस्त्रियेला. ३. शनिप्रदोष. ४. ध्या+अवतार. ५. तत् (तिच्या)+शुभ+उदरीं. ६. चतुर्थाश्रमाला. वेद=चार. ७. आनंदानें.

दैन्यवेलि ते छेदिसी पुरी, हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ २३
पूजिती तुला नित्य योगिनी, आपुले गृहा नीरिं नेउनी ।
स्थापिसी तयां गा! उदुंबरीं, हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ २४
**गां**गसूनुला देउनी वरा, त्रिस्थळी[1] तया दाविसी नरा ।
देसि बा! निधी[2] वृत्तिभीतरीं[3], हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ २५
पादुकासि तूं गा! उदुंबरीं, ठेविसी तया विप्रअंतुरी ।
पूजि पुत्र ते पावली बरी, हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ २६
दोहवीसि जे वांज कासरी[4], दर्शनें कृपा भूप[5] त्यावरी।
वर्तसी जसें त्या नृपांतरीं, हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ २७
तारिले ब्रह्मा[6] दर्शनें तुवां, **भा**रती यती निंदि जेधवां ।
विश्वरूप तूं दाविलें **ह**री, हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ २८
येति विप्र जे क्षोणि जिंकित, ते तुझ्या पुढें गर्व दावित ।
हारिसी पतीताचिया करीं, हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ २९
तो पतीत त्या भस्म सिंचुनी, वेद वदविले ज्ञान देउनी ।
**भा**रती यती विस्मया करी, हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ ३०
**भा**रती यती हेंचि कारण, तो पुसे तुला भस्मधारण ।
सांगसी तया हर्षनिर्भरीं, हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ ३१
**द**त्त विप्र जो व्याधि त्यास ती पीडितां, तुझ्या दर्शना सती ।
आणितां मरे **गा**णगापुरीं, हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ ३२
शोकितां सती, योगि होउनी, बोधिसी तिला ज्ञान देउनी ।
देशि रुद्रअक्षा तिचे करीं, हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ ३३
आणितां तुझ्या दर्शना शवा[7], पीयुषाक्षि[8] तूं आणिसी जिवा ।
तत्सती स्तवी गा! परोपरी, हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ ३४
रुद्ररुद्रअक्ष प्रकीर्तिला, सांगसी व्रता सोमवार तिला ।
देउनीच्छिलें[9] धाडिसी घरीं, हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ ३५
कर्ममार्ग तो विप्र जो पुसे, सांगसी तया हर्षमानसें ।
देसि गा! वरा त्यासि त्यावरी, हे **गुरो** दयाब्धे **नृ**केसरी! ॥ ३६
तीन शेर जो विप्र तंडुला, आणुनी म्हणे पूजितों तुला ।

---

१. गया, प्रयाग आणि वाराणशी. २. द्रव्याचा सांठा. ३. शेतांत. ४. म्हैस. ५. राजाच्या इच्छेप्रमाणें. ६. ब्रह्मराक्षसास. ७. प्रेताला. ८. अमृतदृष्टीनें. ९. देउनि+इच्छिलें=इच्छिलेलें देऊन.

अंगिकारिसी जे तदंतरीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ३७
तेच तीन जे शेर त्यामधीं, तृप्त चार हज्जार ते तधीं।
जेववीसि आश्चर्य भूवरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ३८
वांज[1] जी तुला आरती करी, देशि गा! तिला पुत्र कूसरी।
देशि नातुही पांच त्यावरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ३९
दृष्टिनें हरे! विप्रकुष्ट तो, जाहला तरू शुष्क काष्ट तो।
विप्र तो स्तवी गा! परोपरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी!॥ ४०
प्रीतिचा तुझा भक्त त्याचिया, पाहुनी मना दाविसी तया।
काशिची सुयात्रा परोपरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ४१
सांगसी अनंताच्चिया व्रता, पूर्विंची तया सांगुनी कथा।
ठेविसी तया गाणगापुरीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ४२
सेवितां तुला भक्त तंतिकीं, दाविसी पटीं जेंवि तंतु कीं।
श्रीनगीं स्वरूपासि त्यापरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ४३
देवि सेवुनी दर्शना तुजा, नंदि नाम ये विप्र त्या द्विजा।
बा! करीसि तूं दिव्य शारिरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ४४
नाम ज्या तुझें विप्र तो हरा! पूजितां स्वरूपा मनोहरा।
दावितां तुवां स्तोत्र तो करी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ४५
दीपवाळिसी शिष्य सात ते, आपुले घरीं पाचरीत ते।
जासि सात रूपें तया घरीं, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ४६
शूद्र तो तुझी भक्ति जो करी, त्याचि वासना पुरविसी पुरी।
शेत जें पिके त्या नसे सरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ४७
गाणगापुरीं काशि आणिली, क्षोणिचीं सुतीर्थेंहि दाविलीं।
ख्यात केलि तैं ते महापुरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ४८
जो परीट त्या राज्य दीधलें, म्लेंछ होय तो सौख्य भोगिलें।
व्रण होय तन्मांडियेवरी[2], हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ४९
दुःख पावतां दर्शना तुजा[3], येउनी नमी पादअंबुजा।
व्रण दर्शनें वारिसी दुरी, हे गुरो दयाब्धे नृकेसरी! ॥ ५०
गुप्त कूरवागाणगापुरीं, राहुनी निघा श्रीनगा परी।
रामनातुच्या अंघ्रि अंतरीं, स्थापिले गुरो हे नृकेसरी! ॥ ५१

---

१. वंध्या स्त्री. २. त्याच्या मांडीवर. ३. तुझ्या.

एकावन्न मनोरमा करुनियां हा श्रीगुरूचा स्तव,
केला श्रीगुरुचें चरित्रखिल तत्सारांश हा यास्तव ।
भावें वाचिति ऐकतीहि लिहिती श्रीवास तत्सद्मनीं[1],
राहे स्थैर्य अनुग्रहीत[2] गुरुचें यद्रूप तत्सन्मनीं[3]. ॥ १

---

१. त्याच्या घरीं. २. कृपा. ३. तत्+सत्+मनीं=त्याच्या चांगल्या मनांत.

## पहिल्या ११ अध्यायांतील

# पाठांतरें, अधिक टीपा वगैरेचें परिशिष्ट.

| ध्याय. | गीति. | मूळ. | खुलासा. |
|---|---|---|---|
| १ | (टीप १) | यांची समाधि | 'यांच्या पादुका' असें वाचावें |
| ,, | ६० | उत्तरार्ध– | कपिला वपुला (कपिला गाईच्या आंगाला) [जो] देखे त्याला ती जसि तोष दे इत्यादि अन्वयार्थ |
| , | ९७ | अजा | अजी! (वाडी प्रतीचा पाठ) |
| २ | २ | होतां पाही | होउनि पाहे ( ,, ) |
| , | २५ (पूर्वार्ध) | | विधिनें त्रिजग रचिलें हें व्यास त्रयदशादिकां (देवांना) सांगे |
| , | २९ | तें | तो (वाडीप्रत) |
| , | ४६ (टीप ६) | परमेश्वरपर | 'कर्मार्थी' असें वाचावें |
| , | ६७ | जो | तो (वा. प्र.) |
| , | ७२ | करुनि | करिन ( ,, ) |
| | १५ | प्रथमचरण | दृढभक्ति तेचि भक्ता कृपा करी जननि बाळकासरि ती (वा. प्र.) |
| | २६ | होवो | होतो ( ,, ) |
| | ३२ | मद्गत पर्वि धरत्रिद श (?) | मद्गत पर्वि धरत्रि दश ( ,, ) अर्थ–मीं ऐकिलेल्या कथेंत पृथ्वीवर दहा वेळां इत्यादि |
| | ३८ | जि! सांगु निते | चि सांगुनि तें (वा. प्र.) |
| | ५२ | रि (द्वि?) पावर | रिपावर (वा. प्र.) अर्थ–पृथ्वीवर |
| | ३१ | कपणि | अर्थ–कफनी, बैराग्याचा अंगरखा |
| | ३३ | साहज | अर्थ–सहज |
| | पृ. ३० टी. १० | श्रीनृसिंहसरस्वतीकृत गुरुचरित्राच्या | मूळ (सिद्धकृत) गुरुचरित्राच्या |
| | ७ | पूजीतो | पूजी जो (वा. प्र.) |
| | ८ | विधिसह | विधिहरि ( ,, ) |
| | १३ | जियेचा | तियेचा ( ,, ) |

| अध्याय. | गीति. | मूळ. | खुलासा. |
|---|---|---|---|
| ५ | ३४ | सर्वतांस | सर्व तास ( ,, ) अर्थ—सर्वकाल;तास म्हणजे २॥ घटका |
| ,, | ३५ | नसे ययातें | नसेचि यातें (वा. प्र.) |
| ,, | ८४ | 'न; शब्द न आतां दुःपवि (?) तुवां मज वदावी | न शब्द, न आतां दुःपवि तुवां मज वदावी. अन्वयः—आतां मज शब्द न, तुवां दुःपवि न वदावी. अर्थः—आतां मजकडे शब्द नाहीं; तूं दुर्भाषणें बोलूं नयेस |
| ६ | २८ | दूहिता | दौहिता (वा. प्र.) अर्थः—नात |
| ,, | ३२ | ऐक हें अवश मेना | ऐक हे अवश मेना (वा. प्र.) अर्थः—हे (ही) मेना (वाणी, भाषण) अवश (अवश्य) ऐक |
| ,, | ४९ | मज नमुनि मुनि! | मुनींद्र गमुनि असे (वा. प्र.) |
| ,, | ५३ | नृपा! | रिपा (वा. प्र.) अर्थः—पृथ्वी |
| ,, | ५८ | नित्य | नृत्य ( ,, ) |
| ७ | ३ | कितीक | किती मि ( ,, ) |
| ,, | ५ (टीप ७) | कुरुंदवाडास | त्याचप्रमाणें अमरपूर=औरवाड. त्या वेळीं वाडी येथें वस्ती नव्हती म्हणून ही पुढील हकीकत कवीनें लिहिली असावी |
| ,, | ९ | तो | जो (वा. प्र.) |
| ७ | ३७ | | या गीतींतील पूर्वार्ध व उत्तरार्ध वाडीप्रतीच्या उलट आहेत |
| ,, | ३८ | दैन्य बैस कां व्यालां? | दे न बैसका व्याला (वा. प्र.) अर्थः—हृदीं दुःखाचे व्याला (दुःखसर्पाला) बैसका न दे (राहूं देऊं नको) |
| ,, | ४० | घताचि दिन (?) | घृताचिदिन (वा. प्र.) अर्थः—घृताचि=रात्र. दिन=दिवस |
| ,, | ४९ | अपूर्व | अपार (वा. प्र.) |

| ध्याय. | गीति. | मूळ. | खुलासा. |
| --- | --- | --- | --- |
| ७ | ५४ | नु, | नु. अर्थः–शीघ्र (वा. प्र.) |
| ,, | ५९ | हेळि (?) | हेलि (वा. प्र.) अर्थः–सूर्य |
| ,, | ६४ | ते | हे ( ,, ) |
| ,, | ६७ | प्रकाशयुत गेह ती | प्रकाश पाहुनि गृहा निरीक्षित (वा. प्र.) |
| ,, | ७० | तत्पदांचें तें. | पदाशि वाचेते (वा. प्र.) |
| ८ | ५ | सेवे, | सेवेसि ( ,, ) |
| ,, | ९ | रायाची | रायासी |
| ,, | २३ | विदुरा (?) | विदुरा, अर्थः–बेदर |
| ,, | ३१ टीप १५ | | रिपा=पृथ्वीवर |
| ,, | ४९ | होता | होती |
| ,, | ६१ | अक्षर | अक्षत (वा. प्र.) |
| | ६ | मग्न | निमग्न |
| ,, | ४६ | म्हणुनि 'ये' | 'म्हणुं हि ये' (वा. प्र.) |
| ,, | ५५ | आम्हा तयांत | आम्हांस यांत ( ,, ) |
| ,, | ६० | बहु | बहु ( ,, ) |
| ,, | ६२. | बोलका | बोलता ( ,, ) |
| | १ | सांगेंचि | सांगें जि! ( ,, ) |
| | ५ | घे | गे ( ,, ) |
| | १४ | भवाब्धिसी हे तुं मार्ग | भवाब्धितें हे सुमार्ग (वा. प्र.) |
| | १५।१६ | | वाडीप्रतींतील ह्या आर्या उलट आहेत |
| | ६४ | श्रीकृष्णें | कृष्णें गुरु (वा. प्र.) |
| | ६९ | प्रश्नोत्तर | प्रश्नाक्षर ( ,, ) |
| | ७६ पू. | नंद | नय ( ,, ) |
| | उ. | वृद्ध | वृंद ( ,, ) |
| | ८४ | उपदेशी | उपदेशिति ( ,, ) |
| | ८८ | कशा यती | कशासि यति ( ,, ) |
| | ८९ | रे | ते ( ,, ) |
| | ९२ | वासुदेव दत्ताचें ? | वासुदेव दत्ताचें ( ,, ) अर्थः– दत्ताचें=यमाचें |

| अध्याय. | गीति. | मूळ. | खुलासा. |
|---|---|---|---|
| १० | १०५ | स्वस्वरूप दावित ही | स्वरूप दाविता तें ही (वा. प्र.) |
| ११ | ६ | नुजगा ? | **जनु**गा (वा. प्र.) अर्थ–जनूपासून निघालेली; जान्हवी; गंगा |
| ,, | १८ (टीप १) | स्नानादिक | उदकस्पर्श |
| ,, | ३४ | **गं**गेतें | **गं**गेच्या (वा. प्र.) |
| ,, | ६३ | मांडी | मांडुनि ( ,, ) |
| ,, | ६४ पू. | **जो**खाई | **जा**खाई ( ,, ) |
| ,, | ,, उ. | जो | जा ( ,, ) अर्थ–जा खाई=खाल्ला जाई |
| ,, | ११६ टी. ११ | | कुणगेली=लहान कणगींत |
| ,, | ,, टी. १२ | | कुणगा=धान्यसंग्रह |